# छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन एक अभ्यास

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या
मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रे विद्याशाखे अंतर्गत
इतिहास विषयातील पीएच.डी.पदवीकरीता सादर केलेला प्रबंध


- संशोधक -

श्री. राजाराम रामदास सोनवणे

(इतिहास विभाग प्रमुख)

ॲड्. एम.एन.देशमुख महाविद्यालय राजूर,

ता. अकोले, जि. अहमदनगर.

कायम नोंदणी क्रमांक : SRO २०००७५






- मार्गदर्शक -

प्रा. डॉ. त्रिंबक भिमराज राजदेव

(इतिहास विभाग)

सहकार महर्षि भाऊसाहेब संतुजी थोरात महाविद्यालय, संगमनेर,

ता. संगमनेर, जि. अहमदनगर.


यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक.

दि. ११ नोव्हेंबर, २०११

# प्रतिज्ञा प्रमाणपत्र

मी श्री. सोनवणे राजाराम रामदास असे प्रतिज्ञापूर्वक जाहिर करतो की, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या पीएच.डी. (इतिहास) पदवीसाठी सादर केलेला "छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन एक अभ्यास" हा प्रबंध मी स्वतः लिहीलेला असून पुर्णपणे स्वतंत्र आहे. या प्रबंधात आवश्यक तेथे पुर्वसूरींच्या मतांची ऋणनिर्देशपूर्वक नोंद केलेली आहे.

हा प्रबंध इतर कोणत्याही विद्यापीठात व अन्य कोणत्याही पदवीसाठी सादर केलेला नाही. सन २०११ मध्ये यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठात प्रथम पीएच.डी. (इतिहास) पदवीसाठी सादर करीत आहे.

ठिकाण : राजूर

दिनांक : १०/११/११

**श्री. सोनवणे राजाराम रामदास**

एम. ए. (इतिहास) एम. फिल.
ॲड्. एम.एन.देशमुख महाविद्यालय राजूर,
ता. अकोले, जि. अहमदनगर.

# मार्गदर्शकाचे प्रमाणपत्र

मी असे प्रमाणित करतो की, श्री. सोनवणे राजाराम रामदास यांनी "छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन एक अभ्यास" हा प्रबंध यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रे विद्याशाखेतंर्गत पीएच.डी. (इतिहास) पदवीसाठी सादर केलेला आहे.

प्रस्तुत प्रबंध हा श्री. सोनवणे राजाराम रामदास यांचा स्वतः चा आहे. त्यासाठी त्यांनी अस्सल विश्वासनीय साधनांचा वापर केला असून तो माझ्या मार्गदर्शनाखाली स्वतंत्ररित्या लिहीला आहे. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाच्या पदवीच्या पूर्ततेसाठी तो सादर करण्यात येत आहे.

**ठिकाण : संगमनेर**

**दिनांक : १०/११/११**

सही

10/11/2011

**नाव : प्रा. डॉ. त्रिंबक भिमराज राजदेव**

*(इतिहास विभाग)*

सहकारमहर्षि भाऊसाहेब संतुजी थोरात

महाविद्यालय, संगमनेर, जि. अहमदनगर

# ऋणनिर्देश

“छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन एक अभ्यास” या संदर्भात प्रस्तुत प्रबंधात शोध घेण्याचा मी प्रयत्न केला आहे. कारण राजकीय जीवनाबरोबरच तत्कालीन लोकजीवनाचाही अभ्यास झाला पाहिजे. म्हणून प्रस्तुत विषय मी संशोधनासाठी निश्चित केला आहे. प्रस्तुत प्रबंध सादर करण्यासाठी ज्या संस्था व व्यक्तींनी मला मौलिक मार्गदर्शन व सहाय्य केले त्यांचा किमान नामनिर्देश केल्याने काहीसे वचनमुक्तीचे समाधान मिळेल.

प्रथम मला बुध्दी आणि प्रेरणा देणाऱ्या परमेश्वराला, गुरूजनांना आणि वडील मंडळींना वंदन !

माझ्या प्रबंधाचा विषय “छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन एक अभ्यास” हा आहे. हा विषय निवडण्याचे कारण म्हणजे मराठयांच्या इतिहासामध्ये छ. शिवाजी महाराजांनंतर छ. संभाजी महाराजांचे योगदान महत्त्वपूर्ण असताना तत्कालीन इतिहास लेखनात संभाजीमहाराजांच्या राजकीय व सामाजिक इतिहासलेखन करतांना एक प्रकारे अन्याय केला आहे. परंतू नवीन प्राथमिक ऐतिहासिक साधनांमधून त्यांच्या राजकीय जीवनावर प्रकाश टाकून इतिहासाचे पुर्नलेखन करण्याच्या प्रयत्नाचा एक भाग म्हणून या विषयावर प्रबंध लिहीण्याचे मी निश्चित केले.

हा विषय संशोधनासाठी निश्चित करण्यात माझे मार्गदर्शक डॉ. त्रिंबक राजदेव सर यांचे मोलाचे सहाय्य लाभले.

माझ्या विषयाच्या अभ्यासाच्या निमित्ताने गुरूवर्य डॉ. त्रिंबक राजदेव सर यांचे मार्गदर्शन मला लाभले हे मी माझे भाग्य समजतो. त्यांच्या ऋणातून मी कधीच मुक्त होणार नाही. त्यांच्या मार्गदर्शनामुळेच मी हा प्रबंध लवकर पूर्ण करू शकलो. तसेच प्रा. डॉ. रमेश वरखेडे सर, संचालक मानव्यविद्या व सामाजिकशास्त्रे विद्याशाखा यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ नाशिक, प्रा. डॉ. राजदेरकर, प्र. संचालक मानव्यविद्या व सामाजिकशास्त्रे विद्याशाखा यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ नाशिक तसेच मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रे विद्याशाखेतील कर्मचारी श्री. शिंदे सर यांनी मला वेळोवेळी सहकार्य केले त्याबद्दल मी त्यांचाही ऋणी आहे.

तसेच सत्यनिकेतन संस्थेचे अध्यक्ष ॲड्. एम. एन. देशमुख साहेब, संस्थेचे सचिव मा. मो.कृ. घिगे व प्राचार्य कानवडे टी. एन.(ॲड्. एम.एन. देशमुख महाविद्यालय, राजूर), मा. प्रशांत पाटील गडाख, (सिनेट सदस्य, पुणे विद्यापीठ), प्रा.पुरणाळे सोपानराव (न्यू आर्टस कॉमर्स व सायन्स कॉलेज, शेवगांव), प्रा. डॉ. भामरे राजेंद्र (अध्यक्ष, इतिहास अभ्यास मंडळ, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. कठारे अनिल (श्री. छत्रपती शिवाजी महाविद्यालय, कंधार, जि. नांदेड), प्रा. गिरीमकर के. एल. (के.जे.सोमय्या महाविद्यालय, कोपरगाव), प्रा. सोनवणे दिगंबर (कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय, सोनई, ता. नेवासा), प्राचार्य डॉ. फसले मच्छिंद्र (आबासाहेब काकडे महाविद्यालय, बोधेगाव, ता. शेवगाव) , प्रा. डॉ. मोकाटे नाथा , (बी.डी. काळे महाविद्यालय, घोडेगांव. सदस्य इतिहास अभ्यास मंडळ पुणे विद्यापीठ) उंदरे राजेंद्र (सरपंच, ग्रामपंचायत नविन चांदगाव, ता. नेवासा), डॉ. गायकवाड दिपक (इतिहास विभाग, पुणे विद्यापीठ) माजी प्राचार्य आगळे रघुनाथरावजी (श्री ज्ञानेश्वर महाविद्यालय, नेवासा) इ. मान्यवरांचे बहुमोल मार्गदर्शन मला मिळाले, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

तसेच माझे वडील श्री रामदास सोनवणे, आई सुमन सोनवणे, मुलगी चि. भावना सोनवणे, मुलगा चि. शिवम सोनवणे, भाऊ श्री. गोकुळ सोनवणे, मित्र प्रा. डॉ. द.के. गंधारे, प्रा. अशोक कानडे, प्रा एल.बी. काकडे, प्रा. एल.एल. वाळे, प्रा. के.जे. काकडे, प्रा. बी.टी. शेणकर , प्रा. व्ही.एन. गिते, प्रा. एन. के.म्हस्के , प्रा. सी. एन. कोतकर यांनी दिलेले प्रोत्साहन, सहकार्य याबद्दल मी त्यांचा सदैव कृतज्ञ राहणेच योग्य ठरेल.

तसेच या शोध प्रबंधाचे अत्यंत तत्परतेने टंकलेखन व आकर्षक पध्दतीने बांधणी करणारे प्रतिक्षा कॉम्प्युटर, राजूर, ता. अकोले यांचेही मी मनःपूर्वक आभार मानतो.

**श्री. राजाराम रामदास सोनवणे**

*(इतिहास विभाग प्रमुख)*

ॲड्. एम.एन.देशमुख महाविद्यालय राजूर,

ता. अकोले, जि. अहमदनगर

# अनुक्रमणिका

# प्रकरण १ ले : प्रस्तावना

## प्रकरण पहिले

# प्रस्तावना

### १.१ प्रास्ताविक

मध्ययुगीन भारताच्या इतिहासात मोगलांच्या आक्रमणाचे लोकजीवनावर दूरगामी परिणाम झालेले दिसतात. विशेषतः बाबराने स्थापन केलेल्या मोगल सत्तेचा उत्कर्ष अकबर व शाहजहान यांच्या काळात झाला, परंतु या सत्तेच्या ऱ्हासाला प्रारंभ मोगल सम्राट औरंगजेब याच्या धार्मिक धोरणामुळे झालेला दिसतो. औरंगजेबाच्या काळात दक्षिण भारतामध्ये छत्रपती शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली हिंदवी स्वराज्याची स्थापना झाली. मराठ्यांच्या स्वातंत्र्यलढ्यास मध्ययुगीन भारतीय इतिहासात विशेष महत्त्व आहे. भारतीय संदर्भात विशेष महत्त्व आहे. कारण उत्तर भारतातील रजपूत, जाट, रोहिले यासारख्या अनेक सत्ता असूनही त्या स्वतंत्रपणे मोगलांशी सामना करू शकल्या नाहीत. त्यांनी एक तर नमते धोरण घेतले नाहीतर त्यांनी मोगलांचे मांडलिकत्व पत्करले, परंतु छत्रपती शिवाजी महाराजांनी अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत आदिलशाही तसेच मोगल, सिद्दी, पोर्तुगीज आणि इंग्रज या सर्वांशी संघर्ष करत स्वतंत्र हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. ३ एप्रिल १६८० मध्ये शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर हिंदवी स्वराज्याचे रक्षण करण्याची जबाबदारी त्यांचे ज्येष्ठ पुत्र छत्रपती संभाजीमहाराज यांच्यावर आली व त्यांनी ती समर्थपणे पार पाडली. एका दशकाच्या कालावधीत संभाजी महाराजांनी अतुलनीय पराक्रम, प्रबळ ध्येयवाद आणि असीम निष्ठेमुळे हिंदवी स्वराज्य तर राखले, शिवाय दुष्काळ, अवर्षण अशा प्रतिकूल परिस्थितीत सुनियोजित प्रशासन करून लोकांच्या कल्याणाची

जबाबदारीही पार पाडली. त्यामुळे छत्रपती संभाजीमहाराज कालीन लोकजीवनाचा अभ्यास हा एक उपेक्षित परंतु तेवढाच महत्त्वाचा विषय असल्यामुळे या प्रबंधात प्रस्तुत विषय हा संशोधनाचा केंद्रबिंदू मानला आहे. प्राथमिक व दुय्यम साधनांच्या आधारे महाराष्ट्रातील तत्कालीन लोकजीवनावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे.

मराठयांच्या इतिहासामध्ये छत्रपती संभाजी महाराजांचे कार्य १६८० ते १६८९ हे वैशिष्टयपूर्ण ठरलेले आहे. छत्रपती संभाजी महाराजांनी प्राणपणाने हिंदवी स्वराज्याचे संरक्षण केले व शेवटी स्वराज्याच्या प्रतिष्ठेसाठी बलिदान केले. वा.सी.बेंद्रे, डॉ.कमल गोखले, गो.स.सरदेसाई , डॉ.जयसिंगराव पवार, डॉ. पी.जी.जोशी, प्रा.विजय देशमुख प्रभृतींनी आजवर छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्याविषयी ग्रंथरचना केली आहे. "महाराष्ट्र इन द एज ऑफ शिवाजी" असा पीएच.डी. चा प्रबंध अ.रा.कुलकर्णी यांनी मराठवाडा विद्यापीठात सादर केला होता, तथापी छत्रपती संभाजी महाराजांच्या काळातील महाराष्ट्रातील लोकजीवनाचा अभ्यास झालेला नाही. त्यासाठी या प्रबंधाची योजना केली आहे.

छत्रपती संभाजी महाराजांचा इतिहास अभ्यासताना या प्रबंधात सामाजिक इतिहासाचा दृष्टिकोण समोर ठेवला आहे. प्रो.ब्लॉक (Block) यांनी सामाजिक इतिहासाची संकल्पना स्पष्ट करताना म्हटले आहे,

"Social history is the history of the people. It deals with thought and the work, the daily life, the belief, the needs, the habits, of our ancestors." सामाजिक इतिहास म्हणजे मानवांचा इतिहास. हा इतिहास मानवांचा विचार, त्यांचे कार्य, त्यांचे दैनंदिन जीवन, त्यांच्या श्रध्दा, सवयी यांच्याशी निगडीत असतो.[१] अशा सामाजिक इतिहासामध्ये गतकालीन सामाजिक प्रक्रियांचे व लोकजीवनांचे सूक्ष्म आकलन केले जाते. छत्रपती संभाजी

महाराजांचा अभ्यास करताना तत्कालीन सामाजिक परिस्थितीला या प्रबंधात केंद्रबिंदू मानून अभ्यास करावयाचा आहे. त्यासाठी तत्कालीन कागदपत्रे, बखरी, विदेशी साधने यांच्या आधारे तत्कालीन महाराष्ट्रातील माणसांचे दैनंदिन जीवनकार्य, त्यांच्या सवयी, श्रध्दा, आचार-विचार, इत्यादींचा अभ्यास करावयाचा आहे.

सामाजिक इतिहासाची संकल्पना स्पष्ट करताना Brockhampton ने म्हटले आहे, "Social history is a branch of history that documents the living and working conditions of people rather than affairs of state. Only in the early 20th century did historians begin to study how people lived and worked in the past." राज्याच्या घडामोडीपेक्षा लोकांची जीवनशैली व कार्यपध्दती याबाबत अध्ययन करणारी ज्ञानशाखा म्हणजेच सामाजिक इतिहास होय. विसाव्या शतकाच्या प्रारंभी इतिहासकारांनी गतकालीन लोक कशा प्रकारचे जीवन जगत होते, याच्या अभ्यासाला प्रारंभ केला.[२] छत्रपती संभाजी महाराजांविषयी राजकीय दृष्टीने अभ्यास झाला असला तरी तत्कालीन लोकजीवनाबाबत संशोधन झालेले नाही, म्हणून संशोधनासाठी मी हा विषय निवडला आहे.

सामाजिक इतिहासामध्येच आर्थिक इतिहासाचा समावेश होतो. व्हॅन डीलन (Van Dillen) याने आर्थिक इतिहासाला सामाजिक इतिहासाची शाखाच मानली आहे. त्याच्या मते या शाखा परस्परपूरक आहेत.[३] सामाजिक इतिहासामध्ये प्रामुख्याने मानवप्राणी, समाज, चालीरिती, कार्यपध्दती, संपत्ती, श्रध्दा, अन्न, पोषाख, करमणूकीची साधने, खाजगी जीवन, उत्सव, सामाजिक संस्था यासर्वांचा अभ्यास केला जातो.[४] छत्रपती संभाजी महाराज कालीन महाराष्ट्रातील लोकजीवनाचा अभ्यास करताना मी सर्व पैलूंवर प्रकाश टाकणार आहे. "सामाजिक इतिहास लिहित

असताना अनेक गोष्टींचा विशेषतः धर्म, वाङ्मय, संगीत, तत्वज्ञान, कला यांचा प्रभाव कसा पडत गेला हे दाखवून दिले पाहिजे."[५] छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्राचा सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक अशा चार अंगांनी अभ्यास केला असता छ. संभाजीमहाराज कालीन इतिहासाचे नवे आकलन होऊ शकते.

छत्रपती संभाजी महाराजांच्या काळातील महाराष्ट्रातील लोकजीवनाचा अभ्यास करताना या सर्व दृष्टीने यथार्थ आकलन करण्याची गरज आहे. त्यासाठी हा अभ्यास सामाजिक इतिहासाचे संकेत लक्षात घेऊन आखला आहे. शिवकालीन समाजजीवनाचा अनेक अंगांनी अभ्यास झाला आहे. परंतु संभाजी महाराजांच्या काळातील लोकजीवन मात्र अद्यापही चिकित्सकपणे अभ्यासण्यात आलेले नाही.

संभाजीकालीन लोकजीवनाचे अध्ययन करताना आजवर राजकीयदृष्टीने बराच उहापोह झालेला आहे. डॉ. पी. जी. जोशी यांनी संभाजीकालीन राजकीय स्थित्यंतराचे साक्षेपी अध्ययन केले आहे, परंतु बादशाही आक्रमणाच्या सुलतानी संकटाने हैराण झालेल्या महाराष्ट्रातील सामाजिक संक्रमणांचे आणि उलथापालथींचे पुरेसे अध्ययन झालेले नाही. शत्रूशी लढत असतानाच मराठ्यांना प्रतिकूल नैसर्गिक परिस्थितीशी सुद्धा लढावे लागले. अवर्षण आणि दुष्काळ यामुळे त्रस्त झालेल्या असह्य लोकजीवनास सुसह्य करण्यासाठी छ. संभाजी महाराजांना यथायोग्य पावले टाकावी लागली. या सर्व ध्येयधोरणांचे आणि कृतीचे आकलन करताना प्राथमिक व दुय्यम साधनांचा उपयोग करून तसेच इतिहास संशोधनाची नवी समाजशास्त्रीय दृष्टी समोर ठेवून या प्रबंधात छत्रपती संभाजीकालीन लोकजीवनाचे पैलू नव्याने प्रकाशात आणण्याचा प्रयत्न केला आहे.

कुठल्याही राजाच्या गतकालीन कामगिरीचा अभ्यास करत असताना तत्कालीन राजकीय परिस्थितीप्रमाणेच सामाजिक वातावरण कसे होते यालाही

महत्त्व असते. राजा काळाला घडवितो. त्याचप्रमाणे काळसुद्धा राजाच्या ध्येयधोरणास आकार देण्यासाठी एक घटक म्हणून महत्त्वाची भूमिका पार पाडत असतो. इतिहासाच्या अभ्यासात ***राजा कालस्य कारणम्*** आणि दुसरी बाजू म्हणजे ***कालो राजस्य कारणम्*** या द्वंद्वास महत्त्व आहे.

कार्ल मार्क्सने सांगितलेल्या द्वंद्वात्मक ऐतिहासिक पद्धतीने छ.संभाजीकालीन महाराष्ट्राचे आकलन केले असता असे दिसते की, छ.संभाजीकालीन महाराष्ट्रातील निसर्गाची प्रतिकूलता, मोगल आक्रमकांच्या कारवाया तसेच पोर्तुगीज व इंग्रज या परकीय सत्तांच्या हालचाली अशा सर्व अंगांनी विचार करून छत्रपती संभाजींनी काळाला आकार देण्यात मिळविलेले यश हे अधिक प्रकाशमान होते. छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्यकर्तृत्वाचा विचार करताना त्यांच्या अंगभूत गुणांप्रमाणेच त्यांचा पराक्रम, त्यांचे प्रशासकीय चातुर्य तसेच त्यांची दूरदृष्टी या बाबींचा उलगडा जसा करावा लागतो तसा तत्कालीन महाराष्ट्रातील सामजिक, आर्थिक आणि नैसर्गिक प्रश्नांची गुंतागुंत सुद्धा समजावून घ्यावी लागते. असा प्रयत्न केल्यास या संशोधनाचे मर्म अधिक प्रभावीपणे जाणवू शकते.

## १.२ संशोधनाची पार्श्वभूमी, आवश्यकता व निकड :

### अ) संशोधनाची पार्श्वभूमी

कोणत्याही ऐतिहासिक संशोधनात प्रथम पार्श्वभूमीचे आकलन करावे लागते. त्यामुळे विषयाची बैठक स्पष्ट होते. दुष्काळाची आपत्ती ही फार पूर्वीपासून महाराष्ट्राच्या पाचवीला पुजलेली आहे. त्यानुसार छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्यकीर्दीतही महाराष्ट्रात ठिकठिकाणी दुष्काळ पडत होते. त्या दुष्काळामागची कारणे नैसर्गिक तसेच मानवी स्वरुपाची होती. पर्जन्याचा अभाव हे एक त्यातले महत्वाचे कारण असले, तरी शत्रूंनी स्वराज्याच्या प्रदेशावर केलेल्या हल्ल्यांमुळे पिकांची प्रचंड

हानी होत असे व त्यातून दुष्काळाची स्थिती निर्माण होवून धान्याची टंचाई वाढत असे. छ. संभाजीच्या काळात १६८३-८४ या वर्षी मोगलांच्या लष्करी हालचालींनी मौजे शेखापूर परगणामान या भागातील पिक खराब केल्यामुळे दुष्काळ पडला. वा.सी. बेंद्रे म्हणतात. "मोगल सैन्याने संभाजी राजांच्या प्रदेशात हल्ले करून सर्वत्र धुमाकूळ माजवला व मुलखाची नासधुस केली. गावे जाळून ओस बनविली. औरंगजेबाचा मोठा मुलगा शहाआलम आपल्या चाळीस हजार मोगल फौजेने संभाजीच्या प्रदेशात जेथे जात असे तेथे नासधूस करून दुष्काळाची स्थिती निर्माण करीत."[६] आर्थिक दुरावस्थेत दुष्काळाने भर टाकली, शेतीचे उत्पन्न घटले, लोकांची अन्नानदशा होऊ लागली. या पार्श्वभूमीवर संभाजी महाराजांनी नऊ वर्षे महाराष्ट्रावर कसे राज्य केले, या काळात महाराष्ट्राचे लोकजीवन कसे ढवळून निघाले ते येथे अभ्यासले आहे.

तत्कालीन आर्थिक दुरावस्था, सामाजिक अस्थिरता व धार्मिक अत्याचार यामुळे महाराष्ट्र अधिक गांजलेला होता. शिवाजी महाराजांच्य मृत्यूनंतर मोगलांनी महाराष्ट्रावर चौफेर आक्रमण केले होते. त्यामुळे या प्रतिकूल वातावरणातून महाराष्ट्राला बाहेर काढण्यासाठी छ. संभाजी महाराजांना अधिक संघर्ष करावा लागला. मोगल सम्राट औरंगजेबाबरोबर त्यांनी दिलेली झुंज ही ऐतिहासिक ठरली. औरंगजेब सर्व शक्तीनिशी महाराष्ट्रात मराठयांचा निःपात करण्यासाठी मोठया सैन्यासह उतरला होता. फ्रेंच प्रवासी ॲबे कॅरे याने लिहीले होते, "शिवाजी राजांनी दहा हजार अशा शूर सैन्याचा विभाग आपल्या मुलाच्या ताब्यात दिला होता. हा युवराज लहान असला तरी धैर्यशील व आपल्या पित्याच्या किर्तीस साजेल असा शूरवीर आहे. शिवाजी राजांसारख्या युध्दकुशल पित्याबरोबर तो युध्दकलेत तरबेज झाला असून चांगल्या वयोवृध्द सेनापतीचीही बरोबरी करील इतका तो तयार आहे."[७] ॲबे कॅरे यांनी दिलेली ही पावती त्यांनी पुढे लढून सार्थ ठरविली. जयसिंगराव पवार म्हणतात, "औरंगजेब म्हणजे कोणी सामान्य शत्रू नव्हता, काबूलपासून बंगालपर्यंत

व काश्मिरपासून दक्षिणेत भीमानदीपर्यंत त्याचे अफाट साम्राज्य पसरले होते. त्याच्या साम्राज्याचा फक्त जमीन महसूलच ३३ कोटी २५ लाख होता. मराठयांचे सगळे राज्यच मुळी त्याच्या एका सुभ्याएवढेसुध्दा नव्हते, त्याच्या लष्कराची संख्या ॲबे कॅरे या प्रवाशाने साठ हजार घोडेस्वार, एक लाख पायदळ, पन्नास हजार उंट, तीन हजार हत्ती असल्याची तो एके ठिकाणी नोंद करतो. या ऊलट पगडींनी असा अंदाज बांधला आहे की, मराठयांचे सर्व मिळून सैन्यबल तीस चाळीस हजारांवर होते असे वाटत नाही."[८] यावरून मोगल सम्राट व छत्रपती संभाजी यांच्यातील लढाई ही किती विषम होती हे लक्षात येते. विशाल सागराएवढया मोगल सेनेशी मोजक्या व निवडक मराठी सेनेच्या सहाय्याने मुकाबला करणे हे अवघड काम होते. मोगल सम्राटाशी त्यांनी दिलेली झुंज ऐतिहासिक ठरली. या काळातील लोकजीवन त्यामुळे ढवळून निघाले.

छ. संभाजी महाराजांच्या हत्येनंतर संपूर्ण मराठा राज्यात त्याचे पडसाद उमटल्याचे दिसून येतात. त्यावर इतिहासकार गो.स. सरदेसाई म्हणतात, "संभाजीचे बलिदान व्यर्थ ठरले नाही त्यामुळे महाराष्ट्राला स्वातंत्र्य लढयास नवी प्रेरणा मिळाली."[९] या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील नवीन अभ्यासकांनी छ. संभाजीचे मूल्यमापन करतांना कागदपत्रांची केली मीमांसा अर्थपूर्ण आहे. डॉ.एस. ए.बाहेकर म्हणतात, "संभाजी महाराजांना दूरदृष्टी नव्हती, त्यांनी एकाच वेळी सर्व शत्रू विरुध्द लढण्याची चूक केली, त्यांच्या राजकीय धोरणात सुसूत्रता नव्हती. राजा म्हणून त्यांची कारकीर्द अयशस्वी झाली असे त्यांच्यावर आरोप करण्यात येतात. कोणत्याही राजप्रमुखाचे धोरण आणि त्याची सुसूत्रता त्यावेळच्या परिस्थितीवर अवलंबून असते. त्यामुळे या संबंधी मत व्यक्त करताना संभाजी राजांना कोणत्या परिस्थितीला तोंड द्यावे लागले याचा विचार आरोप करणारांनी केल्यास आणि तत्कालीन कागदत्राचा अभ्यास केल्यास या आरोपात तथ्य नाही."[१०] या प्रकारच्या मतांचे पुनरावलोकन

करून त्याआधारे या ऐतिहासिक पुरुषाला न्याय देण्याचा प्रयत्न येथे करावयाचा आहे. डॉ.कमल गोखले म्हणतात, “संभाजी महाराजांनी मरण पत्करतानाही जो बाणेदारपणा आणि शौर्य दाखविले ते अद्वितीय आहे. संभाजी राजे यांचा युध्दात पराभव करणे जवळजवळ अशक्य आहे असे लक्षात आल्यावरच औरंगजेबाने त्यांना पकडण्याचा डाव टाकावयास प्रारंभ केला.”[११] दुर्दैवाने तो डाव यशस्वी झाला. त्यास मराठा सरदारांची फंदफितुरी कारणीभूत ठरली.

डॉ.कमल गोखले यांनी नव्याने विश्लेषण करून शेवटी असे म्हटले आहे की, “ते शेवटच्या दिवसापर्यंत कार्यमग्न होते. याचाही येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. राजे मुघलांच्या हातात सापडले त्याच दिवशी गिरजोजी यादव संभाजी राज्यांना आपल्या वतन प्रकरणाच्या निकालासाठी भेटला. राजांनी त्याचा निर्णय केल्यावर सही शिक्क्यासाठी कागदपत्रेही रवाना केली होती.”[१२] यावरून छ. संभाजी महाराजांचे लोकप्रशासनाकडे किती बारकाईने लक्ष होते ते समजून घेता येते. डॉ.जयसिंगराव पवार म्हणतात, “आग्-यास आपण शिवाजी राजास मारले नाही ही आपली चुक झाली असे औरंगजेब म्हणतो. ही चुक सुधारण्यासाठी त्याने दुसरी घोडचुक केली. त्याने संभाजीराजास ठार केले ! संभाजी राजास ठार मारले नसते तर कदाचित मराठयांचा मुलुख त्याला जिंकताही आला असता पण ज्या अमानुषपणे मराठी राजाला ठार केले गेले; त्याची वार्ता ऐकून अखिल मराठी समाज मधमाशांचे मोहळ डिवचले गेल्या प्रमाणे सूडाने, त्वेषाने व स्वातंत्र्य लालसेने मोगली फौजेवर तुटून पडला.”[१३] त्यामुळे मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द जोमाने सुरू झाले व पुढे दोनशे वर्ष अखंडपणे चालले. या पार्श्वभूमीवर येथे छत्रपती संभाजी राजांचे नव्याने आकलन केले पाहिजे.

तत्कालीन परिस्थितीचा लोकजीवनावर होणारा परिणाम अभ्यासतांना तत्कालीन समाज रुढी, परंपरा, परस्पर संबंध, युध्द, लढाया, शत्रूशी लढण्याची पध्दती, धर्म व संस्कृतीचे रक्षण, परचक्राशी सामना, स्वातंत्र्याची प्रेरणा व संघर्ष याबाबतीत संभाजी महाराजांनी मांडलेला विचार महत्वाचा ठरतो. हा विचार या प्रबंधात नव्याने मांडावयाचा आहे.

छत्रपती संभाजींच्या काळातील लोकजीवनाचा अभ्यास हा प्रामुख्याने एका दशकाचा अभ्यास आहे. हा कालपट तसा पाहिला तर फार मोठा नाही. परंतु तो संघर्षमय असल्यामुळे अधिक प्रदीर्घ व तेवढाच गुंतागुंतीचा झाला आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या पूर्वायुष्यात तोरणा घेतल्यापासून प्रतापगडाच्या युद्धापर्यंतचा काळ जेवढा महत्त्वाचा आहे त्याहीपेक्षा अधिक निर्णायक संघर्ष छत्रपती संभाजी महाराजांना या दहा वर्षात करावे लागले आहेत. हा संघर्ष पहिल्या टप्प्यात अंतर्गत गृहयुद्धावर आधारलेला आहे तर दुसऱ्या टप्प्यात हा चार प्रकारच्या शत्रूवर मात करण्याशी निगडीत आहे. हे शत्रू म्हणजे क्रमाक्रमाने बदलणारे मोगल, पोर्तुगीज, इंग्रज हे प्रमुख घटक होते. त्याशिवाय सिद्दीशी सुद्धा त्यांना मुकाबला करावा लागला.

छत्रपती शिवाजी महाराजांच्याप्रमाणे अत्यंत योजकतेने या चारही शत्रूंशी लढताना सहकार्य व संघर्षाच सूत्र घेऊन अत्यंत मुत्सद्दीगिरीने स्वराज्याचा मार्ग पुढे नेला.

**आ) संशोधनाची आवश्यकता व निकड :**

इतिहासाच्या संशोधनात अभ्यासविषयाची निवड कशी केली जाते हे सांगताना प्राध्यापक सत्यमूर्ती म्हणतात, “The research topic must be clear in its aspects : It means that the topic which the scholar chooses, must be defined clearly geopraphical and chrono-

logically for instance." संशोधन विषय स्पष्ट असला पाहिजे. संशोधकाने निवडलेला विषय स्पष्टपणे मांडला पाहिजे. भौगोलिक दृष्टीने व कालनिर्णयाच्या दृष्टीने विषय योग्य स्वरुपात नोंदविला पाहिजे.[१४] या पार्श्वभूमीवर संभाजी महाराजांच्या काळातील लोकजीवन अभ्यासतांना येथे समाजशास्त्रीय दृष्टीने अभ्यास करावयाचा आहे. या शोधकार्यातील अभ्यासाचे वेगळेपण स्पष्टपणे मांडले आहे. भौगोलिक दृष्टीने विचार करता सहयाद्रीच्या रांगेतील महाराष्ट्र हे अभ्यासाचे क्षेत्र आहे तर १६८० ते १६८९ हा दहा वर्षाचा काळ या अभ्यासाचा कालावधी आहे. छत्रपती संभाजी राजांच्या राज्यारोहणापासून ते मृत्यूपर्यंतचा काळ या अभ्यासासाठी महत्वाचा मानला आहे.

थोडक्यात काय तर हा अभ्यास एका दशकाशी निगडीत आहे. हे दशक जसे अस्थिर तसेच संघर्षमय होते. या दशकात मोगल सम्राट औरंगजेबास मराठी सत्तेचे समूळ उच्चाटन करावयाचे होते तर छत्रपती संभाजी महाराजांना त्याच्या सर्व डावपेचावर मात करून प्राणपणाने स्वराज्याचे रक्षण करावयाचे होते. मराठ्यांच्या दृष्टीने हा काळ स्वराज्याच्या अस्तित्वासाठी अंतिम संघर्षाचा काळ होता. आपल्या जवळ असलेली साधनसामग्री, मनुष्यबळ आणि मूल्यनिष्ठा या तीन घटकांच्या आधारे कितीही अस्मानी, सुलतानी संकटे आली तरी स्वराज्य राखावयाचे आणि ते वर्धिष्णू करावयाचे हा संभाजीकालीन महाराष्ट्राचा विलक्षण ध्येयवाद होता. या ध्येयवादातून छत्रपती संभाजी महाराजांना व त्यांच्या एकनिष्ठ सहकार्यांना सतत उर्जा मिळत होती. ही उर्जा त्यांनी राज्यारोहणापासून जीवनातील अखेरच्या क्षणापर्यंत प्रभावीपणे जोपासली होती. कितीही संकटे आली आणि कितीही प्रतिकूलता निर्माण झाली तरीही छत्रपती शिवाजी महाराजांच्या प्रमाणे स्वतः छत्रपती संभाजी आणि त्यांचे एकनिष्ठ सरदार या संकटाशी लढताना मुळीच डगमगले नाहीत. उलट त्यांनी आपल्या

ध्येयवादाने मोगलसत्तेशी झुंज देऊन खुद्द बादशहाच्या मुलाबरोबर म्हणजे शाहजादा अकबर याच्याबरोबर युती करून दिल्लीतील मध्यवर्ती सत्तेला जोराचे आव्हान दिले होते.

या निर्णायक संघर्षात नियतीने त्यांची सतत संपूर्ण पाठराखण केली असती तर इतिहासाला कलाटणी देऊन ते अधिक यशस्वी झाले असते, परंतु काहीवेळा निरपेक्ष भावनेने केलेला स्वातंत्र्यासाठीचा संघर्ष हा इतिहासात अजरामर ठरतो. या सूत्राचा प्रत्यय छत्रपती संभाजी महाराजांनी आपल्या कार्यकाळात केलेल्या लढाया, संघर्ष आणि प्रशासकीय धोरणात टाकलेली दूरदृष्टीची पावले यावरून दिसून येतो. विजिगिषू राज्यकर्ता हा केवळ राजकीय आघाड्यांवर लढत नसतो तर तो सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक, शैक्षणिक अशा विविध आघाड्यांवर रचनात्मक कार्य करून इतिहासावर आपली अमिट छाप टाकत असतो. या सूत्राचा प्रत्यय छत्रपती संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करताना येतो. या पार्श्वभूमीवर या अभ्यासाची निकड व महत्त्व या संदर्भात पुढील काही मुद्दे येथे प्रकर्षाने लक्षात घेतले आहेत.

**१. पूर्वीचे विकृत व दूषित चित्रण बदलून छ. संभाजी महाराजांच्या कर्तृत्त्वाचे नव्याने अध्ययन केले पाहिजे.**

मूळ कागदपत्रांचा अभ्यास करुन डॉ.कमल गोखले यांनी छ.संभाजी महाराजांचे नव्याने मूल्यमापन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी म्हटले आहे, "न्यायदान, प्रजादक्षता, महसूलाचे धोरण, वतनवृत्ती, अष्टप्रधान, इत्यादी राज्यकारभारविषयक गोष्टींचा सविस्तर आढावा घेतलेला आहे. त्यावरुन छ.संभाजी महाराजांच्या काळात राज्यकारभाराची घडी व्यवस्थित होती असेच म्हणावे लागते. संभाजी राजांची प्रवृत्ती धार्मिक होती असेही वाटते. त्यांना रामदास स्वामी व इतर

साधूसंतांविषयी वाटत असलेला आदर, समर्थांच्या मठाची त्यांनी घेतलेली काळजी ठिकठिकाणी दिलेली दाने आणि अनुदाने वगैरे अनेक गोष्टी मी दिलेल्या आहेत."[१५] त्यानुसार संभाजी महाराजांचे कर्तृत्त्व नवीन साधनांच्या आधारे अभ्यासले तर तत्कालीन महाराष्ट्रातील लोकजीवन अधिक चांगल्या प्रकारे स्पष्ट होऊ शकते. त्यामुळे इतिहासाचे उभे आडवे धागे विणून समकालीन जीवनाचे नवे वस्त्र विणता येऊ शकते.

**२. गतकालीन घटनाक्रमामध्ये सभोवतालच्या सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक जीवनाचे विश्लेषण केले पाहिजे.**

इतिहास सभोवतालच्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असतो. ही परिस्थिती कशी बदलते त्यावर इतिहासाचे यश व अपयश अवलंबून असते. यासंदर्भात ई.एच.कार म्हणतात, "जर समाजशास्त्राला इतिहासासारखे उपयोगी बनवावयाचे असेल तर त्याने वैशिष्ट्यपूर्ण घटना व सामान्य घटना यांच्यातील संबंधाचा अभ्यास केला पाहिजे. समाजशास्त्राने आक्रमक बनले पाहिजे. अशावेळी वर्तमानकाळातील समाजाचा अभ्यास न करता समाजातील बदल व विकास यासंदर्भात अभ्यास केला पाहिजे."[१६] गतकालीन सामाजिक बदलांचे शास्त्रीय आकलन केल्यामुळे मागील घटना व घडामोडींपासून काही धडे घेता येतात. मध्ययुगीन महाराष्ट्रातील समाजाचा अभ्यास करतांना शिवकाल व संभाजी महाराजांचा काल यांची तुलना केली असता उपरोक्त दृष्टीने नवा प्रकाश टाकता येणे शक्य होणार आहे त्यामुळे नवे आकलन करता येणे शक्य होणार आहे.

**३. छ.संभाजी महाराजांनी अंतर्गत व बाह्य अशा दोन आघाडयांवर मात करुन स्वराज्याचे रक्षण केले. त्यामुळे तत्कालीन महाराष्ट्रातील लोकजीवनाचा अभ्यास केला असता संभाजी महाराजांची थोरवी स्पष्ट होऊ शकते.**

प्रतिकूल परिस्थितीशी संघर्ष करुन एखादा महापुरुष जेव्हा इतिहास घडवितो तेव्हा त्यास अधिक आगळेवेगळे तेज प्राप्त होते. संभाजी महाराजांचा मुख्य सामना

जसा मोगलांशी होता तसाच त्यांना अंतर्गत शत्रूंशीही संघर्ष करावा लागला. डॉ.कमल गोखले म्हणतात, “ते शत्रूला शरण गेलेच नाहीत पण त्यांनी शत्रूपुढे मानही वाकविली नाही. त्यांचा देह औरंगजेबच्या पाशवीवृत्तीला बळी पडला पण त्याच बलिदानातून आणि हौतात्म्यामुळे मराठी राज्य बचावले. हे भारतीयांना केव्हाही विसरता येणार नाही.”[१७] यावरुन छ.संभाजी महाराज हे महाराष्ट्र संस्कृतीचा स्वाभिमान व थोरवी जतन करणारे युगपुरुष होते. त्यांच्या कर्तृत्वाची ही थोरवी इतिहासशास्त्राच्या निकषावर तपासून घ्यावयाची आहे. त्यामुळे त्यांच्या कार्याचे नव्याने मूल्यमापन शक्य होईल.

इतिहासात व्यक्ती, घटना आणि प्रसंग यांचे शास्त्रीय पटलावर कोंदण केलेले असते. व्यक्तीच्या ध्येयधोरणाचा घटनांवर परिणाम होतो आणि घडून गेलेले प्रसंग हे पुनश्च नव्याने अभ्यासताना त्यातील कार्यकारणभाव शोधावा लागतो. असा कार्यकारणभाव शोधताना घडून गेलेल्या घटना का? कशा घडल्या? त्याचे कोणते परिणाम पुढील कालखंडावर झाले? कोणत्या प्रसंगात राज्यकर्त्यांनी सावधपण दाखविले? साक्षेप प्रकट केला आणि कोणत्या क्षणी राज्यकर्त्याकडून काही चुका घडून आल्या याचेही आकलन करावे लागते. असे आकलन केले असता इतिहासाचे पुनर्मूल्यांकन करणे शक्य होते.

## १.३ संशोधनाचे महत्त्व

समाजशास्त्रीय दृष्टीने इतिहासाचा अभ्यास करण्याचा प्रयत्न मॅक्स वेबर व डर्कहॅम यांनी केला आहे. मॅक्स वेबर म्हणतात, “समाजशास्त्र व इतिहास या दोन्ही विषयातील साम्य पाहता मानवी समाजाचे अध्ययन करणारी शास्त्रे म्हणून समाजसूत्र लक्षात येते. फक्त फरक इतकाच की, समाजशास्त्रामध्ये वर्तमानकालीन समाजजीवनाचा अभ्यास केला जातो. इतिहासामध्ये समाजातील भूतकालीन

घटनांवर प्रकाशा टाकला जातो."[१८] म्हणून समाजशास्त्र हा वर्तमानकालीन इतिहास आणि इतिहास हा विषय भूतकालीन समाजशास्त्र आहे असे म्हटले जाते.

**१. ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टी ही इतिहास संशोधनास अत्यंत पोषक ठरते. कारण तत्कालीन समाजातील लोकजीवनाचा अभ्यास केला असता यश अपयश व घटना क्रमाचे यथार्थ विश्लेषण करतो येते. छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्यकाळातील समकालीन महाराष्ट्राचे असे शास्त्रीय अध्ययन करावयाचे आहे.**

प्राध्यापक गुड व हॅट यांच्यामते समाजशास्त्र ही एक नवी ज्ञानशाखा असून अनेकविध पैलूंनी समाजशास्त्राचा अभ्यास करता येणे शक्य आहे.[१९] ऐतिहासिक समाजशास्त्र ही एक अशीच एक ज्ञानशाखा होय. छ.संभाजीकालीन महाराष्ट्राच्या लोकजीवनाचा अभ्यास याच दृष्टीने केला आहे. परमानंदाने त्यांच्या काव्यामध्ये संभाजीराजांबद्दल म्हटले आहे, "संभाजी प्रतापी आणि स्वतःच्या इच्छेप्रमाणे चालणारा असल्याने ते मंत्र्यांना सहन होत नाही."[२०] अशा प्रकारे गतकालीन साधनातून प्रकट होणा-या पुरावांच्या आधारे संभाजी महाराजांच्या सांस्कृतिक दृष्टीचे आकलन करता येऊ शकते. रियासतकार सरदेसाई म्हणतात, "राज्यकारभाराचे व न्यायनिवाडयाचे संभाजीचे कित्येक कागद उपलब्ध आहेत; त्यावरुन निःपक्षपाती न्याय देण्याची त्यांची आवड व प्रजाहिताची कळकळ व्यक्त होते. "[२१] अशा प्रकारची कागदपत्रे शोधून त्यांच्या कल्याणकारी दृष्टीवर नवा प्रकाश टाकता येऊ शकेल.

**२. छत्रपती संभाजी महाराजांनी प्रथम स्वराज्य द्रोह्यांचा बंदोबस्त कुशलतेने केला, युध्द प्रयत्नांचे संयोजन करून त्यांनी आक्रमक नेतृत्वाची चुणूक दाखविली.**

छ.संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत त्यांना प्रथम आपले सत्तास्थान बळकट करावे लागले. त्यांच्या आरंभीच्या कार्याबाबत गो.स.सरदेसाई म्हणतात, "पहिल्या भागात संभाजीने स्वकीयांचे बंडावे मोडून औरंगजेब व पोर्तुगीज यांच्याशी निकराचा सामना केला त्यांचा अंतर्भाव होतो. या सामन्यात बादशहाला संभाजीपुढे एकप्रकारे

हार खावी लागली; आणि नाइलाजाने त्याने आपले लक्ष संभाजीकडून काढून विजापुर व गोवळकोंडा ही राज्ये हस्तगत करण्याचा प्रथम उद्योग केला."[२२] यावरून छ. संभाजी हे मोगलांपेक्षा कसे वरचढ होते ते लक्षात येते. त्यांच्या युध्दतंत्राबाबत डॉ.कमल गोखले म्हणतात, "मराठे जेव्हा आघाडीवर जात तेव्हा दोन्ही बाजूला घोडदळ आणि मध्यभागी पायदळ असे. सैन्यात चांगली शिस्त असल्याचे पोर्तुगीजांनी नमूद केले आहे. बहुतेक तुकडयांबरोबर भगवी निशाणे, पालख्या, छत्री व माल वाहण्यासाठी जनावरे असत. याशिवाय सैनिकांजवळ ढाल-तलवार, भाले, मोठे चाकू, चापाच्या बंदुका, तोफा, धनुष्यबाण आणि जिने तयार करावयासाठी दोर असत. मोगल सैन्यासारखा मोठा लवाजमा त्यांच्याबरोबर होता, सर्व हालचाली वेगात आणि चपळाईने करण्यावर त्यांचा भर असे."[२३] यावरून छ. संभाजीचे युध्दतंत्र किती व कसे प्रगत होते ते लक्षात येते. त्यांची गतीमानताही स्पष्ट होते. संभाजी महाराजांच्या आक्रमक नेतृत्त्वाची मिमांसा करतांना त्या म्हणतात, "संभाजी राजांनी कुतुबशहा व आदिलशहा यांना मदत केली; परंतु स्वतःवरील संकटाच्या वेळी मात्र त्यांना कोणाचेही सहाय्य मिळाले नाही. १६८१ ते १६८८ पर्यंत सर्व आघाडयांवर त्यांना एकाकीच लढा द्यावा लागला."[२४] यावरून त्यांच्या नेतृत्त्वाची मीमांसा करता येते. हा अभ्यास त्यांना न्याय देणारा असणार आहे. या अनुरोधाने नवीन साधनांच्या आधारे येथे विश्लेषण करावयाचे आहे.

**३. औरंगजेबपुत्र अकबराबरोबर त्यांनी केलेली युती पाहता त्यांच्या मुत्सद्देगिरीचे कौशल्य जाणवते. पोर्तुगीज, सिध्दी या पश्चिम किना-यावरील सागरी सत्तांशी त्यांनी शर्थीने झुंज दिली.**

छ.संभाजी महाराजांनी मोगल बादशहाशी टक्कर देण्यासाठी त्यांचा मुलगा अकबर यांच्याशी युती योजिली होती. रियासतकार सरदेसाई म्हणतात, "अकबर हा औरंगजेबाचा चौथा मुलगा. जन्मानंतर एक महिन्याने आई दिलरास बानू मरण

पावल्यामुळे बापाचा तो प्यारा बनला."[२५] अकबराने रजपुतांशी मैत्रीचे धोरण अनुसरले होते. सरदेसाई म्हणतात, "रजपुतांशी समेटाचे बोलणे करण्याकरीता त्याच्याकडे आपले वकील पाठविले. त्यांच्या मार्फत अकबराच्या व प्रमुख राजपुतांच्या वारंवार गाठी पडून बोलणी झाली. त्या बोलण्यात औरंगजेबाच्या दृष्ट व कपटी राजनीतीचा उघड खल झाला. राजपुतांनी अकबरास समजाविलें, कीं बादशहाला यत्किंचित् इजा पोंचविण्याची आमची इच्छा नाही, उलट पूर्वापार प्रघाताप्रमाणे आम्हास बादशहांनी प्रेमानें वागवावें, आमच्या राज्यांचा अपहार करुं नये, म्हणजे आम्ही बादशहाची सेवा निष्ठेने करण्यास सिध्द आहों, अकबर बादशहा थोर होऊन गेले, त्यांनी घालून दिलेले रिवाज यथायोग्य पाळले जावे, हे म्हणणे अकबरास पटले."[२६] अकबराशी वार्तालाभ करतांना छ. संभाजी यांनी दुरदृष्टीने विचार केला होता. त्यांच्या मुत्सद्देगीरीतून एक व्यापक योजना तयार झाली होती. पण दुर्देवाने ती कृतीत आली नाही.

गो.स.सरदेसाई म्हणतात, "पाच महिने झाल्यावर कार्तिक शुध्द ११ रविवारीं ता.१३-११-१६८१ रोजीं पालीस जाऊन त्यानें अकबराशी भेट घेतली. 'समागमे सेना समुदाय हशम देखील होते. शहाजाद्यांबरोबर दुर्गादास होता. बहुत सन्मान केला.'''[२७] अशा प्रकारे संभाजी महाराजांनी अकबरास सम्राट करुन दिल्लीवर प्रभुत्व गाजविण्याची योजना केली होती पण ती अनेक घटनांमुळे सफल झाली नाही. पोर्तुगीजांशी झालेल्या संघर्षाबाबत सरदेसाई लिहितात, "कोकणात पोर्तुगीजांनी संभाजीचा उच्छेद चालविल्यामुळें तो त्यांजवर अत्यंत चिडून गेला होता ; आणि त्यांची चांगली खोड मोडण्याची त्यांची तयारी चालू होती."[२८] यावरुन त्यांच्या मुत्सद्देगीरीची कल्पना येते.

**४. १६८०-१६८४ या पहिल्या पर्वात त्यांनी अंतर्गत यादवीवर मात केली तर दुस-या पर्वात मोगल सत्तेशी निकराने झुंज दिली. साधनसामुग्रीचे दुर्भिक्ष तसेच परिस्थितीची प्रतिकूलता असूनही त्यानी स्वातंत्र्ययुध्दाचे रणशिंग फुंकले व त्यास योग्य वातावरण तयार केले.**

१६८० ते १६८४ हे पहिले पर्व संघर्षास तोंड देऊन स्थैर्यास बैठक देण्यासाठी पोषक ठरणारे होते. या कालखंडामध्ये छ.संभाजी महाराजांनी अत्यंत सावधपणे पावले टाकली. राजाराम व सोयराबाई यांनी संभाजीच्या विरोधात अनेक कटकारस्थाने केली. प्रा.बिरादार म्हणतात, "संभाजीने सोयराबाईस भिंतीत चिणून ठार केले, या मतास अन्य कोणताही पुरावा उपलब्ध होत नाही."[२९] चिटणीस बखरीतील कथा डॉ.कमल गोखले यांनीही नाकारल्या आहेत.

कमल गोखले म्हणतात, "राज्यसूत्रे हातात आल्यावर लगेच संभाजी महाराजांचा राज्याभिषेक होऊ शकला नाही. अष्ट प्रधानांची नेमणूकही झालेली नव्हती. अशा परिस्थितीत त्यांनी १६८० सालच्या मे महिन्यापासून स्वतःच्या अधिकारात पत्रव्यवहार सुरु केलेला होता. उपलब्ध असलेल्या मराठी कागदपत्रांवरुन जुलै १६८१ पर्यंत संभाजी महाराजांनी आपल्या अधिकारात, निरनिराळया क्षेत्रांत अनेक पत्रे लिहिलेली दिसतात."[३०] या पत्रांवरुन त्यांनी साधूसंत महंत यांनाही संपर्क साधला होता व त्यांचे आशीर्वाद घेतले होते. त्यांच्या या सर्व प्रारंभिक कार्यावरुन त्यांची प्रशासकीय चतुराई व लोकाभिमुख दृष्टी दिसून येते. डॉ.कोलारकर संभाजी महाराजांच्या वैशिष्टपूर्ण कार्याबाबत लिहीतात, "शिवाजीच्या मृत्यूनंतर ज्या असाधारण परिस्थितीत संभाजीला काळाचे आव्हान स्वीकारावे लागले ही परिस्थिती आपण लक्षात घेतली पाहिजे."[३१] मराठयांना त्यांच्या स्वातंत्र्याचे व अस्मितेचे रक्षण करण्यासाठी पोषक वातावरण करण्याचे श्रेय छ.संभाजी महाराजांकडे जाते.

**५. आदिलशाही व कुतुबशाही यांचे सहाय्य घेऊन त्यांनी मोगलांशी झुंज दिली. स्वराज्य व स्वधर्म संरक्षण हे त्यांचे जीवनसूत्र होते.**

कर्नल अभ्यंकर यांच्यामते, "स. १६८० च्या सुमारास आदिलशाही आणि कुतुबशाही या दोन्ही राज्यांतील सत्ता अंतर्गत हेवेदावे, अल्पवयीन व अननुभवी सुलतान आणि मोगली आक्रमणाचा कायमचा धोका या कारणांमुळे खिळखिळी झाली होती. शिवाजी महाराजांनी या राज्यांतील परिस्थितीची पूर्ण कल्पना असल्यामुळे त्यांनी मुत्सद्देगिरीच्या जोरावर शक्य तेथे राजकीय दबाव व जरुर पडल्यास लष्करी दडपण आणून या राज्यांबरोबर मित्रत्वाचे संबंध ठेवले होते. सुदैवाने संभाजी महाराजांनी वडिलांचेच धोरण पुढे चालू ठेवून दोन्ही इस्लामी राज्यांशी मित्रत्वाचे संबंध कायम राखले."[३२] त्यांच्या या धोरणामुळे त्यांना पोर्तुगीज, सिध्दी, मोगल यांच्याशी मुत्सद्देगीरीने लढाई करता आली. संभाजी महाराजांनी एका मंदिरास दिलेल्या इनामामध्ये असे म्हटले आहे की, "लखबा लिंगपा मामले तोरगळ यांनी विनंती केली की गतवर्षी सुलतान तारा मोगल (अजमशहा) लष्कर समवेत येऊन कसबे मजकूरची घरे, वाडे, पेठ, जाळून तलफ केली, गावांत जागृत देवस्थान होते ते छिन्नभिन्न केले. दुसरी थोर देवालयें होती ती मोडली. त्या योगें गावांत मरग सुटला. माणसे मरु लागली. रयत लोक राहेनासे झाले. पांढरी बसली. पुरातन मूर्ती दुरात्म्यांनी विच्छिन्न केल्या. महाराज छत्रपती महाराष्ट्र राजा आहे, त्यांची देवस्थानें छिन्नभिन्न असों नयेत. ती बांधून उर्जा चालवावी. तूर्त नवलगुंदांत देवळेंच नाहीतशी झाली आहेत. ऐशास, वेदमूर्ति काशीनाथभट वाराणसीकर बहुत योग्य भले ब्राम्हण आहेत. विचारमतें पाहता हिंदुकीची गोष्ट खरीच. उदंड खर्चवेंच महाराजांच्या दरबारात होऊन जातो, त्यापरीस श्रीचे ऊर्जेस वेच जाहला तरी त्याचे पुण्य व श्रेय छत्रपति महाराजांस येईल. तरी यांस इनाम सर्वमान्य करुन दिल्हे असे."[३३] अशा प्रकारे स्वधर्म आणि स्वसंस्कृतीचे रक्षण करण्यावर छत्रपती संभाजी राजांचा भर होता. त्यांनी राज्यातील प्रजेचे हाल होऊ नयेत म्हणून यथायोग्य काळजी घेतल्याचे उपरोक्त सनदेवरुन दिसून येते.

**६. छत्रपती संभाजी महाराजांची हत्या व्यर्थ गेली नाही. त्यानंतर मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द पुन्हा जोमाने उभे राहिले. तत्कालीन प्रतिकूलतेत प्रेरक वातावरण त्यांच्या आत्मबलिदानाने सिध्द झाले.**

छ.संभाजी महाराजांच्या हत्येमुळे महाराष्ट्रात स्वातंत्र्याची अस्मिता जागृत झाली व एक नवे अस्मितापर्व उदयास आले. डॉ.बाहेकर म्हणतात, "११ मार्च १६८९ रोजी संभाजी राजांची अत्यंत क्रूरपणे आणि अमानुषपणे वढू येथे हत्या करण्यात आली. संभाजी राजांच्या हौतात्म्याने महाराष्ट्रात प्रचंड शक्ती निर्माण झाली. संभाजी राजांच्या मृत्यूनंतर अठरा वर्षापर्यंत मराठयांनी मोघलांशी झुंज दिली. औरंगजेबाची स्वप्ने धूळीस मिळविली. अत्यंत धाडसी, शूर, स्वाभिमानी, कधीच कच न खाणारा आणि शेवटच्या क्षणापर्यंत आपली मान ताठ ठेवणारा बाणेदार हा मराठयांचा लाडका राजा छत्रपती संभाजी हा राष्ट्राचे दैवत बनावा यात काहीच आश्चर्य नाही."[३४] या विवेचनावरुन संभाजी महाराजांच्या ऐतिहासिक कार्याची प्रचिती येते. त्यांनी आपल्या नऊ वर्षाच्या अल्पावधीत स्वातंत्र्य व सुसंस्कृती रक्षणाचे मूल्य जोपासले. त्यांच्या या मूल्यप्रेरणेमुळे मराठयांची सत्ता १८१८ पर्यंत कायम राहिली.

छत्रपती संभाजी महाराजांचे हे ऐतिहासिक कार्य हेच स्पष्ट करते की त्यांनी महाराष्ट्रातील लोकजीवनात स्वातंत्र्याची मूल्यप्रेरणा जोपासली व मराठी माणसाला ताठपणे उभे राहण्यासाठी स्वाभिमान दिला हेही लक्षात घेतले पाहिजे.

छत्रपती संभाजी महाराजांनी स्वराज्यासाठी केलेले बलिदान तीन संदर्भात विशेष महत्त्वाचे ठरते. १. म्हणजे त्यांनी धर्म व संस्कृतीवर आलेले ाक्रमण परतवून लावण्यासाठी स्वतः केलेल्या देहत्यागामुळे पुढील काळ वातंत्र्ययुद्धासाठी लागणारा सर्वंकष संघर्षाचा मूल्यविचार त्यांनी आपल्या बलिदानामुळे जोपासला. २. म्हणजे दुष्काळ, अवर्षण किंवा शत्रूचे सुलतानी आक्रमण यासारख्या संकटाशी लढताना आपल्या प्रजेमध्ये असलेला देशभक्तीचा भाव जोपासताना त्यांनी लोकांच्या

जीवनातील सत्व आणि स्वत्व सतत जिवंत ठेवण्यावर भर दिला होता. ३. म्हणजे राजा किंवा महानायक हे लोकलढ्यातील अग्रणी असतात. त्यांनी जोपासलेला ध्येयवाद हा चिरकाल टिकणारा असतो. युद्धपटलावर नायकाने केलेला संघर्ष हा लोकांच्या मनात त्याच मार्गाने जाण्यासाठी प्रेरक आदर्श देणारा असतो. भारतीय परंपरेत असलेले त्याग व समर्पणाचे महत्त्व या संदर्भात प्रामुख्याने लक्षात घेतले पाहिजे. कारण जोवर या त्याग व समर्पणाचा विचार लोकमानसात दृढ असतो तोवर स्वातंत्र्याचा संघर्ष हा तेवढाच गतिमानपणे चालू असतो.

छत्रपती संभाजी महाराजांच्या बलिदानानंतर १८१८ पर्यंत मराठ्यांचे राज्य टिकले. त्याचे कारण म्हणजे स्वातंत्र्याविषयी असलेली उत्कट निष्ठा आणि त्यासाठी सर्वंकष समर्पण करण्याची तयारी या दोन कारणांमुळे महाराष्ट्रातील प्रजा ही संघर्षासाठी सदैव तयार राहिली. त्यातच छत्रपती संभाजी महाराजांच्या मूल्यनिष्ठेचे खरे यश सामावलेले आहे. कारण इतिहासाच्या पटलावर त्यांनी अंधारातून प्रकाशाकडे जाण्याचा एक नवा मार्ग मराठे सरदार तसेच प्रशासकीय अधिकारी आणि धार्मिक व सांस्कृतिक क्षेत्रात कार्य करणाऱ्या दार्शनिकांना दाखवून दिला. त्यांच्या या ध्येयपथावर वाटचाल करणारे महाराष्ट्राचे खरेखुरे दर्शन पुढील काळात आपणास समर्थपणे घडते.

## १.४ संशोधनाची उद्दिष्टे

कोणत्याही सामाजिक संशोधनात सुस्पष्ट उद्दिष्टांशिवाय सखोल अध्ययन होऊ शकत नाही. हे लक्षात घेऊन या प्रबंधात मांडलेल्या उद्दिष्टांबाबत विचार करणे उपयुक्त ठरेल. सुनिश्चित अशा उद्दिष्टांमुळे संशोधन प्रक्रिया अधिक सुलभ होते. इतिहासाला शास्त्रीय बैठक देण्यात आली आहे. आणि वस्तुनिष्ठता हा इतिहासाचा एक महत्वाचा पैलू आहे. या संदर्भात असे म्हटले जाते की, “कोणत्याही विषयाचे

अध्ययन हे वस्तुनिष्ठ असले पाहिजे याची काळजी घेतली जाते, जर अध्ययन हे व्यक्तिनिष्ठ असेल तर अशा अध्ययनातून तथ्यांचा शोध घेतला जात नाही. असे अध्ययन हे पूर्वग्रह दुषित किंवा पक्षपातपूर्ण असण्याची शक्यता अधिक असते. वैज्ञानिक अध्ययनात अशा पक्षपात किंवा पूर्वग्रहाला कोणतेही स्थान नसते."[३५] त्यामुळे या अभ्यासाला सुनियोजित अशा उद्दिष्टांची निश्चिती केली आहे. ती उद्दिष्टे पुढे दिली आहेत.

**१. छत्रपती संभाजी महाराजांच्या कर्तृत्वाचा नवीन साधनांच्या आधारे अभ्यास करणे.**

ब-याचवेळा इतिहासाची साधने वस्तुनिष्ठपणे अभ्यासली गेली नाही तर व्यक्ती किंवा कालखंडाचा इतिहास अभ्यासतांना इतिहासलेखनावर अन्याय होण्याची शक्यता असते. छत्रपती संभाजी महाराजांविषयी दुराचारी, व्यसनी असे अनेक गैरसमज आहेत. त्याचे खरे कारण म्हणजे राजारामाच्या काळात लिहिली गेलेली चिटणीस बखर होय. मूळ कागदपत्रांच्या आधारे अभ्यास केला असता या प्रकारच्या गैरसमजावर नवा प्रकाश टाकता येतो. इंग्रज प्रवाशाने नोंद केल्याप्रमाणे, "पित्याचे शौर्य आणि स्थान यांचा वारसा संभाजीकडे आला आणि...तो तरुण राजपुत्र धैर्यवान आणि आपल्या पित्याच्या कीर्तीला शोभेल असाच आहे...त्याचे सैनिक त्याला जणू शिवाजी समजूनच मान देतात. त्यांना संभाजीच्या हाताखाली लढावयास आवडते. आणि शूर कृत्याचा सन्मान करण्यात त्याला आनंद वाटतो."[३६] विदेशी कागदपत्रातून प्रकट होणारे संभाजी महाराजांचे जीवन चरित्र नव्याने अभ्यासले असता त्यांचे उपेक्षित गुण प्रकाशात येऊन त्यांच्यावर आरंभीच्या इतिहासकारांनी केलेला अन्याय दूर होऊ शकतो.

**२. छत्रपती संभाजीच्या काळातील लोकजीवनाचे ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीने अध्ययन करणे.**

वर्तमानकाळात राजकीय इतिहासापेक्षा सामाजिक इतिहासाला जास्त महत्त्व आले आहे.[३७] सामाजिक इतिहासात परिवर्तनाच्या प्रक्रियेला गती देणारा व इतिहासाच्या उपेक्षित पैलूंवर प्रकाश टाकणारा इतिहास असतो. संभाजी कालीन समाज व संस्कृतीचे यथार्थ आकलन गद्य-पद्य साहित्य काव्य यांच्या आधारे करता येऊ शकते. त्यावरुन तेव्हाचे वैभवशाली जीवन पुन्हा एकदा चित्रित करता येईल.

**३. छत्रपती संभाजीच्या काळातील राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक जीवनावर नवीन साधनांच्या आधारे प्रकाश टाकणे.**

छ. संभाजी राजांच्या काळात शिवकालीन स्वराज्यात दुफळी माजली होती. सोयराबाईने राजारामाला गादीवर बसविले. संभाजीला हे समजताच संभाजी रायगडावर २० हजार सैनिकांनीशी आला व २० जुलै रोजी राजे सिंहसनारुढ झाले या दुफळीबद्दल कोलारकर म्हणतात, "अशा रीतीने सोयराबाई व तिचे समर्थक यांनी जे संभाजीविरुध्द कारस्थान केले होते ते सपशेल कोसळून पडले."[३८] त्यानंतर छ. संभाजी महाराजांनी स्वराज्याची घडी नव्याने बसविली आणि प्रशासनाला गती दिली. त्यांनी आपल्या समोर असलेल्या अडचणींवर क्रमाक्रमाने मात करण्याचा प्रयत्न केला.

तत्कालीन दुष्काळी परिस्थितीबाबत कमल गोखले म्हणतात, "१६८६ च्या नोव्हेंबर महिन्यात सातारा जिल्हयात दुष्काळ पडला होता. मौजे बोरगावचा अनाजी हरजी व जानोजी, तुकोजी, सोनजी, रेवजी पटेल यांना एका दिवसाचेही खावयास राहिले नव्हते. तेव्हा ते धनाजी जाधवकडे गेले आणि आम्हाला वाचवा म्हणून अनाजी

हरजी वगैरे लोकांनी धनाजीला दि.२४-११-१६८७ रोजी आपल्या तकसीमपैकी तकसीम विकण्याविषयी लिहिले."[३९] याचा अर्थ असा की राज्यामध्ये दुष्काळ पडला असता सरदार वर्ग त्यांच्या उत्पन्नाचा वाटा प्रजेस देत असत.

महाराष्ट्र समाज संक्रमणातून वाटचाल करीत होता. त्याच्यावर धार्मिक अन्याय होत होते. डॉ.कमल गोखले म्हणतात, "मराठा-मुघल युध्दात हिंदू आणि मुसलमान एकमेकांच्या तावडीत सापडत. हिंदूनी मुसलमान धर्म स्वीकारला तर त्यांना कैदेत ठेवण्यात येत असे. मुसलमान धर्म स्वीकारण्यास नकार देतील त्यांची कत्तल करण्यात येई."[४०] १६८०-८१ मध्ये औरंगाबाद प्रांतातील कसबे हरसूल येथील एका ब्राम्हणावर आलेले धर्मांतराचे संकट छत्रपती संभाजी महाराजांनी त्यास त्रिंबकेश्वरास पाठविले. श्री त्रिंबकेश्वर व श्री गौरी यांची प्रदक्षिणा झाल्यानंतर त्याला पूर्वीच्या गंगाधर या नावाने शुध्द करून घेतले. अशा प्रकारे त्याचेवर आलेले धर्मांतराचे संकट संभाजी महाराजांमुळे टळले व त्यास पुन्हा हिंदू धर्मात राहता आले. ही एक आगळी-वेगळी घटना होय.

**४. तत्कालीन परिस्थिती प्रतिकूल असूनही छत्रपती संभाजी महाराजांनी बजावलेल्या भूमिकेचा आढावा घेणे.**

शिवाजी व संभाजी यांच्या काळाची तुलना करताना प्रा.टि.के.बिरादार म्हणतात, "छत्रपती संभाजींना लाभलेली परिस्थिती छत्रपती शिवाजींच्या काळातील परिस्थितीपेक्षा वेगळी होती. शिवाजींना औरंगजेबाच्या सरदाराविरुध्द लढावे लागले. औरंगजेब उत्तरेतील राज्यांवर नियंत्रण स्थापन करण्यास शिवाजीचे राज्य नष्ट करण्यापेक्षाही अधिक महत्त्व देत होता. त्यामुळे तो स्वतः दक्षिणेत आला नाही. याउलट संभाजींच्या काळात राजपुत्र अकबराने बंड करुन संभाजींच्या राज्यात मदत मिळविण्याच्या उद्देशाने प्रवेश केला होता. संभाजी व अकबर यांनी मिळून उत्तरेतील राजपुत राजे तसेच मोगल सरदारांना औरंगजेबाविरुध्द बंड करण्याचे आवाहन केले

होते. त्यामुळे आपल्या अस्तित्वालाच धोका निर्माण झाल्याचे सम्राटास वाटत होते. म्हणूनच त्याने सर्व शक्तिनिशी दक्षिणेत मोहिम काढली होती. अकबराचे बंड नष्ट करण्याबरोबर मराठयांचे राज्यही जिंकून घेणे हा त्याचा मुख्य उद्देश बनला."[४१] अशाप्रकारे संभाजी राजांनी हा उद्देश आपल्या धोरण व कृतीने समर्थपणाने हाणून पाडल्याचे दिसते.

या चारही उद्दिष्टांचा साकल्याने विचार केला असता असे दिसते की, या प्रबंधासाठी निवडलेला ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीकोन हा या संशोधनाचा गाभा आहे. कारण मराठी सत्तेच्या उदयापासून ते ऱ्हासापर्यंत विविध कालखंडातील घटना पटलांचा आढावा घेतला असता बहुसंख्य अध्ययने ही राजकीय इतिहासावर प्रकाश टाकणारी आहेत. अ. रा. कुलकर्णी यांनी त्यास छेद देऊन 'महाराष्ट्र अंडर द एज ऑफ शिवाजी' या मराठवाडा विद्यापीठास सादर केलेल्या पीएच.डी. प्रबंधात शिवाजी महाराजांच्या प्रगमनशील आर्थिकदृष्टीची मांडणी केली. त्यांनी शिवरायांची महसूल व्यवस्था ही रयतेची व्यवस्था कशी होती आणि त्यात जनतेच्या आशा-आकांक्षाचे प्रतिबिंब कसे उमटले होते याबाबत विश्लेषण केल्याचे दिसून येते.

"शिवचरित्र इतिहासातील साधने" हा त्र्यंबक शंकर शेजवलकर यांचा ग्रंथ छत्रपती शिवाजी महाराजांच्या प्रशासकीय चातुर्याचे साक्षेपी आकलन घडविणारा आहे. पांडुरंग पिसुर्लेकर आणि डॉ. रविंद्र रामदास यांनी पोर्तुगीज साधनांच्या आधारे शिवकालीन घटनांवर नवा प्रकाश टाकला आहे. डॉ. बी. एन. आपटे यांनी मराठ्यांच्या नौदलाचा पहिला समग्र व परिपूर्ण अभ्यास केला. तसेच डॉ. म. श्री. माटे यांनी मराठेकालीन स्थापत्य व शिल्पकला हा उपेक्षित पैलू समोर आणला आहे. तसेच डॉ.एस. एन. सेन यांनी मराठ्यांच्या लष्करी प्रशासनावर परिपूर्ण प्रकाश टाकला असून गनिमी काव्याचे युद्धतंत्र मराठ्यांनी कसे विकसित केले यावर सुक्ष्म अंगांनी विचार केला आहे. या सर्व ग्रंथरचनांचा आढावा घेतला असता असे दिसते की, या

अभ्यासात एकतर राजकीय चतुराई मांडली आहे किंवा अन्य एखाद्या पैलूचे विशेष आकलन केले आहे, परंतु ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीने त्याकाळातील लोकजीवनातील स्थित्यंतरे मात्र अभ्यासली गेली नाहीत. त्यामुळे यादृष्टीने या प्रबंधात नव्याने मांडणी केली आहे.

## १.५ संशोधनाची गृहितके

कोणतेही सामाजिक संशोधन हे निश्चित अशा गृहितकांवर आधारलेले असते. निश्चित सुत्रे व अनुमाने बांधली तर संशोधनाचा पुढील मार्ग सुलभ होतो. नित्त्य नव्या ज्ञानशाखांचा शोध घेतांना गृहितकृत्ये निश्चित करुन शोध घेतला असता पुढील आकलन करणे सुलभ होते. सर्वसामान्य माणूस आणि संशोधन करणारी व्यक्ती यांच्यात नवीन ज्ञान प्राप्त करुन घेण्याची जी लालसा असते यात फरक असतो. सामान्य माणूस नवीन ज्ञान हे स्वतःच्या फायद्याइतपच विचार करतो. तर संशोधक हा जो नविन ज्ञान ग्रहण करण्याचा प्रयत्न करतो त्यात त्याचा शास्त्रीय व वैज्ञानिक दृष्टीकोण असतो. कारण त्याला मिळणारे ज्ञान जे ज्ञान असते ते इतरांना सुध्दा त्याचा उपयोग झाला पाहिजे हा मूळ उद्देश असतो. तर्कशास्त्राच्या आधारे तो ज्ञान मिळवत असतो. या चौकटीत प्राप्त केलेल्या ज्ञानाला वस्तुनिष्ठतेची चौकट असते. यात कार्यकारण भावाचा संबंध असतो. पुरावे आणि क्रमबध्दता यावर हे ज्ञान अवलंबून असते. त्यामुळे अशी सुत्रे मांडून त्या अनुरोधाने संशोधकास शोध घ्यावा लागतो व तथ्ये मांडता येतात. अशा शास्त्रीय अभ्यासाच्या पध्दतीत 'गृहितकृत्ये' हा टप्पा महत्वाचा असतो.

संशोधक ज्या विषयात संशोधन करावयाचे त्यासंबंधात संपादीत केलेल्या माहितीचे वर्गीकरण करतो. त्याच्या आधारे गृहितकृत्याची पार्श्वभूमी तयार करुन संशोधनाच्या बाबतीत काही अंदाज मांडतो या अंदाजालाच शास्त्रीय भाषेत सिध्दांत

कल्पना किंवा गृहितकृत्ये असे म्हणतात. ज्ञात असलेल्या माहितीच्या आधारे एखाद्या घटनेच्या संबंधात केलेले अंदाज याला गृहितकृत्ये म्हणतात. हे गृहितकृत्ये बरोबरच असतीलच असे नाही. कोणत्याही विषयाच्या संशोधन कार्यात गृहित आवश्यक असते. अशी गृहितकृत्ये हे एक सुनिश्चित अनुमान असते व ते सतत शोधकार्यास पोषक ठरते. त्यामुळे संशोधनास दिशा प्राप्त होते. त्यांच्या सहाय्याने अभ्यासक संशोधनाचे संभाव्य चित्र रेखाटत असतो. संशोधनाचा तो पाया असतो. ते प्रयत्नपूर्वक निर्माण करावे लागते. त्यामुळे निरीक्षणाला दिशा प्राप्त होते. अशा प्रकारच्या सुत्रबध्द मांडणीमुळे गृहितकृत्ये निश्चित आकार घेतात.

कोहेल व नॅगेल यांनी गृहितकृत्याचा अर्थ अतिशय स्पष्टपणे सांगितला आहे. त्यांच्यामते "चौकशी वा संशोधनास चालना देणा-या प्रारंभिक अडचणींचे वा समस्येचे संभाव्य निराकरण वा उत्तर सूचल्याशिवाय आपण संशोधनकार्यात पहिले पाऊल सुध्दा पुढे उचलू शकत नाही. समस्येची अशी संभाव्य उत्तरे आपणास अध्ययन विषयाच्या कोणत्यातरी पैलूमुळे किंवा अध्ययन विषयाच्या पूर्वज्ञानामुळे सुचतात. अशा उत्तराचे जेव्हा विधानामध्ये रुपांतर केले जाते तेव्हा ती उत्तरे गृहितकृत्ये बनतात."[४२] "इ.एच.बोगार्ड्स यांच्यामते परीक्षण केल्या जाणा-या विधानास गृहितकृत्ये असे म्हणतात."[४३] गुड आणि हॅटस म्हणतात, "गृहितकृत्य अथवा उपकल्पना म्हणजे असे अनुमान की जे तथ्य निरिक्षणावर आधारलेले असून, ज्यामुळे भावी संशोधन कार्याला चालना मिळते."[४४] "पूर्ण परीक्षाअंती जे विधान संशोधन कार्यासाठी स्वीकारावे किंवा नाकारावे हे ठरवले जाते त्या विधानाला गृहितकृत्ये म्हणावे अशी बर्लिन यांनी गृहितकृत्याची मिमांसा केली आहे."[४५]

लुंडबर्ग यांच्यामते, "गृहितकृत्ये हे एक सामाजिक आणि कामचलाऊ सामान्यीकरण किंवा निष्कर्ष आहे की, ज्यांच्या सत्यतेची परिक्षा घेणे अजून बाकी

आहे. संशोधनाच्या प्रारंभिक अवस्थेत गृहितकृत्ये एक अनुमान, मनोकल्पित, कल्पनापूर्ण विचार किंवा आणखी असू शकते. जो क्रिया किंवा संशोधनाचा आधार बनतो."[४६] अशा प्रकारच्या गृहितकांची मांडणी केल्यामुळे शोध कार्य अधिक सुलभ होते. या अभ्यासातील गृहितके पुढीलप्रमाणे नोंदविता येतील.

१. छत्रपती संभाजी शूर व पराक्रमी होते परंतु त्यांना इतिहासात न्याय मिळाला नाही. त्यांच्याविषयीचे गैरसमज चिटणीस बखरीवर आधारलेले आहे.

२. छ. संभाजी महाराजांचे तत्कालीन बखरकारांनी (चिटणीस बखर) त्यांचे चित्रण पूर्वग्रहदुषित पध्दतीने केले.

३. युध्द प्रिय असा हा राजपुत्र समोरासमोरच्या लढाईत तळपत असे. पोर्तुगिज कागदपत्रातील माहितीनुसार संभाजी पराक्रमामध्ये आपल्या पित्याइतकाच शूर होता म्हणून ते संभाजीचा उल्लेख (Warlike Prince) युध्द आवडणारा राजपुत्र असे वर्णन करतात.

४. छ. संभाजी महाराजांनी परकीय शत्रूंच्या हालचाली पाहून त्यांच्यावर त्यांनी ख-या अर्थाने मात केली व लोकांनी त्यांच्या युध्दमोहिमांचे समर्थन केले.

५. छ. संभाजी महाराजांनी मोगलांशी लढतांना त्यांनी शत्रूचे विभाजन करून त्यावर मात करण्याचे तंत्र वापरले व त्यांच्या विरुध्द लढण्याची जनमानसात प्रेरणा व स्फूर्ती तयार केली.

६. छ.संभाजीकालीन सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतीक जीवनाबद्दल पुरेसा अभ्यास झालेला नाही त्यामुळे लोकजीवनाच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष झाले आहे.

या सर्व प्रमुख गृहितकृत्यांची पडताळणी व तपासणी या प्रबंधामध्ये शास्त्रीय पध्दतीने करावयाची आहे.

गृहितकांची आखणी व पडताळणी करताना इतिहास शास्त्रात अधिक सावध भूमिका घ्यावी लागते. कारण ही गृहितके पुढे प्रमेयात रुपांतरीत होतात. त्यांचे सूत्रीकरण करताना परखड सत्य, सबळ पुरावे आणि सैद्धांतिक बैठक या तीन बाबींना अधिक महत्त्व द्यावे लागते. या सर्व बाबींचे आकलन करताना प्रथम मुलभूत संकल्पना समजावून घेतल्या पाहिजेत.

## १.६ संकल्पना

या संशोधनात शीर्षकात आलेल्या दोन संकल्पना स्पष्ट केल्या पाहिजेत. पॉलिन यंग यांच्या मते, "तथ्यांच्या प्रत्येक नव्या वर्गाला अन्य वर्गातील काही निश्चित वैशिष्टयांच्या आधारावर वेगळे करण्यात येऊन त्यास एक संक्षिप्त नाव किंवा लेबल दिले जाते त्यास संकल्पना म्हणतात. वास्तविक अर्थाने संकल्पना ही तथ्यांचा एक वर्ग किंवा समूहाची एक संक्षिप्त व्याख्या आहे."[४७] कोणत्याही संशोधनात शास्त्रीय संकल्पनांचे आकलन व त्यांचे विश्लेषण करण्यावर भर द्यावा लागतो. गुड आणि हॅट यांच्यामते, "सर्व संकल्पना अमूर्त असतात आणि त्या वास्तविकतेच्या काही विशिष्ट पैलूंचे प्रतिनिधीत्व करतात."[४८] अशा संकल्पनांचे शास्त्रीय आकलन वस्तूनिष्ठतेकडे जाण्यास पोषक ठरते. मिचैल यांच्यामते, "एका वर्णनात्मक गुण किंवा संबंधाकडे संकेत करणारा शब्दप्रयोग म्हणजे संकल्पना होय."[४९] अशा गुणसंबंधाचे वर्णन संकल्पनातून केले जाते. व त्यांचे विवेचन शास्त्रीय आकलनावर आधारलेले असते.

वरील व्याख्यांवरुन संकल्पनेचा अर्थ स्पष्ट होतो. या व्याख्यांवरुन असे म्हणता येईल की, संकल्पना घटनांना समजण्याची एक पध्दत आहे. दैनंदिन मानवी व्यवहारात देखील संकल्पनांचा उपयोग केला जातो.

**अ) महाराष्ट्र :**

महाराष्ट्र हा शब्द रठ्ठ-रठ्ठीक महाराष्ट्र या शब्दापासून पुढे आला आहे. मराठी विश्वकोशात म्हटले आहे.

म.म.पी.वा.काणे यांच्या मते, " 'महान राष्ट्र' यावरुन महाराष्ट्र या शब्दाची व्युपत्ती झाली आहे. महाराष्ट्र हे नाव कोणत्याही वंशावरुन किंवा जातीवरुन पडलेले नसून ते देशाच्या विस्तारावरुन पडले असावे. प्राचीन काळापासून दख्खनेच्या मधोमध एक प्रचंड अरण्य होते. त्याचा महाकांतार, महाटवि, दण्डकारण्य असा नामोल्लेख प्राचीन ग्रंथात आढळतो. परंतु आर्यांनी हा जंगलभाग साफ करुन तेथे सर्वत्र गावे, नगरे बसवून आर्य संस्कृतीचा विस्तार केला. अशा प्रकारे पूर्वीच्या महाकांतार किंवा महारण्याच्या ठिकाणी विस्तृत असे राष्ट्र झाल्याने त्याला महाराष्ट्र असे संबोधले जाऊ लोगले."[५०] याचा अर्थ असा की महाराष्ट्र ही संकल्पना आर्य काळापासून प्रचलित होती व ऐतिहासिक कालखंडात ती अधिक विकसित झाली.

या प्रदेशाचे प्राचीन कालात अनेक उपविभाग होते. यामध्ये विदर्भ, कुंतल, अपरांत, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, पांडू राष्ट्र असे विभाग होते. गोदावरी नदीच्या तिरावरील प्रदेश तो अश्मक, कृष्णेच्या उगमाजवळचा तो अपरांत म्हणजे कोकण, गोपराष्ट्र म्हणजे नाशिक भोवतालचा प्रदेश व त्याच्या दक्षिणेचा प्रदेश तो मल्लराष्ट्र असे मानले जात असे. या भागात प्राकृत भाषा बोलली जात असे.[५१] याच भाषेचे पुढे यादव काळात मराठी भाषेत रुपांतर झाले.

महाराष्ट्र महारठ्ठ-रठ्ठ यानामचिकित्सेवरुन या प्रदेशाला 'रट्ट' लोकांनी मुळ वसाहत केली असे दिसते. येथील मुळ लोकांचे मुळ नाव म-हाठे असे असावे. मरहटट हा शब्द कानडी असून 'झाडीमंडळ' असा प्रदेशवाचक एक अर्थ व झाडीमंडळातील 'हटटीजन'(पशुपालन करणारे धनगर गवळी) असा दुसरा अर्थ

होतो. तसेच महानुभाव साहित्यात "महाराष्ट्र म्हणजे महंत राष्ट्र म्हणोन महाराष्ट्र असा उल्लेख सापडतो."[५२] यावरुन या राष्ट्राची तेजस्वीता स्पष्ट होते.

राजाराम शास्त्री भागवत यांच्यामते संस्कृत नामकोशामध्ये येणारा 'मरहठ्ठ' हा जनवाचक शब्द 'मराठा' शब्दाची प्रकृती दिसतो. म-हाठा म्हणजे 'मरता तब हटता' अशी त्यांनी मरहठ्ठ शब्दाची लोकगुणवाचक व्युपत्ती सांगितली आहे.[५३] याचाच अर्थ असा होता की मराठा शूर, पराक्रमी व स्वाभिमानी होते.

अशोकाच्या शीलालेखात दक्षिणेतील रठ्ठ लोकांनाच रास्टीक असे म्हटले असून त्याचेच संस्कृत रुप 'राष्ट्रिक' झाले. असे रा.गो. भांडारकर यांनी आपल्या 'अर्ली हिस्टरी ऑफ द डेक्कन' या दख्खनच्या प्राचीन इतिहासविषयक ग्रंथात म्हटले आहे.[५४] यावरुन प्राचीन काळाची परंपरा स्पष्ट होते. अशाप्रकारे महाराष्ट्र जन हे पराक्रमी, स्वाभिमानी आणि तेवढेच अस्मितेचे जतन करणारे होते. ते अपमानाचा बदला घेत असत. महाराष्ट्रातील लोकांचा हा स्वाभिमान आणि त्यांची अस्मिता याबाबत ह्युयेन त्संगाच्या प्रवासवर्णनापासून ते इटायलियन प्रवाशांपर्यंत आलेली वर्णने अभ्यासली असता महाराष्ट्रातील लोकपरंपरेचे तेजस्वी रूप लक्षात येते. दिलेला शब्द पाळावयाचा आणि स्वराज्यासाठी प्राणाचे समर्पण करावयाचे हा महाराष्ट्र धर्माचा गाभा होता. महाराष्ट्र धर्माबाबत वि. का. राजवाडे, वासूदेवशास्त्री खरे, राजारामशास्त्री भागवत इत्यादींनी केलेले विश्लेषण हे मराठी विरांच्या त्याग, सेवा व समर्पणावर भर देणारे असल्याचे दिसून येते. छत्रपती संभाजी हे त्यास अपवाद नव्हते.

## ब) लोकजीवन :

भूतकाळात वावरणा-या समाजाची दैनंदिन जीवनपध्दती म्हणजे तत्कालीन लोकजीवन होय. स.मा.गर्गे म्हणतात, "मानवांचे सहजीवन समाजामुळेच सातत्याने

चालू राहते. इतर मानवांच्या सहवासात राहूनच त्याला जगणे, वाढणे आणि विकसित होणे शक्य असते.''[५५] त्यामुळे लोकजीवनाचा अभ्यास केला असता त्या कालखंडामध्ये माणसाने वा समूहांनी आपला विकास कसा केला ते समजू शकते.

स.मा.गर्गे म्हणतात, ''समाजाला गती व चालना देणा-या महत्त्वाच्या घटनांचा व संघटनांचाही अभ्यास सामाजिक विज्ञानांना करावा लागतो. अनेक संस्थांशी आणि व्यक्तींशी व्यक्तीचे वर्तन निगडीत असते. त्यातून व्यक्तीच्या वागण्याच्या वर्तमान पध्दतीच्या क्रिया व प्रतिक्रिया समूहावर घडत जातात. त्याला अनूसरुन नव्या गरजा प्रमाणे समाजात अनेक संस्था निर्माण होतात. त्यांची रचना, कार्य, व्याप, हेतू यांच्याशी समाजाचा एक घटक म्हणून व्यक्तीचा संबंध येणे अपरिहार्य असते.''[५६] गतकालीन जीवनाचे विवेचन करतांना अशा सामाजिक इतिहासावर भाष्य करावे लागते. छ. संभाजीचा काळही याच दृष्टीने अभ्यासता येईल.

छत्रपती संभाजी महारांजांचा संबंध तत्कालीन समाजाशी कसा आला त्यावरुन त्याकाळची परिस्थिती अभ्यासता येते. छत्रपती संभाजी महाराजांना केंद्रस्थळी मानून त्याकाळातील समाजाचे चित्र या अभ्यासामध्ये शोधावयाचे आहे. लोकजीवनाच्या अभ्यासात लोक आणि त्यांचा सहभाग, लोक आणि त्यांचे जीवन, लोक आणि त्यांची संस्कृती, लोक व त्यांचा धर्म आणि लोक आणि त्यांनी जोपासलेल्या सभ्यता या सर्व बाबींचा समावेश होतो.

## १.७ लोकजीवन : अभ्यासाचे पैलू

*( सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक पैलू )*

### अ) सामाजिक जीवन :

सामाजिक संबंध हे कुटूंबसंस्थेवरुन स्पष्ट होतात. प्रा. सदाशिव आठवले म्हणतात, ''सामाजिक उत्क्रांतीच्या इतिहासात कुटूंबाचे स्थान महत्त्वाचे मानलेले

आहे. कौटूंबिक जीवन सुरु झाले, तेव्हापासून कुटूंबातील घटकांचे संबंध सर्वात अधिककाळ टिकतात आणि सर्वात अधिक मजबूत असतात, असे सर्व प्रदेशातील लोकांच्या अनुभवावरुन दिसते."[५७] संभाजीकालीन महाराष्ट्र त्यास अपवाद नव्हता. स.मा.गर्गे यांनी अशा अध्ययनातील समाजशास्त्रीय पैलू बारकाईने मांडले आहे. त्यांच्या मते, "मनुष्याचे संगोपन आणि संवर्धन करण्यासाठी सामाजिक, सांस्कृतिक संस्था उभ्या राहतात. त्यातून मनुष्याच्या मनावर आणि बुध्दीवर विविध प्रकारचे संस्कार घडतात. अशा प्रकारे अनेक अंगांनी मनुष्याचे जीवन घडते, वाढते, यश मिळविते आणि कित्येकदा अपयशीही ठरते, अशा समाजात मनुष्याने वागणे, बोलणे, धोरण ठरविणे, विचार करणे आणि शक्ती बुध्दीनुसार काही क्रिया घडविणे. या सर्वांच्या अनुषंगाने सामाजिक विज्ञानात विचार करावा लागतो."[५८] जात धर्म आणि विविध संस्थांचा अभ्यास करताना वैज्ञानिक दृष्टी ठेवली तर लोकजीवन चांगले स्पष्ट करता येते. येथे छ. संभाजी काळाचा असाच अभ्यास करावयाचा आहे.

छ. संभाजी महाराजांच्या यशापशाचा विचार करता हे सर्व पैलू अभ्यासावे लागतात. त्यामुळे त्यांच्या सामाजिक जीवनशैलीची यशापयशाची आणि त्यांच्या काळातील संस्थात्मक जीवनाची कल्पना यथार्थपणे प्रकट होऊ शकते.

छ. संभाजी महाराजांच्या काळातील समाज जीवनाचे आकलन केले असता असे दिसते की, हे समाज जीवन परस्पर विश्वास श्रद्धा आणि निष्ठेवर आधारलेले होते. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांपासून समर्थ रामदासांच्यापर्यंत साधूसंतांनी महाराष्ट्रात मराठी भाषा, धर्म आणि संस्कृतीविषयी स्वतंत्र अस्मिता जोपासली होती. त्याचे वर्णन रामदासांनी महाराष्ट्र धर्म असे केले आहे. या महाराष्ट्र धर्माचे सूत्र असे होते की, अठरा पगड जातींमधील लोक स्वातंत्र्याच्या समान भावनेने संघर्ष करण्यासाठी सिद्ध झाले होते आणि त्यांच्यातील सहसंघर्षाचा भाव तत्कालिन समाजाचे वैशिष्ट्य होऊन बसला होता. ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीने महाराष्ट्र समाजाचे आकलन करून येथे लोकजीवनाचा अभ्यास करावयाचा आहे.

## आ) आर्थिक जीवन :

समाजातील अर्थव्यवहाराचे आकलन केले असता त्या काळातील आर्थिक जीवनावर प्रकाश टाकता येतो. स.मा.गर्गे म्हणतात, "काही गरजा खाजगी स्वरुपाच्या असतात त्या मुलभूत गरजा असतात. पण काही गरजा या सार्वजनिक अथवा सामुहिक असतात. अन्न, वस्त्र, निवारा या खाजगी गरजा होत. पण वाहतूक, दळणवळण, शिक्षण, आरोग्य यांचा अंतर्भाव सामुहिक गरजांत होतो."[५९] संभाजी महाराजांच्या कालखंडातील दुष्काळामुळे बिकट आर्थिक परिस्थिती निर्माण झाली व लोकजीवन अस्थिर बनले.

शेती हा मध्ययुगीन अर्थकारणाचा कणा होता. डॉ.अ.रा.कुलकर्णी म्हणतात, "सतराव्या शतकात महाराष्ट्राचे आर्थिक जीवन शेती व्यवसायाशी संपूर्णपणे निगडित झाले होते. उद्योगधंदे, व्यापार आणि इतर व्यवसाय यांना आर्थिक व्यवस्थेत दुय्यम दर्जाचे स्थान होते. उत्तम शेती, मध्यम व्यापार आणि कनिष्ठ नोकरी" हे सुभाषित प्रसिध्दच आहे. शेती व्यवसाय हाच जीवनाचा एकमेव मार्ग असल्याने महाराष्ट्रात जमिनीला 'काळी आई' असे म्हणत असत. शेतीच्या उत्पन्नावर गावचे अधिकारी, मिरासदार, बलुतेदार, उपरे यांचे जीवन अवलंबून असे."[६०] पण या शेतीला दुष्काळाचा फटका बसला की शेतक-याची पंचाईत होत असे. डॉ.कुलकर्णी म्हणतात, "बरीच शेती ही निसर्गाच्या मेहेरबानीवर अवलंबून असे. त्यामुळे स्वाभाविकच 'जिरायत' जमिनीचे प्रमाण फार मोठे होते. पाऊस पडला नाही, धान्य पिकले नाही, तेव्हा सा-यात सूट द्यावी अथवा तो पूर्णतया माफ करावा अशा तक्रारी रयत करीत असल्याची अनेक उदाहरणे आपल्याला कागदपत्रात आढळतात."[६१] संभाजी काळात असे चित्र अधिक भयानक झाले.

ॲबे कॅरे नावाच्या एका समकालीन प्रवाशाने आपल्या प्रवास वर्णनात म्हटले आहे, "शत्रुच्या भयामुळे अथवा हालचालीमुळे अथवा स्वा-यामुळे माझ्या प्रवासाच्या मार्गावरील अनेक गावे ओस पडली होती. कुलाबा जिल्हयातील सावित्री नदीच्या काठावरील एका खेडयातील सर्व माणसे आपली कुटूंबे आणि जनावरे घेऊन शेजारच्या डोंगरात लपून बसली होती. नदी काठच्या प्रत्येक खेडयातील लोकांना सिध्दी लोकांची फारच भीती वाटत होती. हे सिध्दी सैनिक सशस्त्र बोटीतून येत, एखाद्या खेडयात घुसत आणि ते संपूर्ण लुटत, कोळयांच्या नावा जाळून टाकीत आणि परत जात."[६२] ॲबेकॅरेने केलेले नोंदीच्या शोषणाचे हे चित्र भेदक व हृदयद्रावक असे आहे.

छत्रपती शिवाजी आणि संभाजी महाराजांच्या काळातील आर्थिक जीवनाचे आकलन करताना उभयतांनी केलेल्या सुधारणा, त्यांची महसूल पद्धती तसेच चलन पद्धती आणि त्यांनी घेतलेले लोककल्याणकारी निर्णय याचा विचार करावा लागतो. पद्माकर प्रभूणे यांनी लिहिलेल्या महाराष्ट्रातील चलन व्यवस्था या ग्रंथात शिवकाळाविषयी एक स्वतंत्र प्रकरण देण्यात आले आहे. या प्रकरणामध्ये शिवाजी महाराजांनी होण ही आपली सुवर्णमुद्रा कशी विकसित केली. तसेच हुंडी आणि वापी याद्वारे वेतन देण्याची पद्धत कशी आणली. मंत्र्यांच्या व्यवहारावर कसे नियंत्रण ठेवले या सर्व बाबींचा अभ्यास केला असता आर्थिक सुधारणांचे वेगळेपण लक्षात येते. रयतेच्या भाजीच्या देठासही हात लावू नये नाहीतर मुगल मुलकात आले त्यातून तुम्ही ऐसा तळतळाट होईल असे शिवाजी महाराज आपल्या पत्रातून बजावतात. हे सूत्र संभाजी महाराजांनीसुद्धा आपल्या प्रशासनात काळजीपूर्वक जोपासले होते. त्यांनी केलेल्या आर्थिक सुधारणा या त्यामुळे प्रजाहितदक्ष आणि कल्याणकारी दृष्टीवर भर देणाऱ्या होत्या. हे सूत्र लक्षात घेतले पाहिजे.

## इ) धार्मिक जीवन :

धर्म हा तत्कालीन जीवनाचा महत्त्वाचा भाग होता. स.मा.गर्गे म्हणतात, "धर्मवेडया मनुष्याला एखाद्या विशिष्ट कल्पनेची इतकी खात्री पटलेली असते की ती कल्पना इतरांनाही पटविण्याचा त्यांचा ठाम निश्चय असतो. त्यांचा स्वभाव चिंतनशील नसतो. एखाद्या गोष्टीची आपल्याला पटलेली सत्यता आपल्यापुरतीच मर्यादित ठेवून आपले आयुष्य त्यानुरुप जगणे हे त्याला पटत नाही. इतरांनीही आपले म्हणणे मान्य केलेच पाहिजे असा त्यांचा आग्रह असतो."[६३] संभाजी काळात मुस्लिमांचा असाच हटट होता. "अशा धर्मवेडाने पछाडलेला मनुष्य कृतिशिल असतो, तडाखेबंद प्रचारक असतो, अविश्रांत काम करणारा असतो. एवढेच नव्हे तर आपल्याला पटलेली एखादी कल्पना पटवून देण्याकरिता इतरांना ठार करण्यास मागेपुढे पहात नाही."[६४] मोगल बादशहा औरंगजेबाचे धार्मिक धोरण हे असेच अंधश्रद्धेने व कडव्या धर्मवेडाने युक्त होते.

छत्रपती संभाजी महाराजांनी मोगलांच्या अतिरेकी धार्मिक धोरणास प्रतिशह देऊन स्नानसंध्या करण्यासाठी महाराष्ट्रात शिवरायांनी निर्माण केलेले धार्मिक स्वातंत्र्य पुढे अबाधित ठेवले. या धर्मस्वातंत्र्याचे मर्म मराठ्यांनी मुगलांशी केलेल्या समर्थ लढ्यात होते. जिझिया कर तसेच यात्रा कर यासारख्या जुलमी धार्मिक कराविरुद्ध प्रजेमध्ये असलेला असंतोष देशभरात पहिल्यांदा मराठ्यांनी अभिव्यक्त केला. त्यामुळे शिवाजी महाराजांच्या दक्षिण दिग्विजयात दक्षिणेतील अनेक राज्यांनी त्यांच्या स्वराज्याचा स्वीकार केला आणि मोगलांच्या असमतोल धार्मिक धोरणाचा शेवट होऊन धर्मसहिष्णू विचारांचे राज्य निर्माण झाले. ख्रिश्चन, मुस्लिम तसेच अन्य समुदायांना सुद्धा त्यांच्या धर्मभावना जोपासण्यासाठी पुरेसे स्वातंत्र्य शिवाजी महाराजांनी दिले होते. तेच धोरण छत्रपती संभाजी महाराजांनी पुढे चालविले. त्यांच्या

धार्मिक धोरणातील महत्त्वाचे निर्णय आणि धोरणात्मक पावले अभ्यासली असता लोकजीवनाचा हा पैलू अधिक चांगला स्पष्ट होऊ शकतो.

**ई) सांस्कृतिक जीवन :**

सांस्कृतिक जीवनामध्ये माणसाच्या उपजीवीकेची साधने, त्याच्या खाण्यापिण्याच्या पध्दती, पोशाखाच्या त-हा येथपासून त्याची भाषा साहित्य, चित्र, नृत्य, शिल्प इत्यादी कलापर्यंत सर्वच जीवनव्यवहारांचा अंतर्भाव होतो. सदाशिव आठवले म्हणतात, "मनुष्याच्या सामाजिक संस्था आणि सामाजिक जीवनाच्या संदर्भातील त्याच्या कल्पना व मूल्य ही सुध्दा त्याच्या संस्कृतीचाच भाग असतात."[६५] मध्ययुगीन भारताच्या इतिहासातील सुलतानशाही व मोगलांचा काळ हा सांस्कृतिक अत्याचारांनी भरला होता. राजकीय सत्तेच्या जोरावर अल्पसंख्य समाज हा बहुसंख्यावर आपली संस्कृती लादत होता आणि त्यांना आपली मूल्य स्वीकारण्यासाठी बळजबरी करत होता. अशावेळी या संस्कृतिक असमतोलाशी झुंज देऊन, स्वभाषा, स्वधर्म व स्वसंस्कृती यांचे रक्षण करण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनी देवालये तसेच यात्रांची स्थळे, साधुसंतांचे मठ आणि समाधीस्थळ इत्यादींच्या विकासासाठी विशेष साह्य केले. त्यांचे हेच उदार व सहिष्णू सांस्कृतिक धोरण छत्रपती संभाजी महाराजांनी सुद्धा तेवढ्याच निष्ठेने पुढे चालविले. संभाजी महाराजांच्या सांस्कृतिक ध्येयधोरणाचे तात्विक आणि व्यवहार्य अशा दोन्ही दृष्टीने आकलन करण्याची गरज आहे.

संभाजीकालिन लोकजीवनाचे हे सर्व पैलू अभ्यासताना ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीकोन जसा महत्त्वाचा आहे तसाच दिशादर्शक आहे या सूत्राच्या आधारे लोकजीवनाचे हे अनेकविध पैलू अभ्यासावयाचे आहेत. या अभ्यासाच्या काही मर्यादासुद्धा लक्षात घेतल्या पाहिजेत.

## १.८ मर्यादा

कोणत्याही सामाजिक संशोधनामध्ये अभ्यासाच्या मर्यादा स्पष्ट कराव्या लागतात. प्रा.रा.ना.घाटोळे म्हणतात, "गुणात्मक तथ्यांवरुन परिणात्मक व वस्तुनिष्ठ निष्कर्ष काढणे कठीण असते. अनेकदा संशोधक मुळ विषय सोडून आडमार्गाला जातो. तसेच गुणात्मक तथ्यांचे विश्लेषण करताना पक्षपाती दृष्टीकोन टाळणे असंभव होते."[६६] हे सूत्र घेऊन या अभ्यासास असलेल्या काही मर्यादा येथे स्पष्ट केल्या आहेत. त्या पुढीलप्रमाणे सांगता येतील.

१. हा अभ्यास छत्रपती संभाजी यांच्या कार्यकाळापुरता मर्यादित आहे.

२. हा अभ्यास १६८० ते १६८९ एवढया काळापुरता केला आहे.

३. या अभ्यासामध्ये राजकीय घडामोडी व चरित्रापेक्षा लोकजीवनावर अधिक भर दिला आहे.

४. या अभ्यासात सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक पैलूंच्या आधारे महाराष्ट्रातील लोकजीवन अभ्यासले जाणार आहे.

५. या अभ्यासात नवीन ऐतिहासिक साधनांच्या आधारे विश्लेषण केले आहे.

या लोकजीवनाच्या अभ्यासात सर्वात महत्त्वाची मर्यादा म्हणजे हा अभ्यास एका दशकातील घडामोडींवर भर देणारा आहे. कालपटलाची ही मर्यादा लक्षात घेता अनेक पैलूंचा अभ्यास करताना शिवकालिन चित्र कसे होते आणि संभाजीकालीन चित्र कसे होते असे नकळत तुलनात्मक विवेचनसुद्धा करावे लागले आहे. या सर्व अध्ययनाचा भाग हा ऐतिहासिक समाजशास्त्रीय मांडणीवर आधारलेला आहे हे या अभ्यासाचे गमक होय.

## १.९ प्रकरण योजना

या संशोधनामध्ये सात प्रकरणे असून त्यांचा आराखडा पुढे दिला आहे.

१. प्रस्तावना

२. संबंधित साहित्याचा आढावा

३. संशोधन पध्दती

४. नव्या साधनांच्या आधारे छत्रपती संभाजीचे जीवन व कार्य

५. सामाजिक व आर्थिक जीवनाचे पैलू

६. धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचे पैलू

७. उपसंहार

ही सर्व प्रकरणे एकमेकांशी निगडीत असून, त्यामध्ये परस्पर पूरक अशी तथ्ये आली आहेत आणि या तथ्यांची मांडणी ही परस्परांना पोषक असून, त्याआधारे एकूण अभ्यासाला नवी दिशा देण्याचा प्रयत्न केला आहे.

## १.१० समारोप

अशा प्रकारे छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन या प्रबंधाची पार्श्वभूमी स्पष्ट केली आहे. शोधकार्यातील संकल्पना, उद्दिष्टे, महत्त्व, गृहितके स्पष्ट करण्यात आली आहेत. डॉ.अ. रा. कुलकर्णी यांनी शिवकालीन महाराष्ट्राचे जसे अध्ययन केले तसे या प्रबंधात छत्रपती संभाजीच्या संदर्भात केले जाणार आहे. या प्रकरणात संभाजीकालीन लोकजीवनाच्या अभ्यासाची आवश्यकता आणि महत्त्व नमूद करण्यात आले आहे. तसेच प्रस्तूत संशोधनात संभाजीकालिन लोकजीवनाच्या अभ्यासाचे महत्त्वपूर्ण असे पैलू कोणते आहेत व त्यांची निवड का केली आहे, त्याचा शोध कसा घ्यावयाचा आहे याची व्यूहरचनाच उलगडली आहे. लोकइतिहासाच्या अभ्यासात अनेक अडचणी येतात. तसेच अशा अभ्यासात स्थल, कालाच्या काही

मर्यादाही आहेत. या मर्यादांवर मात करताना साधनांची अचूकता, योजकता आणि दूरदृष्टीने मीमांसा करून लोकजीवनावर नवा प्रकाश टाकावयाचा आहे.

या प्रबंधात संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास हा संशोधनाचा गाभा आहे. त्या अनुषंगाने उपलब्ध प्राथमिक, दुय्यम साधनांचा योजकतेने उपयोग करून संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवनाचे सामाजिक, आर्थिक, धार्मिक आणि सांस्कृतिक हे पैलू उलगडावयाचे आहेत. संभाजीकालीन राजकीय जीवनावर पूर्वीच्या अभ्यासकांनी म्हणजेच वा. सी. बेंद्रे, डॉ. कमल गोखले,डॉ. पी. जी. जोशी, डॉ. सदाशिव शिवदे इत्यादींनी अभ्यास केला आहे, परंतु सामाजिक व आर्थिक जीवनाचा समग्र व एकसंघ असा अभ्यास झालेला नाही. त्याआधारे छ. संभाजीकालीन प्रशासनातील लोक, संस्था आणि विचार यांच्या आधारे उपरोक्त सर्व पैलूंचे नवे आकलन अभिप्रेत आहे. या आकलनाचे एक प्रभावी असे सूत्र आहे. हे सूत्र स्पष्ट करण्यासाठी पुढील प्रकरणात संबंधित साहित्याचा आढावा घेतला आहे.

## संदर्भ ग्रंथसूची


१. गायकवाड, डॉ.सरदेसाई, हनमाने, "इतिहास लेखन शास्त्र", फडके प्रकाशन कोल्हापूर, तृतीयावृत्ती, जानेवारी १९९०, पृष्ठ ३६

२. Brockhamption, "Dictionary of world History", Helicon Publishing Ltd., Landon, 1994, Page 530

३. गायकवाड, डॉ.सरदेसाई, हनमाने, उपरोक्त पृष्ठ ३७

४. कित्ता पृष्ठ ३७

५. कित्ता पृष्ठ ३७

६. बेंद्रे वा.सी., "छ. संभाजी महाराजांचे विकित्सक चरित्र", पीपीएच प्रकाशन, मुंबई, द्वितीय आवृत्ती, १९७१, पृष्ठ ३९३

७. डॉ.पवार जयसिंग, "मराठी सत्तेचा उदय", निराली प्रकाशन, पुणे, प्रथम आवृत्ती, १९९६, पृष्ठ २९८

८. डॉ.पवार जयसिंग (संपा.), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ ", मंजुश्री प्रकाशन, कोल्हापूर, प्रथम आवृत्ती, १९९०, पृष्ठ ५७

९. सरदेसाई गो.स., "उग्रप्रकृती संभाजी स्थिरबुध्दी राजाराम" खंड २, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, नवीन संदर्भासह संपादित केलेली आवृत्ती, १९८९, पृष्ठ ११६

१०. डॉ.बाहेकर.एस.ए., "हुतात्मा छत्रपती संभाजी राजे : काल आणि कर्तृत्व", कसब प्रकाशन, जळगाव, प्रथम आवृत्ती, १९९९, पृष्ठ ३५२

११. डॉ.गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ४९०

१२. कित्ता पृष्ठ ४९०

१३. डॉ.पवार जयसिंग, "मराठी सत्तेचा उदय", उपरोक्त पृष्ठ २९८

१४. Satyamurthi, "Handbook of research methodology in History", Tayloring Publication,New Delhi,First Edition,1995, page-14

१५. डॉ.गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ७

१६. प्रा.लेले वि.गो., (अनुवाद), "इतिहास म्हणजे काय", कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती, १९९४, पृष्ठ ८०

१७. डॉ.गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ४९०

१८. मुठे सुमन, "समाजशास्त्रीय संकल्पना परिचय", सौरभ प्रकाशन, नाशिक, प्रथमावृत्ती, १९९७, पृष्ठ ७

१९. Good and Hatt, "Social Research Method", Ravar Publication, New Dilhi, 2006, Page - 8

२०. दिवेकर सदाशिव महादेव (संपा), "कवि परमानंदकृत श्री शिवभारत", शब्दवेध प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती, १९९८, पृष्ठ ५७

२१. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ ११७

२२. कित्ता पृष्ठ ११९

२३. डॉ. गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ४१४

२४. कित्ता पृष्ठ २१४

२५. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २४

२६. कित्ता पृष्ठ २५

२७. कित्ता पृष्ठ २९

२८. कित्ता पृष्ठ ५५

२९. बिरादार टि.के., "मराठयांचा इतिहास", विद्याभारती प्रकाशन, लातूर, प्रथमावृत्ती २०००, पृष्ठ ३५८

३०. डॉ. गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ८५

३१. डॉ. कोलारकर श.गो., "मराठयांचा इतिहास", मंगेश प्रकाशन नागपूर, पाचवी आवृत्ती, पृष्ठ १३८

३२. डॉ. पवार जयसिंग (संपा.), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ", उपरोक्त पृष्ठ २५०

३३. डॉ. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ ११९-१२०

३४. डॉ. बाहेकर एस.ए., उपरोक्त पृष्ठ ३२३ - ३२४

३५. डॉ. आगलावे प्रदिप, "संशोधन पध्दतीशास्त्र व तंत्रे", विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती, जाने. २०००, पृष्ठ ५

३६. डॉ. गोखले कमल उपरोक्त, पृष्ठ ४८९

३७. गायकवाड, डॉ. सरदेसाई, हनमाने, उपरोक्त पृष्ठ ३७

३८. डॉ. कोलारकर उपरोक्त, पृष्ठ १२९

३९. डॉ.गोखले कमल उपरोक्त, पृष्ठ ३७२

४०. कित्ता पृष्ठ ४४६

४१. बिरासदार टि.के. उपरोक्त पृष्ठ ३९६-३९७

४२. Bhandarkar, "Methodology and Techniques of Social Research ", Himalaya Publication, Bombay First Publication 1977, page - 77

४३. डॉ.बोधनकर सुधिर, "सामाजिक संशोधन पध्दती", श्री साईनाथ प्रकाशन नागपूर, प्रथमावृत्ती १९९३, पृष्ठ - ५१

४४. कित्ता पृष्ठ ५१

४५. घाटोळे रा.ना., "समाजशास्त्रीय संशोधन - तत्वे व पध्दती", श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, सहावी आवृत्ती, १९९७, पृष्ठ ५८

४६. कित्ता पृष्ठ ४७०

४७. डॉ.आगलावे प्रदिप, उपरोक्त पृष्ठ ११०

४८. कित्ता पृष्ठ ११०

४९. कित्ता पृष्ठ ११०

५०. तर्कतिर्थ जोशी लक्ष्मणशास्त्री (संपा.), "मराठी विश्वकोश", खंड १२ वा, प्रकाशन महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ मुंबई, १९८५, पृष्ठ १४७१

५१. कित्ता पृष्ठ ४७१

५२. कित्ता पृष्ठ ४७०

५३. कित्ता पृष्ठ ४७०

५४. कित्ता पृष्ठ ४७०

५५. गर्गे स.मा.(संपा), "भारतीय समाज विज्ञानकोश ", खंड २ रा, कल्पना मुद्रणालय पुणे, पहिली आवृत्ती, १९८७ पृष्ठ २१

५६. गर्गे स.मा.(संपा), "भारतीय समाज विज्ञानकोश ", खंड १ ला, कल्पना मुद्रणालय पुणे, पहिली आवृत्ती, १९८६ पृष्ठ १

५७ कित्ता पृष्ठ ४५७

५८ कित्ता पृष्ठ १

५९ कित्ता पृष्ठ ८९

६०. डॉ. कुलकर्णी अ. रा., "शिवकालीन महाराष्ट्र", राजहंस प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती १९९३, पृष्ठ ५१

६१. कित्ता पृष्ठ ५१

६२. कित्ता पृष्ठ ५५

६३. गर्गे स. मा. (संपा), "भारतीय समाज विज्ञानकोश", खंड ३ रा, मेहता प्रकाशन पुणे, द्वितीयावृत्ती, २००७, कित्ता पृष्ठ ८७

६४. कित्ता पृष्ठ ८७

६५. गर्गे स. मा. (संपा), "भारतीय समाज विज्ञानकोश", खंड १ ला, उपरोक्त पृष्ठ ४५९

६६. घाटोळे रा. ना., उपरोक्त पृष्ठ १७७

# प्रकरण दुसरे

# संबंधित साहित्याचा आढावा

२.१ प्रास्ताविक

२.२ इतिहास लेखन प्रकाशित साहित्याचे साधनमूल्य

२.३ संबंधित साहित्याचे वर्गीकरण

२.४ मागील अभ्यासातील उणीवा

२.५ मतप्रवाह व प्रवृत्ती

२.६ पूर्वीच्या संशोधकांचे निष्कर्ष

२.७ तौलनिक विश्लेषण

२.८ समारोप

संदर्भ सूची

# प्रकरण दुसरे

# संबंधित साहित्याचा आढावा

## २.१ प्रास्ताविक :

कोणत्याही संशोधनात अभ्यास विषयाचे वाङ्‌मयीन समालोचन करणे महत्त्वाचे मानले जाते. प्रा.रा.ना.घाटोळे म्हणतात, “संबंधित साहित्याचे अध्ययन ही पहिली आवश्यक अट आहे. कारण त्याशिवाय त्या विषयाला लागणारे पूर्वज्ञान प्राप्त होत नाही. अशा प्रारंभिक ज्ञानाशिवाय किंवा सैध्दांतिक आधाराशिवाय शोध कार्य करणे म्हणजे अंधारात चाचपडणे होय.”[१] त्यामुळे प्रकाशित साहित्याचा आढावा घेऊन पुढे नवीन दृष्टीने मांडणी करता येते.

डॉ.पु.ल.भांडारकर म्हणतात, “संशोधनकर्त्याने निवडलेल्या विषय-क्षेत्राशी संबंधित साहित्याचे वाचन व मनन हा अन्वेषणात्मक अध्ययनातील एक महत्वाचा भाग होय. ज्या विषयाबाबत गृहितकृत्यांची मांडणीच झालेली नाही अशा विषयासाठी अन्वेषणात्मक अध्ययने विशेष उपयुक्त असतात. अशा अध्ययनांसाठी संशोधनकर्त्याने प्रथमतः त्या विषयाशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंधित साहित्य वाचून काढावे. असे वाचन करीत असताना त्या साहित्याच्या आधारे काही गृहितकृत्ये मांडता येण्यासारखी आहेत काय याकडे त्याने सतत लक्ष ठेवावे.”[२] अज्ञात अशा गृहितकृत्यांचा शोध घेऊन अभ्यासविषय नव्याने मांडताना साहित्य समालोचन दिशादर्शक ठरत असते.

प्रा.भांडारकर म्हणतात, “काही विषयांबाबत आधीच्या संशोधनकर्त्याने काही गृहितकृत्ये मांडलेली असली तर अशी गृहितकृत्ये एकत्र करुन पुढील संशोधनासाठी त्यांचे काय महत्त्व असू शकते याचा अंदाज संशोधनकर्त्यांनी घ्यावा.

तसेच त्या गृहितकृत्यांवरुन नवीन काही गृहितकृत्ये सुचविण्यासारखी असल्यास तसा प्रयत्न करावा."[३] गृहितकृत्ये ही पुढील शोधासाठी नवी दृष्टी देतात. त्यामुळे त्यांच्या आकलनासाठी साहित्य सर्वेक्षण दिशादर्शक ठरत असते. डॉ.सुमन बेहेरे म्हणतात, "ज्या क्षेत्रात अजिबात काही माहिती उपलब्ध नाही अशा क्षेत्रात चाचपडत जावे लागते. त्यासाठी पूर्व अध्ययन पोषक ठरते."[४] पुर्व अध्ययनाचा मागोवा घेतला असता. पुढील शोधकार्यास गती देता येते. मागील संशोधनाची मळलेली वाट नव्या दिशा उजळ करते.

प्रा.मा.शं.सोमण म्हणतात, "समाज हा परिवर्तनशील आहे. समाजाची रचना आणि कार्ये यात सततपणे बदल होत असतात. समाजाच्या बदलत्या स्वरुपाचे दर्शन जर घडवावयाचे असेल तर त्यासाठी समाजाची गतकालीन स्थिती कशी होती या गोष्टींचे ज्ञान असणे आवश्यक आहे"[५] मध्ययुगीन समाजाचे अध्ययन करताना गतकालिन संस्था, समूह, कुटुंबजीवन आणि व्यक्तिंचे परस्पर संबंध यात कसे बदल होत गेले. राजसत्तेच्या बदलाबरोबर धर्मसत्तेचा प्रभाव कसा कमी जास्त होत गेला, संस्थात्मक जीवनावर त्याचे काय परिणाम झाले या सर्व प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतात. त्यासाठी गतकालिन समाजिक जीवनचे बदलते स्वरूप लक्षात घेणे अगत्याचे आहे. हे आकलन होण्यासाठी मध्ययुगीन सामाजिक व आर्थिक जीवनशैलीबाबत पूर्वसुरींनी केलेल्या अभ्यासाचे अनेक नवे पैलू विचारात घेतले पाहिजेत व त्या पैलूंवर साक्षेपी प्रकाश टाकला पाहिजे. भूतकाळातील समाजजीवनात झालेले बदल वर्तमान संदर्भात समजून घ्यावे लागतात.

त्यामुळे या अध्ययनात छ.संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करताना पूर्वसुरींच्या संशोधनाचा आढावा घेणे उचित ठरते.

## २.२ इतिहास लेखन प्रकाशित साहित्याचे साधनमूल्य

इतिहास लेखनात प्राथमिक व दुय्यम साधनांना विशेष महत्त्व असते. बी.एन.सरदेसाई म्हणतात, "साधनांच्या व्याप्तीच्या क्षेत्रात निश्चित अनुमान बांधण्यास इतिहासाच्या प्रसंगांची वा घटनांची रुपरेषा माहित असावी लागते. इतिहासाचा तपशील जसा समजू लागतो तशी साधनांची व्याप्ती वाढत जाते. साधनांची यादी किंवा विषयवार नोंदी करणे हे अतिशय कंटाळवाणे काम आहे. साधनप्राप्ती करुन घेणे हे संशोधकाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे."[६] या प्रबंधामध्ये छ.संभाजीकालीन महाराष्ट्राचे लोकजीवन अभ्यासावयाचे आहे. त्यासाठी लागणारी साधने येथे अभ्यासावयाची आहेत. डॉ.पी.व्ही.यंग म्हणतात, "Historians, Philosophers, Social psychiatrists, Literary men as well as Social scientists use the historical approach as an aid in visualising society as a dynamic organism, and its structures and functions as steadily growing and undergoing change and transformation." समाज एक गतीशील सुसंघटीत शरीर आहे व त्याची रचना व कार्ये यांमध्ये संथपणाने पण सातत्याने बदल होत असतात. असे कल्पविन्यात इतिहास तज्ज्ञ, तत्वज्ञ, सामाजिक मानसविशारद्, साहित्यिक व सामाजिक संशोधक इतिहास पध्दतीचा एक साधन म्हणून वापर करतात.[७] छ.संभाजीकालीन महाराष्ट्र हा शिवकालापेक्षा कसा बदलला ते या प्रबंधामध्ये अभ्यासावयाचे आहे.

प्रा.ए. एन व्हाईटहेड म्हणतात, "Each emerging is perceived as containing within itself all its past and seeds of its future." जे उदयाला येत असते त्याच्यामध्येच त्याचा भूतकाळ समाविष्ट झालेला

असतो, एवढेच नव्हे तर त्यातच त्याच्या उद्याचे बीजारोपण झालेले असते.[८] याचा अर्थ असा की मराठयांच्या इतिहासाचा उदय, विकास व ऱ्हासाचे आकलन करताना तत्कालीन लोकजीवनाचे अध्ययन करणे उपयुक्त ठरते. गतकाळातील घटनांची जाणीव ठेवल्याने वर्तमानकाळातील कृती अधिक धारदार बनते. म्हणून रँके म्हणतात, "History must be interpretation of the past in order to serve as a guide for the future." भविष्यात मार्गदर्शक ठरावा असाच भूतकाळाचा अन्वयार्थ इतिहासाने लावला पाहिजे.[९] छ.संभाजीकालीन महाराष्ट्राचा विचार करताना भूतकालीन साधनांची जुळणी, मांडणी व संगतवार विश्लेषण करणे अगत्याचे ठरते.

हॅन्सगर्थ म्हणतात, "Every model of social structure implies a model of socio-historical change; history consists of changes which social structures undergo." सामाजिक रचनेच्या प्रत्येक नमुन्यात सामाजिक व ऐतिहासिक दृष्टीने बदलत असलेला नमुना समाविष्ठ झालेला असतो. जे बदल सामाजिक रचनेत होत असतात ते इतिहासात सामावलेले असतात.[१०] छ.संभाजीकालीन महाराष्ट्रातील समाजरचनेत झालेला बदल हे इतिहासात स्पष्ट झालेले आहेत की नाही हे या प्रबंधामध्ये तपासावयाचे आहे.

छ. शिवाजी महाराज आणि संभाजी महाराज यांच्या जीवनकार्याला मिळून शिवकाल असे संबांधण्याचा प्रघात आहे. कारण शिवकालिन संस्थात्मक जीवनाची चौकट छ. संभाजींच्या काळात थोड्याफार फरकाने कायम राहिली आहे असे अभ्यासकांना वाटते. परंतु खरे तर छ. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी महाराजांना ज्या प्रतिकूल परिस्थितीला तोंड द्यावे लागले त्या परिस्थितीचे बदलते स्वरूप पाहता संभाजी राजांचा दशकाचा काळ हा स्वतंत्र वाटचालीचा कालखंड म्हटला

पाहिजे. त्यामुळे अर्थातच संबंधित साहित्याचा आढावा घेताना सुद्धा या कालखंडाचा स्वतंत्र विचार करणे अगत्याचे ठरते.

इतिहासासारख्या घटनाप्रधान आणि कालप्रधान विषयात जेव्हा समाजशास्त्रीय दृष्टीने अध्ययन करायचे असते तेव्हा तत्कालीन कालपटावर प्रभाव टाकणाऱ्या घटनांचे शास्त्रीय आकलन आवश्यक असते. असे आकलन करताना या पूर्वीच्या संशोधकांनी केलेल्या विवेचनाचा आणि अध्ययनाचा आढावा घेणे अगत्याचे ठरते. असा आढावा घेताना सरधोपट, सरसकट सर्व साहित्याचे एकत्रित विश्लेषण करावयाचे झाल्यास त्यातून अनेक गुंतागुंतीच्या समस्या निर्माण होतील. ते टाळण्यासाठी उपलब्ध साहित्याचे संकलन करून शास्त्रीय वर्गीकरण केले असता त्यातून आपण भविष्याकडे अधिक स्पष्टपणे पाहू शकतो आणि इतिहासाला समजून घेण्यासाठी गतकालीन संशोधकांनी केलेल्या मांडणीचा आणि दृष्टीकोणांचा आढावा घेताना त्यांच्या विचार व पद्धतीचे समालोचन पुढील आकलनासाठी निश्चितच पोषक ठरते.

## २.३ संबंधित साहित्याचे वर्गीकरण :

मराठयांच्या इतिहासामध्ये छ.संभाजीकाळात महाराष्ट्राचे अध्ययन व संशोधन करताना पुढील तीन प्रकारे ग्रंथांचे वर्गीकरण करता येईल.

अ. इंग्रजी ग्रंथ

ब. चरित्रात्मक ग्रंथ

क. विशिष्ट पैलूबाबतचे संशोधनपर ग्रंथ

### अ) इंग्रजी ग्रंथ :

मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास करताना ग्रँण्ड डफ याने प्रथम 'हिस्ट्री ऑफ मराठाज' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथात त्यांनी केलेले विश्लेषण हे वसाहतवादी दृष्टीने

केलेले होते. त्याच्या मते मराठ्यांचा उदय म्हणजे सह्याद्रीच्या जंगलातील वनवा होता, परंतु न्या. रानडे यांनी 'द राईज ऑफ मराठा पावर' हा ग्रंथ लिहून डफ यांचे मत खोडून काढले आणि त्यांनी छ. शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली झालेला मराठी सत्तेचा उदय ही बाब राष्ट्रनिर्मितीच्या प्रक्रियेचा प्रारंभ होता असे सूत्र मांडले. तर यदुनाथ सरकार यांनी 'शिवाजी ॲण्ड हिज टाईम्स' हा ग्रंथ लिहून मराठयांच्या इतिहासात महत्त्वाची भर टाकली. तसेच जदुनाथ सरकार यांनी 'द हाऊस ऑफ शिवाजी' या ग्रंथात शिवकालिन कागदपत्रांची ओळख करून दिली तर गो.स. सरदेसाई यांनी 'मेन करंट इन मराठा हिस्ट्री' या ग्रंथात मराठ्यांच्या इतिहासातील सुप्त प्रवाहांची नोंद घेतली आहे. या पार्श्वभूमीवर संभाजीकालीन इतिहासावर प्रकाश टाकणाऱ्या इंग्रजी ग्रंथ आहेत.




## १. न्यू हिस्टरी ऑफ द मराठाज् :

गो.स. सरदेसाई यांनी लिहिलेल्या 'न्यू हिस्टरी ऑफ द मराठाज्' या ग्रंथाच्या पहिल्या खंडामध्ये छ.संभाजी यांच्या जीवनकार्याचा विचार केला आहे. या ग्रंथात एकूण अकरा प्रकरणे आहेत. त्यांत राज्यारोहण, अकबर-संभाजी भेट, औरंगजेबाचे दक्षिणेतील आगमन, संभाजीच्या राज्याचा रक्तरंजित प्रारंभ, मोठा कट, औरंगजेबाची संभाजी विरुध्द मोहिम, संभाजीचा पोर्तूगीजांशी संघर्ष, अकबराचा दुखःद शेवट, दुर्गादासाचे आव्हान, संभाजीला अटक व दुर्दैवी अंत हे पैलू चर्चिले आहेत.[११] छ.संभाजीकालीन महाराष्ट्राबाबत सरदेसाई म्हणतात, "The distrurbed atmosphere of Maharashtra soon assumed its normal peaceful tenor for the time." महाराष्ट्रातील गोंधळलेले वातावरण लवकरच सर्वसाधारण शांत व स्थिर बनले.[१२] यावरून त्यांच्या अभ्यासाचा दृष्टीकोण स्पष्ट होतो. अशाप्रकारे गो.स. सरदेसाई यांचा ग्रंथ आधारभूत असून तो दिशादर्शक ठरणारा आहे.

## २. छत्रपती संभाजी :

डॉ.पी.एस.जोशी यांच्या छ.संभाजी या इंग्रजी ग्रंथामध्ये एकूण आठ प्रकरणे असून पहिल्या प्रकरणात अभ्यासविषयाची पार्श्वभूमी स्पष्ट केली आहे. तर दुसरे प्रकरण संभाजीच्या पूर्व आयुष्यावर प्रकाश टाकणारे आहे. तिस-या प्रकरणात संभाजी-मोगल लढयावर प्रकाश टाकला आहे. चौथे प्रकरण संभाजीचा विरोधकांवर विजय स्पष्ट करणारे आहे. पाचवे प्रकरण मोगलांशी युध्द हा पैलू मांडणारे आहे. सहावे प्रकरण मोगलांशी झालेल्या संघर्षाचा दुसर टप्पा स्पष्ट करणारे आहे. सातव्या प्रकरणात तिस-या टप्प्यातील संघर्षाची नोंद केली आहे. आठवे प्रकरण छत्रपती संभाजी यांच्या प्रशासकीय कौशल्यावर प्रकाश टाकणारे आहे. शेवटी ग्रंथसूची दिली आहे. परिशिष्टात संभाजी महाराजांचे एक दानपत्र दिले आहे. हा ग्रंथ मोगल-छत्रपती संभाजी संघर्षावर अधिक भर देतो. व त्यात संभाजीच्या प्रशासनावर एक प्रकरण दिले आहे. "Sambhaji was a good administrator and a skilled general, who gave impartial justice to the subjects." संभाजी महाराज एक चांगले प्रशासक व निष्णांत योध्दे होते त्यांनी प्रजेला प्राधान्याने न्याय देण्याचा प्रयत्न केला.[१३] डॉ.जोशी यांचा हा ग्रंथ संभाजी-मोगल संघर्षाची गाथा स्पष्ट करणारा आहे. त्यातील अनेक पैलू या अभ्यासाला पूरक ठरणारे आहेत. कारण या ग्रंथात तत्कालीन लोकजीवनाचा अप्रत्यक्ष विचार झाला आहे.

## ३. महाराष्ट्र अंडर द एज ऑफ शिवाजी

डॉ.ए. आर. कुलकर्णी यांचा हा ग्रंथ त्यांनी डॉ. आर. एस. गुप्ते यांच्या मार्गदर्शनाखाली मराठवाडा विद्यापीठास सादर केलेल्या पीएच.डी. प्रबंधावर आधारलेला हा ग्रंथ आहे. या ग्रंथात त्यांनी शिवकालीन महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचा आढावा घेतला आहे. त्यामध्ये खास करून त्यांनी महसूल पद्धती आणि

आर्थिक व्यवस्था यावर प्रकाश टाकला आहे. या ग्रंथामध्ये कुलकर्णी यांनी शिवकालीन महसूल पद्धतीचा शास्त्रीय अभ्यास करून असे मत मांडले आहे की, शिवकालीन महसूल पद्धती ही रयतेची पद्धती होती. हा ग्रंथ या संशोधनासाठी एक नमुना म्हणून मार्गदर्शक ठरला आहे. त्यातील अभ्यासप्रणाली, विवेचन पद्धती तसेच विश्लेषण पद्धती याबाबी संशोधकास निश्चितच मार्गदर्शक ठरणारा आहे.

**ब) चरित्रात्मक ग्रंथ :**

कार्लाइलच्या मते, "इतिहास म्हणजे श्रेष्ठ व्यक्तीची चरित्रे व त्यांनी बजावलेली कामगिरी होय."[१४] परंतु काही वेळा इतिहासाची साधने जर वस्तुनिष्ठपणे कार्य करू शकली नाहीत तर त्याचा वीर पुरुषाच्या इतिहासावर परिणाम होतो. संभाजी हे त्याचे उदाहरण होय. के. एम. मुन्शी यांच्या मते वीर पुरुष इतिहास निर्माण करतात, पण काही वेळा इतिहास सुद्धा वीर पुरुष निर्माण करत असतो. त्यांनी हे विधान बाणभट्टाच्या हर्षचरित्राच्या आधारे केले आहे, परंतु छ. संभाजींचा विचार करता येथे असे दिसते की, इतिहासाचे या वीर पुरुषावर अन्याय केला आहे व तो अन्याय प्रामुख्याने त्यांच्या मृत्यूनंतर निर्माण झालेल्या प्रदूषित साधनांमुळे त्यांच्यावर अन्याय करणारा ठरला आहे.

छ. राजारामाच्या काळात मल्हार रामराव चिटणीस बखरीत छ. संभाजीचे जे प्रदूषित वर्णन आले आहे त्या आधारे गो.स. सरदेसाईसारख्या इतिहासकाराने सुद्धा संभाजीचे वर्णन उग्रप्रकृती संभाजी असे केले आहे. संभाजीचे चरित्र आणि चरित्रकार यांच्या विवेचन पद्धतीचे नव्या साधनांच्या आधारे परिशिलन करणे अगत्याचे आहे. यादृष्टीने पुढील चरित्रांचा आढावा घेतला आहे.

## १. उग्रप्रकृती संभाजी व स्थिरबुध्दी राजाराम मराठी रीयासत खंड २ :

'उग्रप्रवृत्ती संभाजी' हा ग्रंथ गो.स.सरदेसाई यांनी लिहिला आहे. हा ग्रंथ २९४ पानांचा आहे व त्यामध्ये छ.संभाजीबद्दल चार प्रकरणे आहेत. प्रकरण एक मध्ये पन्हाळयावरून रायगडावर यामध्ये कारकीर्दीचा आढावा, राज्यारोहण, शहाजादा अकबराचे दक्षिणेत आगमण, प्रधानांच्या नेमणूका व कवीकलश इ. मुद्दे मांडले आहेत. तर प्रकरण दोन मध्ये रणांगणावर, प्रकरण तीन घसरपट्टी, प्रकरण चार विनाशकाल अशी संभाजी महाराजांच्या कार्याची योजना केली आहे. संभाजी राजांच्या कार्याची योजना व मूल्यमापनाबाबत गो.स.सरदेसाई म्हणतात, "शौर्य, साहस, बेडरपणा, इत्यादी गुण जसे त्यांच्या एकंदर कारभारात दिसतात तसेच ते त्यांच्या अखेरच्या कठोर प्रसंगातही तितकेच निदर्शनास येतात. स्वतःच्या कारभारांत त्यांचे स्खलन झाले असले तरी त्याचबद्दल भोगलेल्या भरपूर प्रायश्चित्ताने त्याने महाराष्ट्रीयांचे अंतकरणात नवीन भावनेचा संचार उत्पन्न केला आणि या संचाराच्या जोरावरच पुढे मराठयांनी मोगल बादशाही उलथून पाडली. हे प्रकार आणि त्यांची योग्यता ठरविताना लक्षात ठेवले पाहिजे."[१५] या प्रकारे त्यांनी केलेले मूल्यमापन हे प्रस्तुत अभ्यासाला नवी दृष्टी देण्यासाठी पोषक ठरणारे आहे.

तत्कालीन महाराष्ट्रातील लोकस्थितीबाबत गो.स. सरदेसाई म्हणतात, "मराठे व राजपूत या दोघांनी स्वधर्मरक्षणाचे हेतूने संगनमत करुन परधर्मद्वेषी औरंगजेबाचा पाडाव करावा ही योजना सिध्दीस नेणे म्हणजे एक प्रकारे शिवाजीचा हिंदूपदपातशाहीचा उद्योग पूर्ण करण्यासारखेच होते. हे आपल्यावर ओढवलेले प्रचंड संकट निवारण्यासाठी औरंगजेबास पुत्राचे मागोमाग दक्षिणेत धाव घेण्याची जरूर पडली आणि उत्तरेतील राजपूतांस जिंकण्याऐवजी प्रथम दक्षिणेतील मराठयांस जिंकण्याची त्याने तयारी केली. त्याचा मनोरथ पंचवीस वर्षे सतत झगडूनही शेवटास

गेला नाही. हा यातील झगडयाचा मथितार्थ आहे.''[१६] यावरुन सरदेसाई यांचा दृष्टीकोण स्पष्ट होतो.

छ.संभाजीचे पुनरावलोकन करण्यात त्यांना यश आले नाही, ते लिहितात, ''संभाजीच्या अंगी विशेष विद्वत्ता नव्हती. बापाने त्यांना शिकविण्यास पंडित ठेवले होते. पण धामधुमीच्या त्या काळात लेखन पठणास सवड मिळाली असेल असे वाटत नाही.''[१७] यावरुन त्यांचा छ. संभाजीकडे पाहण्याचा दृष्टीकोण नकारात्मक दिसतो.

**२. छत्रपती संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र :**

छ.संभाजी महाराज यांचे विकित्सक चरित्र हा वा.सी.बेंद्रे यांचा ग्रंथ उत्तम चरित्र लेखनाचा नमुना होय. या ग्रंथात चोवीस प्रकरणे आहेत. या ग्रंथाच्या प्रास्ताविकात वा.सी.बेंद्रे लिहितात, ''ज्यांनी शहाजी महाराजांच्या महत्वाकांक्षेतून सूचित झालेल्या व शिवाजी महाराजांनी साकार केलेल्या 'हिंदवी स्वराज्या' चा हिरीरीने सांभाळ केला, इतकेच नव्हे तर मोगली साम्राज्याला नामोहरम करुन टाकून भारताला इस्लामी सत्तेपासून मुक्त करण्याचा यशस्वी प्रयत्न केला, त्या संभाजी महाराजांची इतिहासात फक्त दुराचारी व दुर्व्यसनी म्हणून जमा केली गेली आहे ही मोठी दुर्दैवी घटना आहे.''[१८] त्यांचा हा दृष्टिकोण पूर्वीच्या चरित्रकारांपेक्षा वेगळा दिसतो. त्यामुळे छ. संभाजी महाराजांकडे पाहण्याची नवी दृष्टी लाभली.

हा चरित्रग्रंथ चार भागांमध्ये विभागता येईल. त्यापैकी पहिल्या भागामध्ये शिवकालीन महाराष्ट्र, हिंदवी स्वराज्याची इमारत, युवराज संभाजी, मोगली मनसबदार संभाजी, प्रधानमंत्री अंतस्थ कलह, कुटुंब परिवार हे पैलू येतात. यावर प्रकाश टाकला आहे.

दुस-या भागात राज्याभिषेक शहजादा अकबर, हिंदवी स्वराज्यावरील परचक्र, दक्षिणेतील संघटना, पोर्तुगीज गोवा लढाई, शहाआलमची स्वारी, सिध्दी व मोगली

आरमार हे घटक येतात. तिस-या भागात इंग्रजी तटस्थता, आदिलशाही व कुतुबशाहीचा नाश, स्वराज्यातील घडामोडी औरंगजेबाच्या हालचाली हे घटक मोडतात. चौथ्या भागामध्ये संभाजीची कैद व मृत्यू, स्वराज्यातील निरवानिरव, राणी येसूबाई व उपासंहार हे घटक येतात.

छ. संभाजी कालीन महाराष्ट्राबाबत वा.सी.बेंद्रे लिहितात, "शिवाजी महाराजांच्या मृत्यूपूर्वीच त्यांनी महाराष्ट्रीय जनतेस व सरदार सेनापतींस आगामी मोगली महान संकटाची जाणीव जाहीरपणे करून दिली होती. त्या काळी दक्षिणेतील दिलेरखान बहादुरखान यांच्या मोगली सैन्याच्या भरीस शहा आलमचे अर्धा-पाऊण लाख सैन्य यावयाचे होते. या जोड सैन्याच्या भीतीने जसा आदिलशहीने आलमगीर बादशहाच्या नावाने खुदबा पढून मांडलिकत्व स्वीकारले तशीच कुतूबशाहने भरमसाठ खंडणी द्यावयाची कबूल करुन मैत्री पत्करली होती."[१९] यावरून शिवाजी महाराजांची दूरदृष्टी स्पष्ट होते. तसेच महाराष्ट्राच्या लोकस्थितीचीही कल्पना येते.

छ.संभाजींच्या चतुराईचे वर्णन करताना त्यांनी म्हटले आहे, "चपळ व मजबूत माणसांच्या सैन्यभरतीसाठी संभाजी महाराजांनी केलेली स्वतंत्र अधिका-यांची योजना जशी आवश्यक मनुष्यसंपत्तीची जोड करुन देत होती तशीच हया मनुष्यसंपत्तीची हानी होऊ न देण्यासाठी त्यांनी आपल्या सैनिकांस उघड समरात न लोटू देता गनिमी काव्यावरच पूर्ण भर देऊन मोगलाचा प्रतिकार करण्याच्या युध्दनीतीचा प्रामुख्याने अवलंब केला होता. हे त्यांच्या अनेक युध्द प्रसंगावरुन स्पष्ट दिसते."[२०] छ. संभाजीचे युध्दनेतृत्व हे प्रतिकूल परीस्थितीवर मात करतांना अधिक तेजस्वीपणे चमकत असे. संभाजीच्या कार्याचे पुनरावलोकन करताना वा.सी.बेंद्रे यांनी लिहिले आहे, "संभाजी महाराजांची सांप्रतच्या इतिहासात जी फक्त दुराचारी व दुर्व्यसनी म्हणून जमा केली गेली आहे. ती संपूर्णतः काल्पनिक किंवा अवास्तव

आहे. या समजाच्या अगदी उलट अशी तत्कालीन वस्तुस्थिती असल्याचे निदर्शनास येते. संभाजी महाराजांनी आपल्या कारकिर्दीचा, कदाचित आयुष्याचाही क्षण नि क्षण 'कर्मण्येवाधिकारस्ते माफलेषु कदाचन' या मनोवृत्तीनेच वेचला, आणि राजभोग तर राहोच पण सामान्य गृहसुखाच्याही लाभास विन्मुख राहुन मोगली परचक्राला तोंड देण्यासाठी, कर्तव्यनिष्ठेने म्हणा किंवा स्वराज्यनिष्ठेने म्हणा, त्यांना सतत झगडत राहावे लागले. तसेच आपल्या भीषण मृत्यूसमयीच्या काळात धारण केलेल्या स्थितप्रज्ञतेने संभाजी महाराजांनी 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मोभयावह' या गीतावचनाची अती तेजस्वी अशी जाणीव करुन देऊन महाराष्ट्राच्या प्रतिकारातील चैतन्य जागृत राखले."[२१] त्यांचा हा दृष्टिकोण तत्कालीन परिस्थितीचे यथार्थ आकलन करण्यासाठी पोषक ठरणार आहे.

### ३. शिवपुत्र संभाजी :

डॉ.कमल गोखले यांचा 'शिवपुत्र संभाजी' हा ५५६ पानांचा ग्रंथ असून त्यामध्ये चौदा प्रकरणांचा समावेश आहे. या चरित्रग्रंथाचे पाच विभागात विभाजन करता येईल. पहिल्या भागात स्वराज्याचा वारसा व बालपण युवराज संभाजी ही प्रकरणे मोडतात. दुस-या भागात वारसा हक्काच्या कलहातून राजपद, संभाजी व शहजादा अकबर ही प्रकरणे मोडतात तर तिस-या भागात मराठे सिद्दी व इंग्रज, मराठे आणि पोर्तुगीज, विजापूर आणि गोवळकोंडा ही प्रकरणे मोडतात. चौथ्या भागात मराठे मोगल संघर्ष येतो. मराठयांच्या कर्नाटकातील हालचाली हे पैलू आहेत. पाचव्या भागात संभाजीचा राज्यकारभार, संभाजीचे धार्मिक धोरण, दुर्दैवी शेवट हे भाग समाविष्ट होतात.

सिंहावलोकन या अंतिम प्रकरणामध्ये डॉ.कमल गोखले म्हणतात, "शिवाजी महाराजांसारख्या अद्वितीय पित्याच्या कर्तृत्वपूर्ण पार्श्वभूमीवर संभाजींची तुलना

होते. ख्यातनाम पित्याच्या मुलांना इतर लाभाबरोबरच हा तोटा नेहमीच सहन करावा लागतो. जीवनात यशस्वी होण्यासाठी कर्तृत्वाबरोबरच भाग्याचीही जोड लागते. शिवाजी महाराजांच्या अंगी अलौकिक कर्तृत्व आणि दूरदृष्टी होती त्याचप्रमाणे दैवही सतत पाठपुरावा करीत आले."[२२] परंतु संभाजी महाराजांनी प्रतिकूल परिस्थितीवर मात करुन बजावलेले ऐतिहासिक कार्य खरोखर इतिहासावर ठसा उमटवणारे ठरले.

संभाजीकालीन महाराष्ट्राचे राजकीय चित्र स्पष्ट करताना डॉ.कमल गोखले म्हणतात, "संभाजीराजांची एकूण कारकिर्द जेमतेम नऊ वर्षाची त्यात त्यांनी पोर्तुगीजांशी लढा देऊन त्यांची आशियात कधीही झाली नव्हती एवढी फजिती केली. तरुण वयात त्यांना अद्दल घडविली. अनेक विजय संपादन केले. इंग्रजांचा सारखा पाठिंबा मिळत असून सुध्दा सिद्दीला त्यांनी चांगले तोंड दिले. इंग्रजांना सतत दमात ठेवले."[२३] छ.संभाजी यांच्या चरित्राचे खरे पुनवरावलोकन करताना डॉ.कमल गोखले यांनी म्हटले आहे, "सर्व आघाडयांवर तोंड देत असताना कधी गोवा तर कधी हबसान, कधी कर्नाटक तर कधी राजापूर, सिंहगड तर कधी चवताळलेल्या शूर सिंहासारखा गर्जत गंगातीरावर तुटून पडणा-या संभाजीला मदिरा आणि मदिराक्षींच्या नादात गुंतून पडावयास वेळ मिळणे शक्य दिसत नाही. तारुण्याच्या भरात कदाचित एखादी चूक त्याने केली असेल किंवा नसेल, असे विरुध्द बाजूचा निर्णायक पुरावा मिळत नाही म्हणून मानले तरी संभाजीराजांच्या हातून असे आत्मघातकी व बेजबाबदार कृत्य घडले असेल असे संभव वाटत नाही."[२४] अशा प्रकारे छ.संभाजी यांच्या चरित्राचे हे पहिले पुनरावलोकन अत्यंत लक्षणीय म्हटले पाहिजे.

डॉ.कमल गोखले यांनी संभाजी चरित्राची प्रेरणा कर्मयोगात आहे हे सांगताना म्हटले आहे, शत्रू त्यांच्या देहाचे हालहाल करीत असताना

'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः।

न चैनं क्लेदयन्त्यापोन शोषयति मारुनः ।।'

हे गीतेतील तत्वज्ञान राजांच्या मनात येणे साहजिकच होते. माणसाने कर्तव्य करीत असताना फळाची आशा धरु नये, देह नाश पावतो. परंतु माणसाचा आत्मा अमरच राहतो. शत्रू देह नष्ट करील पण हा अमर आत्मा शत्रूच्या हातात कोठे पडणार आहे? अर्थात ज्या तत्वज्ञानामुळे संभाजी राजांना असे धैर्य आले असेल ते गीतेतील महान तत्वज्ञान बिचा-या औरंगजेबास कसे माहित असणार."[२५] यावरुन छ.संभाजीच्या कार्याची थोरवी स्पष्ट होते. त्यांचे विजगिषू कर्तृत्व पुन्हा एकदा समजावून घेण्याची गरज आहे हे डॉ.कमल गोखले यांनी प्रथम प्रतिपादन केले.

**४. हुतात्मा छत्रपती संभाजीराजे : काल आणि कर्तृत्व :**

डॉ. एस.ए.बाहेकर यांचा हा ग्रंथ ३६६ पानांचा असून त्यामध्ये सोळा प्रकरणांचा समावेश आहे. या ग्रंथाचे चार भागात विभाजन करता येईल. पहिल्या भागात शंभू राजांचे बालपण, राजकारण, आणि युध्दकलेचे बाळकडू, कर्तबगार युवराज आणि गृहकलह, युवराज शंभूराजे आणि दिलेरखान ही प्रकरणे मोडतात. दुस-या भागात वारसाहक्काच्या कलहातून राजगादीची प्राप्ती, छत्रपती संभाजी - सिध्दी आणि इंग्रज संबंध, छत्रपती संभाजी आणि पोर्तुगीज संबंध या प्रकरणांचा समावेश केला आहे. तिस-या भागात मोगलांच्या किल्लेविषयक मोहिमांना चोख उत्तर, मराठयांचे आक्रमक धोरण आणि मोगल प्रदेशांवर स्वा-या, मोगलांच्या कोकण मोहिमांचा फडशा, दक्षिणेतील राजसत्तांचे संघटन आणि त्यांना मदत या प्रकरणांचा समावेश होतो.तर चौथ्या भागात छत्रपती संभाजी कविकलश आणि अकबरचा संबंध, प्रशासकीय समस्या आणि राज्यकारभार, छत्रपती संभाजी कैद आणि अमानुष हत्त्या, ही प्रकरणे येतात.

समालोचन या अंतिम प्रकरणामध्ये डॉ.एस.ए.बाहेकर म्हणतात, "शिवाजी महाराजांनी परंपरागत वतन देण्याची रुढी बंद केली. तेच वतनविषयक धोरण,

एकाचे वतन दुस-याला न देण्याचे धोरण छ.संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत चालू होते. अशी चोख व्यवस्था असली तरी याच वतनाच्या लोभातून शिर्के आणि इतर वतनदारांनी स्वार्थापोटी फितुरी केली. वतनदार मोगलांच्या आश्रयास गेले. त्यांना संभाजी राजांनी जरबेत ठेवण्याचा प्रयत्न केला. पण शेवटी सैन्य शक्ती कमी पडू लागली. अत्यंत प्रतिकूल परिस्थिती निर्माण झाली म्हणून संभाजी राजांना वतनदार देशमुख बंड करु नये आणि फितुर होऊ नये म्हणून इच्छा नसताना वतने आणि जहागि-या द्याव्या लागल्या हे कोणीही नाकबूल करत नाही."[२६] अशा प्रकारची मीमांसा बाहेकर यांनी केली आहे. त्यांचे हे सूत्र संभाजीची अगतीकता स्पष्ट करणारी आहे. संभाजीच्या युध्द नीतीची अचूक मीमांसा करताना डॉ. प्रा.बाहेकर म्हणतात, "संभाजी महाराजांनी आपल्या कारकिर्दीत गनिमी काव्याच्या युध्द नीतीस प्राधान्य दिले होते. शत्रूचे खच्चीकरण केले तसेच बचावात्मक आणि आक्रमक युध्दनीतीचाही अवलंब केला."[२७] त्यांच्या या धोरणातून नवे आकलन स्पष्ट होते.

## ५. ज्वलज्जलनतेजस संभाजीराजा :

डॉ.सदाशिव शिवदे यांचा हा ग्रंथ ४३५ पानांचा आहे. या ग्रंथाचे चार विभागात विभाजन करता येईल. त्यामध्ये एकूण तेरा प्रकरणे आहेत. या ग्रंथाच्या पहिल्या भागात जन्मले शंभू छत्रपती, सन १६५७ ता १६७४, राजकारणात युवराज शंभूराजे. सन १६७४ ते १६८०, स्वराज्याचा उत्तराधिकारी सन १६८० ही प्रकरणे येतात. दुस-या भागात महाराष्ट्राचे दुसरे छत्रपती सन १६८१, झुंजझुंज १६८२ ते १६८३, गोव्याची थोरली, स्वारी सन १६८३ येतात. जंजिरा, रामसेज सन १६८४, इत्यादी प्रकरणे दुस-या भागात येतात तर तिस-या भागात औरंगजेबाच्या औरचाली सन १६८५ ते १६८६, गोवळकोंडा, हंबीरराव, साल्हेर, सर्जेराव जेधे, अकबर,दुर्गादास राठोड न १६८७, फितुरी ! शिर्के कवी कलश सन १६८८ ही प्रकरणे येतात. तर

चौथ्या भागात मृत्यूंजय अमावस्या ! सन १६८९, धार्मिक वृत्तीचा थोर राजा, प्रशासन, ही प्रकरणे येतात. अंतिम प्रकरणात डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, ‘‘औरंगी आक्रमण अंगावर घेऊन एका बाजूने कुतुबशहा व दुस-या बाजूने आदिलशहा यांना उठविणे व रामसिंह आणि अकबराच्या माध्यमातून दिल्लीला धडक देणे ही राजनीती उच्च दर्जाची खचित होती, पण त्याकरीता आदिलशहा, कुतुबशहा शहजादा अकबर, रामसिंह ही माध्यमे त्या दर्जाची नव्हती, त्यांच्यात ती ताकद नव्हती, जिद्द नव्हती. तीसुध्दा संभाजीराजांची जिद्द जळजळीत होती. समशेर सळसळती होती आणि धैर्य धगधगते होते. दुर्दैवाने त्यांना पोषक परिस्थिती प्राप्त झाली नाही, केवळ हे त्यांचे दुर्दैव.’’[२८] त्यांनी केलेले हे मूल्यमापन वस्तुनिष्ठ आणि तेवढेच सत्य सांगणारे आहे.

**६. महापराक्रमी व परमप्रतापी छत्रपती संभाजी महाराज :**

श्री.अशोकराव शिंदे सरकार यांचा हा ग्रंथ २३१ पानांचा आहे. एकूण २५ प्रकरणे त्यात समाविष्ट असून या ग्रंथाचे पाच विभागात विभाजन करता येईल. पहिल्या भागात प्रकरण १ ते ५, दुस-या भागात प्रकरण ६ ते १०, तिस-या भागात प्रकरण ११ ते १५, चौथ्या भागात प्रकरण १६ ते २० आणि पाचव्या भागात प्रकरण २१ ते २५.

पहिल्या भागात भोसले घराण्याची पार्श्वभूमी, संभाजीराजांचा जन्म व बालपण, संभाजीराजे पंचहजारी मनसबदार, संभाजीराजे व शहाजादा मुअज्जम, राजनीती, युध्दनीती, मुलकी प्रशासन यावर छाप तर दुस-या भागात संभाजीराजे विधी व संस्काराने युवराज झाले, संभाजीराजे व दिलेरखान, राजाराम महाराजांचे मंत्रकारोहण, संभाजीराजांचा राज्याभिषेक, संभाजीराजांच्या विरोधात मंत्र्यांची कट कारस्थाने. तिस-या भागात औरंगजेबाचे स्वराज्यावर आक्रमण, मराठयांनी मोगलांना जर्जर केले, किल्ले व रामसेज आणि शहाबुद्दीनखान व बहाद्दरखान,

शहजादा मुअज्जमकी बुरी हालत, संभाजीराजांनी पोर्तुगीजांना नमविले तर चौथ्या भागात मराठयांची इंग्रजांवर दहशत, छत्रपती संभाजी महाराज आणि सिध्दी, एकनिष्ठ कवी कलश आणि घरभेदे, क्रुरकर्मा औरंगजेब यांचे मुस्लीम राजवटीवर आक्रमण, कुतुबशाहीची मुस्लीम राजवट औरंगजेबाने नष्ट केली तर पाचव्या भागात छत्रपती संभाजी महाराजांचा मोगलांशी अभूतपूर्व लढा, मोगलांचा संगमेश्वरावर छापा, औरंगजेब बादशहाची छावणी, मराठयांनी मोगली सल्तनत धुळीस मिळविली, छत्रपती संभाजी महाराजाची प्रशासन व राजकीय व्यवस्था या प्रकरणांचा समावेश होतो.

अशोकराव शिंदे सरकार शेवटच्या प्रकरणात म्हणतात, "छत्रपती शिवाजी महाराजांच्या धोरणानुसारच छ.संभाजीराजांनी प्रत्येक विभागात पुरस्कार केल्याचे दिसून येते. शिवाजी महाराजांचेच धोरण पुढे चालू ठेवले असे म्हणावे लागेल. संपूर्ण प्रशासन व्यवस्थेमध्ये त्यांनी शिस्त राखण्याचा प्रयत्न केला. फितुर व भ्रष्टाचारी अधिका-यांची त्यांनी गय केली नाही. सर्वसामान्य रयतेच्या हितासाठी त्यांनी कधीच गय केली नाही."[२१] यावरुन संभाजी चरित्राकडे पाहण्याचा अशोकराव शिंदे यांचा दृष्टिकोण स्पष्ट होतो. ते संभाजी चरित्राकडे सकारात्मक दृष्टीने पाहतात असे म्हणता येईल.

तसेच त्यांनी छ. संभाजींच्या विद्वत्तेला आणि ज्ञानसाधनेला न्याय दिला आहे. त्यांनी प्रथमच काही दुर्मिळ ग्रंथांचा शोध घेऊन छ. संभाजी महाराजांनी संस्कृत भाषेत लिहिलेल्या तीन-चार प्रमुख ग्रंथांवर प्रकाश टाकला आहे आणि संभाजी महाराजांच्या प्रतिभाशक्तीची अलौकिक उदाहरणे असलेल्या या ग्रंथावरून त्यांच्या ज्ञानसाधनेची विविध क्षेत्रे आपल्या लक्षात येतात. आणि त्याआधारे संभाजी महाराजांच्या कर्तृत्वाची नव्याने ओळख होते.

## (क) विशिष्ट पैलू बाबतचे लघूशोधनपर ग्रंथ :

### १ स्मारकग्रंथ :

छ.संभाजी महाराजांच्या वीरमरणास ३०० वर्षे झाल्यामुळे त्रिशतकी स्मारक ग्रंथ प्रा.डॉ.जयसिंगराव पवार यांनी संपादन केला आहे. या ग्रंथास त्यांनी प्रदिर्घ अशी १० पानांची प्रस्तावना दिली आहे. या ग्रंथामध्ये ५२ लेखांचा समावेश आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेमध्ये प्रा.डॉ.पवार म्हणतात, "प्रत्यक्ष बादशहाच दक्षिणेत मराठयांचे राज्य बुडविण्याच्या इराद्याने उतरल्यानंतर त्याला परत फिरविण्याचे फर्मान कोणी धाडायचे ? बादशहा यशस्वी झाल्याशिवाय मराठी राज्य बुडविल्याशिवाय परत जाऊ शकत नव्हता. दक्षिणेच्या मोहिमेतील अपयशी बादशहा, मराठयांकडून हतबल झालेला बादशहा, म्हणून तो दिल्ली परतू शकत नव्हता. तसे परतणे म्हणजे त्याच्या साम्राज्य-सत्तेच्या प्रतिष्ठेवर त्याने आपणहून निखारा ठेवल्यासारखे होणार होते. मोगल-मराठा युध्द संभाजीराजांच्या मृत्यूनंतरही मोगलांच्या बाजूने का समाप्त होऊ शकले नाही याचे रहस्य या बादशहाच्या प्रतिष्ठेच्या संरक्षणाच्या हेतूत होते."[३०] यांच्या या विधानातून संभाजीची थोरवी स्पष्ट होते.

त्यांच्या कार्याचे समर्पण करताना प्रा.डॉ. जयसिंगराव पवार लिहितात, "संभाजी महाराजांच्या इतिहासातील कामगिरीचे दुसरे वैशिष्टय असे की त्यांना आपल्या कारकिर्दीत एकटया मोगलांशी संघर्ष करावा लागला असे नाही तर सिध्दी आणि पोर्तुगीज या दोन प्रबळ आरमारी सत्तांशीही त्यांना झुंज द्यावी लागली सन १६८२ ते १६८४ या काळातील संभाजी महाराजांच्या हालचाली पाहिल्या तर असे दिसून येते की मराठयांचा राजा स्वराज्यात घुसणा-या मोगली फौजांशी लढत असतानाच या दोन शत्रूंशीही संघर्ष करतो आहे. अशा प्रकारे तिन्ही शत्रूंशी लढत असता, त्याच्या पराक्रमाचे कौतुक करण्याऐवजी काही इतिहासकारांनी या तीन

सत्तांशी लढा सुरु केल्याबद्दल संभाजी महाराजांवर ठपका ठेवला आहे."[३१] अशा प्रकारची दृष्टी या ग्रंथामध्ये प्रकट झाली आहे.

संभाजीच्या काळ व कर्तृत्त्वाचे मूल्यमापन करताना सेतु माधवराव पगडी म्हणतात, "संभाजीराजांचे सर्वात मोठे गुण म्हणजे साहस आणि निर्धार हे होत. त्यांनी औरंगजेबाच्या मुलाला आश्रय देऊन मोगलांना फार मोठे आव्हान दिले. प्रचंड सैन्यासह औरंगजेब दक्षिणेत उतरला असताना मुळीच डगमगले नाहीत."[३२] त्यांची ही दृष्टी या अभ्यासात पूरक ठरणारी आहे.

स.मा.गर्गे यांनी अकबर व संभाजीची तुलना करताना म्हटले आहे, "संभाजी महाराजांनी गोव्याविरुध्द लढाई सुरु केली. त्यामुळे शहाजाद्याने पोर्तुगीज आणि मराठे यांच्या दरम्यान तह घडवून आणण्याचा प्रयत्न केला. अशाप्रकारे या दोन्ही राजकारणी पुरुषांच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरितीने एकमेकांना मदत करण्याच्या खटपटी चालू होत्या. पण त्यातून निश्चित असे काही निष्पन्न झाले नाही एवढे मात्र खरे."[३३] डॉ.प्र.ग.देशपांडे संभाजीच्या प्रशासनाबाबत म्हणतात, "संभाजीने आरमारात वाढ केली. राजापूरजवळ त्यांची ५९ गलबते आणि गुराबे नेहमी सज्ज असत. पेण येथे त्याने तीन हजारांचे आरमार ठेवले होते. थल येथेही पाच हजाराचे नौदल होते. मुंबईजवळच्या खाडीत संभाजीने १०० गलबते तयार केली होती अशी माहिती मिळते."[३४] अशाप्रकारे या स्मारक ग्रंथातील काही संशोधकांचे लेख उत्तम असून ते पुढील शोध कार्यासाठी दिशा देणारे ठरतात.

प्रा. डॉ. जयसिंगराव पवार यांनी संपादन केलेला हा संभाजी स्मारक ग्रंथ मराठ्यांच्या इतिहासातील छ. संभाजी पर्वाला न्याय देणारा आहे. त्यातील अनेक बारकावे खरोखरच अभ्यासण्यासारखे आहेत. काळाचा प्रवाह पुढे गेला असता नवनवी ऐतिहासिक साधने समोर येतात. हे जसे खरे आहे तसेच नवनवे संशोधक

गतकालीन साधनांकडे नव्या दृष्टीने पाहतात आणि त्यातून नवी प्रमेये विकसित करतात हे सुद्धा लक्षात घेतले पाहिजे. यादृष्टीने छ. संभाजी स्मारक ग्रंथाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

## २.४ मागील अभ्यासातील उणीवा

या साहित्य समालोचनामुळे मागील अभ्यासातील उणीवा स्पष्ट होतात. प्रा. नाडगोंडे म्हणतात, "यापूर्वी त्या विषयावर कोठवर संशोधन झाले आहे ? त्यासंबंधी पूर्वीच्या संशोधकांनी कोणते अभ्युपगम मांडले आहे ? या प्रश्नांची उत्तरे साहित्य सर्वेक्षणातून येत असतात."[३५] प्रा.. नाडगोंडे यांनी मागील अभ्यासातील उणिवा या संदर्भात असे स्पष्टीकरण दिले आहे की, यापुर्वी त्या विषयावर कोणत्या भागावर संशोधन झाले आहेत. व त्यात कोणत्या उणिवा राहिल्या आहेत. ते स्पष्ट होते. या संदर्भाच्या आधारे मागिल अभ्यासातील उणिवा यासाठी या सर्व ग्रंथांचा आढावा घेतला असता पुढील पाच उणीवा लक्षात येतात.

(१) बहुसंख्य संशोधकांनी चरित्रात्मक ग्रंथ लेखनावर भर दिला आहे.

(२) गो.स. सरदेसाई यांचे 'उग्रप्रकृती संभाजी' या खंडातील लेखन हे मल्हार रामराव चिटणीस बखरीवर आधारलेले आहे. त्यामुळे ते पूर्वग्रहदूषित असे आहे. त्याचा आधार घेऊन पुढे तशीच मांडणी करण्यात आली असावी.

(३) संभाजीच्या चरित्राची नव्याने मांडणी करून वा.सी.बेंद्रे यांनी साधन चिकित्साही केली, पण त्यांचे विवेचन अपुरे होते.

(४) डॉ.कमल गोखले यांनी संभाजी चरित्राच्या पुनरावलोकनास प्रारंभ केला हे त्यांचे योगदान महत्त्वाचे ठरते.

(५) डॉ.पी.एस.जोशी यांनी त्यांच्या ग्रंथात संभाजीच्या युध्द मोहीमांचे अधिक

वर्णन केले आहे. पण त्यामध्ये महाराष्ट्रातील लोकजीवनाची चर्चा मात्र नाही.

या सर्व कारणांमुळे प्रस्तुत संशोधक नवीन दृष्टीने संभाजीकालीन लोकजीवनावर प्रकाश टाकणार आहे. प्रा.डॉ.बाहेकर एस.ए., अशोकराव शिंदे यांचे ग्रंथ हे साचेबध्द स्वरुपाचे आहेत. त्यामुळे संभाजीकालीन महाराष्ट्राचे लोकजीवन या शोधप्रबंधात अभ्यासावयाचे आहे.

छ. संभाजीकालीन सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक लोकजीवनाचे अनेक पैलू अनाकलनिय आहेत तसेच ते उपेक्षितही आहेत. इतिहास साधनांच्या दयेवर चालतो असे म्हटले जाते ते खरे आहे. एक तर आजवर साधने अत्यंत कमी प्रमाणात उपलब्ध होती आणि दुसरे म्हणजे साधनांचे विश्लेषण करताना चिटणीस बखरीच्या प्रभावामुळे नव्या साधनांकडे डोळस दृष्टीने पाहण्यास इतिहासकार तयार नव्हते. त्यामुळे छ.संभाजीकालीन लोकजीवनाचे यथार्थ आकलन होऊ शकले नाही. तसेच चरित्र नायकाच्या कामगिरीचे आणि योग्यतेचे मूल्यमापन झाले नाही. असे मूल्यमापन करण्यासाठी मागील संशोधनातील उणीवा लक्षात घेऊन त्या दूर करण्यासाठी या प्रबंधात जाणीवपूर्वक प्रयत्न केले आहेत. या पार्श्वभूमीवर या इतिहासाचा अभ्यास करताना विविध मतप्रवाह व प्रवृत्तींचा शोध घेतला आहे.

**२.५ मतप्रवाह व प्रवृत्ती :**

(१) संभाजी हे दुर्व्यसनी आणि व्यभिचारी होते असे मत चिटणीस बखरीत मांडले आहे. त्याचाच आधार सर्वांनी घेतला आहे.

(२) संभाजीकालीन बखरी या आकसाने लिहिल्या आहेत. त्यातील वर्णन हे पूर्वग्रहदूषित आहे.

(३) संभाजीच्या पराक्रमाचे व युध्द मोहीमांचे वर्णन नव्याने केले पाहिजे.

(४) संभाजी-अकबर कराराचे विश्लेषण नकारात्मक दृष्टीने केले आहे.

(५) संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास आजवर झालेला नाही.

## २.६ पूर्वीच्या संशोधकांचे निष्कर्ष :

यापूर्वी संशोधकांनी केलेले आकलन पुढीलप्रमाणे देता येईल.

(१) गो.स.सरदेसाई म्हणतात, "संभाजीच्या स्वभावाला विवेक व शांत विचार पारखा होता. अंतर्बाह्य राजकारणाची त्याला चांगली ओळख नव्हती. विश्वासू हेर व चतुरस्त्र सल्लागार यांच्या सहाय्याने शिवाजीने ठिकठिकाणचे राजकारण ओळखून प्रत्येक डाव टाकिला, परंतु एका कलूशाशिवाय संभाजीने कधी कोणाचा सल्ला शांतचित्ताने ऐकिल्याचे उदाहरण आढळत नाही."[३६] गो.स.सरदेसाई यांचे हे मत चिटणिस बखरीवर आधारलेले होते. त्यांनी पूर्वसंशोधनाचे मुल्यांकन केलेले दिसत नाही.

(२) वा.सी.बेंद्रे म्हणतात, "संभाजी महाराजांच्या या आठ-नऊ वर्षांच्या गनिमी युध्दाच्या काळात युध्दकलेपेक्षा त्यांच्या आंतरराष्ट्रीय राजकारणालाच अधिक वाव मिळाला व त्यात त्यांची पटुता विशेष प्रकर्षतेने डोळयात भरते."[३७] संभाजी महाराजांचे युध्दतंत्र जसे गनिमीकाव्यावर आधारलेले होते. तसेच ते समोरासमोरच्या युध्दातही प्रकट होत असे.

(३) डॉ.कमल गोखले यांच्यामते, "त्यांनी कर्तव्य करताना, राजद्रोह्यांना शिक्षा देताना अशीच कर्तव्यकठोर बुध्दी दाखविली होती, जन्मभर चारी बाजूंनी वेढणा-या शत्रूंशी लढा दिला होता."[३८] छ. संभाजीचे हे युध्दशास्त्रातील प्रगत ज्ञान त्यांच्या नेतृत्वावर प्रकाश टाकणारे होते.

(४) पी.जी.जोशी यांच्या मते, "Sambhaji was a well trained prince in the matters of the administration of the swarajya."[३९] जोशी यांचे हे विवेचन छ. संभाजीच्या प्रशासकीय निपुणतेवर भर देणारे आहे.

(५) डॉ.बाहेकर एस.ए. यांच्यामते, "छत्रपती संभाजी महाराजांनी आपल्या अतुलनीय शौर्याने आणि कर्तृत्वाने शिवाजी महाराजांनी घालून दिलेले मुलभूत दंडक पालन केले."[४०] छ. संभाजी महाराजांनी शिवाजी महाराजांचे आदर्श कसोशीने व काटेकोरपणे पाळले हे लक्षात घेतले पाहिजे.

(६) प्रा.शिवदे सदाशिव म्हणतात, "संभाजीराजांचे नेतृत्वगुणांबद्दल किंवा शौर्याबद्दल शंका घेण्याचे कारण नव्हते, तथापि त्यांचा जसा उपयोग होणे गरजेचे होते, तसा झाला नाही. त्यासाठी त्यांच्याजवळ उत्तम, चतुर, स्वामीनिष्ठ सल्लागाराची प्रभावळ नव्हती."[४१] अशी प्रभावळ असती तर संभाजी महाराज अधिक यशस्वी झाले असते.

(७) अशोक शिंदे म्हणतात, "तरुण संभाजी राजे हे शूर, साहसी, पराक्रमी व तडफदार होते, प्रशासनाच्या सर्व विभागामध्ये त्यांनी आपल्या अभ्यासू वृत्तीने दरारा बसविला होता. जरी राजकारण आणि प्रशासन यांचा फार मोठा अनुभव नव्हता तरी प्रशासनामध्ये गफलती झालेल्या दिसत नाहीत."[४२] प्रशासनातील पारदर्शकता आणि स्वच्छता या बाबी त्यांच्या कर्तुत्वाची साक्ष पटवितात, त्यांचा कारभार लोकाभिमुख व कल्याणकारी होता.

त्यांच्या या मताचे परिशिलन करताना त्यातून प्रकट होणाऱ्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीचे आणि संभाजी राजांच्या प्रशासनातील चातुर्याचे वैशिष्ट्य लक्षात घ्यावे लागते असे वैशिष्ट्य हे निश्चितच नवीन अध्ययनासाठी पोषक ठरणारे आहे.

## २.७ तौलनिक विश्लेषण :

अनेक वेळा छ.शिवाजी व संभाजी राजांची तुलना केली जाते. डॉ.कमल गोखले म्हणतात, "संभाजी महाराजांना दूरदृष्टी नव्हती, त्यांच्या राजकीय धोरणात काही सुसूत्रता नव्हती, राजा म्हणून त्यांची कारकिर्द अयशस्वी झाली, असे त्यांच्यावर आरोप करण्यात येतात. कोणत्याही राजप्रमुखाचे धोरण आणि त्याची सुसूत्रता त्यावेळच्या परिस्थितीवर अवलंबून असते. त्यामुळे या प्रबंधात मत व्यक्त करताना राजांना कोणत्या परिस्थितीला तोंड द्यावे लागले याचा विचार करावा लागतो."[४३] या पार्श्वभूमीवर छ. संभाजी महाराजांचे कर्तुत्त्व अधिक उमटून दिसते.

डॉ. प्रा.बाहेकर म्हणतात, "औरंगजेबाच्या प्रचंड लष्करी आक्रमणामुळे एकाच वेळी अनेक आघाडयांवर त्यांना लढा द्यावा लागला. त्यामुळे स्वराज्याची आर्थिक घडी विस्कटली असताना सुध्दा अभूतपूर्व प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्याचे कौशल्य संभाजी राजांनी दाखविले."[४४] प्रतिकूल अशा परिस्थितीवर मात करून इतिहास घडतो व घडविला जातो. या तत्त्वाची साक्ष त्यांच्या ऐतिहासिक कर्तुत्त्वातून पटते.

डॉ.शिवदे सदाशिव म्हणतात, "मोगलांच्या विध्वंसक विजेच्या लोळापासून मराठी राज्य वाचविणे दुरापास्त होते. तसा प्रयत्नसुध्दा त्यांच्याकडून केला गेला."[४५] मोगलांनी मराठी राज्य बुडविण्याचा चंग बांधला होता. फोडा व झोडा हे तत्त्व अनूसरले होते. त्यावर छ. संभाजी महाराजांनी समर्थपणे मात केली.

वा.सी.बेंद्रे यांच्यामते, "युध्द व युध्दनीती यावरच संभाजी महाराजांनी आपले सर्व लक्ष केंद्रीत केले होते आणि त्यात जी काही राजकारणकुशलता दिसून येते ती फार मोठी असून तिचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे मोगली अफाट शक्ती सामर्थ्याच्या आघातापासून संभाजीराजांनी आपले हिंदवी स्वराज्य आठ-नऊ वर्षे सुरक्षित राखले."[४६] खरेतर या दोन्ही राजांची तुलना करताना तत्कालीन परिस्थितीचे भान

ठेवले पाहिजे. गो.स.सरदेसाई म्हणतात, "संभाजी स्वतः शूर व धाडसी होता, परंतु सेनापतीला अवश्य लागणारे रणांगणावरचे किंवा मुत्सद्देगिरीचे डावपेच त्याला कळत होते असे दिसत नाही. आणि ते कळत असेल तरी दमादमाने व सोयीने सर्व संधाने जुळवून आणण्याची दीर्घ दृष्टी त्याचे ठिकाणी नव्हती."[४७] गो.स.सरदेसाई यांचे विधान पटण्यासारखे नाही. कारण पोर्तुगीजांशी लढतांना संभाजी महाराजांनी बाळगलेले धैर्य व त्यांची दुरदृष्टी पाहतांना त्यांचे हे कार्य खरोखर तेजस्वी असल्याचे दिसून येते.

या सर्व चर्चेवरुन हे स्पष्ट होते की उभयतांची तुलना करताना परिस्थितीची भिन्नता लक्षात घेतली पाहिजे. खरे तर छ. शिवाजी व संभाजी यांची तुलना करताना तत्कालिन परिस्थितीची भिन्नता लक्षात घेतली पाहिजे. त्यांना मिळालेले यश किंवा मर्यादा पाहता ते त्या परिस्थितीचा परिपाक होते असे म्हणता येईल.

## २.८ समारोप :

या प्रकरणामध्ये अशा प्रकारे प्रकाशित साहित्याचा आढावा घेण्यात आला आहे. प्रथम साहित्य समालोचनाचे महत्त्व स्पष्ट करण्यात आले. त्यानंतर प्रकाशित साहित्याचे वर्गीकरण करण्यात आले. असे वर्गीकरण करतांना इंग्रजी ग्रंथ, चरित्रात्मक ग्रंथ व विशिष्ट पैलू बाबतचे संशोधनपर ग्रंथ यांचाही आढावा घेण्यात आला आहे.

मागील संशोधनातील उणीवा स्पष्ट करण्यात आल्या व त्यानंतर पुढील संशोधन कार्यासाठी पोषक असे सूत्र विकसीत करता येणे शक्य झाले आहे. या प्रकरणात संबंधित साहित्याचा आढावा घेताना उपलब्ध सामग्रीचे तीन प्रकारात वर्गीकरण केले आहे. तसेच असे वर्गीकरण करताना पूर्वसुरींनी केलेल्या आकलनाचा दृष्टीकोन सांगून त्यांच्या मर्यादाही स्पष्ट केल्या आहेत. इतिहासाचा अभ्यास करताना वर्तमान

दृष्टीकोनाबरोबरच पूर्वीच्या संशोधकांनी घेतलेला धांडोळासुद्धा विचारात घ्यावा लागतो. छ. संभाजीवर ज्या प्रमुख अभ्यासकांनी गेल्या तीन-चार दशकांत विविध ग्रंथांच्या रुपाने जी मांडणी केली ती येथे साकल्याने मांडली आहे. भूत, वर्तमान आणि भविष्यकाळ यामध्ये सुवर्णमध्य साधून इतिहासाचे आकलन करावे लागते. असे आकलन करताना एखाद्या राजाच्या काळातील राजकीय परिस्थितीपेक्षाही त्याकाळातील सामाजिक, आर्थिक, अशा विविध पैलूंनी लोकजीवनाचे आकलन करावे लागते. असा विचार करून छ. संभाजीकाळातील लोकइतिहासाचे आकलण करण्याचा या प्रबंधात प्रयत्न केला आहे. त्यासाठी संबंधित साहित्याचा आढावा घेऊन अभ्यासाची पार्श्वभूमी तयार करण्यात आली.

या संशोधनाच्या पुढील प्रकरणामध्ये संशोधन पध्दती या प्रकरणावर प्रकाश टाकला आहे.

## संदर्भ ग्रंथसूची


१. प्रा.घाटोळे रा.ना., "समाजशास्त्रीय संशोधन तत्त्वे व पध्दती", श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, सहावी आवृत्ती, १९९७, पृष्ठ ५८

२. भांडारकर पु.ल., "सामाजिक संशोधन पध्दती", महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, नागपूर, दुसरी आवृत्ती, १९८१, पृष्ठ १३७

३. कित्ता पृष्ठ १३७

४. बेहरे सुमन, "सामाजिक संशोधन पध्दती", विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती, १९९८, पृष्ठ ३४

५. सोमन मा.शं., "सामाजिक संशोधन तंत्रे", पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, जाने. २००८, पृष्ठ ६५

६. सरदेसाई बी.एन., "इतिहास लेखनशास्त्र", फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, फेब्रु. १९९६, पृष्ठ १४७

७. नाडगोंडे गुरुनाथ, "सामाजिक संशोधन पध्दती", फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९८६, पृष्ठ १८६

८. कित्ता पृष्ठ १८८

९. कित्ता पृष्ठ १८९

१०. कित्ता पृष्ठ १९०

११. Sardesai G. S., "New History of the Maratha's", Vol. 1, Phienix Publication, Bombay, First Edition, 1971, Page 4

१२. कित्ता पृष्ठ ३०४

१३. Joshi P.S., "Chatrapati Sambhaji", Chand and Company, New Delhi, First Edition, 1980, Page 306

१४. राजदरेकर सुहास, "इतिहास लेखनशास्त्र", विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती, १९९८, पृष्ठ १४

१५. सरदेसाई गो.स., "मराठी रियासद" खंड २ रा, उग्रप्रकृती संभाजी, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, प्रथमावृत्ती, १९०२, पृष्ठ ११८

१६. कित्ता पृष्ठ १८

१७. कित्ता पृष्ठ ११८

१८. बेंद्रे वा.सी., "छत्रपती संभाजी महाराज यांचे विकित्सक चरित्र", पी.पी.एच प्रकाशन, मुंबई द्वितीयावृत्ती, १९७१, पृष्ठ १

१९. कित्ता पृष्ठ ५२९-५३०

२०. कित्ता पृष्ठ ५३१

२१. कित्ता पृष्ठ ५३५-५३६

२२. डॉ.गोखले कमल, "शिवपुत्र संभाजी", कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, चौथी आवृत्ती, २००१, पृष्ठ ४७८

२३. कित्ता पृष्ठ ४८२

२४. कित्ता पृष्ठ ४८४

२५. कित्ता पृष्ठ ४९१

२६. डॉ.बाहेकर एस.ए., "हुतात्मा छत्रपती संभाजी राजे : काल आणि कर्तृत्व", कसब प्रकाशन, जळगाव, प्रथमावृत्ती, १९९९, पृष्ठ ३४५

२७. कित्ता पृष्ठ ३५१

२८. शिवदे सदाशिव, "ज्वलज्ज्वलतेजस संभाजीराजा", डायमंड पब्लिकेशन, पुणे, द्वितीयावृत्ती, २००८, पृष्ठ ४५४

२९. शिंदे सरकार, "महापराक्रमी व परमप्रतापी छ.संभाजी महाराज", सह्याद्री प्रकाशन संस्था, इस्लामपूर, पृष्ठ १७७

३०. पवार जयसिंग, (संपा.), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ", मंजुश्री प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९९०, संपादक : पवार जयसिंग, पृष्ठ ९१

३१. कित्ता पृष्ठ ९२

३२. कित्ता पृष्ठ ११४

३३. कित्ता पृष्ठ २०५

३४. कित्ता पृष्ठ २६९

३५. नाडगोंडे उपरोक्त पृष्ठ ५९

३६. सरदेसाई गो. स., उग्रप्रकृती संभाजी, उपरोक्त पृष्ठ ११५

३७. बेंद्रे वा. सी. उपरोक्त पृष्ठ ५३१

३८. डॉ. गोखले कमल उपरोक्त पृष्ठ ४९१

३९. डॉ. जोशी पी. एस. उपरोक्त पृष्ठ ३७६

४०. डॉ. बाहेकर एस. ए. उपरोक्त पृष्ठ ३५५

४१. डॉ. शिवदे उपरोक्त पृष्ठ ४५५

४२. शिंदे सरकार उपरोक्त पृष्ठ १७७

४३. डॉ. गोखले कमल उपरोक्त पृष्ठ ४८८

४४. डॉ. बाहेकर एस. ए. उपरोक्त पृष्ठ ३५१

४५. डॉ. शिवदे उपरोक्त पृष्ठ ४५४

४६. बेंद्रे वा. सी. उपरोक्त पृष्ठ ५३३

४७. सरदेसाई गो. स., उग्रप्रकृती संभाजी, उपरोक्त पृष्ठ ११६

# प्रकरण तिसरे

# संशोधन कार्यपध्दती

# प्रकरण तिसरे

# संशोधन कार्यपध्दती

## ३.१ प्रस्तावना :

कोणत्याही विषयातील अज्ञात पैलूंचे संशोधन करून अनुमान काढतांना किंवा नवीन सिध्दांत मांडतांना कोणती पर्याप्त संशोधन पध्दती उपयोगात आणली याला सामाजिक शास्त्रात फार महत्त्व असते. सामाजिक शास्त्रात संशोधन करतांना संशोधनापूर्वी योजिण्यात आलेल्या विषयांच्या संदर्भात तथ्यांचे अवलोकन करणे गरजेचे असते. त्यानंतरच संशोधनाची निश्चित दिशा संशोधकास स्पष्ट करता येते. कुठल्याही विषयाचे शास्त्रीय आकलन हे सूत्रबध्द अशा प्रयत्नांतून शक्य होते. छ. संभाजीकालीन महाराष्ट्रातील लोकजीवन या विषयाचे अध्ययन करतांना हाच दृष्टीकोन स्विकारला आहे.

ऐतिहासिक संशोधनामध्ये नवनवीन दृष्टीने अध्ययन केले जात आहे. इतिहास हे एक सामाजिक शास्त्र आहे आणि इतिहासाचे लेखन हे ही शास्त्रीय पध्दतीने केले जाते. प्रा.इ.एच. कार म्हणतात, "इतिहास म्हणजे वर्तमानकाळ व भूतकाळ यांच्यातील न संपणारा संवाद होय."[१] इतिहासाचे संशोधन करताना ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीनेही लोकजीवनाचे आकलन केले जात आहे. प्रा.इ.एच. कार यांनीही हा नवा दृष्टिकोन महत्त्वाचा असल्याचे म्हटले आहे.[२] हा नवा दृष्टीकोन सामाजिक लोकजीवनावर भर देणारा आहे. समाजात झालेले बदल, लोकांचे बदललेले वर्तन आणि त्यांच्या जीवनशैलित पडलेला फरक या सर्व बाबींचे आकलन करून असे अध्ययन करावे लागते. तो या संशोधनाचा महत्त्वाचा धागा होय.

ऐतिहासिक सत्य हे शास्त्रीय कसोटयांच्याआधारे अभ्यासले जात असते. साधनांचे संकलन वर्गीकरण चाचणी व विश्लेषण हे ऐतिहासिक आकलनातील महत्त्वाचे टप्पे असतात. कार्ल पियर्सन यांनी म्हटले आहे, "सत्याचे आकलन होण्यासाठी जवळचा रस्ता नाही. विश्वाबाबतचे ज्ञान शास्त्रीय पध्दतीच्या गवाक्षातून करुन घेण्याखेरीज दुसरा पर्याय नाही."[3] इतिहासासारख्या सत्याधारित शास्त्रामध्ये अशा प्रक्रियेचे काटेकोर आकलन करणे अत्यंत महत्त्वाचे ठरते. प्राचीन व मध्ययुगीन इतिहासाबाबत तर अशा प्रक्रियांना विशेष महत्त्व आले आहे.

मध्ययुगात इतिहासाची साधने अधिक प्रमाणात उपलब्ध होतात. ही साधने केवळ स्थानिक भाषेत नाही तर ती विदेशी भाषेत सुद्धा आढळतात. संभाजीकालीन जीवनाचा विचार करता ती साधने जशी मोडी लिपीत आहेत तशी ती इंग्रजी, पोर्तुगीज, फ्रेंच या भाषेतही आहेत. या विदेशातील साधनात सत्त्याचा भाग अधिक असतो. स्थानिक माहितीला परकीय साधनांतील सत्त्याच्या आधारे पुष्टी दिली असता त्यातून नवनवे पैलू समोर येतात आणि या पैलूंचे आकलन केले असता त्याकडे पाहण्याचा नवा दृष्टीकोन अधिक चांगल्या पद्धतीने प्रकाशमान करता येतो. कार्ल पियर्सन यांनी सत्य शोधण्याच्या बाबतीत केलेले सूत्रकथन इतिहासासारख्या वस्तुनिष्ठ शास्त्राला अधिक पोषक ठरणारे आहे. त्यातील बारकावे लक्षणीय असून ते अधिक काळजीपूर्वक शोधून सत्याचे आकलन करावे लागते.

इतिहास संशोधनामध्ये घटनाक्रम व कालक्रम या बाबी अत्यंत महत्त्वाच्या ठरतात. सामाजिक संशोधनात तथ्य संकलन महत्त्वाचे असते. प्रा.रा.ना.घाटोळे म्हणतात, "केवळ ज्ञान अथवा तथ्य प्राप्त करुन घेणे म्हणजे शास्त्र नव्हे. नुसत्या संग्रहित ज्ञानाला आपण शास्त्र म्हणत नाही, तर हे ज्ञान अथवा तथ्य कोणत्यातरी पध्दतीने व्यवस्थित रुपाने संग्रहीत करावी लागतात. जमा केलेल्या तथ्यात कोणतातरी क्रम

असतो आणि हा क्रम कार्यकारण भावावर आधारलेला असतो."[४] लोकजीवनाचा अभ्यास करताना सामाजिक घटकांचे आकलन महत्त्वाचे ठरते, या संदर्भात प्रा. घाटोळे म्हणतात, "सामाजिक संशोधनाचा संबंध सामाजिक घटनांशी येतो. संशोधनात या घटनांचा अभ्यास केला जातो. समाज व्यक्तिंचा मिळून बनलेला असतो, म्हणून व्यक्तीच्या सामाजिक वर्तनाचा, कृतींचा, तिच्या क्रिया-प्रतिक्रियांचा, मनोवृत्तींचा अभ्यास हे सामाजिक संशोधन कार्य आहे. तसेच व्यक्तीशी निगडित असलेल्या समूह, गट, संस्था, समस्या संस्कृती, धर्म, परंपरा व समाज या घटकांचा समावेश सामाजिक संशोधनात होतो."[५] छत्रपती संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करताना तत्कालिन लोकांच्या सामाजिक, आर्थिक व धार्मिक तसेच सांस्कृतिक वर्तनाचा अभ्यास करावयाचा आहे.

इतिहास हे एक शास्त्र आहे व ते कार्यकारणभावावर आधारलेले आहे. संशोधनात नवा आकार कसा द्यावयाचा हे तथ्यांच्या प्रभावी संकलनावर अवलंबून असते. या संदर्भात असेही म्हटले जाते की, "शास्त्रीय पध्दतीचा अवलंब करुन जे ज्ञान मिळविले जाते ते शास्त्रशुध्द व सुसंबध्द आहे अथवा नाही हे निश्चित करण्यासाठी काही मूलभूत तत्त्वांची अथवा श्रध्दा स्थानांची कसोटी लावावी लागते. ह्या कसोटींना शास्त्रीय पध्दतीचे अधिष्ठान आहेत. त्यावर एखाद्याने मिळविलेले ज्ञान अथवा तथ्य प्रमाणित आहे अथवा नाही हे ठरविता येते."[६] इतिहास संशोधन हे सुध्दा त्यास अपवाद नाही त्यामुळे या संशोधनात शास्त्रीय मिमांसा करण्यावर भर दिला आहे. या संदर्भात असे सूत्र मांडले जाते की, "कोणत्याही विषयाचे अध्ययन हे वस्तुनिष्ठ असले पाहिजे याची काळजी घेतली जाते, तर अध्ययन हे व्यक्तिनिष्ठ असेल तर अशा अध्ययनातून तथ्यांचा शोध घेतला जात नाही. असे अध्ययन हे पूर्वग्रह दूषित किंवा पक्षपात पूर्ण असण्याची शक्यता अधिक असते. वैज्ञानिक अध्ययनात अशा पक्षपात किंवा पूर्वग्रहाला कोणतेही स्थान नसते."[७] छ.संभाजी महाराजांच्या इतिहासाचे नव्याने आकलन करताना येथे पूर्वग्रहापासून मुक्त होऊन वस्तुनिष्ठ दृष्टी स्वीकारली आहे.

इतिहास हे एक सामाजिक विज्ञान आहे. वैज्ञानिक पध्दतीबद्दल म्हटले जाते की, "विज्ञानामध्ये सातत्याने यथार्थता किंवा अचूकता यावर भर दिला जातो. केवळ अर्धे सत्य किंवा कार्यपध्दतीचा निष्काळजीपणा यावर विज्ञानात समाधान मानले जात नाही. विज्ञानात अधिक विशेष विश्लेषण, खरे भविष्य कथन आणि नियंत्रण यांना विशेष महत्त्व दिले जाते."[८]

इतिहासाला वैज्ञानिक दृष्टी देत असताना हाच विचार पथदर्शक ठरणार आहे. प्रस्तुत विषयाचा सामाजिक विज्ञान या दृष्टीने अभ्यास केला आहे. वैज्ञानिक पध्दतीमध्ये तथ्यांच्याआधारे सत्य संकलन करावे लागते. यासंदर्भात असे प्रतिपादन केले आहे की, "विज्ञानात समप्रमाणतेला विशेष महत्त्व आहे. त्यामुळे समप्रमाणता सिध्द करण्यासाठी न्याय आणि विश्वसनीय मापन साधनांची आवश्यकता असते. जेव्हा मापनसाधनाद्वारे वैशिष्टयांचे अचूक आणि स्पष्टपणे मापन केले जाते तेव्हा असे मापन साधन न्याय्य आणि विश्वसनीय मानले जाते."[९] इतिहासासारख्या शास्त्रातही ही समप्रमाणता मोलाची ठरते.

छ.संभाजीच्या इतिहासाचे न्याय दृष्टीने आकलन करताना हा विचार खरोखर पथदर्शक ठरणारा आहे. इतिहास शास्त्राच्या दृष्टीने ही मिमांसा अचूकपणे लागू पडते. ए.वुल्फ यांनी शास्त्राची तीन वैशिष्टये सांगितलेली आहे. चिकित्सा अवधारण, सामान्यीकरण व व्यवस्थिकरण आणि अनभवानुसरण ही ती वैशिष्टये आहेत. या मूलाधाराच्या सहाय्याने घटकांचे व घटनांचे अध्ययन व्यवस्थितपणे करणे शक्य होते.[१०] या सूत्राचा वापर करुन छ.संभाजीकालीन महाराष्ट्राच्या लोकजीवनाचा येथे अभ्यास करावयाचा आहे. प्रो.ब्लॉक यांनी अगदी योग्य शब्दात म्हटले आहे की, "सामाजिक इतिहास म्हणजे मानवांचा इतिहास होय"[११] या पार्श्वभूमीवर इतिहास एक सामाजिकशास्त्र या नात्याने कार्य करते हे लक्षात घेतले पाहिजे.

सामाजिक इतिहासाच्या बाबतीत तत्कालीन समाजात घडणारी स्थित्यंतरे व संक्रमणे अभ्यासताना समाजजीवनात झालेल्या उलथापालथींचा अभ्यास करावा लागतो. जुनी मूल्ये कशी रोवली गेली, त्यास हादरे कसे बदले, त्याची जागा नव्या मूल्यांनी कशी घेतली या सर्व प्रश्नांचा उहापोह करताना हे लक्षात घेतले पाहिजे की, मुगलांच्या आक्रमणामुळे महाराष्ट्रातील समाज जीवनाला बसलेले हादरे हे अनेक प्रश्न निर्माण करणारे होते. या प्रश्नांची उत्तरे तत्कालीन राज्यकर्त्यांना शोधावी लागत होती. छ. शिवाजी आणि संभाजी महाराजांनी मोगलांच्या सांस्कृतिक आक्रमणाशी कसा सामना केला, लोकांचे नैतिक मनोबल कसे उंचावले, साधूसंतांनी त्यांना कशी प्रेरणा दिली, लोक संकटाशी कशा पद्धतीने सामोरे जाते होते या सर्व बाबी लक्षात घेतल्या असता गतकालिन समाजात झालेले बदल शास्त्रीयपणे अभ्यासता येतात. अशा बदलांचा अभ्यास करताना वापरावयाच्या संशोधन पद्धतीवर या प्रकरणात चौफेर प्रकाश टाकला आहे.

### ३.२ ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टिकोन :

सामाजिक इतिहासाची संकल्पना स्पष्ट करताना Brockhampton कोशात म्हटले आहे, "Social history is branch of history that documents the living and working conditions of people rather than appear of state" सामाजिक इतिहास ही एक इतिहासाची ज्ञानशाखा आहे. त्यामध्ये लोकांच्या जीवन जगण्याच्या व कार्यकरण्याच्या स्थितीचे आकलन केले जाते. राज्यातील घटना व घडामोडीपेक्षा लोकजीवनावर या ज्ञानशाखेत अधिक भर दिला जातो.[१२] छ.संभाजी कालीन इतिहासाचा अभ्यास करताना येथे लोकजीवनावर भर द्यावयाचा आहे. या अगोदरच्या संशोधकांनी राजकीय घडामोडींवर अधिक भर दिल्यामुळे असा सामाजिक लोकजीवनाचा अभ्यास प्राधान्याने करणे अगत्याचे ठरते. सामाजिक इतिहास ही अभ्यासशाखा अगदी अलिकडे

विकसित झाली. ट्रिव्हेलिन यांनी इंग्लंडचा सामाजिक इतिहास लिहिला. अर्नाल्ड टॉयन्बी यांनी संस्कृतीचा विकास रेखाटताना सामाजिक इतिहासाचा विचार केला आहेच. अशा प्रकारे सामाजिक इतिहासाचा विकास मोलाचा ठरतो.

इतिहासातील व्यक्ती, घटना व प्रसंगाचे शास्त्रीय संशोधन करताना आपणास समाजशास्त्रीय दृष्टीने मिमांसा करावी लागते. सामाजिक शाखेतील संशोधन हे अलिकडे अधिक शास्त्रीय रूप धारण करत आहे. माणूस हा सामाजिकशास्त्रातील तर्क अध्ययनांचा केंद्रबिंदू असतो. इतिहासाचे अध्ययन केंद्राभोवती फिरत असते.[१३] छ.संभाजीकालीन इतिहासाचा मानवी दृष्टीने अभ्यास महत्त्वाचा ठरतो. प्रा.सेलिंगमन यांनी सामाजिक शास्त्राची नवी भूमिका स्पष्ट करताना केलेली मिमांसा महत्त्वाची ठरते. ते म्हणतात, "सामाजिकशास्त्रे ही अशी मानसिक किंवा सांस्कृतिक शास्त्रे आहेत की ज्यामध्ये समूहाचा घटक या नात्याने व्यक्तींच्या कृतींचा अभ्यास केला जातो."[१४] या संदर्भात कोलंबिया विश्वकोशात सामाजिकशास्त्राची मिमांसा महत्त्वाची ठरते.

कोलंबिया विश्वकोशात याच संदर्भात केलेली आहे. यात असे म्हटले आहे, "मानवी समूहांचा अभ्यास करणारी शास्त्रे म्हणजे सामाजिकशास्त्रे होत."[१५] येथे छ.संभाजीकालीन महाराष्ट्राचे समाजजीवन अभ्यासावयाचे आहे. प्रा.मॉरीस आर. कोहने यांनी म्हटले आहे, "समूह जीवनातील मानवी जीवन व्यवहाराचे विश्लेषण सामाजिकशास्त्रात केले जाते."[१६] याचाच अर्थ असा की काळ कुठलाही असो, प्राचीन की मध्ययुगीन त्यामधील समूह जीवनाचे आकलन हा पैलू अधिक महत्त्वाचा ठरतो. त्यावरुन लोकव्यवहाराची प्रचिती येऊ शकते. सामाजिक इतिहासाबाबत टॉयन्बी म्हणतात, "इतिहासाच्या लेखन प्रकारामध्ये समाज व व्यक्ती हे दोनच महत्त्वाचे घटक असतात आणि सा-या कालसापेक्ष घटना या दोन घटकांच्या भोवती रुंजी घालत असतात."[१७] छ.संभाजीराजे व तत्कालीन समाज यातील आंतरक्रियांचे

आकलन करणे हाही अभ्यासाचा गाभा होय. ज्ञानकोशात म्हटले आहे, "अठराव्या शतकात राजकीय व धार्मिक इतिहासावर भर दिला जात होता. विसाव्या शतकाच्या प्रारंभी लोक कशा प्रकारचे जीवन जगत होते व कार्य करत होते याच्या अभ्यासाला प्रारंभ झाला."[१८] आता एकविसाव्या शतकामध्ये प्रत्यक्ष लोकइतिहासावर भर दिला जात आहे.

सामाजिक इतिहासाच्या अभ्यासाला गेल्या दोन दशकापासून प्रारंभ झाला. भारतातमध्ये रोमिला थापर यांनी ही ज्ञानशाखा समृध्द केली आहे.[१९] या पार्श्वभूमीवर या प्रबंधामध्ये छ.संभाजीकालीन सामाजिक लोकइतिहासावर प्रकाश टाकावयाचा आहे. प्रा.नाडगोंडे यांच्यामते, "व्यक्तिच्या वर्तनावर इतर व्यक्तिंचा प्रभाव पडलेला असतो. इतरांमुळे प्रभावीत झालेले वर्तन हे सामाजिक वर्तन असते. तेव्हा व्यक्तीच्या सामाजिक वर्तनाचा अन्वयार्थ लावताना हे व्यक्ती-व्यक्तींचे परस्पर संबंध व त्याचे स्वरुप समजावून घेणे आवश्यक ठरते."[२०] मोगल सम्राट औरंगजेबाच्या धार्मिक धोरणाचा तत्कालीन महाराष्ट्र जीवनावर कसा प्रभाव पडला व त्यास लोकांनी कसा विरोध केला हे सूत्र या अभ्यासात महत्त्वाचे ठरते. विविध प्रकारच्या सामाजिक परिस्थितीत आढळून येणारे सामाजिक संबंधही विविध प्रकारचे असतात.[२१] अशा प्रकारच्या सामाजिक संबंधांचा अभ्यास आपण समाजशास्त्रीय दृष्टीने करू शकतो.

स्टुअर्ट चेस म्हणतात, "सामाजिकशास्त्र म्हणजे शास्त्रीय पध्दतीने मानवी संबंधांचा अभ्यास करणे होय."[२२] या शोधप्रबंधाची हीच बैठक होय. अशा मानवी संबंधाचे इतिहासात आकलन करताना या संबंधात झालेले बदल आणि लोकांनी राज्यकर्ते व समाजजीवनास दिलेला प्रतिसाद पाहता भावी वाटचालीचे यथार्थ दर्शन घडविता येते. समाजशास्त्र ही तुलनेने अधिक तरुण आणि तवेढीच महत्त्वपूर्ण ज्ञानशाखा असून सामाजिक शास्त्रातील अनेक कूट प्रश्नांची उकल करण्यासाठी

नवसमाजशास्त्रीय दृष्टी ही खरोखरच प्रभावी ठरू शकते. त्यातल्या त्यात ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीकोन हा तर सामाजिक इतिहासाच्या अभ्यासासाठी महत्त्वाचा मानला जातो.

मार्क्सवादी अभ्यासामध्ये इतिहासाचे द्वंद्वात्मक भौतिक वादाच्या दृष्टीने आकलन केले जाते. इतिहास हा संघर्षातून घडतो असेही मार्क्सवादी मीमांसा मानते, परंतु ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीने विचार करता असे म्हटले जाते की, इतिहासात घडणाऱ्या सर्व प्रक्रिया ह्या सामाजिक प्रक्रियांचा भाग असतात. समुद्रातून किनाऱ्यावर जशा लाटा आदळतात त्याप्रमाणे समाजजीवनात घडणाऱ्या चढउतारांचे पडसाद हे इतिहासात उमटत असतात. हे पडसाद टिपण्यासाठी उपलब्ध साधनांचे नव्याने आकलन करून त्याआधारे सामाजिक गतिशास्त्राचा मागोवा घ्यावा लागतो. असा मागोवा जितका शास्त्रीय पद्धतीने घेतला जातो तितके लोकजीवनाचे अधिक साक्षेपी आणि अधिक वस्तुनिष्ठ आकलन घडविता येते.

**३.३ ऐतिहासिक संशोधन पध्दती :**

या संशोधनासाठी ऐतिहासिक संशोधन पध्दतीचा उपयोग करण्यात आला आहे. सामाजिक शास्त्रांच्या विषयाच्या संशोधनात गतकालीन घटनांच्या अभ्यासाला महत्त्वपूर्ण स्थान असते. हे संशोधन सामाजिक समूह, संस्था किंवा व्यक्तीशी संबंधीत असते. त्यांच्या सातत्याने परिवर्तनाची प्रक्रिया सतत चालू असते. त्यामुळे त्यांचे नीट आकलन होण्यासाठी सामाजिक घटनांची तपासणी सुरुवातीपासूनच करावी लागते. सामाजिक संशोधन पध्दतीमध्ये ऐतिहासिक संशोधन पध्दतीचे स्वतंत्र स्थान आहे. ही पध्दती गतकालीन घटनांच्या व जीवनाच्या यथार्थ आकलनासाठी वापरली जाते. ऐतिहासिक संशोधन पध्दतीचे शास्त्रीय अध्ययन कार्यातील महत्त्व अनन्यसाधारण आहे. प्रा.नाडगोंडे म्हणतात, ‘‘गतकालीन घटनांचा मागोवा घेणे हे

अनेक अर्थांनी आवश्यक असते. त्याचे स्वरुप अनेकवेळेला गुंतागुंतीचे, संदिग्ध, अस्पष्ट, निरीक्षणबाह्य व कालदृष्टया दूर अंतरावरचे असते. साहजिकच अशा घटनांचा अभ्यास एका वेगळया पध्दतीने करावा लागतो."[२३] ही पध्दती म्हणजे ऐतिहासिक पध्दती होय.

केवळ इतिहासाच्या अभ्यासातच नव्हे तर इतर अनेक ज्ञानशाखातही ही पध्दत योजकतेने वापरली जाते. ऐतिहासिक पध्दतीची उपयुक्तता अनेक दृष्टीने प्रतिपादन केली जाते. यासंदर्भात डॉ.पॉऊलिंग यंग म्हणतात, "समाज एक गतिशील, सुसंघटीत शरीर आहे. त्याची रचना व कार्य यामध्ये संथपणाने पण सातत्याने बदल होत असतात. असे कल्पिन्यात इतिहासतज्ञ, तत्त्वज्ञ, सामाजिक मानसविशारद्, साहित्यिक व सामाजिक संशोधक ऐतिहासिक पध्दतीच एक साधन म्हणून वापर करतात."[२४] छ.संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करतानाही ही पध्दत खरोखरच पूरक ठरणारी असून त्यामुळे तत्कालीन परिस्थितीचे अनेक अज्ञात पैलू प्रकाशात येऊ शकतात. या पध्दतीचे महत्त्व सांगताना प्रा.नाडगोंडे म्हणतात, "जेव्हा भूतकाळातील घटनांत वर्तमान काळातील घटनांची बीजे असतात. त्याचप्रमाणे उद्याच्या उषःकालाची पहाट वर्तमानकाळात दिसून येते, तर वर्तमानकालीन पहाट रात्रीच्या गर्भात असते."[२५] छ.संभाजीच्या समर्पणातून वर्तमान महाराष्ट्राचा इतिहास घडला आहे. कारण मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द हे संभाजी राजांच्या मृत्यूप्रेरणावर आधारलेले होते. डॉ.रा.श्री.मोरवंचीकर म्हणतात, "जर आपण सामाजिक इतिहास लिहून समाजसंघटनांची माहिती जगापुढे मांडली नाही तर फार मोठा अनर्थ होण्याची शक्यता आहे."[२६] कारण सामाजिक इतिहास हा गतकालीन अनुभवांच्या आधारे समाजाची नव्याने जडणघडण करण्यासाठी पथदर्शक ठरत असतो. प्रा.नाडगोंडे म्हणतात, "ऐतिहासिक अभ्यास पध्दतीचे स्वरुप किंवा त्यांचे महत्त्व कोणते हे

अजमावताना हे लक्षात घेणे जरुर आहे की, एकूण मानवी संस्कृतीचे योग्य आकलन ऐतिहासिक अभ्यास पध्दतीने होऊ शकते. कारण कोणत्याही सामाजिक घटनेचे यथार्थ आकलन करुन घेण्यासाठी त्या घटनेचा उगम व विकास कसा झाला हे पाहणे उद्‌बोधक ठरत असते."[२७] पुर्व इतिहासातील सामाजिक प्रवाह हे अशा अभ्यासातून स्पष्ट करता येतात.

मराठयांच्या इतिहासातील महाराष्ट्र धर्म ही कल्पना उदयाला आली व नव्या जाणीवेतून त्याआधारे छ.शिवाजीने हिंदवी स्वराज्य स्थापन केले तर छ.संभाजीरावांनी या स्वराज्याचे प्राणार्पण करुन संरक्षण केले. इतिहास संशोधनात कागदपत्रांचे महत्त्व अनन्यसाधारण असते. त्याचे महत्त्व सांगताना नाडगोंडे म्हणतात, "ज्या व्यक्तींच्या हाती ही कागदपत्रे असतील ती मिळवून त्याला सार्वजनिक रुप देणे आवश्यक असते."[२८] अशा या सार्वजनिक कागदपत्रांचा नवा अर्थ लावून येथे छ.संभाजीकालीन लोकजीवनाचे शास्त्रीय अध्ययन करावयाचे आहे. राजकीय व सामाजिक संस्थांचा विकास एकदम झालेला नाही हे लक्षात घेतले तर त्यांची वाटचाल कितीतरी काळ अगोदर चालू झालेली होती ते स्पष्ट होते.

आर.जी.कॉलिंगवूड म्हणतात, "ज्या गतकाळाचा अभ्यास इतिहासकार करीत असतात तो भूतकाळ मृतप्राय नसतो, तर काही अर्थाने त्याचे अस्तित्व वर्तमानकाळातच असते."[२९] महाराष्ट्र जीवनातील बदलत्या सामाजिक व धार्मिक कल्पनांचा अभ्यास करताना तत्कालीन मूल्ये, धर्मसंस्था व संकल्पना यामध्ये झालेल्या बदलांची मिमांसा करावयाची आहे. ऐतिहासिक समाजशास्त्र एक नवीन व प्रगत ज्ञानशाखा आहे. डॉ.मोरवंचीकर म्हणतात, "आज सामाजिक इतिहासाची नव्याने गरज निर्माण झाली आहे. म्हणून इतिहास व समाजशास्त्र यांचा तौलनिक पध्दतीने अभ्यास करण्याची गजर निर्माण झाली आहे."[३०] त्यामुळे मध्ययुगीन भारताचा इतिहास केवळ राजकीय दृष्टीने नव्हे तर सामाजिक अंगांनी केला तर अनेक कूट प्रश्न अभ्यासावे लागतात.

चिकित्सक दृष्टीने संशोधन ही नव्या युगाची हाक आहे त्यामुळे नव्या व जुन्या कल्पनांचा अगर माहितीचा स्वीकार करताना अभ्यासकाला टिकात्मक दृष्टी हवी. ही दृष्टी असेल तर ऐतिहासिक अभ्यास पध्दती विशेष यशस्वी व परिणामकारकरित्या अंमलात आणता येते. म्हणून पॉलीन म्हणतात, "विविध बाजूंनी गोळा केलेल्या ऐतिहासिक माहितीची निवड न्यायबुध्दीने केल्यास व त्याचे टिकात्मक परीक्षण करुन त्याचा वापर तारतम्याने केल्यास सामाजिक परिस्थिती व सामाजिक संस्था व समुदाय घटक यांविषयींच्या आकलनासाठी व त्यासंबंधी सर्वसामान्य सिध्दांत मांडण्यासाठी आवश्यक असणारे ज्ञान प्राप्त होईल."[३१] या अभ्यासामध्ये असाच दृष्टिकोन ठेवला आहे.(१) येथे माहितीचे न्याय बुध्दीने निवड केली आहे. (२) तसेच साधनांचे टिकात्मक परीक्षण केले आहे. (३) साधनांचा तारतम्याने वापर केला आहे.

छ.संभाजीकालीन लोकइतिहासाचे अध्ययन करताना येथे उपलब्ध साधनांची काटेकोरपणे निवड करावयाची आहे. साधन चिकित्सा करुन त्यांच्या शास्त्रीय वापरावरही भर दिला आहे.

वा. सी. बेंद्रे यांनी लिहिलेल्या साधन चिकित्सा या ग्रंथात मराठ्यांच्या इतिहासाची साधने कशी पडताळून घ्यावयाची आणि त्या साधनांना नवा अर्थ कसा द्यावयाचा याबाबत आकलन केले आहे. कालक्रम, घटना, घडामोडी आणि लोकजीवनात झालेले बदल यांचा इतिहास शास्त्राच्या आधारे मागोवा घेताना ऐतिहासिक पद्धती ही अंधारातून प्रकाशाकडे जाण्यासाठी मार्गदर्शक ठरते. या पद्धतीचे साक्षेपी आकलन हे इतिहासाला नवी दिव्यदृष्टी देऊ शकते. हे सूत्र लक्षात घेऊन ऐतिहासिक पद्धतीचा वापर करताना या अभ्यासामध्ये पुढील तीन बाबींवर भर दिला आहे.

१. उपलब्ध साधनांची पडताळणी करताना ती साधने किती वस्तुनिष्ठ आहेत हे लक्षात घेण्यासाठी साधनांचे अंतर्गत व बाह्य मूल्यमापन केले आहे.

२. साधनांच्या पडताळणीत आणि विश्लेषणात तथ्यांची जुळणी करणे अत्यंत महत्त्वाचे असते. ही तथ्ये अनेक भाषेत विखुरलेली आहेत. त्यामुळे सत्त्याच्या अधिक समीप जाण्यासाठी परकीय साधनांचा वापर करावा लागतो. तो वापर शास्त्रीयपणे केल्यास सत्य अधिक ठोसपणे मांडता येते.

३. गतकाळातील इतिहासकारांनी मांडलेली जुनी प्रमेये झुगारून देऊन नवीन प्रमेये मांडताना ऐतिहासिक सत्याचे पदर नव्याने उलगडावे लागतात. त्यादृष्टीने चिटणीस बखरीतील अनेक जुन्या भ्रामक कल्पनांचे मूल्यमापन करून नवा इतिहास समोर आणावयाचा आहे.

छ. संभाजीकालिन दहा वर्षांचा काळ हा युद्ध, आक्रमण, नैसर्गिक आपत्ती यामुळे धामधुमीचा काळ बनला होता. या काळात विंचवाचे बिऱ्हाड पाठीवर या म्हणीप्रमाणे राजाला सैन्य आपल्यासमवेत घेऊन कधी मोगलांशी, कधी पोर्तुगीजांशी तर कधी इंग्रजांशी व सिद्दीशी चार हात करावे लागत होते. असा सामना करताना एका बाजूला सैन्याचे मनोधैर्य उंचवायचे होते आणि दुसऱ्या बाजूला प्रजेच्या कल्याणाचीही जपणूक करावयाची होती. संभाजी महाराजांनी अशी दुहेरी कार्ये विचारपूर्वक केली आणि आपल्या धेय्यधोरणांची अंमलबजावणी करून स्वराज्य रक्षणाचे आणि संस्कृती रक्षणाचे उद्दिष्ट साध्य केले. त्यांच्या या कामगिरीचे मूल्यमापन करताना वरील तीनही टप्प्यांनी साधनांची विश्वसार्हता, साधनांची जुळणी आणि साधनांचे नव्याने विश्लेषण करून लोकजीवनाबाबत नवे सत्य समोर आणण्याचा प्रयत्न केला आहे.

या पार्श्वभूमीवर या संशोधनासाठी लागणारी माहिती अनेक प्रकारच्या प्राथमिक व दुय्यम साधनांमध्ये विखुरलेली आहे. तथ्य संकलनासाठी ही सर्व साधने मिळवून त्यांची संगतवार जुळणी करून त्या आधारे नवीन माहिती व नवे दृष्टीकोन विकसित करावयाचे आहेत. मध्ययुगीन भारताच्या इतिहासात गुंतागुंतीचे अनेक प्रश्न आहेत.

तसेच साधनांच्या उपलब्धतेबरोबर त्यांची सत्यता पडताळणे हेही तेवढेच महत्त्वाचे अंग असते हे लक्षात घेऊन संभाजीकालिन लोकइतिहासाची तथ्य संकलनाची साधने पुढीलप्रमाणे मांडली आहेत.

## ३.४ तथ्य संकलन साधने :

संशोधनासाठी जी माहिती मिळवावी लागते त्यास तथ्य असे म्हणतात.[३२] छत्रपती संभाजीकालीन लोकजीवनाचा इतिहास हा काही विश्वासार्ह अशा तथ्यांच्या आधारे शोधावयाचा आहे. अशा तथ्यांचे महत्त्व सांगताना प्रा.घाटोळे म्हणतात, "तथ्य संकलन ही वैज्ञानिक पध्दतीची पहिली महत्त्वाची अट आहे. या सर्व संकलीत तथ्यांचे उचित व व्यवस्थित वर्गीकरण करावे लागते."[३३] प्रा.गुड व हॅट यांच्या मते, "Fact is an emperically verifiable observation" तथ्ये म्हणजे एक अनुभवसिध्द सत्यापनीय अवलोकन होय.[३४] या अभ्यासामध्ये संकलीत करावयाच्या तथ्यांचे विश्लेषण या भागात केले आहे.

### अ) प्राथमिक साधने :

प्राथमिक साधनांचे महत्त्व सांगताना नाडगोंडे म्हणतात, "निश्चित हेतू पुढे ठेवून मिळविलेल्या माहितीला प्राथमिक साधने म्हणतात."[३५] या अभ्यासामध्ये प्रामुख्याने छ. संभाजीकालीन प्रकाशित व अप्रकाशित कागदपत्रांचा विचार करावयाचा आहे. संभाजीकालीन पत्रव्यवहार हा पत्रसारसंग्रह या नावाने शं. ना. जोशी यांनी १९४९ साली संकलित केला आहे. पुणे येथील भारत इतिहास संशोधन मंडळाच्या वतीने प्रकाशित करण्यात आलेल्या या ग्रंथामध्ये संभाजीकालीन मौलिक पत्रांचा समावेश आहे. शिवाय मराठवाडा विद्यापीठाच्या इतिहास विभागाच्या वस्तुसंग्रहालयात संभाजीकालीन काही दुर्मिळ कागदपत्रे आहेत. या कागदपत्रांचाही संशोधकाने शोधकार्यासाठी उपयोग केला आहे.

## १. मुलाखती :

हा तथ्य संकलनाचा मौखिक प्रकार आहे. व्यक्तीच्या भावना, हेतुनिष्ठता, प्रेरणा इत्यादी संबंधीचे ज्ञान मुलाखती तंत्राने होत असते. म्हणजे जे प्रत्यक्ष निरीक्षणाने साधत नाही ते ज्ञान मुलाखती तंत्राने साध्य होते. प्रत्यक्ष निरीक्षणाने व्यक्तिच्या केवळ बाह्यरंगाचे दर्शन घडते पण मुलाखतीच्या द्वारे व्यक्तीच्या अंतरंगात प्रवेश करता येतो. म्हणून पी.व्ही.यंग म्हणतात, "मुलाखत म्हणजे असा अनौपचारिक मौखिक व परिणामकारक संवाद की जो एखाद्या निश्चित व नियोजित आशयाला धरून विशिष्ट हेतूने घडवून आणलेला असतो."[३६] येथे आंतरदृष्टीस चालना देणाऱ्या घटकांचा विचार करताना काही अभ्यासकांच्या मुलाखती घेऊन त्याआधारे संभाजीकालीन लोकजीवनाबाबत त्यांच्याकडून कळीच्या प्रश्नाबाबत माहिती घेतली आहे. सुमारे २० संशोधक निवडून त्यांच्याकडून संभाजीकालिन लोकजीवनाबाबत काही महत्त्वांच्या प्रश्नाबाबत चर्चा केली आहे व या प्रश्नांची उकल करण्याचा प्रयत्न केला आहे.

## २. पत्रे :

पत्रांचे ऐतिहासिक साधन म्हणून महत्त्व सांगताना म्हटले आहे, "पत्राचे स्वरुप हे खाजगी असते त्यामुळे पत्रातून व्यक्तीच्या भावभावनांचे मोकळे दर्शन घडत असते."[३७] पत्रातील सामग्री ही अशा प्रकारे गतकालीन समाजजीवनावर प्रकाश टाकणारी असते. सुहास राजदरेकर म्हणतात, "राज्यकारभाराच्या संदर्भातील पत्रव्यवहारात साधारणपणे आर्थिक, राजकीय परिस्थितीचे दर्शन घडते."[३८] अलिकडे अशा पत्रातून सामाजिक घटनांचे पदरही उलगडता येतात.

## ३. सार्वजनिक दप्तर :

सार्वजनिक संस्थांमधील माहिती प्रकाशित व अप्रकाशित अशा दोन्ही स्वरुपात उपलब्ध असते.[३९] संभाजीकालीन कागदपत्रे पुणे येथील भारत इतिहास संशोधन

मंडळ, मराठवाडा विद्यापीठ वस्तु संग्रहालय औरंगाबाद, डेक्कन महाविद्यालयातील संग्रहालय व अभिलेखागार पुणे, इत्यादी ठिकाणी उपलब्ध आहेत. या साधनांबाबत अरुणा मोरे म्हणतात, "महाराष्ट्रात जी प्रमुख अभिलेखागार व वस्तुसंग्रहालये आहेत त्यातून महाराष्ट्राच्या इतिहासावर प्रकाश पडतो."[४०] या सामग्रीचा धांडोळा घेतला असता नविन समाजशास्त्रीय दृष्टी स्विकारली पाहिजे.

**ब) दुय्यम साधने :**

तथ्य मिळविण्यासाठी एक प्रसिध्द रित म्हणून दुय्यम साधनांचा उल्लेख करता येईल. सामाजिक संशोधनात प्राथमिक सामग्रीइतकाच किंबहुना थोडासा अधिक वापर दुय्यम सामग्रीचा केला जातो.[४१] या अभ्यासात संभाजीकालीन पत्रे व सार्वजनिक दप्तर यांचा अभ्यास करावयाचा आहे.

**१. बाडे**

मध्ययुगात छापण्याची कला नसल्यामुळे महत्त्वाची कागदपत्रे नक्कल करून सांभाळून ठेवत असत. अशा कागदपत्रांना बाडे असे म्हणतात. अशा बाडांतून देवादिक, राजे, पादशाह यांच्या याद्या, त्यांच्या कारकिर्दीची कालगणती, काही निवडक ऐतिहासिक प्रसंग, तिथी, शक यांची माहिती असे. क्वचितप्रसंगी औषधे, मंत्रतंत्र यांची माहिती दिलेली असे. या साधनातील मजकूराचा दर्जा अर्थात दुय्यम प्रकारचा होता.[४२] ऐतिहासिक बाडातून प्रकट होणारी माहिती ही सामाजिक परिवर्तन प्रक्रियांवर प्रकाश टाकणारी असते.

**२. पोवाडे व काव्य**

इतिहासाचे संदर्भ साधन म्हणून पोवाडे हे सुद्धा एक महत्त्वाचे साधन ठरते. पोवाडे हे जरी वीर रसप्रधान असले तरी त्यांच्यातील वर्णन हे बरेच ऐतिहासिक सत्याला धरून असल्यामुळे एक साधन यादृष्टीने त्याचा मोठा आधार मानावयास हरकत

नाही.[४३] य. न. केळकर यांनी ऐतिहासिक पोवाडे या ग्रंथात पेवाड्यांचे संकलन केले आहे. त्यापैकी काही पोवाडे छ. संभाजीच्या पराक्रमाचे वर्णन करणारे आहेत.

### ३. बखर वाङ्मय :

महत्त्वपूर्ण खबरी एकत्र करुन मराठेशाहीत जे ग्रंथ पुढे आले ते म्हणजे बखर होय.[४४] बखरकारांनी तत्कालीन इतिहास शब्दबध्द केला. अनेक प्रसंग रंगविताना बखरकारांनी अतिशयोक्ती केली असली तरी ऐतिहासिक सत्य आपणास नजरेआड करता येणार नाही. इतिहासाची शास्त्रशुध्द मांडणी या काळात केली जात नव्हती. बखरलेखक हे तत्कालीन इतिहासकारच होते. त्यांनी आपल्या विवेचनातून दिलेली माहिती इतिहास अभ्यासकांच्यादृष्टीने अतिशय उपयुक्त आहे. मल्हार रामराव चिटणीस यांनी संभाजीवर 'चिटणीसांची बखर' लिहिली आहे. या बखरीत संभाजीविषयी अतिशयोक्तीपर आणि विपर्यास्त माहिती वाचावयास मिळते. दुसरी बखर म्हणजे 'एक्याण्णव कलमी बखर' खंडो अण्णाजी यांनी लिहिली आहे. या बखरीत संभाजीच्या बालपणाची माहिती मिळते. थोडक्यात धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिती समजण्यास देखिल बखर साहित्याची मोठी मदत होते.

### ४. संत वाङ्मय :

रामदास, तुकाराम हे संतशिरोमणी याच काळात होऊन गेले. त्यांचे लिखाण जरी पारमार्थिक विषयासंबंधीचे असले तरी ज्या समाजात ते वावरत होते त्या समाजाचे प्रतिबिंब त्यांच्या लिखाणात पडणे अनिवार्य होते. मात्र सामाजिक, आर्थिक इतिहासासाठी कणाकणाने या साहित्यातून माहिती गोळा करावी लागते. त्यातून अतिशयोक्तीचा आणि अलंकाराचा भाग झाडून टाकावा लागतो. आणि निर्भेळ सत्य तेवढे टिपावे लागते.

## ५. संस्कृत साधने :

डॉ. सदाशिव शिवदे यांनी "मराठयांच्या इतिहासाची संस्कृत साधने"हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. हा ग्रंथ या अभ्यासासाठी उपयुक्त ठरला आहे. तसेच श्री. अशोकराव शिंदे सरकार यांनी "छ. संभाजी महाराज वाङ्मय व साहित्य" हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. या ग्रंथात त्यांनी छ. संभाजीने लिहीलेल्या बुध्दभूषणंम या ग्रंथातील अनेक सुभाषिते दिली आहेत. त्याचाही या अभ्यासासाठी उपयोग झाला आहे. तसेच कवी परमानंदकृत "श्री. शिवभारत" संस्कृत मुळ ग्रंथाचे सदाशिव महादेव दिवेकर यांनी मराठीत भाषांतर केले आहे. त्याचाही येथे उपयोग झाला आहे.

## ६. महजर, करीने

महजर, करिने ही साधने न्याय मिळविण्याच्या दृष्टीने तयार केलेली असतात. यातील प्रत्येक पुरावा मिळत असेलच असे सांगता येत नाही. मात्र मजकूर साधारण लिहिण्याची खबरदारी घेतलेली असते. यातील मजकूराची कालमर्यादा ही अनेक वर्षांची अगर अनेक पिढ्यांची असू शकते. या साधनांतून अव्वल दर्जाची पूर्ण व एकत्रित माहिती मिळत नाही. महजर हे विशेष न्याय निवाड्याचे कागदपत्र असते. महजरात दोन्ही बाजूंची मते नमूद करून सादर केलेल्या कागदपत्रांची नक्कल असते.[४५] करीने हे साधारणतः एखाद्या घराण्याच्या जमीनीच्या मालकीबद्दल किंवा वतनाबद्दल माहिती देतात.

करीनेमध्ये जी माहिती दिलेली असेल त्याबरहुकुम खरेखोटेपणाबद्दल पंचायतीत कागदपत्रे दाखल करत.[४६] करीने हे साधन त्यामुळे अधिक विश्वसनीय असल्याचे दिसून येते. करीना सादर केल्यानंतर गोत पंचायत एकत्र बसून चौकशी करत व मग करिन्यात लिहिलेली माहिती सुधारून लिहित असत. अशा रितीने गोत चर्चा झाल्यानंतर महजर करत व महजर झाले म्हणजे तो वाद संपला असे समजावयास

हरकत नाही. करीन्याचे एक वैशिष्ट्य म्हणजे आधिच्या पिढीने जसे सादर केलेले असेल त्याची नक्कल करून ती माहिती जशीच्या तशी सादर केली जात असे.

छ.संभाजीच्या काळात झालेल्या न्याय निवाड्याची अनेक कागदपत्रे उपलब्ध आहेत. त्यांचा उपयोग आर्थिक जीवनाचा इतिहास सांगण्यासाठी होतो. तळकोकणात संगमेश्वर येथे देसाई यांच्या घरात झालेला महसूलाचा वाद मिटवण्यासाठी स्वतः संभाजीमहाराज गेले होते अशी नोंद सापडते.

### ७. शकावल्या

शकावल्यांचा उपयोग इतिहासासाठी पुष्कळ होतो. शकावल्या म्हणजे एखादे घराणे किंवा व्यक्ती यांचे चरित्र देणारे साधन होय.[४७] शकावल्यांमधून प्रसंगांचे वर्णन असते. बिनचूकपणे कालनिर्देश नसतो. शकावल्याचे मुख्य दोन भाग पडतात. त्यापैकी एका भागावर पौराणिक परंपरेचा प्रभाव पडलेला आहे. तर दुसऱ्या प्रकारच्या शकावलीमध्ये राजकीय घडामोडींचा उल्लेख दिसून येतो. शकावलीमध्ये दररोजच्या खर्चापासून ते राज्यव्यवस्थेपर्यंत अनेक गोष्टींचा उल्लेख असतो.

या प्रकारच्या अनेक नोंदी संभाजीकालीन दप्तरात सापडतात. या नोंदींचा उपयोग तत्कालिन सामाजिक, आर्थिक जीवनाचे पदर उलगडण्यासाठी होतो.

### क) विदेशी साधने :

विदेशी साधनात पोर्तुगीज साधने छ.संभाजीच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत. पोर्तुगीज कागदपत्रे व इतर साहित्य अनेक ठिकाणी संग्रहीत करण्यात आलेली आहेत. भारतात गोवा, मुंबई येथील रॉयल एशियाटीक सोसायटी या ठिकाणी असलेल्या संग्रहालयातून या संबंधीची कागदपत्रे ठेवण्यात आली आहेत.[४८] डॉ.पिसुर्लेकर यांनी मराठयांच्या इतिहासाची साधने 'पोर्तुगीज दप्तर खंड २' संपादीत केला आहे. त्यामध्ये संभाजीकालीन पत्रांचा समावेश होतो. हा मजकूर त्यांनी मराठी व इंग्रजी भाषेत उपलब्ध करून दिलेला असल्याने छ.संभाजीच्या कारकिर्दीवर बराच प्रकाश पडू शकतो.

पिसुर्लेकर यांच्या खंडातून संभाजी-पोर्तुगीज संबंध, त्यातील युद्धे, तह तसेच करार, सांस्कृतिक संबंध इत्यादी अनेक पैलूंवर प्रकाश पडतो. तसेच पोर्तुगीज मराठे संबंध अर्थात पोर्तुगीजांच्या दप्तरातील मराठयांचा इतिहास हाही ग्रंथ महत्त्वाचा आहे. ही सर्व साधने देशी साधनांपेक्षाही महत्त्वाची आहेत. कारण या कालखंडात परकियांनी प्रत्यक्ष डोळ्यांनी परिस्थिती पाहून सत्य परिस्थितीचे जे वर्णन केले आहे ते या कागदपत्रांतून लक्षात येते. त्याचा शास्त्रीय अभ्यास केला असता नवा दृष्टीकोन समोर येतो.

### ३.५ वर्णनात्मक संशोधन आराखडा :

प्रत्येक व्यक्तीला जीवनात कोणत्याही कामात यशस्वी मजल गाठावयाची असेल तर त्याला सूत्रबध्द नियोजनाची आवश्यकता असते किंवा आराखडयाशिवाय त्याच्या प्रयत्नास यश प्राप्त होणे हे दुर्लभ असते. आपले उद्दिष्ट निश्चित करून ते सुलभपणे प्राप्त करण्यासाठी दिशादर्शक आराखडा तयार करून व्यवस्थित नियोजन करणे महत्त्वाचे असते. आराखडामुळे इच्छित ध्येयपूर्तीसाठी केलेले प्रयत्न सार्थ ठरतात. संशोधनक्षेत्रातही आराखडयास फार महत्त्व असते. त्याशिवाय संशोधक आपल्या संशोधनावर नियंत्रण ठेवू शकत नाही. संशोधन आराखडयाचे महत्त्व स्पष्ट करतांना पु. ल.भांडारकर म्हणतात, "ज्याप्रमाणे स्थापत्य शास्त्रज्ञ घर बांधणीच्या प्रत्यक्ष सुरवात करण्यापूर्वी नकाशा तयार करतो. या नकाशात कोणत्या महत्त्वाच्या गोष्टीचा निर्णय घ्यायचा असतो. याचा तो विचार करतो. त्या अनुषंगाने तो निर्णय घेत असतो. त्यामुळेच त्याचे श्रम, पैसा आणि वेळ वाया जात नाही. आणि घरपण अपेक्षेप्रमाणे निर्माण केले जाते."[४१] सत्याचे दर्शन घडविण्यासाठी निश्चत आराखडा हा पोषक व मार्गदर्शक ठरत असतो. फिलिप्स व बर्नाड एस. हे संशोधन आराखडयाचे महत्त्व स्पष्ट करतांना म्हणतात की, "संशोधनाचे यश हे नियोजन व

अंमलबजावणीवरच अवलंबून असते."[५०] या अभ्यासासाठी अशा दिशेने प्रयत्न करून योग्य आराखडा विकसित करावयाचा आहे.

प्रा. रा.ना. घाटोळे संशोधन आराखडयाचे महत्त्व स्पष्ट करतांना म्हणतात की, "संशोधनास प्रारंभ करण्यापूर्वी प्रथम संशोधनाचा आराखडा तयार करावा लागतो. यात संशोधनाचा उद्देश, अध्ययन, संशोधनाचे क्षेत्र, कालावधी, संशोधनासाठी आवश्यक माहिती गोळा करणे ती किती व कशी करावी, नमुना निवडीचे विश्लेषण, संशोधनकार्याचा व्यय इ. अनेक गोष्टी प्रारंभीच ठरवाव्या लागतात. आराखडयामुळे संशोधनात सुसुत्रता येते." [५१] अशी सुसूत्र मांडणी करून आराखडा चांगल्या प्रकारे विकसित करता येतो.

पु.ल. भांडारकर आराखडयाची रूपरेषा स्पष्ट करतांना म्हणतात की,

" आराखडा बनविने म्हणजे कार्ययोजना आखणे, नियोजित कार्यात उपस्थित होण्याची शक्यता असणाऱ्या समस्या व अडचणींच्या निराकरणाची आगाऊ व्यवस्था करून घेण्याच्या प्रक्रियेलाच सर्वसामान्य अर्थाने आराखडा कमविणे असे म्हणता येईल."[५२] या अभ्यासामध्ये सुनिश्चित असा आराखडा वापरून संशोधन करावयाचे आहे.

संशोधन आराखडयाचे अनेक प्रकार असतात. संशोधनाच्या उद्दीष्टांप्रमाणे तो बदलत असतो. पण आराखडयाचा प्रमुख चार विभागात विचार केला जातो. एक अन्वेषणात्मक, दुसरा वर्णनात्मक, तिसरा निदानात्मक, चौथा प्रयोगात्मक आराखडा या संशोधनात वर्णनात्मक आराखडयाचा उपयोग करण्यात आला आहे. पु.ल. भांडारकर म्हणतात, "विशिष्ट व्यक्तिंच्या, समूहांच्या व स्थितींच्या वैशिष्टयांचे वा लक्षणांचे यथातथ्य वर्णन करणे हाच वर्णनात्मक अध्ययनांचा प्रधान हेतू असतो."[५३] या अभ्यासात छ. संभाजी काळातील लोकस्थितीचे वर्णन करावयाचे आहे.

वर्णनात्मक आराखड्याची उपयुक्तता इतिहासासारख्या विषयात अधिक असते. डॉ. प्रदिप आगलावे यांच्या मते, "एखाद्या व्यक्ती, समूह, समाज, घटना किंवा कोणताही विषय या समस्यांच्या वास्तविक तथ्यांचे, वैशिष्ट्यांचे वर्णनात्मक विवेचन प्रस्तुत करणे हा वर्णनात्मक संशोधन आराखड्याचा मुख्य उद्देशा असतो."[५४] या अभ्यासात सुद्धा संभाजीकालिन लोकजीवनाचा अभ्यास करताना या पद्धतीचा येथे उपयोग केला आहे. या पद्धतीची उपयुक्तता सांगताना पुढे असे म्हटले आहे की, अशा पद्धतीच्या वापरात त्याकरिता विषयाच्या संबंधात यथार्थ आणि संपूर्ण माहिती प्राप्त होणे आवश्यक आहे. कारण त्याशिवाय अध्ययन विषय किंवा समस्यांच्या संदर्भात आपण कोणतेही वर्णनात्मक विवेचन प्रस्तुत केल्यास असे विवेचन वैज्ञानिक राहणार नाहीत. वैज्ञानिक विवेचनाचा आधार वास्तविक आणि विश्वसनीय तथ्य हा आहे.[५५] याच सूत्राच्या आधारे हा अभ्यास करावयाचा आहे.

हा आराखडा कसा वापरावा हे सांगाताना म्हटले आहे की, वर्णनात्मक संशोधन आराखड्यात तथ्य संकलनासाठी वैज्ञानिक तंत्राचा उपयोग करून वस्तुनिष्ठ तथ्ये संकलित केली जातात. वर्णनात्मक संशोधन आराखड्यात मुलाखत, प्रश्नावली, निरीक्षण, सामुदायिक दप्तर इ. तथ्य संकलनाच्या तंत्रांचा समावेश केला जातो.[५६] ही सर्व तंत्रे संभाजीकालिन इतिहासाचा अभ्यास करताना वापरली आहेत.

रा.ना. घाटोळे यांच्या मते, " एखाद्या समस्येशी संबंधीत असलेल्या वास्तविक तथ्यांच्या आधारावर वर्णनात्मक विवेचन करणे हा वर्णनात्मक शोध आराखडयाचा मुख्य उद्देश आहे."[५७] येथे छ. संभाजीकालीन लोकस्थितीबाबत शास्त्रीय विवेचन करावयाचे आहे.

साहित्य, कला, इतिहास या क्षेत्रात विषयवस्तूचे आकलन करताना वर्णनात्मक संशोधन आराखडा पूरक ठरतो. डॉ.पु.ल.भांडारकर यांच्यामते, "जेव्हा गतकालीन

घटनांपैकी एखादी व्यक्ती किंवा समूह हयात नसतो तेव्हा साधनांच्या आधारे वर्णन करावे लागते."[५८] संभाजीकालीन महाराष्ट्राचे असेच वर्णन येथे करावयाचे आहे. प्रा.घाटोळे म्हणतात, "एखाद्या समस्येशी संबंधीत असलेल्या वास्तविक तथ्यांच्या आधारावर वर्णनात्मक विवेचन करणे हा वर्णनात्मक संशोधन आराखडयाचा मुख्य उद्देश आहे."[५९] छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक पैलू येथे अभ्यासवायचे आहेत.

या अभ्यासामध्ये संभाजीकालीन महाराष्ट्राचे लोकजीवन साधनांच्याआधारे स्पष्ट करावयाचे आहे. वर्णनात्मक आराखडयात प्रामुख्याने मुलाखत, अनुसूची व प्रश्नावली, प्रत्यक्ष निरीक्षण, सहभागी निरीक्षण, सामुदायिक रेकॉर्ड व त्यांचे विश्लेषण हया सर्व प्रकारांचा समावेश होतो.[६०] भेटी देऊन तथ्य संकलीत करता येतील, निर्दोष वर्णनात्मक आराखडा करण्यासाठी संशोधकाने आपल्या संशोधनात पूर्वग्रह, पक्षपातीपणा, गैरसमज, इत्यादी दोषांचा प्रवेश होणार नाही याची काळजी घेतली पाहिजे कारण त्यामुळे वर्णनात पूर्वधारणा, पूर्वग्रह, पक्षपात इत्यादी दोष नकळत उमटतात.[६१]

छ.संभाजी बाबत चिटणीस बखरीच्या आधारे जे पूर्वग्रह आहेत त्यापासून मुक्त होऊन येथे वस्तुनिष्ठ संशोधनावर भर दिला आहे. उद्दिष्टये निश्चितीबाबत प्रा.काचोळे म्हणतात, "संशोधनाचे काम क्लिष्ट असते. वेळ, धन, श्रम याबाबतीत कितीही मर्यादा घालून घेतली तरी संशोधकाला काहीना काही तरी याबाबतीत त्याग करावा लागतो. शोध विषयात मौलिक प्रश्नांचा व उद्दिष्टांचा समावेश करावा लागत असल्यामुळे असंबंध व अनावश्यक तथ्ये वगळता तर येतातच शिवाय श्रम आणि धनाची सुध्दा बचत होते."[६२] त्यामुळे या अभ्यासामध्ये सुनिश्चित उद्दिष्टये ठरवून त्याआधारे अभ्यासाची मांडणी केली आहे.

वर्णनात्मक आराखडयाची उपयुक्तता स्पष्ट करताना प्रा.नाडगोंडे म्हणतात, "एखाद्या घटनेविषयी अगर प्रस्तावने विषयी लोकांची मते अजमावण्यासाठीही वर्णनात्मक संशोधन आराखडा उपयुक्त ठरतो. ही मते परस्परविरोधी असू शकतात. त्यांचे प्रमाण नेमके किती आहे हे वर्णनात्मक संशोधन आराखडयावरुन लक्षात येऊ शकते. उदा. महिलांनी चित्रपट पहावे की पाहू नये, त्यांना मतदानाचा अधिकार असावा की असू नये याबाबतची उलटसुलट मते अजमावता येतात."[६३] या अभ्यासामध्ये छ.संभाजीविषयी व तत्कालीन परिस्थितीविषयी साधकबाधक चर्चा करुन समतोल साधावयाचा आहे.

वर्णनात्मक आराखडा वापरताना तथ्यांची जुळणी, संकलन व पडताळणी या तीन टप्प्यांतून समतोल दृष्टीने सत्त्य शोधावयाचे असतात व ही सत्ये पूर्वीच्या संशोधकांनी मांडलेल्या दृष्टीकोनापेक्षा भिन्न आणि नवीन वळण देणारी असतात. असा प्रयत्न करून या अभ्यासामध्ये संभाजीकालीन लोकजीवनावर नव्याने प्रकाश टाकावयाचा आहे. त्यासाठी उपलब्ध साधनांची सत्त्यता आणि विश्वसनीयता कशी पडताळून पाहवयाची हे सुद्धा स्पष्ट केले पाहिजे.

**३.६ साधनांची सत्यता व विश्वसनीयता :**

इतिहास हे साधनांच्या दयेवर चालणारे शास्त्र आहे. प्रा.गायकवाड व सरदेसाई म्हणतात, "कोणत्याही संशोधकाला इतिहास लिहित असताना प्रामुख्याने कागदपत्रे शोधावी लागतात. अशी कागदपत्रे उपलब्ध झाल्यानंतर त्याच्या अनुरोधाने त्याला इतिहास लेखनाचे कार्य करावे लागते."[६४] या अभ्यासातही साधनांची अचुकता महत्त्वाची ठरते. कागदपत्रांचे अंतर्गत व बाह्य परीक्षण करुन त्यांची विश्वसार्हता पडताळून घ्यावी लागते. बहिरंग परीक्षणाबाबत म्हटले आहे की, "बहिरंग परीक्षण ही प्रक्रिया कागदपत्रांच्या कमी प्रतीची मानन्याकडे इतिहासकारांचा कल आहे."[६५] तथापी या प्रकारच्या अभ्यासातून सत्य शोधन करणे शक्य होते.

प्रा. हॉकेट म्हणतात, "कागदपत्रांच्या परीक्षणामध्ये दोन स्वतंत्र प्रक्रियांचा समावेश होतो. एखाद्या वेळेस संशोधक दोन्ही पध्दतीचा अवलंब एकाच वेळेला करु शकेल. पहिली प्रक्रिया ही मुलभूत स्वरुपाची व अपरिपक्व असून त्या प्रक्रियेपासून जे निष्कर्ष निघतात त्याचा वापर दुस-या प्रक्रियांमध्ये केला जातो."[६६]

या दोनही पध्दती येथे महत्त्वाच्या ठरतात. कागदपत्रांच्या विश्वसनीयतेमध्ये अंतर्गत परीक्षण महत्त्वाचे ठरते. अंतर्गत परीक्षणामध्ये एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे की ज्या माणसाने ते कागदपत्र लिहिलेले असतील त्याचे विचार व व्यक्तिमत्त्व निश्चितपणे त्यांच्यामध्ये उमटलेले असते. इतिहासकाराने जे काही लिहिलेले असेल त्याचा तर अर्थ लावावाच परंतु अर्थाच्याही पलीकडे जो अर्थ साधारणतः शक्य असेल तो लावण्याचा प्रयत्न करावा.[६७] डॉ. के. एन. चिटणीस म्हणतात, "बहिरंग परीक्षणाचा हेतू जर काल, स्थल व इतर बाह्य गोष्टी ठरविणे असाच आहे तर अंतरंग परीक्षणाचा हेतू कागदपत्राच्या आत शिरुन त्यांचे विश्लेषण करणे व शेवटी कागदपत्रातील घटना सत्त्य या नात्याने जगापुढे आणणे हाच असतो."[६८]

या दोनही पैलूंनी येथे संभाजीकालीन कागदपत्रांची येथे पडताळणी करावयाची आहे. अंतरंग परीक्षण ही जटली प्रक्रिया असते. वास्तववादी टीका ही अंतरंग परीक्षणाचा आत्मा आहे. या परीक्षणामध्ये कागदपत्राचा लेखक जे काही म्हणत असेल त्याच्याशीच संशोधकाचा संबंध असतो असे नव्हे, तर त्यामागे लेखकाची कोणती भूमिका आहे हे जाणून घेतले जाते. वास्तववादी टिकेमध्ये पुढील एकच मुद्दा गृहित धरला जातो, तो म्हणजे लौकिक अर्थ व खरा अर्थ हा होय.[६९]

अशा प्रकारे संभाजीकालीन बखरी, पत्रे, ग्रंथ, देशी व विदेशी साधनसामग्रीचे अंतरंग व बहिरंग परीक्षण करून येथे लोकजीवनाचा अभ्यास करावयाचा आहे.

छ. संभाजी काळात साधने विपुल आहेत. त्यात देशी कागदपत्रांप्रमाणेच विदेशी कागदपत्रांचाही समावेश आहे. पूर्वीच्या काळी बखर हे दुय्यम साधन वापरून संभाजीच्या कर्तृत्वावर अन्याय करण्यात आला. आता प्राथमिक साधनांच्या आधारे संभाजीचे नवे आकलन करताना दुय्यम साधने बाजूला ठेवून प्राथमिक साधनांच्या आधारे नवे सत्त्य शोधावयाचे आहे. असे करताना डॉ. कमल गोखले यांनी केलेला पहिला प्रयत्न महत्त्वाचा असून, त्यानंतर डॉ. सदाशिव शिवदे, अशोक शिंदे यांनी काही प्रयत्न केले असले तरी त्यात प्रामुख्याने राजकीय इतिहासावर भर दिला आहे. हा अभ्यास मात्र सामाजिक इतिहासावर भर देणारा आहे.

### ३.७ उद्दिष्टांनुरूप शोधकार्य :

कोणतेही संशोधन कार्य हे मर्यादीत स्वरुपाचे व विशिष्ट कालावधीत पूर्ण करावयाचे असेल तर उद्दिष्टे निश्चित करावी लागतात. या संशोधनाची उद्दिष्टये पुढील प्रमाणे आहेत.

१. छत्रपती संभाजी महाराजांच्या कर्तृत्वाचा नवीन साधनांच्या आधारे अभ्यास करणे.

२. छत्रपती संभाजीच्या काळातील लोकजीवनाचे ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीने अध्ययन करणे.

३. छत्रपती संभाजीच्या काळातील राजकीय, सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक जीवनावर नवीन साधनांच्या आधारे प्रकाश टाकणे.

४. तत्कालीन परिस्थिती प्रतिकूल असूनही छत्रपती संभाजी महाराजांनी बजावलेल्या भूमिकेचा आढावा घेणे.

प्रा.आगलावे म्हणतात, “संशोधन अध्ययनाच्या उद्दिष्टांचे निरुपण करणे ही वर्णनात्मक संशोधन आराखडयाची पहिली पायरी आहे. या पायरीमध्ये संशोधनाशी




संबंधीत मौलिक प्रश्नांचे स्पष्टीकरण आणि उद्दिष्टांना परिभाषित केले जाते. त्यामुळे अनावश्यक आणि असंबंध तथ्यांचे संकलन केले जात नाही. तसे वेळ, श्रम, पैसा यांची बचत देखिल होते.''[७०]

या अनुषंगाने छ. संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करताना उद्दिष्ट्ये समोर ठेवून त्यादृष्टीने साधनांची पडताळणी करावयाची आहे. हे संशोधनकार्य उद्दिष्टांनुरुप आखले आहे. त्यामुळे त्याची सीमा व मर्यादाही सुनिश्चित करण्यात आल्या आहेत.

या सर्व उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठी या संशोधन कार्यात वर्णनात्मक आराखडा वापरून तसेच प्राथमिक व दुय्यम साधनांचा आढावा घेऊन त्यांची जुळणी आणि पडताळणी करून नव्याने सत्त्य शोधन करावयाचे आहे. उद्दिष्टास अनुरूप शास्त्रीय पद्धती वापरली असता त्या आधारे अंधारातून प्रकाशाकडे वाटचाल करण्यास साह्य होते आणि तथ्यसंकलनाची साधने एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे पुढे मार्ग काढण्यासाठी पथदर्शक ठरतात. याचे हे स्वरूप खरोखरच लक्षणीय आहे.

कोणत्याही संशोधनात ऐतिहासिक साधनांची पडताळणी करताना त्या-त्या उद्दिष्टास अनुसरून तथ्य शोधावी लागतात व ही तथ्ये समोर ठेवून त्यातून नव्या प्रमेयांचा विकास करावा लागतो. उद्दिष्टे आणि गृहितके या आधारे नवा प्रकाशकुंज समोर येतो. त्यालाच 'नवे प्रमेय' असे म्हटले जाते. या अभ्यासाच्या मर्यादाही लक्षात घेतल्या पाहिजेत. कारण संशोधनास स्थळ, काळाच्या मर्यादा असतात आणि विशिष्ट कालावधीत शोधकार्य पूर्ण करावयाचे असल्यामुळे संशोधनास कोणत्या मर्यादा आहेत, त्या का व कशा घातल्या आहेत, त्यांच्या मर्यादांच्या लक्ष्मणरेषेत राहून अभ्यास विषयाकडे कसे पाहिले पाहिजे, त्याचे स्वरूप व व्याप्ती का व कशी समजून घेतली पाहिजे यासाठी मर्यादांचे भान असणे आवश्यक असते.

## ३.८ संशोधनाच्या मर्यादा :

कोणत्याही सामाजिक संशोधनामध्ये अभ्यासाच्या मर्यादा स्पष्ट कराव्या लागतात.

१. हा अभ्यास छत्रपती संभाजी यांच्या कार्यकाळापुरता मर्यादित आहे.

२. हा अभ्यास १६८० ते १६८९ एवढया काळापुरता केला आहे.

३. या अभ्यासामध्ये राजकीय घडामोडी व चरित्रापेक्षा लोकजीवनावर अधिक भर दिला आहे.

४. या अभ्यासात सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक पैलूंच्या आधारे महाराष्ट्रातील लोकजीवन अभ्यासले जाणार आहे.

५. या अभ्यासात नवीन ऐतिहासिक साधनांच्या आधारे विश्लेषण केले आहे.

या सर्व मर्यादांचे भान लक्षात घेता संभाजीकालिन लोकइतिहासाची जडणघडण करणे किती अवघड काम आहे आणि त्या आधारे लोकांच्या सहभागाची मीमांसा करताना सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक जीवनाचे पैलू कसे शोधावयाचे आहेत हे आपण लक्षात घेतले असता सत्याचे आकलन करताना या मर्यादांचे भान असणे किती आवश्यक आहे हे लक्षात येते. सामाजिक संशोधनात स्थल,कालाच्या मर्यादा, साधन, सामुग्रीच्या मर्यादा, तथ्यसंकलनाच्या मर्यादा, भाषा आणि अभिव्यक्तीच्या मर्यादा या सर्वांचा विचार करता सर्व मर्यादांवर मात करून संशोधकाला पुढील वाटचाल करावी लागते. व ही वाटचाल त्याला सुनिश्चित मार्गक्रमणासाठी साह्यभूत ठरते. हे लक्षात घेऊन या अभ्यासामध्ये उपरोक्त मर्यादांचे सतत भान ठेवले आहे. त्यामुळे संशोधन करताना संशोधकाला येणाऱ्या अडचणी समजून घेणे शक्य झाले आहे.

### ३.९ समारोप :

अशाप्रकारे या प्रकरणात छ.संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करण्यासाठी योजिलेल्या संशोधन पध्दतीवर चौफेर प्रकाश टाकला आहे. या प्रकरणात प्रथम इतिहास एक सामाजिक शास्त्र या नात्याने त्यातील संशोधनाच्या नवीन प्रवाहावर प्रकाश टाकला आहे. तसेच ऐतिहासिक संशोधन पध्दती व तिची रूपरेषा स्पष्ट केली आहे. तसेच या अभ्यासासाठी तथ्य संकलनाच्या प्राथमिक व दुय्यम साधनांवर विशेष प्रकाश टाकला आहे. तसेच या अभ्यासात वर्णनात्मक संशोधन आराखडा का व कसा वापरला ते नमूद केले आहे. तसेच संभाजीकालीन लोकजीवन स्पष्ट करण्यासाठी प्राथमिक व दुय्यम साधनांची ओळख करुन देऊन त्यांची सत्यता व विश्वसनीयता पडताळण्यासाठी अंतरंग व बहिरंग परीक्षणाच्या पध्दती दिल्या आहेत. तसेच हे शोधकार्य उद्दिष्टांनुरुप कशाप्रकारे पूर्ण केले जाणार आहे तेही स्पष्ट केले आहे. या प्रकरणामध्ये वर्णनात्मक आराखड्याचे उपयोजन, महत्त्व व वापर यावर भर दिला आहे. तथ्यसंकलनाची प्राथमिक व दुय्यम साधने संभाजीकालीन लोकजीवनाच्या संदर्भात स्पष्ट केली आहेत. हे शोधकार्य अधिक गुंतागुंतीचे व क्लिष्ट होऊ नये म्हणून अभ्यासविषयाच्या मर्यादांचे ज्ञान व भान ठेवले आहे. त्याआधारे लोकजीवनाचा पट उलगडावयाचा आहे. पुढील प्रकरणात छ.संभाजीचे जीवन व कार्य यावर प्रकाश टाकला आहे.

## संदर्भग्रंथसूची


१. लेले वि.गो., 'अनुवाद' "इतिहास म्हणजे काय ?", कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, १९९४, पृष्ठ ३०

२. कित्ता पृष्ठ ३३

३. भांडारकर पु.ल., "सामाजिक संशोधन पध्दती", महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ विद्या बुक, औरंगाबाद, चौथी आवृत्ती, १९९९, पृष्ठ १

४. घाटोळे रा.ना., "समाजशास्त्रीय संशोधन : तत्त्वे व पध्दती", श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, सहावी आवृत्ती, १९९७, पृष्ठ १

५. कित्ता पृष्ठ ९

६. कित्ता पृष्ठ २

७. आगलावे प्रदिप, "संशोधन पध्दती व तंत्रे", विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती, जाने. २०००, पृष्ठ ५

८. कित्ता पृष्ठ ६

९. कित्ता पृष्ठ ७

१०. नाडगोंडे गुरुनाथ, "सामाजिक संशोधन पध्दती", फडके प्रकाशन, कोल्हापूर, दुसरी आवृत्ती, १९९९, पृष्ठ ५

११. देव प्रभाकर, "इतिहास शास्त्र" प्रकाशन ब्रेन टॉनिक प्रकाशन, नाशिक, पहिली आवृत्ती २००७

१२. Brockhampton, "Dictionary of world history" , Helicon Publication, London. 1994], Page 530

१३. नाडगोंडे उपरोक्त, पृष्ठ ८

१४. कित्ता पृष्ठ ८

१५. कित्ता पृष्ठ ९

१६. कित्ता पृष्ठ ९

१७. मोरवंचीकर रा.श्री., "इतिहास लेखन शास्त्र इतिहासकार", विद्या बुक, औरंगपुरा, प्रथमावृत्ती, १९९९, पृष्ठ १६

१८. Brockhampton उपरोक्त पृष्ठ ५३०

१९ देव प्रभाकर, उपरोक्त पृष्ठ २४

२०. डॉ. नाडगोंडे गुरुनाथ, "सामाजिक संशोधन पध्दती", फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९८६, पृष्ठ ११

२१ कित्ता पृष्ठ ११

२२. कित्ता पृष्ठ ११

२३. डॉ नाडगोंडे गुरुनाथ, "सामाजिक संशोधन पध्दती", फडके प्रकाशन, कोल्हापूर, दुसरी आवृत्ती १९९९, पृष्ठ १६४

२४. कित्ता पृष्ठ १६५

२५. कित्ता पृष्ठ १६५

२६. मोरवंचीकर उपरोक्त पृष्ठ १६

२७. नाडगोंडे गुरुनाथ, दुसरी आवृत्ती उपरोक्त पृष्ठ १६६

२८ उपरोक्त पृष्ठ १६९

२९. उपरोक्त पृष्ठ १७३

३०. मोरवंचीकर रा.श्री., उपरोक्त पृष्ठ ४७

३१. कित्ता पृष्ठ ४७

३२. नाडगोंडे गुरुनाथ, दुसरी आवृत्ती उपरोक्त पृष्ठ १७७

३३. घाटोळे उपरोक्त पृष्ठ ६७

३४. कित्ता पृष्ठ ६७

३५. नाडगोंडे गुरुनाथ, दुसरी आवृत्ती उपरोक्त पृष्ठ ६९

३६. कित्ता पृष्ठ ६४

३७. कित्ता पृष्ठ ७३

३८. राजदरेकर सुहास, "इतिहास लेखन शास्त्र" विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथमावृत्ती, १९९८, पृष्ठ ३५

३९. नाडगोंडे उपरोक्त पृष्ठ ७८

४०. मोरे अरुणा, "इतिहासाची तोंडओळख," के.एस. पब्लिकेशन, पुणे,प्रथमावृत्ती, जुलै २००६, पृष्ठ ?

४१. बिरादार टी.के., "मराठयांचा इतिहास" विद्याभारती प्रकाशन, लातूर, प्रथमावृत्ती, २०००, पृष्ठ १५

४२. गायकवाड व इतर, "इतिहास लेखन शास्त्र" फडके प्रकाशन कोल्हापूर, तृतीय आवृत्ती १९९०, पृष्ठ २३४

४३. कित्ता पृष्ठ २३५

४४. बिरादार उपरोक्त पृष्ठ २५

४५. गायकवाड व इतर उपरोक्त पृष्ठ २३५

४६. कित्ता पृष्ठ २३५

४७. कित्ता पृष्ठ २३५

४८. बिरादार उपरोक्त पृष्ठ २५

४९. भंडारकर पु.ल. उपरोक्त पृष्ठ १२४

५०. फिलिप्स बर्नाड एस. " Methodology & Research in Social Science",Dr. O.R. Krishnaswami, Mumbai, 4th Ed., 1978, pg 132

५१. घाटोळे रा.ना., उपरोक्त पृष्ठ ६१

५२. डॉ. भांडारकर पु.ल., उपरोक्त पृष्ठ १४४

५३. घाटोळे रा.ना., उपरोक्त पृष्ठ ६१

५४. आगलावे प्रदिप, "संशोधन पध्दती शास्त्रे व तंत्रे" विद्या प्रकाशन नागपूर, २०००, पृष्ठ १५८

५५. कित्ता पृष्ठ १५९

५६. कित्ता पृष्ठ १५९

५७. कित्ता पृष्ठ ६१

५८. भांडारकर उपरोक्त पृष्ठ ४६

५९. घाटोळे उपरोक्त पृष्ठ ५९

६०. कित्ता पृष्ठ ५९

६१. कित्ता पृष्ठ ५९

६२. काचोळे दा.धो., "सामाजिक संशोधन पध्दती", कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती, १९९३, पृष्ठ ३५

६३. नाडगोंडे गुरुनाथ, प्रथमावृत्ती उपरोक्त पृष्ठ ६३

६४. गायकवाड व इतर उपरोक्त पृष्ठ १९५

६५. कित्ता पृष्ठ २०३

६६. कित्ता पृष्ठ २०३

६७. कित्ता पृष्ठ २१०

६८. कित्ता पृष्ठ २१०

६९. कित्ता पृष्ठ २११

७०.. आगलावे उपरोक्त पृष्ठ १६०

# प्रकरण चौथे

# नव्या साधनांच्या आधारे छत्रपती संभाजीचे जीवन व कार्य

४.१ प्रास्ताविक

४.२ बालपण व शिक्षण

४.३ गृहकलह व मंचकारोहन

४.४ कट व काटशह

४.५ संभाजी अकबर युती

४.६ मोगल बादशहा औरंगजेबाचे दक्षिणेत आगमण

४.७ विजापूर व गोवळकोंडयाविरुध्दची मोहिम

४.८ संभाजी सिध्दी संघर्ष

४.९ संभाजी पोर्तुगीज संघर्ष

४.१० छ. संभाजी - इंग्रज संघर्ष

४.११ पून्हा मोगलांशी संघर्ष व अखेर शेवट

४.१२ संभाजीकालीन प्रशासन

४.१३ समारोप

संदर्भ सूची

# प्रकरण चौथे

# नव्या साधनांच्या आधारे छत्रपती संभाजीचे जीवन व कार्य

## ४.१ प्रास्ताविक :

मध्ययुगीन भारताच्या इतिहासामध्ये मराठयांचा इतिहास हा महत्त्वाचा ठरतो. कारण तो भारतीय स्वातंत्र्यलढयाचा एक महत्त्वाचा भाग ठरतो. प्रा.डॉ. जयसिंग पवार म्हणतात, "संभाजीमहाराज मराठयांच्या इतिहासातील तळपते, तेजस्वी तारे होते. परंतु राज्यकर्ता या नात्याने त्यांची व्यक्तिरेखा एक दुर्दैवी व्यक्तिरेखा ठरली. पित्यासारखे यश त्यांच्या वाटयास आले नाही. संभाजीमहाराजांना शिवाजी महाराजांसारख्या थोर युगपुरुषाच्या पोटी जन्मास येण्याचे थोर भाग्य लाभले होते. परंतु त्यापेक्षाही बलवत्तर दुर्दैव त्यांच्या वाटयास आले होते. जन्मापासून मृत्यूपर्यंत दुर्दैवाने त्यांची पाठ सोडली नाही."[१] त्यांचे हे विवेचन अर्थपूर्ण आहे.

एका बाजूला दुर्दैव तर दुस-या बाजूला दुष्काळ, धान्यटंचाई व साधनांची प्रतिकूलता यापुढे त्यांना अनंत अडचणींना तोंड द्यावे लागले. या पार्श्वभूमीवर छ. संभाजी महाराजांनी केलेला संघर्ष अविस्मरणीय म्हटला पाहिजे. भारतीय इतिहासामध्ये पराक्रम, त्याग व समर्पण याला विशेष महत्त्व आहे. छ. संभाजी महाराजांनी केलेल्या समर्पणामुळे ते भारतीय इतिहासात धर्म व संस्कृतीसाठी समर्पित झालेला 'राजा' असे आपले अद्वितीय स्थान निर्माण केले.

संभाजी महाराजांचा जन्म पुरंदरगडावर १४ मे १६५७ रोजी सईबाईंच्या पोटी झाला. पुढे ५ सप्टेंबर १६५९ रोजी सईबाईचा बाळंत रोगाने मृत्यू झाला. त्यामुळे लहानपणी त्यांचे मातृछत्र हरपले. त्यांचे संगोपन आजी जिजाबाईने केले.[२] प्रा. डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, "सावत्र आईमुळे वडीलांनी मला वाईट वागणूक दिली

तरी मी रामचंद्रासारखा वागलो असा उल्लेख संभाजी महाराजांनी आपल्या दानपत्रात केला आहे."[३] यावरुन छ.संभाजीमहाराजांपुढे प्रभू रामचंद्राचा आदर्श असल्याचे स्पष्ट होते. वास्तविकरित्या संभाजी महाराज पराक्रमी, शौर्य, साहस आणि धाडस यांबाबत आपल्या पित्यापेक्षा काकणभर सरस होते.[४] त्यांच्या कार्याचे हे श्रेष्ठत्व सबळ पुराव्यांच्या आधारे या प्रकरणात नव्याने सिध्द केले आहे.

छ. संभाजींच्या जीवन व कार्याचे विश्लेषण करताना जन्मापासून त्यांच्या अखेरच्या क्षणापर्यंत त्यांनी स्वदेश, स्वधर्म व स्वसंस्कृती यांच्या रक्षणासाठी केलेला अतुलनीय त्याग महत्त्वाचा ठरतो. त्यांनी आपल्या कर्तृत्वाची छाप इतिहासावर उमटविली. कारण ते प्रतिकूल परिस्थितीशी लढत राहिले. भारतीय इतिहासात प्रतिकूल परिस्थितीशी लढून संघर्ष करणाऱ्या व्यक्ती या अधिक अमर ठरतात आणि त्या व्यक्ती राष्ट्र जीनात स्वतंत्र स्थान निर्माण करतात. छ. संभाजींचे कार्य असेच इतिहासाला कलाटणी देणारे ठरले. छ. शिवाजी महाराजांचे वर्णन 'शककर्ता' असे केले जाते तर संभाजीचे वर्णन 'प्रजाहितदक्ष व संस्कृतीरक्षणकर्ता राजा' असे करावे लागेल. त्यांनी मोगल बादशाहा औरंगजेबाशी दिलेली झुंज व त्यांच्या समर्पणानंतर निर्माण झालेले स्वातंत्र्याचे वारे पाहता मराठ्यांच्या इतिहासातील एका निरंतर संघर्ष पर्वाचे ते साक्षीदार असल्याचे दिसून येते.

### **४.२ बालपण व शिक्षण :**

छ.संभाजी महाराजांचे बालपण व त्यांचे शिक्षण याबाबतची माहिती लक्षणीय आहे. त्याबाबत म्हटले आहे की, "संभाजी राजांच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था ठेवली होती. केशव भट व उमाजी पंडित यांनी त्यांना तत्कालीन विविध विषयांचे शिक्षण दिले. म्हणूनच संभाजी राजे सुविद्य होते. 'बुध्दभुषणम्' नावाचा ग्रंथ त्यांनी संस्कृत भाषेतून लिहिला. संभाजी राजांना त्याकाळातील सर्व लष्करी विद्या अवगत होत्या.

शिवाजी महाराजांनी त्यांना युध्दाचा अनुभव व राजकारणाचे शिक्षण मिळावे म्हणून काळजी घेतली. ते नेहमी त्यांना स्वारी वेळी बरोबर नेत असत."[५] यावरुन छ.संभाजी राजांच्या व्यक्तिमत्वाचा परिपूर्ण विकासावर त्यांनी भर दिला होता असे म्हणता येईल. रियासतकार गो.स. सरदेसाई छ.संभाजी यांच्या शिक्षणाबाबत म्हणतात, "१६६८-१६७० या काळात संभाजी सात हजारी मनसबदार या नात्याने ब-हाणपूर नजीक मोगल छावणीत राहात असे. या काळात शिकारीचा नाद विशेष लागला."[६] व-हाड व खान्देशचा मोकासा संभाजीस देण्यात आला होता.[७] १६७२ साली विजापूर विरुध्दच्या मोहिमेची सूत्रे संभाजीकडे सोपविली होती आणि त्यानंतर त्यांच्यासोबत अनाजी दत्तो यांना ठेवण्यात आले होते.[८] अशाप्रकारे प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणे संभाजी राजांची जडणघडण होत होती.

छ.संभाजी यांच्या साक्षरतेबद्दल कोणताही वाद नाही. प्रा.बाहेकर म्हणतात, "राजघराण्याच्या तत्कालीन रुढी आणि प्रथेनुसार भोसले घराण्याचे उपाध्ये केशवभट आणि उमाजी पंडित या शास्त्रींनी शंभूराजांना मुळाक्षरे लिहनं-वाचनं शिकविले."[९] त्यांचे हे शिक्षण मोडी लिपीत झाले होते. छ.संभाजी यांच्या संस्कृत भाषेतील गतीबाबत म्हटले आहे की, "शंभूराजांना संस्कृत भाषेत विशेष गोडी निर्माण झाली होती. शिवाजी राजांचे पूत्र म्हणून शंभू राजांना कसे शिक्षण दिले असेल याबाबत समकालीन दाखला मिळतो. 'बुध्दभुषणम्' या संस्कृत ग्रंथात संभाजी राजांनी काव्यलंकार, शास्त्रे, पुराणे, संगीत आणि धनुर्विद्या याचा सखोल अभ्यास केला होता याचा स्पष्ट उल्लेख आहे."[१०] यावरुन छ.संभाजी यांच्या ज्ञानप्राप्तीची जिज्ञासा प्रकट होते तसेच त्यांच्या प्रतिभाशक्तीची चुणूकही स्पष्ट होते. त्यांचे गुरू तसेच आजी जिजाबाईचे संगोपन यांमुळे पारंपारिक मूल्याबाबतचे संस्कार संभाजीवर अधिक झाले.

प्रा.डॉ. एस.ए. बाहेकर म्हणतात, "रामायण-महाभारतातील राजकारणाचे आणि युध्दतंत्राचे धडे त्यांच्या मनावर लहानपणीच गिरविले गेले. शंभूराजांच्या

बुध्दीचा विकास होत असताना शंभू राजे शारीरिकदृष्टया सुदृढ होते. शंभूराजांना मुळातच व्यायामाची आवड होती. दंड, बैठका, सुर्यनमस्कार, मल्लखांब, पोहणे, घोडयावर स्वार होणे याचे शिक्षण त्यांना महाराजांनी दिले असणारच. एकूण शंभू राजांच्या बौध्दिक आणि शारीरिक विकास होऊन शंभूराजे वयाच्या आठव्या वर्षी तरबेज बनले."[११] यावरुन मुत्सद्देगीरी व बलोपासना या दोन्ही अंगांनी छ.संभाजीचा विकास होत गेल्याचे दिसते. छ.संभाजी महाराजांचा विकास हा संक्रमण काळात होत होता. अनुकूल, प्रतिकूल परिस्थितीचे वादळ त्याच्याभोवती सतत घोटाळत होते. तत्कालीन परिस्थितीने त्यांच्या जीवनामध्ये अनेक बदल होत गेले. प्रा.डॉ. एस.ए. बाहेकर म्हणतात, "नेमके याचवेळी मोगली सरदार मिर्झाराजा जयसिंगाचे आक्रमण स्वराज्यावर झाले आणि शंभू राजांचे बालपण हरपले."[१२]

## ४.३ गृहकलह व मंचकारोहन :

छ.संभाजीच्या जीवनातील अस्थिरता हा एक महत्वाचा पैलू होय. त्यांना तत्कालीन परिस्थितीने गृहकलहाच्या तीव्र संघर्षात ओढले होते. रियासतकार सरदेसाई म्हणतात, "राजगडावर शिवाजीचा राज्याभिषेक समारंभ झाला, तेव्हा इंग्रजांसारख्याचे व्यवहार पाहण्याचे काम संभाजीला सांगण्यात आले होते. म्हणजे महत्त्वाच्या कामात मन घालून राज्याचे हिताहित पाहण्याची त्यास शक्ती यावी अशी व्यवस्था करण्यात शिवाजीने बिलकूल हयगय केली नाही."[१३] यावरुन छ.शिवाजी महाराजांची पुत्राच्या प्रशिक्षणाची तळमळ दिसून येते.

प्रा. डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, "राज्यभिषेकाच्यावेळी सोयराबाईस पटट्राणीचा मान मिळाला होता. तर युवराजपद संभाजीस देण्यात आले होते हाच कळीचा मुद्दा होता."[१४] त्यामुळे संभाजीविरुध्द कट कारस्थाने करण्यास प्रतिपक्ष उताविळ झाला होता. सरदेसाई म्हणतात त्या सूत्रात गृहकलहाची बीजे दिसून येतात.

त्यांच्या मते, "मरणसमयी शिवाजीने राज्याची पुढील व्यवस्था काही एक ठरविली नव्हती, आणि संभाजीचा हक्कही नष्ट केला नव्हता."[१५] त्यामुळे पुढील घटनांचा कल अघटीतपणे घडत गेला व त्यातून दुष्टचक्र सुरु झाले. प्रा. गो. स. सरदेसाई म्हणतात, "शिवाजीच्या मृत्यूनंतर आपण राज्याचे मालक ही संभाजीची समजूत कायम असल्यामुळे रायगडावरील विपरीत प्रकार ऐकूण तो चिडून गेला."[१६] त्यांचा हा राग साहजिक होता. शिवाजीच्या मृत्यूनंतर रागडावर घडलेल्या घटनांचा क्रम लक्षात घेण्यासारखा आहे. सरदेसाई यांच्यामते, "इकडे रायगडावर शिवाजीचा मृत्यू होताच संभाजी पूर्णपणे अटकेत आहे अशा समजुतीवर सोयराबाई व अनाजीपंत यांनी संभाजीस कळू न देता राजारामास गादीवर बसविण्याचा बेत रचिला."[१७] यावरुन संभाजीस किती प्रतिकूल वातावरणास तोंड द्यावे लागले याची प्रचिती येते.

प्रा.डॉ. जयसिंगराव पवार यांनी पुढील राजकारणाचा प्रवाह स्पष्ट केला आहे. त्यांच्यामते, "शिवाजी महाराजांच्या गैरहजेरीत सोयराबाईने अष्टप्रधान मंडळातील मंत्री, अधिकारी यांनादेखील आपल्या कटात सामील करुन घेतले होते. त्यामुळे अष्टप्रधान मंडळाचे मंत्री संभाजीराजाविषयी अविश्वास व्यक्त करीत होते. वरील सर्व प्रकारामुळे संभाजीराजाला वारसाहक्क मिळालेला असून सुध्दा राज्यपदासाठी संघर्ष करावा लागला. कारण सोयराबाईला संभाजीराजांचा हक्क मान्य नव्हता."[१८] त्यामुळे उभय पक्षामध्ये संघर्ष अटळ होता. रियासतकार सरदेसाई यांनी केलेली नोंद लक्षणीय आहे. त्यांच्यामते, "शिवाजीची उत्तरक्रिया राजारामाचे संनिध साबाजी भोसले शिंगणापूरकर यांच्या हस्तें करण्यात आली. मुद्दामच मृत्यूची बातमी उघडपणे संभाजीस कळविण्यात आली नाही. त्याला बोलावणे जाते तर तीन-चार दिवसात तो रायगडावर येऊ शकला असता. मोरोपंत पिंगळे व अनाजी दत्तो बाहेर होते ते लगेच रायगडावर दाखल झाले. प्रल्हाद निराजी, रामचंद्र निलकंठ व मुख्य लेखक बाळाजी आवजी अगोदरच तेथे होते. त्यांच्याविचारे सोयराबाईने तारीख २१-०४-

१६८० रोजी राजारामास गादीवर बसवून रायगडाचा बंदोबस्त केला."[१९] छ.संभाजी महाराजास असे वाटत होते की, आपणावर अन्याय होत आहे व त्यास चोख प्रत्युत्तर दिले पाहिजे. त्यामुळे संभाजी महाराजांनी रायगडावरील कटास कसा प्रतिशह दिला हे स्पष्ट केले पाहिजे. चिटणीस बखरीतील ऐकीव विधाने सर्वस्वी खरी न मानता त्यांचे पुनरावलोकन करण्याची गरज आहे. या संदर्भात प्रा.जयसिंगराव पवार लिहितात, "संभाजी राजांचा बंदोबस्त करण्यासाठी हालचाली सुरु केल्या. त्यानुसार पन्हाळगडावर स्वारी करुन संभाजीस पकडावे किंवा मारावे असा हुकूम मारोपंताने अनाजी दत्तो व इतर मंडळीस दिला होता. तसा पत्रव्यवहार अनेक सरदारांशी केला होता. त्यापैकी एक पत्र संभाजी राजांच्या हाती पडले. त्यामुळे त्यांना सर्व कटकारस्थानाची माहिती समजली."[२०] अशाप्रकारे छ.संभाजींनी अत्यंत जागृकतेने या कटात प्रतिरोध करुन त्यास काटशह दिला.

**४.४ कट व काटशह :**

आपला पुत्र राजाराम यास गादीवर बसविण्याचा सोयराबाईचा प्रयत्न पाहता संभाजीने पुढील पावले कशी टाकली ते लक्षात घेतले पाहिजे. रियासतकार सरदेसाई लिहितात, "आवजी बल्लाळ याच्या हातें पत्रे लिहून ती तिने पन्हाळयात खंडोजी नाईक जासूद व गणोजी कावळा यांजबरोबर पाठविली. ती हिरोजी फर्जंद व सोनाजी नाईक बंकी यांचे नांवाची होती. पत्रांत मजकूर असा होता कीं, संभाजीचा बंदोबस्त पक्का करुन सर्वांनी त्याजबद्दल सावधगिरी ठेवावी."[२१] सोयराबाईंच्या या सूचना लक्षणीय होत्या. पण चतुर छ. संभाजीस त्याचा पत्ता लागला व त्याने पुढील पावले टाकली. रियासतकार लिहितात, "शिवाजीच्या मृत्यूची बातमी दिर्घकाळ गुप्त राहणे शक्य नव्हती. संभाजीस ती ताबडतोब कळली. सोनाजी नाईकांने त्याचा बंदोबस्त कडक केला म्हणून त्यास संभाजीने ठार मारिलें. हिरोजी फर्जंद घाईघाईने पळून चिपळुणास गेला म्हणून या वेळी निभावला. विठ्ठल त्रिंबक महाडकर पन्हाळयावर

किल्लेदार होता, त्यास संभाजीने कैद करुन किल्ल्याचा बंदोबस्त आपल्या हातात घेतला. "[२२] हंबीरराव मोहिते यांनाही संभाजीने वश करुन घेतले होते. सरदेसाई लिहितात, "शिवाजीचा प्रत्यक्ष पुत्र समोर येऊन हुकूम करु लागल्यावर त्यास तोंडावर विरोध करण्याची छाती कोणास होईल ! रायगडावरील मंडळींनी आपल्याविरुध्द कट चालविलेला पाहून संभाजीस अत्यंत आवेश चढला. ठिकठिकाणच्या अंमलदारास त्याने गोड वचनांनी आपल्या बाजूस वळविले. राजापूर, कुडाळ कडील कामावीसदारांस पत्रें पाठवून पैका घेऊ पन्हाळयावर बोलाविलें."[२३] यावरुन छ. संभाजीचे डावपेच स्पष्ट होतात. संभाजी राजांनी हिरोजी फर्जेद व जनार्दनपंत हनमंते यांना कैद केले होते.

२७ एप्रिल १६८० च्या पत्रात राजापूरच्या वखारीतील इंग्रज अधिका-यांनी वरिष्टांस कळविले होते की, "संभाजीने सर्व राज्यसूत्रे आपल्या हाती घेतले आहेत. ठिकठिकाणच्या सुभेदारास व हावलदारास त्याने आपल्यापाशी बोलाविले आहे. कित्येकांस त्याने कैदखान्यात घालून, कित्येकांस बडतर्फ केले आहे. शिवाजीच्या मृत्यूनंतर २० दिवसांतला हा प्रकार आहे."[२४] यावरून संभाजी राजांनी मराठी राज्यावर आपला जरब चांगल्या प्रकारे बसविला होता असे म्हणतात येईल. प्रा. देशपांडे प्र. न. म्हणतात, "पन्हाळयावरील लोकांपैकी जे अण्णाजी दत्तोंच्या कटात सामील झाले होते. त्यांना संभाजीने कैद केले. त्यानंतर पन्हाळयाच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने कडेकोट बंदोबस्त केला. आपला सासरा पिलाजी शिर्के यास पंधरा हजार फौज देऊन संभाजीने कोल्हापूर भागात सुसज्ज राहण्यास सांगितले. मालोजी घोरपडे यास पन्हाळयाचा सरनोबत म्हणून नेमले. अशाप्रकारे व्यवस्था लावल्यानंतर संभाजी कवी कलशाशी विचारविनिमय करुन रायगडाकडे निघाला."[२५] पन्हाळयावरून रायगडास जातांना संभाजीची मनस्थिती आपल्या विरूध्द अष्टप्रधानांपैकी प्रधानच आहे आणि त्यांचा विचार आपल्याला छत्रपतीची गादी मिळू न देण्याचा आहे. अर्थात

झगडा करावा लागणार एकंदरीत आपल्यावरील कहूराची व त्याबरोबर जबाबदारीची जाणिव उत्पन्न होऊन तो संतप्त तर झालाच पण धर्मप्रवणही झाला आणि यावेळी संतमहंत साधू अशांचा आपल्याला आशिर्वाद असावा व त्यायोगेही थिर मिळावा असे वाटणारी झाली होती.[२६] यावरून छ. संभाजीच्या मनस्थितीची कल्पना येते त्याने पुढील वाटचालीत जी भूमिका घेतली त्याचे प्रतिबिंब येथे उमटले आहे.

डॉ.प्र. न. देशपांडे म्हणतात, ''पन्हाळयातून क-हाडमार्गे संभाजी प्रतापगडला प्रथम आला. तेथे त्याने तुळजाभवानीची यथासांग पूजा केली. त्यानंतर दुस-या दिवशी रायगडाकडे संभाजीने शीघ्रगतीने प्रयाण केले. १८ जून १६८० रोजी संभाजी रायगडाला पोहचला रायगडावर त्याला फारसा विरोध झालेला आढळत नाही. राजारामाला रायगडला कैद करुन त्याने सर्व सूत्रे आपल्या हाती घेतली. अशाप्रकारे शिवाजीच्या मृत्यूनंतर अडीच महिन्यात राज्यक्रांती करुन मराठा राजवंशाचा कारभार संभाजीने स्वतःकडे घेतला.''[२६] जेधे शकावलीत याबाबत म्हटले आहे, ''आश्वीन वदी मोरोपंती देह ठेविला. रायगडी मेले त्याचे पुत्र निळोपंत सोडिले. पेशवाई दिल्ही. आनाजी पंतासहि सोडिले मजमु दिल्ही. त्यास मार्गसीर्ष मासी ब-हाणपूर हंबीरराव याणी मारिला.''[२८]

याचे विश्लेषण करताना प्र.न.देशपांडे म्हणतात, ''आषाढ शुध्द २ शुक्रवारी संभाजी राजे रायगडास आले. राज्य करु लागले. राजाराम कैदेत ठेवले. राजारामाप्रमाणेच मोरोपंत आणि अण्णाजी दत्तो यांनाही संभाजीने तुरुंगात टाकले. याप्रसंगी संभाजी विरोधकांशी अत्यंत क्रूरतेने वागला, आपली सावत्र आई सोयराबाई हिचा त्याने निर्घृणपणे वध केला इत्यादी कथा उत्तरकालीन बखरींमधून आलेल्या आहेत. परंतु त्यात सत्यांश नाही.''[२९] ''आपल्या विरोधी कारस्थान करणा-यांना संभाजीने अटकेत टाकले ही गोष्ट खरी आहे. अर्थात राज्यसूत्रे हातात घेताना ही कृती करणे संभाजीच्या दृष्टीने अपरिहार्य होते. तरीपण गणोजी शिर्के, हरजी महाडीक, तुकोजी पालकर

इत्यादी सरदारांच्या विनंतीनुसार संभाजीने मोरोपंत, अण्णाजी दत्तो व इतर काही मुत्सद्दयांची मुक्तता केली. सुटका झाल्यानंतर मोरोपंत फार दिवस जगू शकले नाहीत. ऑक्टोबर १६८० मध्ये त्यांचा मृत्यू झाला. मोरोपंतांचा मुलगा निळोपंत याला कैदेतून मुक्त करुन संभाजीने त्याच्याकडे पंतप्रधानकी दिली. जेथे शकावलीतील नोंदीवरुन असे दिसते की मोरोपंत कैदेतच वारले. त्यांच्या मृत्यूनंतर निळोपंत, अण्णाजी दत्तो वगैरेंची सुटका झाली. "[३०] या सर्व उदाहरणावरुन संभाजीचा उदार दृष्टीकोन स्पष्ट होतो.

चिटणीस बखरीतील नोंदीची परखड चिकित्सा करुन प्रा.प्र.नी.देशपांडे यांनी मांडलेला युक्तीवाद हा तर्कसंगत आणि तेवढाच वास्तव वाटतो. त्यांनी म्हटले आहे, "संभाजीने आपल्या विरांधकांना क्रूर वागणूक दिली हे विधान टिकू शकत नाही, कारण जुलैमध्ये मंचकारोहन झाल्यावर केवळ तीन महिन्यातच त्याने आपल्या विरोधकाना कैदेतून मुक्त केले. एवढेच नव्हे तर कटाचा प्रमुख सूत्रधार अण्णाजी दत्तो यास मुजुमदार करुन संभाजीने आपल्या मनाची विशालता दाखवली. पंतप्रधानपद वंशपरंपरागत नव्हते तरीपण मोरोपंतंच्या मागे निळोपंतास पंतप्रधान करुन संभाजीने मोठेपणा दर्शविला. या सा-या गोष्टी लक्षात घेतल्यास संभाजी विषयी प्रचलीत असलेल्या कथा किती विकृत स्वरुपाच्या आहेत याची खात्री पटते."[३१] विरोधकांनाही आपलेसे करुन संभाजीने चुणूक दाखिविली व त्यातून त्यांची मुत्सद्देगिरी स्पष्ट होते.

प्रा.जयसिंगराव पवार यांनी म्हटले आहे, "शिवाजी महाराजांच्या मृत्यूपश्चात २।। महिन्यात क्रांती करुन संभाजी राजांनी सत्तासूत्रे हाती घेतली. २० जुलै १६८० रोजी संभाजीराजे सिंहासनारुढ झाले. १६ जानेवारी १६८१ रोजी त्यांनी स्वतःचा राज्याभिषेक राजगडावर करुन घेतला."[३२] अशा प्रकारे गडबडीचे वातावरण निवळले. पहिला क्रोध मावळला. संभाजीचा राज्यकारभार निर्वेक्षपणे पुढील दशकभर चालू राहिला.

## ४.५ संभाजी अकबर युती :

छ.संभाजीच्या जीवन चरित्रात हे एक महत्त्वाचे पर्व आहे. रियासतकार सरदेसाईंच्या मते, "अकबर हा औरंगजेबाचा चौथा मुलगा ता.१९-९-१६५७ रोजी जन्मला. अर्थात संभाजी व अकबर यांच्या वयात चार महिन्यांचे अंतर होते. दोघांच्याही आया लहानपणीच निवर्तल्यामुळे त्यांजवर बापांचे प्रेम विशेष जडले. जन्मानंतर एक महिन्याने अकबराची आई दिलरासबानू मरण पावल्यामुळे बापाचा तो प्यारा बनला. कोणातरी अनुभवी सेनापतीच्या हाताखाली आपल्या पुत्रास स्वारीवर पाठवून लष्करी व मुलकी विषयांत शिक्षण देण्याचा क्रम बादशहांनी ठेविला होता."[३३] "त्यामुळे त्याची राजपुतानाविरुध्द मोहिमेवर नियुक्ती करण्यात आली. त्यास अनुसरुन अकबरही चांगला हुशार झाला. बापाच्या मर्जीप्रमाणे वागून व हरएक कामात फत्ते मिळवून त्याने बाहेरचा लौकिक व बापाचा विश्वास संपादिला."[३४] राजपुताशी मैत्रीचे संबंध ठेवणे अधिक हिताचे आहे असा अकबराचा विचार होता. तो औरंगजेबास पटला नाही. त्याने अकबरावर परखड टीका करुन त्याची भूमिका नाकारली. तेव्हा अकबराने मराठा सम्राट छ.संभाजीशी पत्रव्यवहार सुरु केला व दि.९-५-१६८१ रोजी अकबराने संभाजीस लिहिलेल्या पत्रात म्हटले होते, "राज्य करुं लागल्यापासून हिंदूंस बुडवावें, असा औरंगजेबाचा निश्चय झाला आहे. राजपुतांशी युध्द करण्याचें कारण हेंच. सर्व लोक ईश्वराचीं लेकरें असून राजा हा त्यांचा संरक्षक आहे, म्हणून लोकांचा उच्छेद करणें बादशहास योग्य नाही. औरंगजेबाचीं कृत्यें मर्यादेबाहेर गेलीं, आणि माझी खात्री झाली कीं, लोकांचा आपण अशा रीतींने नाश केला तर हा देश आपल्या हातचा जाईल. अशा स्थितींत तुमचे राज्य बादशहाचे मुक्कामापासून दूर आहे असें पाहून, मी तुमचेकडे येण्याचा निश्चय केला. दुर्गादास राठोड मजबरोबर आहेत. मजबद्दल आपले मन निःशंक असूं द्या. परमेश्वरकृपें मला राज्य मिळालें तर मी फक्त नांवाचा धनी राहणार, राज्य सर्व

तुमचें असें समजा. आपण दोघांनी मिळून बादशहाचा पाडाव करुं."[३५] या पत्रातील संदर्भ लक्षणीय आहे.

अकबर खानदेश, बागलाणमार्गे कोकणात शिरला. गो.स. सरदेसाई यांनी म्हटले आहे. "मराठी राज्यांत शिरतांच संभाजीचे अधिकारी येऊन त्यास भेटले. रायगडाचे उत्तरेस पंचवीस मैलांवर नागोठण्याजवळ अंबा दनीचे काठीं पाली येथें शहाजाद्यास त्यांनी आणून किल्ल्याच्या पायथ्यांशी एक केंबळी घर मोकळे करुन त्यास राहण्यास दिले."[३५] अकबराच्या व्यवस्थेबाबतचा तपशील महत्त्वाचा आहे तो असा, "पालीहून रायगडावर शहाजादा व संभाजी यांजमध्यें निरोप जाऊं येऊं लागले. पंधरा दिवसांनी संभाजीने नेताजी पालकर व हिरोजी फर्जद यांस अकबराचे भेटीस पाठविलें. त्यांजबरोबर मध्यें हिरा बसविलेला एक मोत्यांचा कंठा, एक जडवाचा तुरा व एक हजार होन अशी नजर त्यानें अकबरास पाठविली. खुषखबर विचारुन हिरोजी लगेल परत गेला. नेताजी पालकर त्याचे जवळ विचारपूस करण्यास राहिला."[३७] अकबर सैन्याची संख्या वाढवित आहे याबद्दल संभाजीस शंका वाटू लागली.

स.मा.गर्गे म्हणतात, "छ.संभाजी आणि शहाजादा अकबर या दोघांनाही एकमेकांची फारच थोडी माहिती होती. संभाजी महाराज आपली सत्ता स्थिरस्थावर करण्यात गुंतलेले होते आणि शहाजादा अकबर औरंगजेबाची शिक्षा चुकविण्यासाठी दक्षिणेत आला होता. त्याला छ.संभाजीच्या घरगुती अडचणींची कल्पना नव्हती. तसेच स्वतःच्या राजकीय भवितव्याविषयीही त्याला काही अंदाज येत नव्हता."[३८] यावरुन उभयंतामध्ये पुरेसा सुसंवाद नसल्याचे दिसून येते. एक फार्सी इतिहासकार म्हणतो शहजादा अकबराने दक्षिणेत आल्यानंतर संभाजीला एक पत्र लिहिले होते त्यामध्ये म्हटले होते, "हिंदुस्थानातील त्या राजश्रेष्ठाने (संभाजीने) या माझ्या पत्रात

लिहिल्याप्रमाणे वागावे म्हणजे जगात त्याचा सुलौकिक होईल. यापूर्वी मी तुम्हाला एक पत्र पाठविले होते. आता मी येऊन पोहोचे पर्यंत तुम्ही पत्रे पाठविण्यात कसुर करु नये. तुम्हाला भेटण्याची आतुरता आहे."[३९]या पत्रावरुन अकबराची दृष्टी स्पष्ट होते.

प्रत्यक्ष छ.संभाजी व अकबरादरम्यान प्रभावी सुसंवाद का घडू शकला नाही हा संशोधनाचा मुद्दा होय. अकबराच्या दिवाणानेही अशाच आशयाची पत्रे संभाजी राजांना पाठविली तशीच कवी कलश यासही पाठविली. या सर्व पत्रात संभाजीशी आपली भेट व्हावी म्हणजे त्यातून काही पुढच्या योजना आखता येतील असे वारंवार सुचविलेले आहे. कवी कलशाच्या मध्यस्थीने असा बराच पत्रव्यवहार झाला आणि शेवटी छ.संभाजी आणि शहाजादा अकबर यांची १३ नोव्हेंबर १६८१ रोजी भेट झाली. या भेटीनंतर संभाजी व अकबर या दोघांनीही औरंगजेबाच्या सत्तेला सुरुंग लावण्याचे प्रयत्न सुरु केले.[४०] या नंतरच्या घटना व घडामोडींचे चक्र लक्षणीय ठरते. त्याबाबत डॉ.प्र.न.देशपांडे म्हणतात, "संभाजीने रामसिंगाला पत्र पाठवून उत्तरेत औरंगजेबाच्या राजवटीविरुध्द रजपुतांचा उठाव करण्याची प्रेरणा दिली. अकबरानेही रामसिंगाला पत्र लिहून औरंगजेबाविरुध्द भडकाविले. संभाजी आणि अकबर यांचे पत्रे मे १६८२ मध्ये रामसिंगास रवाना झाली. त्या सुमारास दक्षिणेत मोगल आणि मराठे यांच्यामध्ये धुमश्चक्री सुरु झालेली होती. अकबराने स्वतंत्रपणे इराणचा शहा अब्बास यांच्याशीही पत्रद्वारे संपर्क साधला होता."[४१] प्रयत्नांची दिशा ठीक होती परंतु शत्रूपक्षही तेवढयाच तयारीत होता. छ.संभाजीचा प्रयत्न गतीमान स्वरुपाचा होता.

प्रा.प्र.न. देशपांडे यांनी म्हटल्याप्रमाणे, "औरंगजेबाच्या दक्षिणेतील हालचाली चालू असताना संभाजीने अकबर व दुर्गादास राठोड यांना उत्तरेत पाठविण्याचे ठरविले. त्या दोघांनी उत्तरेत उठाव करुन औरंगजेबाची सत्ता नष्ट करावी असा संभाजीचा

मनसुबा होता. ऑगस्ट १६८२ मध्ये संभाजी व अकबर यांची पुन्हा भेट झाली. अकबराने समुद्रमार्गे प्रथम अहमदाबादकडे जावे आणि तेथून रजपुतांच्या प्रदेशात जावे अशी मसलत भेटीमध्ये ठरली. परंतु ही बातमी औरंगजेबाला समजताच गुजरात, खानदेश आणि माळवा या प्रांतात त्याने बंदोबस्त वाढवला व अकबर कोठेही सापडल्यास त्याला कैद करण्याची फर्माने काढली.''[४२] अकबर संकटात सापडला. संभाजीच्या दृष्टीने हा कसोटीचा काळ होता. यावेळी संभाजी मोठया अडचणीत सापडला. मोगलाप्रमाणे सिध्दी, इंग्रज, पोर्तुगीज यांनीही संभाजीविरुध्द लढा सुरु केल्यामुळे स्वराज्यावर चारी बाजुंनी संकटे आली. आकाश फाटल्यासारखी परिस्थिती निर्माण झाली. त्यातच अकबराने संभाजीचा पक्ष सोडला हे संकट विलक्षण होते. तरीही संभाजीने धीर खचू दिला नाही.[४३] पुढे अकबराची कथा ही दुखांन्तिकडे जाते.

प्रा.प्र.न.देशपांडे म्हणतात, ''अकबराने गोव्याला प्रयाण केले व पोर्तुगीजांची मदत मागितली तेथून मक्केला जाण्याचा अकबराचा विचार होता. त्यासाठी त्याने एक जहाजही पैदा केले परंतु दरम्यानच्या काळात दुर्गादास राठोड व कवी कलश यांनी त्याच्याशी संपर्क साधून त्यांची मने वळविले. अकबर पुन्हा संभाजीकडे आला व पोर्तुगीजांविरुध्द चालविलेल्या लढयात त्याने मराठयांना साथ दिली. एवढेच नव्हे तर युध्द संपल्यावर मराठयांच्या बाजूने पोर्तुगीजांशी तह करण्याची जबाबदारी त्याने स्वीकारली.''[४४] हे सर्व घडत असताना अकबर हळूहळू निराशेकडे वळत गेला. मोगलांविरुध्द मराठयांचे युध्द चालू होते. या युध्दात औरंगजेबाला अपयश येईल याची अकबराला खात्री वाटेना. त्याचे मन कच खाऊ लागले. १६८४ मध्ये तर त्याने मोगलांशी तह करण्याचा विचार केला. त्याला आपल्या बाजूला वळविण्यासाठी औरंगजेबाचा प्रयत्न चालू होता.[४५] अकबरास ही विफलता त्याच्या पराभवाचे द्योतक ठरत होती.

ईश्वरदार नागर लिहितो, ''बादशहाची मुलगी जीनतुन्निसा हिने शहाजादा अकबर यास एक उपदेशपर पत्र लिहिले. दुर्गादास राठोड याच्या दडपणामुळे अकबराला औरंगजेबाकडे येणे शक्य नव्हते असेही इश्वरदासाने म्हटले आहे. अखेर भटक्या जीवनाला कंटाळलेल्या अकबराने उत्तरेची वाट धरण्याचे ठरविले परंतु इश्वरदास म्हणतो त्याप्रमाणे पन्हाळयाजवळ किंवा भिमसेनच्या माहितीप्रमाणे चाकणजवळ मोगल व अकबर यांच्यात घनघोर युध्द होऊन त्याचा पराभव झाला.''[४६] अकबराचे हे अपयश संभाजीला धक्का देणारे होते. भिमसेन लिहितो, ''संभाजीकडून आपले काम होणार नाही हे शहाजादा अकबर यास समजून चुकले. इराणच्या बादशहाकडे जाण्याचा विचार करून तो थोडी माणसे आपल्याकडे घेऊन जहाजातून रवाना झाला. दुर्गादास राठोड हा त्याला सोडून आपल्या देशी परत गेला. राजापूरच्या बंदरातून फेब्रुवारी १६८७ मध्ये अकबर इराणकडे गेला.''[४७] अशा प्रकारे संभाजी अकबर युतीचे प्रयत्न विफल ठरले. त्यामुळे मोगल बादशहाने संभाजीच्या विरुध्द पवित्रा घेतला.

स.मा.गर्गे यांनी या घटनेची मीमांसा करताना म्हटले आहे, ''छ.संभाजी आणि शहाजादा अकबर दोघांनाही प्रतिकूल परिस्थितीने पुरेपुर घेरले होते. म्हणूनच दोघांचीही संधी हुकली. परिणामी औरंगजेबाचे कारस्थान मात्र यशस्वी ठरले.''[४८] अशा प्रकारे संभाजी अकबर यांचा प्रयत्न विफल ठरला व बादशहाचे संकट अधिक तीव्र झाले.

### ४.६ मोगल बादशहा औरंगजेबाचे दक्षिणेत आगमण :

छ.संभाजीचे मोगलाविरुध्दचे धोरण शिवाजीपेक्षाही अधिक आक्रमक व चढाईचे होते. डॉ.प्र.न.देशपांडे म्हणतात, ''संभाजीने मोगलाविरुध्द लढा सुरु केला होता. क-हाड, खानदेश भागात मराठी सेना पाठवून त्याने मोगल सुभेदार बहादूरखान याच्या तोंडचे पाणी पळविले होते. जानेवारी १६८१ मध्ये थेट ब-हाणपूरवर हल्ला

करुन मराठ्यांनी ते शहर लूटून फस्त केले होते. मोगलांची अशी नाचक्की होत असतानाच अकबर संभाजीस येऊन मिळाला. अशा परिस्थितीत दक्षिणेतील मोगल वर्चस्व धोक्यात येणार हे ओळखून स्वतः औरंगजेब प्रचंड फौज येऊन त्वरेने निघाला."[४९] औरंगजेबाच्या दक्षिण मोहिमेची पूर्वतयारी कशी होती त्याचा तपशीलही इतिहासकारांनी दिला आहे. १३ नोव्हेंबर १६८१ ला त्याने ब-हाणपूर गाठले. औरंगजेबाबरोबर शहाजादा मुअजम, शहाजादा कामबक्ष, सरदारांपैकी जुल्फिकारखान, शहाबुध्दीन, बक्षी रुहुल्लाखान, असदखान, दाऊदखान इत्यादी किती तरी सरदार होते. शहजादा आजमला तर त्याने अगोदरच औरंगाबादला पळविले होते.[५०] त्यावरुन त्याचे हे आक्रमण किती पूर्वनियोजित होते हे लक्षात येते.

त्याची व्यूहरचना लक्षणीय होती. डॉ.देशपांडे म्हणतात, "स्वतः औरंगजेब २२ मार्च १६८२ रोजी औरंगाबादला येऊन दाखल झाला. त्या अगोदरच त्याच्या योजनेप्रमाणे मोगल फौजा बागलाण व कोकण भागात चालून गेल्या होत्या. हसन अलीखानने ३० जानेवारी १६८२ रोजी कल्याण घेतले होते. त्याच सुमारास शहाबुद्दीनखानने बागलाणातील मराठ्यांबरोबर साल्हेरच्या परिसरात लढा सुरु केला होता. बागलाण प्रदेश गुजरातला लागून असल्यामुळे त्या भागावर वर्चस्व प्रस्थापित करण्याची धडपड औरंगजेबाने सुरु केली होती. कारण या भागातूनच गुजरातेत व तेथून राजस्थानात अकबराला पांगविण्याची संभाजीची योजना होती. कदाचित या कारणासाठी कोकणच्या किनारपटटीचा तो उपयोग करुन घेईल अशी भीती औरंगजेबाच्या मनात होती. म्हणून या दोन भागात त्याने एकाचवेळी फौजा पाठविल्या."[५१] मोगल मराठे संघर्षात अनेकदा मराठे काकणभर श्रेष्ठ व सरस ठरले.

एप्रिल १६८२ मध्ये शहाबुद्दीनला औरंगजेबाने रामसेजच्या किल्ल्याकडे पाठविले. रामसेजचा मराठा किल्लेदार संभा याने मोठ्या जिद्दीने किल्ला लढविला. लाकडाच्या

तोफा बनवून त्यामधून कातडी उडविण्याचा त्याने प्रयोग केला. शहाबुद्दिनने किल्ल्याच्या उंचीचा प्रचंड बुरुज बांधून त्यावरुन तोफांचा मारा करण्याचा प्रयत्न केला. या हल्ल्याचे मनोरंजक वर्णन भिमसेन यांनी आपल्या ग्रंथातून केलेले आहे. शहाबुद्दीनच्या मदतीसाठी औरंगजेबाने बहादूरखानास पाठविले. तेव्हा त्याच्यावर रामसेजच्या वेढयाची जबाबदारी सोपवून स्वतः शहाबुद्दीन जुन्नरकडे गेला. बहादूरखानास अनेक प्रयत्न करुनही किल्ला हस्तगत होईना. तेव्हा ऑक्टोबर १६८२ मध्ये निराश मनाने त्याने वेढा उठविला.[५२] अशा प्रकारे अनेकदा औरंगजेब मोगलांना निराशेचे धक्केही बसत असत.

मोगलांच्या कोकण मोहिमेत मराठे सरस ठरल्याचे दिसते. प्रा.प्र.न.देशपांडे म्हणतात, "नोव्हेंबर १६८२ मध्ये रणमस्तखान हा सरदार प्रचंड फौजेनिशी कोकणात उतरला. अल्पावधीतच त्याने कल्याण आपल्या ताब्यात घेतले. मार्च १६८३ मध्ये रुहल्लाखान नावाच्या एका सरदारास औरंगजेबाने रणमस्तखानाच्या मदतीस पाठविले. कोकण भागात दरारा निर्माण करुन रुहल्लाखान औरंगबादेस परतला."[५३] यश अपयश याचा जणू पाठशिवणीचा खेळ चालू होता. प्रा.न.देशपांडे म्हणतात, "रुहल्लाखानाची पाठ वळताच मराठयांनी मोगलांना कल्याण भागातून हाकलून लावले. मराठा सरदार भोसले याने तर भीमपराक्रम गाजवून मोगलांची गाळण उडवली. कोकणातील पिछेहाट समजताच औरंगजेबाने शहाजादा मुअज्जम याला सप्टेंबर १६८३ मध्ये मराठयांचा मोठ करण्यासाठी पाठविले."[५४] मराठयांच्या पराक्रमाचे व गनिमी काव्याचे चित्र इतिहासकारांनी वस्तुनिष्ठपणे मांडले आहे.

कोकणच्या मोहिमेत मुअज्जमची फजिती झाली. मराठयांनी घाट अडवून धरल्यामुळे आणि समुद्रमार्गाची नाकेबंदी केल्यामुळे मोगलांना रसद मिळेनाशी झाली होती. रामद-याच्या घाटात मुअज्जमच्या सैन्येचे किती हाल झाले हे सांगताना

खाफीखान लिहितो, "फौजेत धान्याचा दुष्काळ पडला. महगाई इतकी वाढली की, कधीकधी तीन तीन - चार चार रुपये देऊनही एक शेर गव्हाचे पीठ मिळेनासे झाले. फौजेतील माणसांपैकी जे मृत्यूच्या दाढेतून वाचले, त्यांच्या शरीरात तर अर्धेच प्राण शिल्लक राहिल्याप्रमाणे होते. प्रत्येक श्वासागणिक त्यांना वाटे की, तेवढेच आयुष्य लाभले हीच खैर झाली."[५५] संभाजीच्या चतुराईची चुणूक कोकण मोहिमेत प्रकट होते. औरंगजेबाने सुरतेच्या अधिका-याला समुद्रमार्गे धान्याची रसद कोकणाकडे पाठविण्यास फर्मावले. परंतु किनारपटटीच्या किल्ल्यातून मराठयांनी मोगलांच्या जहाजावर हल्ले केले. त्यामुळे रसद पोचू शकली नाही असे खाफीखान लिहितो. अखेर औरंगजेबाने मुअज्जमला परत बोलावले. परत जातानाही मोगलांना मराठयांचे हल्ले चुकवता चुकवता नाकी नऊ आले. १८ मे १६८४ रोजी मुअज्जम बादशहाकडे आला.[५६] अशाप्रकारे कोकण मोहिमेत मराठयांनी मोगलांची धोबीपछाड केल्याचे दिसते. प्रा.प्र.न.देशपांडे म्हणतात, "अशा प्रकारे बागलाण आणि कोकण भागात मोगलांना १६८४ पर्यंत नाव घेण्यासारखे यश मिळू शकले नाही."[५७] कोकणावर मराठयांनी आपले वर्चस्व गनिमी काव्याने सिध्द केले होते.

### ४.७ विजापूर व गोवळकोंडयाविरुध्दची मोहिम :

प्रा.जयसिंगराव पवार म्हणतात ते खरे आहे, "औरंगजेबाने १६८४ पर्यंत जंगजंग पछाडले पण त्यास मराठयांचे राज्य जिंकता आले नाही. मोगलाविरुध्द दक्षिणेतील सत्ता एक होतील ही भीती औरंगजेबाला वाटू लागली. तेव्हा त्याने प्रथम शाही राजवटी नष्ट करण्याचा बेत आखला. त्यानुसार अंमलबजावणी सुरु केली."[५८] संभाजीचा पवित्रा हा निश्चितच मोगल विरोधी होता पण मागील अनुभवावरुन औरंगजेबाने प्रथम शाह्यांचा बिमोड करुन नंतर संभाजीविरुध्द फळी उघडली. मोगलांचे डावपेच सरस ठरले.

प्रा.जयसिंगराव लिहितात, "विजापूरकरांनी इ.स. १६५७ सालच्या तहाच्या अटी पाळल्या नाहीत असे निमित्त करुन औरंगजेब बादशहाने इ.स. १६८५ साली विजापूर विरुध्द मोहीम हाती घेतली. राजपुत्र अझमाहो यास कामगिरीवर पाठवले. परंतु त्यांस विजापूरच्या अदिलशहाचा पराभव करता आला नाही. म्हणूनच शेवटी स्वतः औरंगजेब बादशहाने विजापूरवर स्वारी केली. त्यावेळी उभयपक्षी झालेल्या संघर्षात मुघलांच्या शाही सामर्थ्यापुढे सिकंदर आदिलशहाचा निभाव लागला नाही. शेवटी त्याने शरणागती पत्करली. बादशहाने सुलतान सिकंदर आदिलशहास कैद करुन दौलताबादच्या किल्ल्यात कारावासात पाठवले. अशा प्रकारे औरंगजेबाने इ.स. १६८६ साली विजापूरचे आदिलशाही राज्य खालसा केले."[५९] त्याचा हेतू मराठयांचे मित्र नष्ट करणे हा होता त्यामुळे संभाजी एकाकी पडला गेला. गोवळकोंडयाच्या विरोधातील त्याची मोहिम लक्षणीय होती. त्याबाबत म्हटले आहे, "इ.स. १६८६ मध्ये विजापूर घेतल्यानंतर १६८७ साली औरंगजेबाने गोवळकोंडयाकडे मोर्चा वळविला. सुलतान अब्दुल हसन तेथील शासक होता. मुहज्जमची या कामगिरीसाठी नियुक्ती केली. त्याने हैद्राबाद जिंकून घेतले. सुलतान अब्दुल हसन याने तह करण्याचे मान्य केले. परंतु औरंगजेबास विजापूरप्रमाणे गोवळकोंडा घेणे आवश्यक वाटत होते. म्हणून त्याने गोवळकोंडयाच्या किल्ल्यास वेढा दिला. मोगलांच्या शाही सामर्थ्यापुढे गोवळकोंडयाच्या सुलतानाचा निभाव लागला नाही. त्याने २ ऑक्टोबर १६८७ रोजी बिनशर्त शरणागती पत्करली. औरंगजेबाने त्यास वार्षिक ५० हजार पेन्शन देऊन कैदेत टाकले. गोवळकोंडा राज्य अशा प्रकारे खालसा केले."[६०] शाह्यांच्या पतनामुळे मोगल मराठयांच्याविरोधात चवताळून उठले.

प्रा.जयसिंगराव पवारांच्या मते, "विजापूर व गोवळकोंडा राज्याशी संघर्ष चालू असता काही मुलुख मुघलांनी घेतला. मामुरखानाने शहाजीराजांची मूळ जहागीर असलेला

सुपे, बारामती, इंदापुर हा प्रदेश जिंकून घेतला. शहाबुद्दीनखान याने रायगड परिसरातील देवघाट लगतच्या प्रदेशावर वर्चस्व प्रस्थापित केले होते. १६८५ मध्ये गाझीउद्दीन या सरदाराने रायगडावर हल्ला करण्यासाठी कुच केले होते. परंतु त्यास यश मिळाले नाही. पुढील काळात शाही राजवटी नष्ट झाल्याने मुघलांनी मराठयांशी तीव्र संघर्ष सुरु केला. सातारा, सांगली, कोल्हापूर भागात सारख्या चकामकी झडू लागल्या. वाई जवळ झालेल्या संघर्षात हंबीरराव मोहिते हा सेनापती ठार झाला. तो संपल्यामुळे मराठा लष्कराची बाजू लंघडी झाली. इ.स.१६८८ मध्ये मुघलांनी मराठयांच्या मुलुखात गोंधळ घातला."[६१] मोगलांच्या या सर्व हालचाली छ.संभाजीस अडचणीत आणणा-या होत्या हे मात्र खरे.

### ४.८ संभाजी सिध्दी संघर्ष :

सिध्दी आणि पोर्तुगीज यांच्या भूमिका कशा हिंदूविरोधी होत्या याबाबत प्रा.बाहेकर म्हणतात, "औरंगजेबाच्या नेतृत्त्वात स्वराज्यावर मोगलांचे आक्रमण सुरु असताना संभाजी राजांना सिध्दी - पोर्तुगीज - इंग्रज या भारतातील युरोपियन सागरी आणि व्यापारी सत्ता यांच्या विरुध्द संघर्ष द्यावा लागला. प्रामुख्याने सिध्दी आणि पोर्तुगीज या दोन्ही सागरी सत्ता धर्मान्य आणि धर्माच्या कडव्या पुरस्कर्त्या होत्या त्यांनी भारतातील हिंदू धर्मियांचा अतोनात छळ मांडला होता. विशेष म्हणजे त्या मोगल सत्तेच्या पुरस्कर्त्या होत्या."[६२] त्यामुळे मोगल मराठा संघर्षात या सत्ता नेहमी मोगलांच्या बाजूने उभ्या राहात असत. प्रा.बाहेकर पुढे म्हणतात, "या सागरी सत्तांचा स्वराज्याला नेहमीकरीता उपसर्ग होत असे. सिध्दीचे प्रमुख ठाणे जंजिराचा बलदंड सागरी किल्ला आणि पोर्तुगीजांचे प्रमुख ठाणे गोवा हे होते. शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीपासून या दोन्ही सत्तांशी मराठयांचा संघर्ष सुरु होता. संभाजी राजाच्या कारकिर्दीतही त्यांना त्यांच्याविरुध्द संघर्ष करावा लागला."[६३] या संघर्षाचा रोमांचक इतिहास लक्षणीय आहे. उंदेरी बेटाविरुध्द संभाजीची मोहीम धाडसी होती.

"पन्हाळयाहून रायगडला आल्यानंतर जुलै १६८० मध्ये संभाजीने एका काळोख्या रात्री गुप्तपणे २०० लोक उंदरी बेटावर पाठविले. परंतु त्यांची चाहूल लागल्याने सिद्यांनी त्यांना पकडले. त्यांच्यापैकी ८० जणांची डोकी उडवली व बाकीच्यांना मुंबईला पाठविण्यात आले. अशा प्रकारे संभाजीचा हा धाडसी प्रयत्न फसला. (अशाच प्रकारचा प्रयत्न शिवाजीने गोवा जिंकण्यासाठी केला होता.)"[६४] छ.संभाजीचे धाडस आणि आक्रमकता यास त्यापुढे इतिहासात तोड नाही. अपयश आले तरी न खचता आपल्या मोहीमा जिद्दीने चालविण्यामध्ये संभाजीचे दूरदर्शीतत्व स्पष्ट होते.

"संभाजीच्या लोकांनी उंदेरीवर आणखी एक हल्ला करण्याचा प्रयत्न केला. परंतु सिद्यांनी हा हल्ला परतवून लावला. डिसेंबर १६८१ मध्ये सिध्दी व संभाजी यांच्यामधील संघर्ष तीव्र झाला. या महिन्यात सिद्यांनी संभाजीच्या प्रदेशात शिरुन नागोठणा व आपटा येथे जाळपोळ केली. त्यामुळे चिडून जाऊन संभाजीने दंडराजपुरीला वेढा घातला. ३ जानेवारी १६८२ च्या इंग्रजी पत्रात पुढीलप्रमाणे मजकूर आढळतो : 'संभाजीराजाने दंडराजपुरीस वेढा दिला आहे. सतत पंधरा दिवस तोफखाना झडत असल्यामुळे कोटाच्या भिंतीही जमीनदोस्त झाल्या आहेत. सिद्दी व त्याचे लोक तेथील खड़कामागे लपून बचाव करुन घेत आहेत.' या लढयाच्या वेळी संभाजीने अरबी आरमारही मदतीस बोलावले होते. सिद्दी खैरियत मोठया पेचात सापडला होता. परंतु खैरियतच्या नशिबाने खैर केली. या सुमारास मोगल सरदार हसन अलीखानने कल्याणवर हल्ला चढवला, त्यामुळे सिद्यांबरोबर चाललेला लढा दादाजी रघुनाथवर सोपवून संभाजी घाईने परतला."[६५] अशा प्रकारचे संभाजीचे अनेक शत्रू विविध प्रकारच्या अडचणी निर्माण करत होते. सिद्दीचे समूळ उच्चाटन, पराभव करण्याची संधी आली होती. डॉ.प्र.न.देशपांडे यांनी म्हटल्याप्रमाणे, "यावेळी औरंगजेबाचा मुलगा अकबर संभाजीबरोबर होता. पावसाळयापर्यंत दादाजी रघुनाथने वेढा पुढे रेटला. परंतु पावसाळा सुरु होताच वेढयात व्यत्यय आला. अनेक

लोक मारले गेले तेव्हा दादाजी रघुनाथरावाने नाइलाजाने वेढा उठवला. दौलतखान आणि मायनाक पंडरीचा मुलगा यांच्या नेतृत्वाखाली मराठा आरमाराच्या हालचाली १६८२ मध्ये चालू राहिल्या. सिध्दी संबुळचा मुलगा सिद्दी मिस्त्री यानेही मराठयांच्या आरमारात नोकरी पत्करली होती. अशा परिस्थितीतही इंग्रजांच्या आश्रयाने सिद्द्यांचे अपद्रव चालूच होते."[६६] त्यामुळे संभाजीस या सर्व उपद्रवांचा बंदोबस्त करावा लागला. सिद्दी मराठा संघर्ष हा अनेक प्रकारच्या चढउतारांनी भरलेला आहे. त्याची मीमांसा प्रा.देशपांडे अशी करतात, "ऑगस्ट १६८२ च्या अखेरीस समुद्र शांत होताच सिद्द्यांनी लुटालुटीचे सूत्र पुन्हा चालू केले. तेव्हा दौलतखान, सिद्दी मिस्त्री वगैरेंनी कोलगावजवळ सिद्द्यांशी लढत दिली. परंतु मराठयांना माघार घ्यावी लागली. सिद्दी मिस्त्री जखमी झाला, व पुढे त्याच अवस्थेत मृत्यू पावला (ऑक्टोबर १६८२). याच सुमारास सिद्दी मसअद मृत्यू पावला आणि जंजि-याची सूत्रे सिद्दी कासीम व सिद्दी खैरियत यांच्याकडे आली.

१६८३ मध्ये सिद्द्यांचे मराठयांविरुध्द उपद्व्याप चालूच होते. एवढेच नव्हे तर मुंबईकर इंग्रजांनाही त्यांनी सतावण्यास सुरुवात केली. या वेळी संभाजी पोर्तुगीजांविरुध्द लढण्यात गर्क होता. १६८४ मध्ये सिद्दी कासीम मोगलांच्या आरमाराचा प्रमुख बनला व सुरतेकडे निघून गेला. त्यामुळे जंजि-याची सूत्रे सिद्दी खैरियतकडे आली. परंतु त्याचे आरमारी सामर्थ्य आता कमी झाल्यामुळे त्याने मराठयांविरुध्द उचल खाल्ली नाही. १६८६ च्या सुमारास औरंगजेबाने सिद्द्यांना मराठयांविरुध्द चिथावले. सिद्द्यांनी मराठयांचे काही गड जिंकून घेतले. जैतापूरच्या खाडीत मराठयांनी सिद्द्यांना चांगलाच हात दाखविला. परंतु यानंतर औरंगजेबांशी पुन्हा संपर्क सुरु झाल्यामुळे संभाजीला सिद्द्यांच्या हालचालीकडे लक्ष देण्यास सवड मिळाली नाही."[६७] या अपयशाची कारण मीमांसा सखोलपणे केली पाहिजे. संभाजीने सिद्द्यांचा प्रभाव वाढू दिला नाही पण त्याचबरोबर सिद्द्यांचा बंदोबस्त करणेही त्याला

शक्य झाले नाही. जंजिरा घेण्यात शिवाजीला अपयश आले होते. संभाजीने जंजिरा जिंकण्याचा निर्धार केला होता. पण मोगलांच्या स्वारीमुळे त्याला आपला बेत तडीस नेता आला नाही.[६८] जर नियतीने साथ दिली असती तर संभाजीस सिद्दीचा यथायोग्य बंदोबस्त करणे शक्य झाले असते असेच सार रुपाने म्हणता येईल.

## ४.९ संभाजी पोर्तुगीज संघर्ष :

पोर्तुगीज ही मध्ययुगातील एक महत्त्वाची सत्ता होती. पोर्तुगीज सत्तेचे महत्त्व सांगताना प्रा.बाहेकर म्हणतात, "पोर्तुगीजांचे पश्चिम किना-यावर दोन ठिकाणी राज्य होते. पहिले गोव्याचे तर दुसरे उत्तर कोकणातील चौल, वसई, दमन इ. भागाचे होते. त्यांच्या या प्रदेशाला 'फिरगांणा' असे म्हणतात. 'फिरगांणा' प्रदेशात राहणारे ते फिरंगी म्हणून त्यांना 'फिरंगी' या नावाने सुध्दा ओळखले जाते. शिवाजी महाराजांच्या अखेरच्या काळात त्यांचे गोव्याच्या पोर्तुगीजांशी संबंध फारसे सलोख्याचे नव्हते."[६९] त्यामुळे संभाजीसही पोर्तुगीजांशी सामना करताना निर्णायक संघर्षाला सामोरे जावे लागले. संभाजीचे आरंभीचे पोर्तुगीजांबाबत धोरण हे स्नेह व मैत्रीवर भर देणारे होते. जयसिंगराव पवार म्हणतात, "शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर लवकरच संभाजी महाराजांनी रामजी नाईक ठाकूर हा आपला वकील गोव्यास पाठवून उभयपक्षी मैत्रीचे संबंध निर्माण व्हावेत म्हणून इच्छा प्रदर्शित केली. (मे १६८०) संभाजी महाराजांना अंतर्गत शत्रूंचा बंदोबस्त करुन आपले आसन स्थिर करावयाचे होते. त्यात सीमेवर पोर्तुगीजांसारख्या परक्या सत्तेची एक शत्रू म्हणून भर त्यांना नको होती. गोव्याच्या व्हाईसरॉयने या वकीलाचे स्वागत करुन उभयपक्षी असा मैत्रीचा करार व्हावा या विचारास अनुमती दिली. तसेच मराठ्यांशी इतपर मैत्रीचे संबंध ठेवावेत असे त्याने आपल्या अधिका-यांना हुकुमही पाठविले."[७०] परंतु संघर्षाचे क्षण येतच असत. असाच एक प्रसंग लक्षणीय होता.

प्रा.एस.ए.बाहेकर म्हणतात, “पोर्तुगीज आणि मराठे यांच्यात मैत्री तहाची बोलणी चालू असतानाच डिचोली येथील मराठयांचा सुभेदार मोरो दादाजी याने २ ऑगस्ट १६८० रोजी फिरंग्याच्या बारदेशमधील ‘सिओलियम’ हे गाव लूटून येथील तीन लोकांना आणि गोव्याकडे मौल्यवान रत्ने घेऊन

जाणा-या व्यापा-यांना पकडले. ही वार्ता गोव्याच्या गव्हर्नरच्या कानावर जाताच गोव्याच्या गव्हर्नरने मोरो दादाजीला दिनांक ४-१-१६८१ रोजी पत्र लिहून पकडलेली माणसे सोडण्यास सांगितले. या माणसांना सोडले नाही तर संभाजीराजांना पोर्तुगीजांशी मैत्रीचे संबंध ठेवावयाचे नाहीत असे गव्हर्नर माणनार होता. डिसोलीच्या सुभेदा-याच्या हालचालीचा विजरईने निषेध केला.”[७१] त्यामुळे संभाजी राजाची अडचण झाली. जून १६८१ मध्ये येसाजी गंभीरराव याने सामोपचाराचे बोलणे केले. येसाजी जरी तहाच्या वाटाघाटीच्या निमित्ताने गेला असला तरी संभाजी राजांनी स्वतःच्या सही शिक्क्याचे पत्र देवून कोठल्याही त-हेने आपले हात अडकवून घेतला नव्हता.

राज्यावर आल्याबरोबर कोणाशीही शत्रूत्व ओढवून घ्यावयास नको म्हणून संभाजी राजांनी वकीला मार्फत बोलणी सुरु केली असावीत येसाजीने डिचोलीच्या सुभेदाराच्या वागणुकी संबंधी राजांना कळविले संभाजी राजांनी पोर्तुगीजांच्या कागाळयाचा विचार केला आणि डिचोलीचा सुभेदार दादोजी यास बदलून त्याच्या ऐवजी जिवाजी नाईक याची डिसेंबर १६८१ च्या अखेर नेमणूक केली.”[७२] त्यामुळे उभय पक्षात संघर्ष अटळ होता. अंजदीव बेटाचा वाद हा असाच एक संघर्षाचा प्रसंग होता. “गोवा ते कारवार या किना-यापासून भर समुद्रात अंजदीव नावाचे एक बेट आहे. या बेटावर तटबंदी करून तेथे आरमारी तळ करावा अशी योजना संभाजी महाराजांनी तयार केली. त्यासाठी खर्चाचीही तरतूद करण्यात आली. व सामानसुमानही जमवले. (जाने

१६८२); पण ही बातमी पोर्तुगीजांना कळल्यावर ते अस्वस्थ झाले. या बेटावर मराठयांचा पाय रोवला गेला तर त्यांचा व त्यांचे मित्र अरब यांचा गोव्यास कायमचा धोका उत्पन्न होईल अशी भीती त्यांना वाटली. तेव्हा त्या बेटावर सात हजार सैनिक पाठवून पोर्तुगीजांनी ते बेट काबिज केले व तेथील तटबंदीच्या कामास सुरुवात केली. संभाजी महाराजांच्या गोव्याच्या वकीलाने पोर्तुगीजांच्या या कृत्याचा निषेध केला. पण हे बेट आपल्याच ताब्यात असल्याचे पोर्तुगीजांनी सांगून तटबंदी पूर्णत्वास नेली."[७३] संभाजी महाराजांनी मोठया चतुराईने संघर्ष टाळला कारण त्यांना पराभव होऊ द्यायचा नव्हता.

मोगल सिद्दी यांच्या शत्रूत्वात पोर्तुगीजांची भर नको असे संभाजीचे धोरण होते. त्यासाठी त्याने अरबांशी मैत्रीही केली. डॉ.पिसुर्लेकर म्हणतात, "अंजदीव बेटातील संबंधाने विरजई संभाजीशी बोलणी करण्यास तयार नसला तरी पोर्तुगीज व मराठे यांचे संबंध बिघडले नाहीत. इतकेच नव्हे तर संभाजीस पुत्र झाल्याचे वर्तमान मराठयांच्या वकीलाकडून विरजईस कळल्यामुळे ता.२८ जुलै १६८२ पत्रात त्याने संभाजीचे अभिनंदन केले व जन्मास आलेल्या राजपुत्रास एक दागिना नजर पाठविला. हा पुत्र शाहू असावा. विरजईने त्याचा उल्लेख संभाजी मागून राज्यावर येणारा असा केलेला आहे."[७४] संभाजीचे पोर्तुगीज धोरण हे अशाप्रकारे सावध हालचालीवर आधारलेले होते.

पोर्तुगीजांनी मात्र ऐनवेळी कोलांटीउडी घेऊन मोगलांची बाजू घेतली. याबाबत जयसिंगराव पवार म्हणतात, "संभाजी राजांची चोहोबाजूंनी कोंडी करण्यासाठी औरंगजेब बादशहाने पोर्तुगीजांचे सहकार्यही मिळविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. पोर्तुगीजांना मराठे व मोगल दोन्हीही परकेच होते. त्यांच्यामधील संघर्षाचा फायदा अधिकाधिक उठविणे हे पोर्तुगीजांचे धोरण होते. दुसरे असे की प्रचंड फौज फाटयासह

महाराष्ट्रात घुसलेल्या मोगली सत्तेला विरोध करण्याचे सामर्थ्य पोर्तुगीजांजवळ नव्हते तेव्हा पोर्तुगीज व्हाईसरॉयने आपल्या उत्तरेकडील चौल, वसई, दमण इ. प्रदेशातील पोर्तुगीज अधिका-यांना मोगली आरमारास आपल्या किनारी प्रदेशातून निर्वेध जाऊ द्यावे अशा सुचना पाठविल्या."[७५] पोर्तुगीजांनी संभाजीविरुध्द लढावे अशी मोगलांची धारणा होती पण पोर्तुगीज दोन्ही डगरीवर हात ठेवून होते. ते समान अंतराचे धोरण ठेवत.

लवकरच जानेवारी १६८३ मध्ये मोगली बादशहाचा शेख महंमद हा वकील गोव्यात आला व त्याने पोर्तुगीजांशी वाटाघाटी सुरु केल्या. पोर्तुगीजांनी संभाजीविरुध्द युध्द पुकारावे असा त्याने आग्रह धरला पण व्हाईसरॉय त्यास कबुल झाला नाही. तथापि आपल्या प्रदेशातून अन्नधान्य खरेदी करण्यास त्याने मोगलांना परवानगी दिली.[७६] एवढयावरच मोगल खुष झाले होते. पोर्तुगीज जवळीक वाढली होती. दोघांच्या भांडणात तिस-याचा लाभ हे पोर्तुगीजांचे लक्ष होते. जयसिंगराव पवार म्हणतात, "एप्रिल १६८३ मध्ये गोव्याच्या व्हाईसरॉयने मोगल बादशहास पत्र लिहून आपण संभाजीविरुध्द मोगलांना किती व कशी मदत करत आहोत हे स्पष्ट करुन या मदतीच्या बदल्यात आपल्यास दक्षिण कोकणचा प्रदेश बहाल करावा अशी विनंती केली. मोगलांना मिळून दक्षिण कोकणी प्रदेश आपल्या पदरात पडेल अशी आशा पोर्तुगीजांना वाटत होती."[७७] अशा प्रकारचे पोर्तुगीज धोरण मराठयांना अडचणीत टाकणारे होते. त्यामुळे मराठे आक्रमक बनले.

उत्तर कोकणातील चौल, ठाणे, वसई इत्यादी पोर्तुगीज प्रदेशातून मराठी मुलुखावर स्वारी करण्याची वाट पोर्तुगीजांनी मोगलांना दिल्यामुळे मराठयांचे पोर्तुगीजांशी शत्रूत्वाचे संबंध निर्माण होणे स्वाभाविकच होते. मराठयांनी याचा बदला म्हणून फेब्रुवारी १६८३ पासून पोर्तुगीज प्रदेशांवर हल्ले करुन त्यांची ठाणी व किल्ले जिंकून

घेण्यास सुरुवात केली. फेब्रुवारी १६८३ मध्ये मराठयांनी उत्तर कोकणातील पोर्तुगीजांचे दोन किल्ले जिंकून घेतले. लवकरच एप्रिलमध्ये मराठयांच्या बाराशे सैनिकांनी पोर्तुगीजांच्या तारापूर या ठाण्यावर हल्ला केला त्याशिवाय वसईपासून दमण पर्यंतच्या प्रदेशातील अनेक पोर्तुगीज गावांवर हल्ले करुन ती त्यांनी जाळून टाकली.[७८] मराठयांच्या या प्रतिक्रियेमुळे पोर्तुगीजांना चांगलाच शह बसला. डिसेंबर १६८३ पर्यंत चौलचा वेढा चालूच होता. चौल मराठयांच्या हाती पडले नाही. चौलचा बदला म्हणून मराठयांच्या फोंडा या किल्ल्यावर पोर्तुगीजांनी हल्ला केला. छ.संभाजींनी जबर मुकाबला केला. येसाजी कंक व त्याचा पुत्र कृष्णाजी सफल ठरले. भयंकर पाऊस व मराठयांचे हल्ले यामुळे त्यांना आपले बरेच सामानसुमान व तोफा तळावरच सोडून जावे लागले. मराठयांचे हल्ले इतके जबर होते की, खुद्द व्हॉइसरॉय दोन वेळा मरता मरता वाचला. फोंडयाच्या मोहिमेचा बोजवारा उडून व्हाइसरॉय आपल्या जखमी सैनिकांसह कसाबसा गोव्यास परताला.[७९] हा जणू मराठयांचा तेजस्वी विजयच होता. छ.संभाजी महाराजांनी थेट गोव्यावर आक्रमण करून पोर्तुगीजांची झोप उडवून दिली. प्रथम फोंडयावर स्वारी करुन संभाजी महाराजांनी फोंडा काबीज केला ते पुढे गोवाही जिंकणार होते पण निसर्गाने पोर्तुगीजांना साथ दिली व मोगल डोक्यावर उभे राहिले.

प्रा.जयसिंगराव पवार म्हणतात, "पोर्तुगीजांची चांगलीच अद्दल घडविण्यासाठी आता संभाजी महाराजांनी खुद्द गोव्यावरच स्वारी केली आणि गोवा बेटाजवळच जुवे बेटावरील किल्ला जिंकून घेतला (२४ नोव्हें). तेव्हा व्हाइसरॉयने दुस-या दिवशी ४०० सैन्यासह जुवे बेटावरील मराठयांवर हल्ला केला. परंतु त्यात त्यांचा पराभव झाला व तो पळून गेली (२५ नोव्हें). याच वेळी मराठे गोव्यावर हल्ला करुन ते काबीज करणार, परंतु इतक्यात मांडवी नदीस भरती आल्यामुळे हल्ला पुढे ढकलला गेला. गोवा मराठयांच्या ताब्यात आता काही तासांच्या अवधीतच जाणार या भीतीने गोव्यात

पूर्वी होऊन गेलेल्या सेंट फ्रान्सिस झेवियर याच्या थडग्यातील शवासमोर जाऊन व्हाइसरॉयने गोव्याचे संरक्षण व्हावे म्हणून करुणा भागली आणि काय चमत्कार ! मराठे जुवे बेट सोडून निघुन गेल्याचे दुस-या दिवशी दिसून आले ! (२५ नोव्हें). खरे कारण असे होते की, प्रचंड सैन्य घेऊन शहाजादा शहा आलम दक्षिण कोकणात उतरुन आपल्या पिछाडीस येत असल्याची बातमी संभाजी महाराजांच्या हाती आली होती. म्हणून गोव्याचे प्रकरण पुढे केव्हा तरी निकालात काढू असा विचार करुन त्यांनी माघार घेतली होती."[८०] संभाजी महाराजांच्या पराक्रमाची चुणूक त्यांच्या गोवा मोहीमेत दिसून येते.

पोर्तुगीजांचे धोरण हे मराठयांच्या विरोधात आहे. त्याच्याशी नरमाईने नव्हे तर चढाईनेच वागले पाहिजे हे संभाजीचे सूत्र होते व ते सफल ठरले. संभाजीची गोवा मोहीम तत्वतः सफल झाली नाही पण त्यामुळे संभाजीचे वजन वाढले यात शंका नाही. डॉ.प्र.न.देशपांडे म्हणतात ते खरे आहे, "एकाच वेळी दोन आघाडयांवरील युध्द टाळण्यासाठी संभाजीने पोर्तुगीजांशी तह करण्याचे ठरविले व त्यासाठी शहाजादा अकबर व कवी कलश यांची नियुक्ती केली. भीमगडाच्या जंगलात तहाच्या वाटाघाटी सुरु झाल्या. अखेर मर्दनगडावर तह पूर्ण झाला."[८१] त्या वरुन संभाजीच्या मुत्सद्देगिरीची व चतुराईची कल्पना येते. प्र.न.देशपांडे पुढे म्हणतात, "परंतु पोर्तुगीज व संभाजी यांचा तह टिकू शकला नाही. मोगलांचे साह्य मिळाल्यामुळे १६८५ मध्ये पोर्तुगीजांनी मराठयांविरुध्द उचल खाल्ली. केशव प्रभु वगैरे देसायांना हाताशी धरुन पोर्तुगीजांनी संभाजीच्या प्रदेशात धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली. विदन, कमणदुर्ग, अशेरी हे मराठयांचे किल्ले त्यांनी जिंकले. देसायांच्या मदतीने मोगलांनी १६८९ मध्ये फोंडाही ताब्यात घेतलेला होता. "[८२] संभाजीला जिंकलेले व आपल्या ताब्यात आणलेले गड परत करावे लागले.

प्रा.प्र.न.देशपांडे म्हणतात, "आतापर्यंत पाहिलेल्या तपशिलावरुन संभाजीने पोर्तुगीजांवर मात करण्याचा कसा प्रयत्न केला होता याची कल्पना येईल. मोगलांच्या स्वारीचा धोका नसता तर संभाजीने गोवा जिंकला असता व पोर्तुगीजांना भारतातील गाशा गुंडाळावा लागला असता. संभाजीचे दुर्दैव हे की त्याचे सारेच शत्रू एकाच वेळी त्याच्याविरुध्द उठले. बंडखोर देसायांनीसुध्दा स्वराज्याशी बेईमानी करण्याची संधी वाया घालवली नाही."[८३] अशा प्रकारे संभाजीचे पोर्तुगीज धोरण अंशतः सफल झाले असे म्हणता येईल. संभाजीच्या लोकनिष्ठा आणि पराक्रमाची जाणीव ही त्याच्या प्रभावशाली पोर्तुगीज आक्रमक धोरणातून स्पष्ट होते. त्यांचे हे धोरण खरोखर मर्दानी आणि रणझुंजार होते. पोर्तुगीज धोरणाची ही सूत्रे लक्षणीय आहेत.

त्यांच्या युध्दप्रिय नेतृत्वाचे वर्णन हे पोर्तुगीज कागदपत्रात 'War like Prince' (युध्दावर प्रेम करणारा राजपुत्र) असे करण्यात आले आहे ते योग्य होते. प्रा.पिसुर्लेकर म्हणतात, "संभाजी महाराज आणि पोर्तुगीज यांच्यामध्ये युध्द सुरु झाले त्याची जिम्मेदारी आपणावर नाही हे आपल्या राजास पटवून देण्याचा प्रयत्न गोव्याच्या व्हाईसरॉयने १६ डिसें. १६८३ रोजी पोर्तुगीजच्या राजास पाठविलेल्या पत्रात केली आहे."[८४] त्या पत्रावरुन छ.संभाजीस पोर्तुगीज कसे घाबरत होते याची कल्पना येते. स.शं.देसाई संभाजी पोर्तुगीज संबंधाबाबत म्हणतात, "शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत त्यांचे जे दूत गोव्यात जात असत त्यांना सार्वभौम राजाच्या दूतांप्रमाणे वागविण्यात येत नसे, तो मान मिळाला संभाजीच्या दूतांना."[८५] यावरुन संभाजीकाळात मराठयांचे प्रभुत्त्व वाढले असल्याचे दिसून येते.

स.शं.देसाई संभाजी पोर्तुगीज संबंधाबाबत म्हणतात, "छ.संभाजी जिवंत असता पोर्तुगीजांना त्याचा एवढा वचक वाटत होता की, ते सार्वभौम राजा म्हणून मानीत होते. त्याच्या वकीलास ते सार्वभौम राजाच्या वकीलाप्रमाणे वागवीत असत. शिवाजी महाराजांना ते नुसते 'शिवाजी राजे' म्हणून संबोधित, तर संभाजीच्या नावामागे 'छत्रपती' हे अभिदान ते लावीत."[८६] यावरुन संभाजीचे पोर्तुगीज सत्तेवरचे प्रभूत्व सिध्द होते.

## ४.१० छ.संभाजी - इंग्रज संघर्ष :

छ.संभाजींना पोर्तुगीजांप्रमाणे इंग्रजांशीही शर्थीची झुंज द्यावी लागली. प्रा.पवार लिहितात ते खरे आहे, "इंग्रजांनी सुरुवाती पासूनच म्हणजेच शिवाजी महाराजांच्या काळापासून मराठयांच्या विरोधात कारवाया करुन वेळ प्रसंगी मराठयांच्या शत्रूंनाही सहकार्य केले होते. त्यांच्या या धोरणात संभाजी महाराजांच्या काळातदेखिल बदल झाला नाही."[८७] यावरुन मराठे-इंग्रज संघर्षाचे स्वरुप स्पष्ट होते. प्रा.प्र.न.देशपांडे म्हणतात, "मराठयांविरुध्द सिद्दांना पाठिंबा द्यावा म्हणून सुरतकर इंग्रज आग्रह करीत असत. परंतु मुंबईकरांना मात्र आतून संभाजीची भीती वाटत होती याच सुमारास (ऑक्टो. १६८२) सिद्दींना इंग्रजांनी पाठीशी घालू नये म्हणून त्याच्याशी तह करण्यासाठी संभाजीने प्रल्हाद निराणीला पाठविले."[८८] प्रा.देशपांडे म्हणतात, "मुंबईकरांनी सुरतकरांशी सल्लामसलत करण्यामध्ये बराच वेळ दवडला. अखेर इंग्रजांनी हेन्री स्मिथला प्रल्हाद निराणीबरोबर रायगडला पाठविले. परंतु सुरतकर इंग्रजांनी सिद्दीबाबत आपले धोरण न बदलल्यामुळे संभाजीने तह करण्यास नकार दिला."[८९] यावरुन छ.संभाजीस कशा प्रकारे धोरणे बदलावी लागली याची प्रचिती येते.

संभाजीच्या कर्माची थोरवी स्पष्ट करताना प्रा.देशपांडे म्हणतात, "इंग्लंडच्या राजाने या काळात ईस्ट इंडिया कंपनीच्या भ्रष्ट कारभाराला तिलांजली देण्यासाठी २८ डिसें. १६८३ रोजी मुंबई बेट ताब्यात घेतल्याचे जाहीर केले व रिचर्ड केजविन यांना गव्हर्नर म्हणून नेमले. अधिकारसूत्रे हाती येताच केलविनने मराठयांशी तह करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे १६८४ मध्ये संभाजी व इंग्रज यांच्यामध्ये परस्पर मैत्रीचा तह झाला. या तहातील अटींप्रमाणे इंग्रजांनी सिद्दींना मुंबईत आश्रय नाकारला. इंग्रजांशी मैत्री जोडून संभाजीने एक राजनैतिक विजय मिळवला असे म्हणावे लागेल."[९०] याचा अर्थ असा की संभाजी हा चतुर व मुत्सद्दी राजा होता.

संभाजीचे धोरण शत्रूंना विभागून ठेवण्याचे होते. सिद्दी व मोगल यांच्या विरोधात इंग्रजांना संभाजीने आपलेसे केले होते. प्रा.प्र.न.देशपांडे म्हणतात, "तहानंतर १६८७ ध्ये इंग्रजांनी सिद्दींपासून खाडीचे रक्षण करावे असा आणखी एक तह संभाजीने सिद्दींचे परिपत्यही केले असते. इंग्रजांना मात्र सिद्दींच्या जाचाला तोंड द्यावे लागले. संभाजी मोगलांबरोबर लढण्यात गुंतलेला पाहून सिद्दींना इंग्रजांना सतावण्यास सुरुवात केली."[११] संभाजी महाराज हे दूरदृष्टीने कार्य करत होते. त्यांनी छ.शिवाजींचे धोरण कायम ठेवून स्वशक्तीने पोर्तुगीजांना वठणीवर आणले तर इंग्रजी सत्तेवर आपले वर्चस्च स्थापन कसे केले ते ही युध्द न करता बुध्दीचातुर्याने. त्यांनी सिद्दी विरोधी केलेला इंग्रजांचा वापर हे त्यांच्या बुध्दीचातुर्याचे लक्षण होय.

## ४.११ पून्हा मोगलांशी संघर्ष व अखेर शेवट :

दुर्दैवाने छ.संभाजीचा पाठलाग सुरु केला. या संदर्भात जयसिंगराव पवार यांनी म्हटले आहे, "नोव्हेंबर १६८८ नंतर संभाजी राजाचे दुर्दैव अधिकाधिक बलवत्तर होऊ लागले. अनेक दुर्दैवी घटना घडू लागल्या. संभाजीराजांचे आप्तेष्ट शिर्के संभाजीराजांच्या विरोधात कारस्थाने करु लागले. त्यांनी शाहूस गादीवर बसविण्याच्या खटपटी सुरु केल्या. कवि कलश याने त्यांना विरोध केला. परंतु शिर्क्यांच्या सामर्थ्यापुढे त्याचा निभाव लागला नाही. उभयपक्षी झालेल्या संघर्षात कवि कलशाचा पराभव झाला. प्राण वाचविण्यासाठी तो खेळणागडावर आश्रयास गेला. संभाजीराजांना ही हकीकत कळताच त्यांनी शिर्क्यांच्या बंदोबस्तासाठी हालचाली सुरु केल्या. परंतु शिर्क्यांनी शांत बसण्याऐवजी पन्हाळा, खेळणा भागात राजा विरुध्द बंड पुकारले."[१२] अशाप्रकारे शिवाजीप्रमाणेच संभाजी महाराजांनाही अंतर्गत बंडांना सामोरे जावे लागले. शिर्के प्रकरणाने संभाजीस मनस्ताप झाला या काळात घडलेल्या घटनावर भाष्य करताना

प्रा. प्र.न.देशपांडे म्हणतात, "संभाजीने शिर्क्यांचा बंदोबस्त करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे शिर्क्यांचा गावी जाऊन त्याने दहशत निर्माण केली व शिर्के मंडळींना पळवून लावले. त्यानंतर कलशाच्या मदतीसाठी संभाजी विशाळगडावर गेला. शत्रू पक्ष टेहळणीवर होताच विशाळगडावरुन संभाजी पन्हाळयास आला असताना कोल्हापूर भागात मोगलांनी कडेकोट बंदोबस्त केल्याचे त्याच्या लक्षात आले तेव्हा क-हाड, सातारामार्गे रायगडकडे जाण्याऐवजी संगमेश्वर चिपळूनमार्गे जावे असा विचार त्याने केला. त्याप्रमाणे जानेवारी १६८९ मध्ये संभाजी कवि कलश संगमेश्वरपर्यंत आले. या गोष्टीचा सुगावा मुकर्रबखानाला होताच त्याने पाठलाग करुन फेब्रु. १६८९ रोजी संभाजी व कवि कलश यांना पकडले."[१३] संगमेश्वर येथे देसाईच्या वाडयावर महसूली तंटा सोडविण्यासाठी संभाजी महाराज गेले होते. जयसिंगराव पवार म्हणतात, "१ फेब्रु. १६८९ रोजी देसाई यांच्या वाडयावर शेख निजामने छापा घालून संभाजीराजे आणि कवि कलश यांना पकडले त्यावेळी उभयपक्षी थोडासा संघर्ष झाला. परंतु संभाजीराजे व कवि कलश यांची सुटका करता येईल असे स्वरुप नव्हते. सेनापती महलोजी घोरपडे हा यावेळी झालेल्या चकमकीत ठार झाला. काही जण पळून गेले."[१४]

प्र.न.देशपांडे म्हणतात, "जेधे शकावलीत नोंद पहा : माघ वद्य सप्तमी शुक्रवारी संभाजीराजे व कवि कलश खेळण्याहून रायगडास जावयास संगमेश्वरास आले असता सेक निजाम (मुकर्रबखान) दौड करुन येऊन उभयेतास जिवंतच धरुन नेले. वरकड लोक रायगडास गेले. संभाजीला पकडले त्या वेळी तो विलासात दंग होता असे साकी मुस्तैदखान लिहितो."[१४] पण त्यास पुरावा देण्यास अन्य कागदपत्रात पुरावा सापडत नाही. प्र.न.देशपांडे म्हणतात, "संभाजीला पकडल्यानंतर मोगलांना किती हर्ष झाला याची कल्पना खाफीखानाने दिलेल्या वर्णनावरुन येते. औरंगजेब या सुमारास विजापूरहून अकलूजला बादशहाच्या छावणीत आनंदी आनंद झाला. छावणीतील

लोकांनी शहासेण वाजवून अक्षरशः आकाश डोक्यावर घेतले असे खाफीखान लिहितो. बादशहाने हमीदुद्दीनखानाला संभाजीस बेडया घालून आपल्यासमोर हजर करण्यास फर्मावले. त्यानंतर औरंगजेब फेब्रुवारी १६८९ मध्ये बहादूरगड येथे पोहोचला. बादशहाच्या हुकुमाप्रमाणे संभाजीला बेडया घालून मोगलांनी त्याची व कवि कलशाची धिंड काढली. या धिंडीचे वर्णन खाफीखानने दिले आहे. ते वाचल्यावर अंगावर शहारे आल्याशिवाय राहत नाहीत."[१६] छ.संभाजीच्या छळामुळे मराठी स्वराज्यात संतापाची लाट पसरली.

प्रा.डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, "बादशहाच्या आदेशानुसार कैद्यांच्या अंगावर विदूषकी पोषाख चढविण्यात आला. त्यांना उंटावर बसवले. ढोल, शिंगे आणि इतर कर्कश वाद्ये वाजवत त्यांची धिंड काढण्यात आली. यावेळी त्यांची वाटेल त्या प्रकारे मुघलांनी विटंबना केली. त्यांचा छळ केला."[१७] त्यामुळे स्वाभिमानी महाराष्ट्र दुखावला गेला.

प्रा.डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, "संभाजीराजांना धिंड काढून झाल्यानंतर पुन्हा बादशहासमोर पेश केले. त्यावेळी संभाजी महाराजांनी बादशहाला मानवंदना देण्यासाठी मान झुकवली नाही. ताठ मानेने बादशहाच्या नजरेवर नजर देत उभे राहिले. त्यांनी बादशहाने विचारलेल्या प्रश्नांना बाणेदारपणे उत्तरे दिली. हा प्रकार पाहून बादशहा संतापला. त्याने संभाजीला नवी दृष्टी द्यावी असा आदेश दिला. त्यानुसार बादशहाच्या नोकरांनी तापत्या लोखंडी सळाया संभाजी महाराजाच्या डोळयात खुपसल्या आणि त्यांचे डोळे काढण्यात आले."[१८] अशा प्रकारे संभाजीचा छळ चालू होता. पण त्याने आपला स्वाभिमान सोडला नाही.

ईश्वरदास लिहितात, "त्याने त्या दिवसापासून जेवणखावण सोडले त्याच्या पहारेक-यांनी त्याला अन्नसेवन करण्याबद्दल पुष्कळ सांगितले पण त्याचा काही उपयोग

झाला नाही."[९९] रियासतकार सरदेसाई यांच्यामते, "अशा स्थितीत औरंगजेब संभाजीला थोडीच क्षमा करणार होता. त्याच रात्री बादशहाने संभाजीचे डोके काढविले आणि कलुशाची जिव्हा छेदिली. पुढे यांचे काय करावे याबद्दल बादशहाने मुघलांना अभिप्राय विचारला, तेव्हा त्यांनी कळविले, मुसलमानांचे खून व अप्रतिष्ठा करुन व त्यांची शहरे लुटून संभाजीने घोर पापाचरण केले असल्यामुळे त्यास मृत्यूचीच शिक्षा योग्य आहे. तेव्हा आता संभाजीकडून जास्त लाभ्यांश काहीच होत नाही असे दिसून येताच बादशहाने त्यास ठार मारण्याचा हुकूम फर्माविला. हे सर्व होत असतां बादशहाचा मुक्काम बहादूरगडाहून कारेगावात गेला. पंधर दिवस पावेतो संभाजीचे अतोनात हाल करण्यात आले."[१००] अशाप्रकारे संभाजीचे बलिदान व्यर्थ गेले नाही. त्यातून राष्ट्र उभारणीची प्रेरणा प्राप्त झाली.

### ४.१२ संभाजीकालीन प्रशासन :

छ.शिवाजीप्रमाणे संभाजीराजांचे प्रशासन हे महाराष्ट्र धर्मावर आधारलेले होते. डॉ.कमल गोखले म्हणतात, "देशाचा राजा म्हणून राजाने राजधर्म पाळावयाचा असतो. या राजधर्मात राज्याचे रक्षण, धर्मरक्षण, चोख न्यायदान, प्रजादक्षता, प्रजेचे अभय, रयतेची कळकळ इत्यादी अनेक कर्तव्ये समाविष्ट होतात."[१०१] ही सर्व कर्तव्ये संभाजी महाराजांनी पाळली. डॉ.सेन आपल्या 'Administrative system of the Marathas' या पुस्तकात म्हणतात की, "Sambhaji had subverted his father's system of administration and he had no unind to improve it."[१०२] हे सेन यांचे विधान अपुरे वाटते. कारण संभाजी महाराजांनी शिवकालीन प्रशासन कायम ठेवून ते समृध्द करण्याचा प्रयत्न केला. गो.स.सरदेसाई आपल्या 'उग्रप्रवृत्ती संभाजी' या पुस्तकात लिहितात की, "संभाजीचा राज्यकारभार मराठी राज्याला हितकारक नव्हता."[१०३] त्यांचे हे विधान पूर्वग्रहावर आधारलेले व

चूकीचे आहे. संशोधकांनी चिटणीस बखरीच्याआधारे केलेली ही विधाने तेवढीच गैरलागू व अवास्तव वाटतात. प्रा.बाहेकर यांच्यामते, "आज उपलब्ध झालेल्या अस्सल ऐतिहासिक साधनांवरुन संभाजी राजे अत्यंत बुध्दिमान, संयमी, क्षमाशिल, उदार, न्यायनिहूर आणि लोक कल्याणकारी राजे होते असे सिध्द होत आहे."[१०४] या पार्श्वभूमीवर येथे संभाजीकालीन प्रशासनावर नवा प्रकाश टाकावयाचा आहे. त्यांच्या प्रशासनाचे तत्वसूत्र सांगताना डॉ.कमल गोखले म्हणतात, "संभाजी राजेही शासनाचे मध्यबिंदू होते. तेही विविध धर्माच्या आधाराने कायदे कानून करणारे, न्यायदानाचे प्रमुख आणि सेना प्रमुख होते. तेही विविध धर्माच्या प्रजेच्या स्वास्थ्याची आणि स्थैर्याची हमी ते देत असत."[१०५] हे त्यांचे कार्य त्यांच्या धोरण व निर्णयप्रक्रियेतून विशेषत्वाने गोचर होते.

त्यांच्या भूमिका स्पष्ट करताना प्रा.डॉ. कमल गोखले म्हणतात, "शिवाजी महाराजांप्रमाणेच त्यांनी सर्व बाबतीत आपल्याकडे अधिकार घेतलेले होते. या अधिकारांची अंमलबजावणी करावयाची वेळही त्यांच्या कारकिर्दीच्या पहिल्या वर्षा-दीडवर्षातच आली."[१०६] धोरण व अधिकारांची अंमलबजावणी करताना छ.संभाजी यांनी टाकलेली पावले ही लोक कल्याणकारी होती हे लक्षात घेतले पाहिजे. संभाजीराजांच्या कारकीर्दीत औरंगजेब स्वतः आपल्या लक्षावधी फौजेसह स्वराज्यात उतरलेला होता. स्वराज्याच्या प्रदेशातच त्याने युध्दभूमी निर्माण करुन स्वराज्याला व संभाजीराजांना प्रचंड आव्हान दिले होते. स्वराज्यातील सर्व सामान्य रयत भयभीत झालेली होती. रयतेचा ज्याच्याशी संबंध येतो व ज्याच्या विश्वासावर रयत रहात असते ते स्थानिक वतनदार मात्र परकीय शक्तीशी हात मिळवणी करीत असत. त्यामध्ये वतन मिळविण्याचा व वतन टिकविण्याचा उद्देश असे. मोगलांच्या प्रचंड शक्ती सामर्थ्यामुळे मनातून भीती बाळगून त्याच्या आश्रयास जात असत. परंतु

अशाही बिकट परिस्थितीत सर्व वतनदारांशी चांगले संबंध ठेऊन त्यांना आपलेसे करुन संभाजी राजांनी त्यांना राजी रोखले होते आणि प्रशासनावरील आपली पकड मजबूत केलेचे दिसून येते.[१०७] रयतेचा राजा ही त्यांची भूमिका अत्यंत निर्णायक होती. संभाजीची कागदपत्रावर आढळणारी मुद्रा पुढीलप्रमाणे होती.

*"श्री शंभोःशिव जातस्य मुद्रा द्यो, रिवराजते ।*

*यदं कसेविनी लेखा वर्तते कस्य नो, परि ।।"*[१०८]

म्हणजेच संभाजीची ही मूद्रा सूर्यप्रभेप्रमाणे शोभते, व ज्या मुद्रेचा आश्रय करणारी लेखा सुध्दा कोणावरही सत्ता चालविते, ती ही शिवपुत्र शंभूची मुद्रा प्रकाशमान होत आहे. याचाच अर्थ असा की संभाजीचे प्रकाशन हे सूर्यासारखे तेजस्वी स्वयंप्रकाशित होते. त्याचप्रमाणे संभाजीच्या पत्रव्यवहारावर पत्र समाप्तीची जी मुद्रा आहे ती, "मर्या, देयं विज, यते."[१०९] अशा प्रकारची आहे. छ.संभाजीने प्रत्येक वेळी प्रशासन कृतीमध्ये आणताना मर्यादांचे पालन केले असल्याचे दिसून येते. छ.संभाजीचा महिलांकडे पाहण्याचा दृष्टिकोन उदार होता. असे मत प्र.न.देशपांडे यांनी मांडले आहे. त्यांच्यामते, "संभाजीने महाराणी येसूबाईला काही राजकीय अधिकार दिलेले होते ही गोष्ट वैशिष्टयपूर्ण मानवी लागेल. छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकपूर्व कारकीर्दीत राजमाता जिजाबाईचा राज्यकारभारावर काही प्रमाणात प्रभाव होता. तथापि शिवाजी महाराजांच्या कोणत्याही राणीला अगदी सोयराबाईला सुध्दा राजकीय अधिकार मिळालेला दिसत नाही. संभाजीने आपल्या गैरहजेरीत राज्यशासन पाहण्याचा अधिकार राणी येसूबाईला दिला होता."[११०] अधिकार प्रदान करताना त्यांनी घेतलेला हा पवित्रा खरोखर महत्वाचा वाटतो.

राजमंडळाविषयी डॉ.व्ही.टी.गुणे लिहितात, "छत्रपतींचे अधिकार सार्वभौम असले तरी राजमंडळाच्या सहकार्याने, प्रसंगी सल्लामसलतीने, राज्यकारभार करण्याची

पध्दती शिवाजी महाराजांनी स्वीकारली होती. संभाजीनेही याच पध्दतीचा अवलंब करण्याचा कसोशीने प्रयत्न केला."[१११] त्यांनीही पध्दत केवळ स्वीकारली असे नाही तर त्यामध्ये सुधारणाही केली. डॉ.कमल गोखले म्हणतात, "संभाजी राजांच्या कारकीर्दीत छंदोगामात्य या पदाची अष्टप्रधानात भर पडली असा समज असला तरी शिवाजी महाराजांच्या राज्यभिषेक प्रसंगी "उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडितराव सुवर्ण कलश मधुपूर्ण घेऊन उभे राहिले." असा उल्लेख आढळतो. "[११२] अशा प्रकारचे बदल लक्षणीय म्हटले पाहिजेत.

प्र.न.देशपांडे मुलकी व्यवस्थेबद्दल म्हणतात, "शिवाजी महाराजांनी मुलकी व्यवस्थेसाठी जे घटक निर्माण केले होते, ते छत्रपती संभाजीच्या कारकीर्दीत कायम होते. स्वराज्याची विभागणी प्रांतांमध्ये (सरसुभा) केलेली असून अष्टप्रधानांपैकी ज्येष्ठ प्रधानांचे अधिपत्य या प्रांतावर असे. अशा प्रधानांना सरकारकून असे म्हणत असत. संभाजीच्या कारकीर्दीत पंतप्रधान आणि सचिव यांच्या अधिपत्याखाली प्रांत होते. त्याचप्रमाणे छंदोगामात्य कवि कलश याच्याकडे कुडाळ भागाचे अधिपत्य होते. सरकारकूनांना प्रांताच्या व्यवस्थेसाठी सरसुभेदार मदत करीत असत. प्रांतांची विभागणी सुभ्यांमध्ये केलेली होती. सुभ्याचे उत्पन्न एक लाख प्रतिवर्षी होत असे. सुभ्यावरील अधिका-यास सुभेदार असे म्हणत. सुभेदाराच्या मदतीसाठी मुजूमदार व कारकून असत. सुभ्यांची विभागणी तर्फ या घटकामध्ये करण्यात येत असत. या घटकावरील अधिका-यास हवालदार असे म्हणत. त्याच्या मदतीसाठी काही दुय्यम अधिकारी असत. सर्वात लहान घटक म्हणजे मौजे किंवा गाव यावरील अधिका-यास मोकदम (पाटील) असे म्हणत."[११३] ही व्यवस्था संभाजीकालीन प्रशासनाची बैठक स्पष्ट करणारी आहे. छत्रपती संभाजीने शिवाजी महाराजांचे प्रजाहित धोरण धामधुमीच्या काळातही राबविण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला व छत्रपती संभाजी हाही प्रजाहितदक्ष राजा होता हे येथे आवर्जून लक्षात घेतले पाहिजे.[११४] हे त्यांचे धोरण प्रत्यक्ष प्रशासकीय धोरणातून स्पष्ट होते.

प्रा.शिंदे सरकार म्हणतात, "बंडखोरी करणा-या किंवा रयतेला त्रास देणा-या वतनदारांना संभाजी राजांनी चांगलाच इंगा दाखविला होता. विशेष करुन शत्रूला मिळणा-या वतनदारांविषयी संभाजी राजांच्या मनात विलक्षण संताप असे. फितूर झालेला एखादा वतनदार परत स्वराज्यात आला तर संभाजी राजे त्याची खडसून हजेरी घेत असत."[११५] अशा प्रकारची कडक शिस्त त्यांनी ठेवली होती. संभाजी राजांच्या न्यायव्यवस्थेबाबत प्रा.शिंदे सरकार म्हणतात, "संभाजी महाराजांच्या अत्यंत धामधूमीच्या व प्रतिकूल परिस्थितीतही न्यायदानाचे काम निर्भिडपणे चालू होते."[११६] त्यावरुन प्रजाहितदक्षता प्रकट होते.

प्र.न.देशपांडे आर्थिक प्रशासनाबाबत म्हणतात, "छत्रपती संभाजीच्या कारकीर्दीत लष्करावरील खर्चात मोठी वाढ झाली. औरंगजेबाच्या स्वारीमुळे स्वराज्यात आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाली. युध्दक्षेत्र स्वराज्याच्या भूमीत निर्माण झाल्यामुळे मुलखाची अतोनात हानी झाली. गावेच्यागावे ओस पडली, लोक परागंदा होऊ लागले. देशमुखांना आपली वतने सुरक्षित राहतील याची खात्री वाटेना. त्यातच १६८५ ते १६८७ च्या काळात स्वराज्याच्या काही भागात दुष्काळाने थैमान घातले."[११७] यावरुन संभाजीच्या कार्यकुशलतेचे आकलन होते. डॉ.पी.एस.जोशी म्हणतात, "Taking into account the data given earlier it is clear that even though Sambhaji was a good administrator and a skilled general who gave impartial justice to the subjects."[११८] यावरुन संभाजी महाराज हे कुशल प्रशासक व सेनापती होते. त्यांनी छ. शिवाजी महाराजांप्रमाणेच रयतेच्या भाजीच्या देठाची सुद्धा काळजी घेतली आणि बहुत जनांना आधार दिला. अखंडपणे परिस्थितीशी सामना केला. त्यातून त्यांचे श्रेष्ठत्व स्पष्ट होते.

डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, "बुध्दभुषण मधिल दुसऱ्या अध्ययातील पहिल्या भागात छ. संभाजी महाराजांनी राजाच्या लक्षणांची चर्चा केली आहे. त्यात सर्व गुणांचा संयोग असणे नम्रवृत्ती, शास्त्राभ्यास, क्षमाशिलता, सद्‌बुध्दी, उत्तम प्रकृती, धनसंचय, उत्तम हेर, उत्तम दुत, बोलण्यातील चातुर्य, उच्च भाषण, इंद्रिय निग्रह, न्यायदानास प्रविग, तहामध्ये चतुर, शत्रुस प्रतिकार करण्यास बलिष्ठ, तडजोड, विग्रह इ. मध्ये प्रविण, संपत्तीचे नियोजन, जेष्ठांचा उपदेश माननारा, दुरदृष्टी, नम्र, वेदांचे ज्ञान असलेला, शिक्षा करण्यामध्ये योग्य अयोग्य विचार, अश्व, गज, रथविद्येने परिपुर्ण, उपवास, तप, यज्ञ, अभ्यास यांचा भोक्ता, मंत्र्यांमध्ये प्रिय, जनसंग्रही, शांतवृत्ती, प्रसन्न भाव इ. उत्तम लक्षणे राजाची एक ते तेविस श्लोकापर्यंत दिली आहेत. राजाच्या दरबारातील सभासद पदावरील लोक धर्मशास्त्रज्ञानी, कुलवान, सत्यभाषी, मित्र आणि शत्रु यांच्याशी समभावाने वागणारे असावेत. तसेच त्यांनी सुसंस्कृतपणा, प्रेमभाव, द्वेषरहितवृत्ती, वानीत सभ्यता ठेऊन सभेत प्रवेश करावा असे छ. संभाजी महाराजांनी बुध्दभुषणम मधिल २४० व २४१ श्लोकात म्हटले आहेत." [११९] यावरून राजाची जबाबदारी व कार्य यावर प्रकाश पडतो. त्यांनी केलेले हे विश्लेषण हिंदू राजनीतीस धरून आहे.

पुढे सदाशिव शिवदे म्हणतात, "श्लोक २८५ ते ३२१ मध्ये म्हटले आहे. विपत्ती काळामध्ये राजाने कसे वागावे यासंबंधीचे वर्णन आहे. यात लूट संभाळणे शत्रु सैन्यावरील हल्ला, विद्या, शिक्षण, बलसंवर्धन, सज्जनपणा इ. गोष्टी तसेच राजाचे आरोग्य, धर्म, चित्त इ. अनेक गोष्टींची चर्चा केली आहे. राजाचा मुख्य प्रधान, सेनापती, पुरोहित, आले-गेले यासंबंधिची माहिती दूत पाठवून मिळविली पाहिजे. राज्यातील अंतर्गत शत्रूंचा शोध घेतला पाहिजे. तसेच धर्माची स्थापना केली पाहिजे. आणि सत्कार्यास प्रोत्साहित केले पाहिजे."[१२०] संकटाच्या समयी राजाने कोणती कर्तव्य पार पाडावी या बाबीचे हे दिशादर्शन महत्त्वाचे आहे.

## ४.१३ समारोप :

या प्रकरणात छत्रपती संभाजी महाराजांच्या जीवनकार्याचा शोध घेतला आहे. प्रमुख घटनांचा आढावा घेताना जुन्या साधनांची नव्याने पडताळणी केली आहे व काही नविन साधने वापरली आहेत त्यामुळे संभाजीला न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे. पूर्वीच्या अभ्यासकांनी छ. संभाजीवर अन्याय करणारे जे विश्लेषण केले त्यापेक्षा काही नवे पैलू प्रकाशात आणले आहे.

अशा प्रकारे या प्रकरणात छत्रपती संभाजीच्या जीवनकार्यावर चौफेर प्रकाश टाकला असून संभाजीच्या चरित्रातील प्रमुख घटना, बालपण व शिक्षण, गृहकलह, कट व काटशह, संभाजी अकबर युती, मोघलांशी संघर्ष, संभाजी-सिध्दी-पोर्तुगीज-इंग्रज संबंध इत्यादी पैलू चर्चिले आहे. अशा प्रकारे हे प्रकरण छत्रपती संभाजीच्या जीवनकार्यावर नवा प्रकाश टाकणारे आहे.

छ. संभाजी हे व्यसनी आणि बदफैली व्यक्तिमत्व नव्हते तर ते कुशल, कर्तव्यदक्ष आणि प्रजाहितदक्ष राजा होते हे त्यांचे चरित्र नवीन दृष्टीने अभ्यासले असता स्पष्ट होते आणि चिटणीस बखरीत जो पूर्वग्रह तयार करण्यात आला होता तो या प्रकरणात दूर करण्यात आला आहे.

पुढील प्रकरणात सामाजिक व आर्थिक जीवनाचे पैलू चर्चिले आहेत.

## संदर्भ ग्रंथसूची


१. प्रा.डॉ.पवार जयसिंगराव, "मराठी सत्तेचा उदय", निराली प्रकाशन पुणे, तृतीयावृत्ती, २००५, पृष्ठ १८५

२. सरदेसाई गो.स., "मराठी रियासद - उग्रप्रकृती संभाजी", खंड २, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, चौथी आवृत्ती, १९८९, पृष्ठ २०

३. प्रा. डॉ.पवार जयसिंगराव, उपरोक्त पृष्ठ १८६,

४. कित्ता पृष्ठ १८६

५. कित्ता पृष्ठ १८६

६. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २०

७. प्रा.डॉ.पवार जयसिंगराव उपरोक्त पृष्ठ १८६

८. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २१

९. प्रा.डॉ.बाहेकर एस.ए., "हुतात्मा छत्रपती संभाजी राजे - काल आणि कर्तुत्व", कसब प्रकाशन, जळगांव, प्रथमावृत्ती, १९९९, पृष्ठ १९

१०. कित्ता पृष्ठ १९

११. कित्ता पृष्ठ १९

१२. कित्ता पृष्ठ १२

१३ सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २१

१४. डॉ.पवार जयसिंगराव, उपरोक्त पृष्ठ १८७

१५. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २२

१६. कित्ता पृष्ठ २२

१७. कित्ता पृष्ठ २२

१८. डॉ.पवार जयसिंगराव उपरोक्त पृष्ठ १९०

१९. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २२

२०. डॉ.पवार जयसिंगराव उपरोक्त पृष्ठ १९१

२१. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २२

२२. कित्ता पृष्ठ २२

२३. कित्ता पृष्ठ २३

२४. कित्ता पृष्ठ २३.

२५. जोशी शं.ना., "छ. संभाजीकालीन पत्रसार संग्रह",प्रकाशक भा.इ.सं.मंडळ, पुणे १९४९

२६. डॉ.देशपांडे प्र.न., "मराठयांचा उदय आणि उत्कर्ष",स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, द्वितीयावृत्ती, २००१, पृष्ठ २५

२७ कित्ता पृष्ठ १८८

२८. कित्ता पृष्ठ २०५

२९. कित्ता पृष्ठ १८८

३०. कित्ता पृष्ठ १८८

३१. कित्ता पृष्ठ १८८

३२. डॉ.पवार जयसिंगराव उपरोक्त पृष्ठ १९१

३३. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ २४

३४. कित्ता पृष्ठ २४

३५. कित्ता पृष्ठ २७

३६. कित्ता पृष्ठ २७

३७. कित्ता पृष्ठ २८

३८. डॉ.पवार जयसिंग (संपा), ''छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ'',मंजुश्री प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९९०, पृष्ठ २०३

३९. कित्ता पृष्ठ २०४

४०. कित्ता पृष्ठ २०४

४१. डॉ.देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ १९१

४२. कित्ता पृष्ठ १९१

४३. कित्ता पृष्ठ १९१

४४. कित्ता पृष्ठ १९१

४५. कित्ता पृष्ठ १९१

४६. कित्ता पृष्ठ १९१

४७. कित्ता पृष्ठ १९२

४८. डॉ.पवार जयसिंग (संपा), ''छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ'',उपरोक्त पृष्ठ २०६

४९. डॉ.देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ १९२

५०. कित्ता पृष्ठ १९२

५१. कित्ता पृष्ठ १९३

५२. कित्ता पृष्ठ १९३

५३. कित्ता पृष्ठ १९३

५४. कित्ता पृष्ठ १९३-१९४

५५. कित्ता पृष्ठ १९४

५६. कित्ता पृष्ठ १९४

५७. कित्ता पृष्ठ १९४

५८. पवार जयसिंगराव, “मराठी सत्तेचा उदय”, निराली प्रकाशन पुणे, तृतीयावृत्ती, २००५, पृष्ठ २०१

५९. कित्ता पृष्ठ २०२

६०. कित्ता पृष्ठ २०२

६१. कित्ता पृष्ठ २०२

६२. डॉ. बाहेकर एस.ए., उपरोक्त पृष्ठ १०४

६३. कित्ता पृष्ठ १०४

६४. डॉ. देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ १९५

६५. कित्ता पृष्ठ १९६

६६. कित्ता पृष्ठ १९६

६७. कित्ता पृष्ठ १९६

६८. कित्ता पृष्ठ १९६

६९. डॉ. बाहेकर एस.ए, उपरोक्त पृष्ठ ११९

७०. डॉ. पवार जयसिंगराव, “मराठी सत्तेचा उदय”, निराली प्रकाशन पुणे, प्रथमावृत्ती, १९९६, पृष्ठ ३१०

७१. बाहेकर एस.ए., उपरोक्त पृष्ठ १२०-१२१

७२. कित्ता पृष्ठ १२१

७३. डॉ. पवार जयसिंगराव, उपरोक्त पृष्ठ ३१०

७४. डॉ. पिसुर्लेकर पा.स., “पोर्तुगीज मराठे संबंध अर्थात पोर्तुगीजांच्या दप्तरातील मराठयांचा इतिहास”, पुणे विद्यापीठ मुद्रणालय, पुणे, १९६७, पृष्ठ ८९

७५. डॉ.पवार जयसिंगराव उपरोक्त पृष्ठ ३१०-३११

७६. कित्ता पृष्ठ ३११

७७. कित्ता पृष्ठ ३११

७८. कित्ता पृष्ठ ३११

७९. कित्ता पृष्ठ ३१२

८०. कित्ता पृष्ठ ३१४

८१. डॉ.देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ १९९

८२. कित्ता पृष्ठ १९९

८३. कित्ता पृष्ठ १९९

८४. पिसुर्लेकर पा.स., (संपा), "मराठयांच्या इतिहासाची साधने पोर्तुगीज दप्तर" खंड २, प्रकाशन - महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७४, प्रथमावृत्ती, पृष्ठ १२

८५. डॉ.पवार जयसिंगराव (संपा), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ", उपरोक्त पृष्ठ २२३

८६. कित्ता पृष्ठ २२३

८७. डॉ.पवार जयसिंगराव, "मराठी सत्तेचा उदय",निराली प्रकाशन पुणे, तृतीयावृत्ती, २००५, पृष्ठ १९४

८८. डॉ.देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ १९७

८९. कित्ता पृष्ठ १९७

९०. कित्ता पृष्ठ १९७

९१. कित्ता पृष्ठ १९७

९२. डॉ.पवार जयसिंगराव, उपरोक्त पृष्ठ २०३

९३ कित्ता पृष्ठ २०३

९४. कित्ता पृष्ठ २०४

९५. डॉ.देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ २०२

९६. कित्ता पृष्ठ २०२

९७. पवार जयसिंगराव, उपरोक्त पृष्ठ २०४

९८. कित्ता पृष्ठ २०४

९९. डॉ.देशपांडे प्र.न., उपरोक्त पृष्ठ २०३

१००. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ ११४

१०१. डॉ.गोखले कमल, "शिवपूत्र संभाजी", कॉन्टीनेन्टल प्रकाशन पुणे, चौथी आवृत्ती, २००१, पृष्ठ ३३५

१०२. कित्ता पृष्ठ ३३६

१०३. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ ११६

१०४. डॉ.बाहेकर एस.ए., उपरोक्त पृष्ठ २६०

१०५. डॉ.गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ २२२

१०६. कित्ता पृष्ठ ३३८

१०७. शिंदे सरकार, "छत्रपती संभाजी महाराज - महापराक्रमी व परमप्रतापी", सहयाद्री प्रकाशन, इस्लामपूर, पृष्ठ १५९

१०८. कित्ता पृष्ठ १६०

१०९. कित्ता पृष्ठ १६०

११०. डॉ.पवार जयसिंगराव (संपा), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ", उपरोक्त पृष्ठ २६०

१११. कित्ता पृष्ठ २६०

११२. डॉ.गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ३४२

११३. डॉ.पवार जयसिंगराव (संपा), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ", उपरोक्त पृष्ठ २६४

११४. कित्ता पृष्ठ २६५

११५. शिंदे सरकार, उपरोक्त पृष्ठ १७३

११६. कित्ता पृष्ठ १०८

११७. डॉ.पवार जयसिंगराव (संपा), "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ", उपरोक्त पृष्ठ २६७

११८. जोशी पी.एस., छत्रपती संभाजी, प्रकाशन चंद व कंपनी, दिल्ली, प्रथमावृत्ती, १९९०, पृष्ठ ३०६

११९. शिवदे सदाशिव, "मराठयांच्या इतिहासाची संस्कृत साधने", प्रकाशक टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे, प्रथमावृत्ती २०१०, पृष्ठ २८०

१२०. कित्ता पृष्ठ २८२

# प्रकरण ५ वे

# छ. संभाजीकालीन सामाजिक व आर्थिक जीवनाचे पैलू

### *अ. सामाजिक जीवनाचे पैलू*

५.१ प्रस्तावना

५.२ समाजशास्त्रीय दृष्टिकोण

५.३ सामाजिक जीवनाचे पैलू

५.४ वतनदार समाज

५.५ मुस्लिम समाज

५.६ वेठबिगारी

५.७ गुलामगिरी

५.८ कुटूंबव्यवस्था

५.९ आहार

५.१० स्त्रीजीवन

### ब. आर्थिक जीवनाचे पैलू

५.११ प्रस्तावना

५.१२ शेती

५.१३ शेतीचे स्वरूप व प्रकार

५.१४ पीके

५.१५ इनाम प्रकार व स्वरूप

५.१६ शेतकऱ्यांची परिस्थिती

५.१७ शेतकऱ्यांच्या कल्याणाचे प्रयत्न

# प्रकरण ५ वे

# छ. संभाजीकालीन सामाजिक व आर्थिक जीवनाचे पैलू

## *अ. सामाजिक जीवनाचे पैलू*

### ५.१ प्रस्तावना :

मध्ययुगीन समाजजीवन हे सरंजामशाही स्वरुपाचे होते. सुलतानशाही व मोगलकालीन समाजाचे अविशिष्ट स्वरुप हे मराठेकाळातही प्रचलीत होते. त्यामुळे तत्कालीन रुढी परंपरा आणि सामाजिक चालीरीती या मराठा काळातही प्रचलीत होत्या. वा.कृ. भावे यांच्या मते, "शिवकाळात खेडी व शहरे यात विषमता उत्पन्न झाली नव्हती. तेंव्हा नगरे संख्येनेही फार थोडी व वस्तीनेही लहान होती. हल्ली ज्या नगरांची वस्ती लाखांनी मोजण्याइतकी आहे ती नगरे तेंव्हा सहस्त्रांनी मोजण्याइतकी लहान होती. लोकसंख्येच्या तुलनेने खेडयात जसे अंतर अगदी थोडे होते. तसेच सुखसोईतही होते."[१] यावरुन तत्कालीन समाजजीवनाची कल्पना येते.

समाजजीवनाचे आर्थिक जीवनही त्याकाळात वैशिष्टयेपूर्ण स्वरुपाचे होते. वा.कृ.भावे म्हणतात, "यंत्रकलेचा प्रादुर्भाव नसल्यामुळे मोठमोठया गिरण्या व कारखाने शहरात नव्हते. संपत्तीची विषम वाटणीही हल्लीप्रमाणे झाली नव्हती."[२] यावरुन सामाजिक व आर्थिक जीवनाचे चित्र स्पष्ट होते. तुलनेने ग्रामिण जीवन अधिक सुसहय होते. वा. कृ. भावे म्हणतात, "ग्रामीण जीवन नागरी जीवनासारखेच बऱ्याच अंशी असून ग्रामात जमीनदार, इनामदार, सावकार व त्यांच्या आश्रयाने शास्त्री, पंडीत, वैदयक, ज्योतिषी, वैदय, पुराणिक, हरीदास, गोंधळी, गायक, वादक, नर्तक, व्यापारी असल्यामुळे ग्रामिण जीवन समृध्द, सुखी, आनंददायक,

आरोग्यकारक बनून त्यातूनच राज्यास जरुर त्या सदगुणांचा सामर्थ्यांचा पुरवठा होत असे."[३] यावरुन शिवकालीन समाजाच्या आर्थिक जीवनाचे चित्र स्पष्ट होते. या प्रकरणामध्ये संभाजीकालीन सामाजिक जीवनाचा अभ्यास करावयाचा आहे.

प्रा. अ.रा. कुलकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे, "सतरावे शतक हे दख्खन देशाच्या इतिहासात विशेष क्रांतीकारक ठरले. या शतकात दक्षिणेत राजकीय बदल मोठया प्रमाणावर झाले. दख्खनच्या राजकारणावर मराठयांचा प्रभाव मालोजी-शहाजीच्या काळापासून पडत होता. त्याचीच परिणती पुढे शिवछत्रपतींच्या काळात मराठी सत्तेच्या स्थापनेत झाले. राजकीय बदलाबरोबरच त्याचे परिणाम स्थानिक, सामाजिक, आर्थिक जीवनावर पडणे स्वाभाविक होते."[४]

ग्रामजीवनाचे वैशिष्टये सांगताना प्रा. अ.रा. कुलकर्णी म्हणतात, "सतराव्या शतकात आणि त्यापूर्वीच्याही काळात सामाजिक आणि आर्थिक व्यवहाराचा केंद्रबिंदू म्हणजे खेडे होते. शेती व्यवसाय हाच जीवनाचा प्रमुख मार्ग असल्याने बहुतांशी लोक प्रामुख्याने त्यावरच अवलंबून असत. त्यामुळे खेडयाला अग्रस्थान तर होतेच पण तेथील लोकांचेही प्रमाण आजच्या खेडयांच्या मानाने अधिक होते असे दिसते."[५] यावरुन तत्कालीन ग्रामप्रधान लोकजीवनाची प्रचिती येते. मध्ययुगीन जीवनामध्ये खेडयांचे स्थान महत्त्वाचे होते. शेतीप्रधान जीवन असल्यामुळे लोक खेडयात राहत असत व परस्परावलंबी जीवन जगत असत. त्यांच्या आर्थिक गरजा हया ग्रामसंस्कृतीशी निगडीत असत.

### ५.२ समाजशास्त्रीय दृष्टीकोण :

ऐतिहासिक समाजशास्त्रीय दृष्टीने विचार करता इतिहासाची मांडणी ही सामाजिक स्थित्यंतराच्या आधारे करावी लागते. प्रा. गुरुनाथ नाडगोंडे म्हणतात, "एकूण मानवी संस्कृतिचे योग्य आकलन ऐतिहासिक अभ्यास पध्दतीने होऊ शकते कारण कोणत्याही

सामाजिक घटनेचे यथार्थ आकलन करुन घेण्यासाठी त्या घटनेचा उगम व विकास कसा झाला हे पाहणे उद्‌बोधक ठरत असते. समाजशास्त्रात १९ व्या शतकात विकासावादी तत्त्व अत्यंत प्रभावी ठरेल याचे हेच कारण आहे."[६] या सूत्राच्या आधारे येथे छ. संभाजीकालीन समाजजीवनाचा अभ्यास करावयाचा आहे. सामाजिक इतिहासामध्ये समाजजीवनात झालेले सूक्ष्म बदल हे अत्यंत काळजीपूर्वक नोंदविता येतात. या बदलांच्या आधारे साक्षेपी वेध घेऊन नवी मीमांसा करता येते. प्रा. नाडगोंडे यांनी पुढे असे म्हटले आहे की, "कोणत्याही सामाजिक घटनेचा अगर सामाजिक संस्थेच्या योग्य आकलनासाठी त्याचा उदगम व विकास पाहिला पाहिजे त्यासाठीच ऐतिहासिक अभ्यास पध्दती अगत्याची ठरते. म्हणूनच जे सामाजिक शास्त्रज्ञ वर्तमानकाळातील घटनांचा मागोवा घेतांना त्या घटनांचा भूतकाळ लक्षात घेत नाहीत. ते संशोधनाच्या दृष्टीने फार मोठा धोका पत्करतात."[७] यावरुन गतकालीन समाजजीवनाचे आकलन करतांना येथे रुढी परंपरा तसेच चालीरीती व कालसापेक्ष होत असलेल्या बदलांचा शोध घेऊन त्यांची मीमांसा करावी लागते.

Barkhamption कोशात सामाजिक इतिहासाची मांडणी करतांना पुढील पैलूंवर भर दिला आहे. प्रचलीत सामाजिक व्यवस्था, त्या व्यवस्थेतील नियंत्रीत घटक, त्यांचा सामाजिक वर्तनावर पडणारा प्रभाव या तीन घटकांसंदर्भात समाजशास्त्रीय दृष्टीने इतिहासाची मिमांसा करता येते.[८] लोकइतिहाच्या अभ्यासात त्याकाळातील सामाजिक व्यवस्थेचे आकलन करावे लागते. तसेच कुटुंब, धर्म, रूढी, परंपरा यांचे त्यावरील नियंत्रण व त्यांचा प्रभाव हे घटक बारकाईने अभ्यासावे लागतात.

नवसमाजशास्त्रीय दृष्टीबाबत प्रा. गुड व हॅट म्हणतात, समाजशास्त्र हे तुलनेने नवे सामाजिकशास्त्र असून या शास्त्राचा अभ्यास करतांना नवे परिणाम वापरुन त्याआधारे मिमांसा करावी लागते.[९] त्यामुळे ऐतिहासिक समाजशास्त्राच्या दृष्टीने

गतकालीन जीवनाचा अभ्यास करतांना संकल्पना व व्यवहार या दोन्हीही दृष्टीने अभ्यास करावा लागतो.[१०] या दृष्टीने मध्ययुगीन समाजजीवनातील सामाजिक व आर्थिक पैलूंचा येथे अभ्यास केला आहे.

## ५.३ सामाजिक जीवनाचे पैलू :

गतकालीन समाज जीवनाचे विविध पैलू अभ्यासतांना विविध घटकांचे साक्षेपी आकलन करावे लागते. यासंदर्भात येथे पुढील पैलूंवर प्रकाश टाकला आहे.

### ३.१ समाजरचना :

मध्ययुगीन समाजरचना ही प्राचीन समाजरचनेच्या स्वरुपाचा विस्तार होती. वाकाटकांच्या नंतर हळूहळू चार वर्णाचे जातीमध्ये रुपांतर झालेले दिसते या जातींना समाजात वेगळी वागणूक मिळू लागली.[११] वाकाटक काळानंतर मध्ययुगाच्या प्रारंभापर्यंतचा इतिहास पाहता असे दिसते की, प्राचीन वर्णव्यवस्था परंपरेचे रुपांतर जातीव्यवस्थेत झाले. वर्णव्यवस्थेची लवचिक चौकट बदलून तिचे रुपांतर घट्ट अशा जातीव्यवस्थेमध्ये झाले त्यामुळे समाजातील अभिसरणाची प्रक्रिया संपली. मध्ययुगीन समाज जीवनाबद्दल प्रा. के.एन. चिटणीस म्हणतात, "महाराष्ट्रीयन समाजात बऱ्याच जाती, उपजाती आणि त्यांच्या पून्हा उपशाखा असून त्यांच्यामधील भेदभावाचे निवारण करणे किंवा तो कमी करणे जवळजवळ अशक्यच होते. धर्मशास्त्रात सांगितलेली वर्णपध्दती येथील जातीय पध्दतीला लागू पडत नव्हती. मूळ ठिकाण, उच्च वंश, कुल, पंथ, व्यवसाय अशा अनेक प्रकारच्या कारणांवरुन जाती आणि उपजाती अस्तित्त्वात आल्या होत्या."[१२] ही तत्त्वे तत्कालीन समाजजीवनात प्रभावीपणे आढळतात.

भारतीय समाज जीवनाबद्दल प्रा. एम.जी. कुलकर्णी म्हणतात, "प्रमाणक व्यवस्थेमध्ये व्यक्तीच्या सामाजिक जीवनातील एकंदर वर्तनाला दिशा दाखवून त्याला योग्य आणि विशिष्ट चाकोरी निर्माण करुन देणाऱ्या लोकनीती, लोकाचार, रुढी, परंपरा या गोष्टी येतात. विधी आणि संस्कार यांचा या प्रमाणक व्यवस्थेमध्ये समावेश होतो."[१३] छ. संभाजीकालीन समाजजीवनावरही या प्रमाणक घटकांचा प्रभाव विशेषपणे जाणवतो. त्यामुळे तत्कालीन समाजरचनेचा अभ्यास करतांना या सर्व पैलूंचे आकलन करणे अपरिहार्य ठरते. प्रा. अ.रा.कुलकर्णी म्हणतात, "१७ व्या शतकात सरकारी प्रलोभनामूळे उजाड पडलेल्या खेडयांची पुनर्वसाहत झाल्याची उदाहरणे आढळून येतात. अशी ही खेडी क्रमशः विस्तार पावत गेली असावीत."[१४] यावरुन तत्कालीन समाजजीवन हे ग्रामप्रधान होते. असे म्हणता येईल.

तत्कालीन समाज हा वर्ण जातींनी भरलेला होता. "हिंदू समाजातील वर्णव्यवस्था ही हिंदू धर्माचे प्रधान किंवा एकमेव लक्षण बनण्याइतकी महत्त्वाची मानली जाते."[१५] अगदी प्राचिन काळापासून ते मध्ययुगापर्यंत वर्ण व जातीचा प्रभाव कायम होता. व तो भारतीय व्यवस्थेचा महत्त्वाचा भाग असल्याचे दिसून येते. मध्ययुगीन जात व वर्णव्यवस्थेबाबत अभ्यासक म्हणतात, "मध्ययुगीन भारतीय समाज चातुर्वण्य व्यवस्थेत सामावलेला दिसून येतो."[१६] याच काळात वर्णव्यवस्थेचे रुपांतर जातीव्यवस्थेत झाले. त्यामुळे समाजातील स्थित्यंतराची प्रक्रिया खंडीत झाली. प्रा. सावंत म्हणतात, "वर्णव्यवस्था ही समाजामध्ये पूर्णपणे रुजली व त्यातूनच जातीसंस्थेचा वृक्ष फोफावला."[१७] छ. संभाजीकालीन महाराष्ट्र हा जातीपाती व नात्यागोत्याच्या रक्तसंबंधावर आधारलेला होता असे म्हणता येईल.

**अ. हिंदू समाज :**

शिवकाळात महाराष्ट्रामध्ये हिंदू समाज हा प्राधान्याने रहात होता. तो सनातनी व परंपरावादी होता. त्याचे स्वरुप सांगताना पु.ग. सहस्रबुध्दे म्हणतात, "भारतातील कोणत्याही प्रदेशाच्या समाजरचनेचा विचार करावयाचा म्हणजे प्रथम चातुर्वर्ण्याचा विचार करावा लागतो. हिंदू समाज म्हणजे चातुर्वर्ण्य आणि चातुर्वर्ण्य म्हणजे हिंदू समाज अशी अभिन्नता आज हजारो वर्ष आहे. महाराष्ट्रही त्याला अपवाद नाही."[१८] मध्ययुगात तर महाराष्ट्रात हे सूत्र अधिकच गडद होते. त्यामुळे सामाजिक विषमता व बाबी अपरिहार्य होत्या.

**१. ब्राह्मण :**

ब्राह्मण म्हणजे ज्याला पारंपारिक व धर्मशास्त्रीय आधारान्वये पूजा-अर्चा करण्याचा अधिकार आहे. तो जे करतो ते सर्व धार्मिक विधी करीत असतांना पुरोहितपणा करतो. अध्ययन आणि अध्यापन करतो. यज्ञ, होम करतो. वेदशास्त्रात पारंगत असतो. [१९] दत्ता भगत म्हणतात, "शिवकाळात ब्राह्मणांना सर्वोच्च आणि सन्मानांचे स्थान होते. ब्राह्मण सर्व प्रकारचे धार्मिक विधी पार पाडत असत. त्याचा मोबदला म्हणून त्यांना दक्षिणा मिळत असे. हेच त्यांच्या उदरनिर्वाहाचे प्रमुख साधन होते. छ. शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक केलेल्या गागाभट्टाला भरपूर दक्षिणा मिळाली होती."[२०] छ. संभाजीच्या काळातही ज्ञानी, विद्वान व पंडीत ब्राह्मणांना आर्थिक सहाय्य दक्षिणेच्या स्वरूपात केले जात असे. काही वेळा त्यांना भूमी व गावेही दान केली जात असत.

देशपांडे प्र.न. म्हणतात, "छ. शिवाजी महाराज ब्राह्मणांचा आदर करीत असत. ते गोब्राम्हण प्रतिपालक होते."[२१] त्यांनी गरीब ब्राह्मणांना धर्मार्थ ठराविक द्रव्य देण्याची व्यवस्था केली होती.[२२] दत्ता भगत म्हणतात, " छ. संभाजीही अपवाद नव्हते.

अष्टप्रधान मंडळात केवळ सेनापती पदावरच मराठा जातीतील व्यक्तीची निवड केल्याची आढळते बाकी सात पदावर ब्राम्हणांचीच निवड केल्याचे आढळते."[२३]

यावरुन ब्राह्मणांच्या सामाजिक आर्थिक स्थितीची कल्पना येते. शिवकाळात असलेला ब्राह्मणांचा प्रभाव छ. संभाजीच्या काळातही तसाच होता. शिवकाळात ब्राह्मणवर्गास आदराचे स्थान होते तसेच आदराचे स्थान छ. संभाजीकाळातही होते. अध्ययन, अध्यापन व धार्मिक कार्य ते करत असत. तसेच मुत्सद्दीगिरीच्या बाबतीतही या वर्गास महत्त्वाचे स्थान होते. ब्राह्मणांत कायस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडी, प्रभू, चितपावन इ. अनेक भेद होते. व त्यांच्या हक्कावरुन व उच्चनीचतेवरुन सतत संघर्ष चालत असत. [२४] ब्राह्मणांचा जो वर्ग राजसत्तेच्या निकट असे त्याचा प्रभाव अधिक असे. शिवकाळात देशस्थ तर पुढे पेशवाई कोकणस्थ ब्राह्मणांचे वर्चस्व होते. याशिवाय ब्राह्मण जातीत भिक्षुक ब्राह्मणांचा मोठा वर्ग होता. यात यजुर्वेदी, सामवेदी, तैतरिय, वाजसेनिय, गोसावी, जोशी, याप्रकारच्या पोटजातींचा समावेश होता. [२५] एकंदर ब्राह्मणवर्ग सर्वश्रेष्ठ समजला जात असला तरी त्यातील अंतर्गत कुल, गोत्र, विवाह हे शिवकाळ तसेच छ. संभाजीकाळातही चालू असल्याचे दिसून येते.

**२.क्षत्रिय अथवा मराठा समाज :**

डॉ. बाहेकर म्हणतात, "ब्राह्मणानंतर समाजात क्षत्रियांचे स्थान होते. खेडयातील बहूसंख्य लोक क्षत्रिय असत त्यांनाच मराठे म्हणून ओळखले जाई. मराठयांच्या ९६ कुळींचे वर्णन आढळते. छ. शिवाजी महाराजांनी राज्याभिषेक करुन घेवून मराठयांचे क्षत्रियत्व सिध्द केले होते. त्यांना मराठे म्हणून ओळखले जाई. मराठयांच्या ९६ कुळी प्रसिध्द होत्या."[२६] या कुळातील जातींना विशेष प्रतिष्ठा होती तसेच विवाह प्रसंगी समान दर्जा राखतांना खालील कुळांचा शोध घेतला जात असे. अहिराव,

ढवळे, पालवे, मोरे, आंग्रे, ढेकले, पालांडे, मोहिते, कदम, आंगणे, ढोणे, पिंगळे, राठोड, इंगळे, तावडे, पिसाळ, राष्ट्रकुट, तुवर, फडतरे, काळे, फाळके, काकडे, फाकडे, कोकाटे, फाटक, खंडागळे, बागवे, खडतरे, बागराव, खैर, बांडे, गव्हाणे, बाबर, गुजर, भागवत, गायकवाड, भोसले, घाटगे, भोवरे, चव्हाण, भोगले, चालुक्य, भोईटे, जगताप, मधुरे, जगदळे,राणे, तेजे, राऊत, थोरात, रेणुसे, थोटे, लाड, दरबारे, वाघ, दळवी, विचारे, दाभाडे, शेलारे, धर्मराज, शेखपाल, देवकते, शिंदे, धायबर, शितोळे, धुमाळ, शिर्के, नलावडे, सालवे, नलिंधरे, सावंत, निकम, साळुंके, निसाळ, मालप, जगधने, माने, जाधव, मालुसरे, ठाकुर, महाडीक, धमाले, ह्याबर, ढमढेरे, मुळीक, सांबरे, पवार, सिसोदे, प्रतिहार, सुर्वे, पानुसरे, हंडे, पांढरे, हरफळे, पठारे, क्षिरसागर इत्यादी.

"मराठा जातीमध्ये मराठा आणि कुणबी अशा दोन शाखा असल्याचे आढळते. कुणबी जातीत देश कुणबी आणि कोकण कुणबी असे दोन प्रमुख भाग पडतात."[२७] वास्तविक पाहता कुणबी हे गरीब शेतकरी होते. महाराष्ट्राच्या काही भागात लेवा किंवा लेवा कुणबी या नावानेही संबोधले जाते. कुणब्यांना लढाई करण्याची परंपरा नाही. लेवा कुणबी हा कामात सतत मग्न असतो. शेती, पशुपालन, हा त्यांचा प्रमुख व्यवसाय होता. डॉ. जी.एस.घुर्ये हे मराठा आणि कुणबी याबद्दल माहिती देतांना म्हणतात की, "Among the Marathas there are two classes Viz; Kadu or bitter of Akarmashe or bastards and that among the farmer some families of high social position allow their sons, but not their daughrers to marry into ordinary Maratha families"

मराठा जातीत कडू आणि गोड असे दोन भाग असून त्यांच्यात रोटी व्यवहार चालतो परंतु बेटी व्यवहार चालत नाही.[२८] अशा प्रकारचे समाजभेद हे रूढीपरंपरेवर आधारलेले असत. त्यामागे सामाजिक इब्रत व प्रतिष्ठेच्या कल्पना निगडीत असत. कर्वे इरावती पुढे म्हणतात, "मराठा आणि कुणबी यांच्यात फार मोठा फरक असे त्यांच्यात कन्यादान कोणत्याही परिस्थितीत होत नसे. मराठे लोक कुणब्यांपेक्षा श्रेष्ठ समजत असत मराठे राज्यकर्ते व गावचे वतनदार होते. कुणब्याला शेती, पशुपालन, दुधव्यवसाय, शेतमजूरी इ. व्यवसाय करावे लागत."[२९] शिवकाळामध्ये स्वराज्य हा उद्देश समोर होता. त्यामुळे परस्पर मतभेद असले तरी ते दिसत नव्हते. छ. संभाजी महाराजांच्या काळात मात्र सत्तेत दोन तट पडले व मराठे विभागले गेले त्याचा फायदा मोगलांना मिळाला.

**३. वैश्य समाज :**

बिरादार टी.के. म्हणतात, "मध्ययुगीन महाराष्ट्रात उदीम करणारे वैश्य वर्गातील बहुतेक लोक गुजरात व कर्नाटकातून महाराष्ट्रात आल्याचे दिसून येते. महाराष्ट्रातील व्यापार मराठी माणसांच्या हातात नव्हता. याच लोकांनी बाजारपेठेत आपले स्थान बळकट केल्याचे दिसते. डोक्यावर अथवा जनावरांच्या पाठीवर व्यापारी माल लादून खेडयाखेडयातून फिरून व्यापार करणारा हा वैश्य वर्ग होता. शिवकाळापासून महाराष्ट्रात शेटे, महाजन हे पेठेचे वतनदार होते. पेठ वसविने आठवडी बाजार भरविणे व त्यांची व्यवस्था पाहणे हे या वतनदारांचे काम होते. शिवाजी महाराजांनी व्यापाराकडे लक्ष देऊन व्यापाऱ्यांना सवलती व संरक्षण देण्याचे धोरण स्वीकारल्याचे दिसून येते. त्यामुळे स्वराज्यात अनेक ठिकाणी बाजारपेठा उदयाला आल्या होत्या. रायगड, ठाणे, कुलाबा, कल्याण, भिवंडी, राजापूर इ."[३०] संभाजीच्या काळामध्ये या आर्थिक व्यवस्थेत बदल झाले नाहीत. परंतु दुष्काळ तसेच नैसर्गिक आपत्ती यामुळे अन्नधान्याच्या टंचाईला तोंड दयावे लागले.

## ४. समाजातील कनिष्ठ वर्ग :

शिवकालीन समाजात अनेक कनिष्ठ वर्ग अस्तित्त्वात असल्याचे दिसून येते. कारागीर, कलाकार व कमी प्रतीचा व्यवसाय करणारे या सर्वांचा त्यात समावेश होत होता. संभाजीकाळातही हा कनिष्ठ वर्ग कार्यरत होता.

### अ. बारा बलुतेदार :

डॉ. अ.रा. कुलकर्णी म्हणतात, "मध्ययुगीन महाराष्ट्रात ग्रामीण भागातील सेवकांना बलुतेदार या संज्ञेने ओळखले जात होते. महाराष्ट्रात बहुतेक खेडयांचा समावेश होता. 'खेडी' ही आर्थिक जीवनाचा केंद्रबिंदू होती त्यामुळेच प्रत्येक खेडे आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण बनलेले होते. याकाळात ग्रामीण जीवनात बलुतेदारी पध्दतीला फार महत्त्व प्राप्त झाले होते कारण शेती व्यवसायाच्या अगदी प्रारंभापासूनच शेतीला पूरक अशा ग्रामसेवक या संस्थेचा उदय होत गेला. शिवपूर्व काळापासून ग्रामीण जीवनात बलुतेदारी प्रचलीत होती. प्रत्येक खेडेगावात बारा बलुतेदार असत. त्यांना ग्रामीण जनतेच्या सेवेच्या पोटी प्रामुख्याने धान्याच्या रुपाने मोबदला मिळत असे. त्यास बलुता असे म्हणत."[३१] बलुतेदारी पध्दत ही सामाजिक लाभाच्या घटकाची मांडणी करते त्यामुळे तत्कालीन व्यावसायिक घटकांना वस्तू सहाय्य करण्याचा हेतू होता.

धान्य उत्पादनातील काही हिस्सा धान्याच्या रुपात अथवा प्रसंगी पैशाच्या रुपात बलुतेदारांना जे वेतन मिळत असत त्याला बलुता म्हणत क्वचित प्रसंगी बलुतेदारांचा उल्लेख 'बळीचा भाऊ' शेतकऱ्यांचा भाऊ असा केला जात असे.[३२] छ. संभाजीकाळातही आर्थिक जीवन शेतीवर आधारलेले असल्यामुळे बलुतेदारांचे प्रभुत्व होते.

**१. सुतार :**

डॉ. अ. रा. कुलकर्णी म्हणतात, "शेतकऱ्यांना लागणारी सर्व प्रकारची लाकडी अवजारे किंवा वस्तू तयार करणे किंवा त्यांची दुरुस्ती तो मोफत करून देत असे. सुतार लाकडापासून नांगर, पाभर, तिफन, बैलगाडी, कोळपे, बखर इ. शेतीउपयोगी अवजारे बनवीत असे." [३३] सुतार समाज हा संस्कारांनी युक्त होता तो उपनयनविधी करत असे. त्याचे राहणीमाण हे ब्राह्मणांच्या जवळचे असे. पुढे म्हणतात, "सुतारात पुढील पोटजाती होत्या मराठे सुतार, देशी सुतार, कोकणी सुतार, गुजराती सुतार इ."[३४] सुतारांकडून कलाकुसरींची कामे करून घेतली जात असत. मराठेकालीन राजवाडयातील लाकडी कलाकुसरीचा दर्जा अव्वल दर्जाचा होता छ. संभाजीचा काळ त्यास अपवाद नाही.

**२. कुंभार :**

आप्पासाहेब पवार यांच्या मते, "बलुत्याच्या बदल्यात कुणबी शेतकऱ्याला मातीच्या घागरी, ताकाचा डेरा, इतर भांडी पुरवित असे. अक्षय तृतीया, नवरात्र, विवाह, उत्सव आणि समारंभाच्या वेळी तो मातीची भांडी देत असे. तो पोळयाच्या दिवशी बैलाच्या प्रतिमा आणि गौरी उत्सवाच्या वेळी गौरी प्रतिमा सर्व गावकऱ्यांना बनवून देत असत. गुऱ्हाळाच्या हंगामात कुंभार शेतकऱ्यांना चाक पुरवीत असे."[३५] कुंभाराचे हे काम छ. संभाजीच्या काळातही चालू होते. त्यांच्या कार्याचा कृषी व औद्योगीक विकासात महत्त्वाचा वाटा होता. इरावती कर्वे म्हणतात, "कुंभारात जवळपास बारा पोटजाती आढळतात. सर्व जाती व्यवसायावरून पडलेल्या आहेत. प्रत्येक जातीची मातीची भांडी बनविण्याची कला एकमेकांच्या कलेपेक्षा वेगळी आढळते. त्यामुळे प्रत्येक कुंभारांची नावे वेगवेगळी आढळतात. कुंभारांमध्ये पुढील पोटजाती किंवा नावे आढळतात. मराठे कुंभार, गुजराती कुंभारी, कोकणी राणा,

अहीर किंवा लहानचाके, लाड किंवा थोर चाके, परदेशी कुंभार, लिंगायत कुंभार इ."[३६] कुंभाराचा व्यवसाय हा मृदभांडी तयार करणे हा होता. सोळा संस्कारात तसेच जन्मापासून ते मृत्यूपर्यंत कुंभारास विविध प्रकारची भांडी तयार करावी लागत असत.

### ३. लोहार :

शेतकऱ्याला लागणाऱ्या सर्व लोखंडी वस्तू तयार करणे किंवा त्यांची दुरुस्ती करणे हे त्यांचे महत्त्वाचे काम होते. [३७] लोहाराला त्यावेळेच्या शेतीसाठी लागणारी अवजारे तयार करण्याचे काम करावे लागत असत. छ. संभाजीच्या काळातही त्यांची कामगिरी चालू होती.लोहाराचे काम हे तांत्रिक असे तो ऐरणीवर घनाने घाव घालून लोखंड तापवित असे. व शेतीची अवजारे तयार करीत असे. शेतकरी लोहार कामासाठी लोहाराला लोखंड आणि हाताखाली मदत करणारा गडी देत असे. शेतीसाठी लागणारा नांगराचा लोखंडी फाळ, पाभरीचे फारोळे, कोळप्यांच्या गोल्या त्याला दरवर्षी बलुते म्हणून अर्धा ते दीड शेर बी आणि हंगामाच्या शेवटी धान्याची रास पडल्यावर शेकडा पावने दोन प्रमाणे धान्य मिळत असे. लोहारात कोकणी लोहार, पांचाळ, मराठा लोहार व कन्नड लोहार इ. पोटजाती होत्या. संभाजीकाळातही या पोटजाती प्रचलीत होत्या.

### ४. न्हावी :

न्हावी हा आठवडे किंवा एक महिन्यांनी शेतकऱ्यांच्या हजामती करीत असे त्याबद्दल त्याला त्यादिवशी एक भाकरी आणि दरवर्षी प्रत्येक माणसामागे दोन ते चार पायल्या धान्य बलुते दिले जाई. समारंभ व मिरवणूकीत मशाल धरणे हेही न्हाव्याचे काम होते. मशाल धरणाऱ्याला वाजंत्री असे म्हणत. विवाह, सण, उत्सव प्रसंगी गावकऱ्यांची आणि वतनदारांची अनेक प्रकारची कामे त्याला करावी लागत असत. त्याचा मोबदला

मात्र वेगळा मिळत असे. विवाहप्रसंगी जेव्हा वर गावात येई तेंव्हा न्हावी त्याचा घोडा धरुन त्यास वधुग्रही नेत असे. या जातीत वाजंत्री आणि मशालजी या दोन पोटजाती होत्या. [३८] छ. संभाजी काळात बलूतेदारांचा पारंपारिक जीवनाशी संबंध असल्यामुळे त्यांना समाजात महत्त्वाचे स्थान होते. न्हावी हा गावच्या व्यवस्थेमध्ये केस कापण्याचे काम करत असे. तसेच तो आपल्या व्यवसायातून लोकांना उपयुक्त माहिती देत असे.

**५. परीट :**

गावकऱ्यांची सर्व प्रकारची कपडे धुणे हे परटाचे मुख्य काम होते. एखादया घरात मृत्यू झाला तर त्या घरातील सर्व कपडे धोबी धुवून देत असे. लग्न व मुंजीसारख्या शुभप्रसंगी धोब्याची गरज भासत असे. सुगीच्या दिवसांत कपडे धुतल्याबद्दल शिजलेले अन्नही मिळत असे. नवे कपडे धोब्याने धुतले तर गिऱ्हाईकाकडून नाममात्र पैसेही त्याला मिळत.

ग्रँटडफच्या माहितीप्रमाणे, "गावातील सर्व महत्त्वाच्या समारंभाच्या प्रसंगी जातीने हजर राहून समारंभाच्या जागेवर कापड अंथरुन सुशोभित करण्याचे काम त्याच्याकडे असे तसेच तो ज्या गावकऱ्यांची सेवा करीत असे त्यांना पासोडी नावाचे वस्त्र पुरविणे महत्त्वाच्या समारंभाच्या प्रसंगी मराठे लोक हे वस्त्र शालीसारखे आपल्या कंबरेभोवती बांधीत."[३९] कपडयाची स्वच्छता परीट वर्ग करीत असे. रामायण आणि महाभारत काळात परिटाचे स्थान महत्त्वाचे होते ते समाजामध्ये सार्वजनिक स्वच्छतेचे काम करीत असे. त्याच्या अंगीकृत कामाच्या निष्ठा या खरोखरच अद्भूत असत. छ. संभाजी काळातही परिटाचे महत्त्व निश्चितच वैशिष्टयपुर्ण होते.

### ६. गुरव :

गुरवाला ग्रामदेवतेची पूजा करण्याचे, देवाला पोशाख, दागिने घालण्याचे काम करावी लागत आणि हे सर्व कामे तो बलुत्याच्या बदल्यात करीत असे. गावजेवणावळीच्या प्रसंगी द्रोण-पत्रावळी तयार करण्याचे महत्त्वाचे काम त्याच्याकडे होते. गावातील ब्राह्मण कुटुंबांची तो मोफत सेवा करीत असे. ज्याप्रमाणे दौऱ्यात पाटलाबरोबर न्हावी जात असे त्याचप्रमाणे गुरव कुलकर्ण्याचे दप्तर वाहून नेत असे.

उत्सव, जत्रेच्या दिवशी गुरव वाद्य वाजवीत असे. मराठी लष्करात म्हणूनच गुरवाचा समावेश वादय वादक म्हणून झालेला दिसून येतो. गावच्या देवाचा पुजारी या नात्याने गुरवाला परंपरेनुसार देवळाची झाडलोट, दिवाबत्ती करणे, देवाला स्नान घालून पूजा करणे ही कामे तो करी. गावाच्या देवाच्या जत्रेत पालखी उचलण्याचा मान गुरवाचाच होता. ग्रामप्रशासनात गुरव ही जी सेवा करीत असे त्याच्या बदल्यात त्याला गावकऱ्याकडून बलुते आणि इनाम जमीनही दिली जाई. '[४०] गुरव हा मंदिरातील पुजा अर्चा करीत असे. तो नैवैद्दही दाखवित असे. गुरूवास त्याच्या नित्य कार्याबाबत बलूतेदारी पध्दतीमध्ये महत्त्वाचे स्थान होते.

### ७. जोशी :

जोशी याचे काम पंचांग वाचन करणे व शेतकऱ्यांना शेतीच्या कामाचे मुहूर्त काढून देणे हे होते. [४१] जोशी त्याच्या पवित्र व नियमबध्द वर्तनामुळे समाजात आदराचे स्थान प्राप्त करून असत. त्याच्याकडे धार्मिक कार्य दिले जात असत. तसेच महत्त्वाच्या सनसमारंभ प्रसंगी लोकांना धर्मविधीबाबत मार्गदर्शन करण्याचे काम जोशी करत असत. छ. संभाजी काळातही ही सर्व कामे जोशी चोखपणे बजावत असे.

## ८. सोनार :

सोनार हाही महत्त्वाचा बलुतेदार होता. हा नाणी पारखण्याचा आणि सोन्या-चांदीचे दागिने घडविणे, मोडणे, दुरुस्ती करणे इ. कामे करीत असे. हे सर्व कामे तो बलुत्याच्या बदल्यात करीत असे पण कौशल्यपूर्ण कामाबद्दल तो बाजारभावाप्रमाणे गिऱ्हाईकाकडून किंमत वसूल करीत असे. ग्रामप्रशासनात एक सभासद या नात्याने त्याला काही परंपरागत हक्क अधिकार प्राप्त झालेले होते.[४२] अन्य बलुतेदारांपेक्षा त्याचे स्थान वरचे होते. कारण त्याला बलुत्यापेक्षाही प्रत्यक्ष ऐवज मिळत असे. सोनार हा त्याच्या कौशल्यामुळे इतर बलुतेदारांपेक्षा अधिक प्रभावी ठरत असे. त्याच्या हातात सोने, चांदी व्यवहार असल्यामुळे त्याचे संबंध समाजातील धनिक वर्गाशी येत असत. हा वर्ग आपल्या आर्थिक क्षमतांमुळे समाजात चांगले प्रभुत्व निर्माण करून होता. विवाह प्रसंगी सोने चांदीचे अलंकार करून देणे हे त्याचे महत्त्वाचे काम होते. शिवाय लोकांच्या धार्मिक व सांस्कृतिक गरजा तो पूर्ण करत होता.

## ९. मुलान्ना :

मुसलमानी अमदानीत बारा बलुतेदारांच्या नामावलीत मुलान्नाचा समावेश झाला. गावच्या मज्जिदीची व कबरस्थानाची देखभाल करणे व गावचा खाटीक अथवा कसाई म्हणून काम करणे ही मुलान्नीची मुख्य कामे होती. मुसलमान समाजाचे सर्व धार्मिक विधी मुलान्ना करीत असे.[४३] काही वेळा गंडेदोरे करण्याचे व पीरास भजण्याचे कामही तो करीत असे. काही हिंदूही त्याची सेवा घेत असत. बलुते म्हणून शेतकरी दोन बैलाच्या नांगरामागे तीन पायली धान्य देत असे. मुलान्ना या हिंदू समाजातील जोशी वर्गाप्रमाणेच मुस्लिम समाजात धार्मिक क्षेत्रात महत्त्वाचे स्थान होते. तो विविध धार्मिक प्रसंगी त्या समाजास मार्गदर्शन करीत असे.

**१०. चांभार :**

चांभाराचे मोट शिवणे, तिला थिगळ लावणे, गोफनिला टवळे लावणे, जूना जोडा, आसूड सांधणे इ. कामे तो कुणब्याचे करीत असे. नवीन जोडा, आसूड, मोट इ. रोख पैसा पडत असे. चांभाराला कुणबी दोन शेर बी व शेकडा सव्वा दोन बलुते देत असे. [४४] त्याचे कार्य समाजउपयोगी होते. त्याला बलुत्याबरोबरच प्रत्यक्ष आर्थिक उत्पन्नही मिळत असे. चर्मकार हा लोकउपयोगी लघुउद्योजक होता. त्याला सामाजिक व आर्थिक विकासाच्या बाबतीत हिंदू समाजात महत्त्वाचे स्थान होते.

**११. महार :**

महार हा महत्त्वाचा बलुतेदार होता. [४५] शेती व सुरक्षिततेच्या दृष्टीने तो उपयोगी कार्य करीत असे. तो रयत आणि सरकार उपयोगी बलुतेदार होता. तो गावचा चालता बोलता इतिहास होता. महारांना पुढील कामे करावी लागत शेतकऱ्यांचे नांगर, बी, काठी, इ. सामान रोज सकाळी शेतावर नेणे व परत आणने, गुरांची साफसफाई करणे, सरपण फोडणे, शेतकऱ्यांचे निरोप देणे, लेकी सुना माहेरी आणने, सासरी पोहचविणे इ. कामे तो करीत असे. तो निष्ठावान लोकसेवक होता. त्याला संदेशवहनाची कामेही करावी लागत असत. तसेच त्याला गावच्या सुरक्षेततही महत्त्वाचे स्थान होते.

**१२. मांग :**

मोटेचे दोरखंड, चाबुक, चामडयांच्या वादया तयार करण्याचे काम तो करीत. गावच्या रक्षणाचे कामही त्याच्याकडे असे. गावकीच्या कामात मांगांचा सहभाग असला तरीही तो महाराच्या तुलनेत कमी प्रमाणात आढळतो. मांग ही महार जातीप्रमाणेच प्राचीन जात समजली जाते. त्यांच्या पुढील पोटजाती होत्या. घोडके, डफडे, पेंढारी, मांगगारुडी, होलीर, वाजंत्री इ. [४६] हे त्या-त्या वेळी नेमून दिलेली

कामे करीत असे. मांगाचे काम चामडी कमावणे आणि लोकांना उपयोगी होतील अशी कामे करणे ही त्याची जबाबदारी होती. हिंदू समाजव्यवस्थेत मातंगाला महत्त्वाचे स्थान होते. छ. संभाजीकाळही त्यास अपवाद नव्हता.

अशा प्रकारे बलुतेदार हे मध्ययुगीन समाजातील लघुउद्योजक होते. छ. संभाजी काळात या बलुतेदारांना आखून दिलेली कामे होती. शिवाय त्यांच्या बलुतेदारांचे दानही निश्चित होते. सोनार व चर्मकार हे बलुत्याशिवाय आर्थिक धनही मिळवित असत. त्यांचे हे लाभ त्यांचे स्थान उंचविणारे असे.

**ब. अठरा अलुतेदार :**

शिवकाळापासून समाजधारणेच्या दृष्टीने उपयुक्त अशी बलुतेदार पध्दत भरभराटीला आली होती. शिवपूर्व काळापासून समाजात जसे बारा बलुतेदार होते तसे अठरा अलुतेदारही होते. छ. संभाजीच्या काळात हे बलुतेदारांप्रमाणे अलुतेदार सक्रिय होते. त्यांचे कामे निश्चित करण्यात आली होती. व त्यांना मोबदला कसा द्यावयाचा याची पध्दतही ठरलेली असे. अलुतेदारांचा समावेश कसबी कारागीरात केला जात असे. ज्यावेळी त्यांच्या सेवेची गरज निर्माण होईल तेंव्हा ते कसबी कारागीर भागवीत असत. त्यामुळे ग्रामसेवकांच्या यादीत त्यांचेही स्थान आढळते. अलुतेदारांची सेवा काळाच्या ओघात कायमस्वरुपी भासू लागली तर त्यांचा समावेश केला जाई. म्हणून महाराष्ट्राच्या विविध भागात अलुतेदार आणि बलुतेदार यांची स्वतंत्र यादी केल्याचे दिसते. [४७] अलुतेदार हे छोटे उदयोजक म्हणून कलाकौशल्याची कामे करीत असत. छ. संभाजी काळातही अलुतेदारांचे कार्य गतीमान होते. अलुतेदारांना त्यांचा सेवेचा मोबदला रोखीतच दिला जाई आणि जोपर्यंत काम असेल तोपर्यंत हा मोबदला दिला जाई.

बलुतेदार आणि अलुतेदार एकमेकांमध्ये भावाभावाचे दृढ आणि जिव्हाळयाचे नाते मानत. हे सर्व जण कुणबी किंवा शेतकऱ्याला आपल्याला सांभाळणारी आई मानत. हे मायलेकरांचे नाते शेकडो वर्ष कायम टिकले त्यामुळे भिन्न जातीमध्ये एकोपा आणि कौटुंबिक जिव्हाळा निर्माण होत असे. अलुतेदार अठरा होते. त्यांची कामे पुढीलप्रमाणे होते.

**१. तेली :** गळीत धान्यापासून तेल काढणे आणि विकणे हे प्रमुख काम होते. "त्यांच्यात दोन जाती होत्या. एक बैले जे तेल काढण्यासाठी एका बैलाचा उपयोग करत. दोन बैले जे तेल गाळण्यासाठी दोन बैलाचा उपयोग करत."[४८] दोन्ही प्रकारचे तेली शिव व छत्रपती संभाजी काळात होते.तेल ही लोकांच्या जीवनात महत्त्वाची गरज असल्यामुळे तेली समाजास त्याच्या कौशल्यामुळे महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले होते.

**२. तांबोळी :** या जातीचे मुख्य काम म्हणजे विडयाची पाने पिकविणे आणि त्यांची विक्री करणे.

**३. साळी :** कापड विणण्याचे काम साळी लोक करीत असत.

**४. सनगर :** कांबळे तयार करणे.

**५. शिंपी :** कपडे शिवण्याचे काम करीत.[४९]

तांबोळी हा वर्ग विडयाची पाने संकलीत करणारा व विकणारा वर्ग होता. त्या काळात लोक चांगल्या भोजनानंतर पान खात असत. तसेच किमती वस्त्र तयार करण्याची कला साळी समाजास अवगत होती. तर संगर हे कांबळे तयार करत असत. व हे वस्त्र थंडीच्या काळात लोकांना उब देत असत. तर साळयाने विणलेली कपडे प्रत्यक्षात शिऊन देण्याचे काम शिंपी करत असे.

**६. माळी :** सन्नासुदीच्या दिवशी गावकऱ्यांना फुले देण्याचे काम माळी करीत असे. गावच्या देवाच्या पूजेसाठी फळाफुलांची लागवड करणे अशा स्वरुपाची कामे माळी लोक करीत. [५०] छ. संभाजी काळातही त्यांचे हे कार्य सातत्याने चालू होते. माळी या जातीत व्यवसायावरुन फुलमाळी, जीरेमाळी आणि हळदी माळी इ. पोटजाती निर्माण झाल्या. [५१] त्या पोट जाती शिवकाळापासून पेशवाईपर्यंत कायम होत्या. माळी लोक हे फुले व फळे यांचा व्यवसाय करत मध्ययुगातील ते पारंपारीक फुल व फळ उत्पादक होते.

**७. गोंधळी :** देवी व देवतांच्या उपासना करणे, गोंधळ घालणे, गोंधळी, वाघ्या, मुरळी, हे लग्नकार्य गोंधळ किंवा जागरण घालत व देवाच्या उत्सवात आपापली कामे करत असत. [५२] हा वर्ग आपली कला एका पिढीकडून दूसऱ्या पिढीकडे देत असे. त्याच्या कलात्मक अभिव्यक्तीमध्ये एक प्रकारची सामूद्रायिक प्रतिभा प्रकट होत असे. संभाजीकाळातही त्यांची ही भूमिका धर्म कार्य व मनोरंजनास पोषक होती.

**८. डवरी :** देवदेवतांच्या उपासना करुन गुजरान करणे

**९. भाट :** लग्नात बाण्या म्हणण्याचे काम भाट करतात. [५३] शिवकाळाप्रमाणे संभाजी काळातही असे भाट होते. भाटाचे काम स्तुती करणे हे होते. भाट आपल्या धन्याची तोंडभरून स्तुती करत व त्याबदल्यात त्यांच्या धन्याकडून दान व धन घेत असे.

**१०. ठाकूर :** हा जंगलात राहणाऱ्या काही जमातींचा पुरोहित असे. [५४] हे त्यांचे कार्य मध्ययुगाप्रमाणे छ. संभाजी काळातही चालू होते.हा पुरोहित आदिवासींच्या धार्मिक जीवनात महत्त्वाचे संदर्भ देत असे. त्यांच्या धार्मिक कार्यात मदत करत असे.

**११. मुलाना :** मुसलमानांचे धार्मिक विधी पार पाडणे हे काम मुलाना करीत असे.[५५] छ. संभाजी काळातही हा वर्ग होता.

**१२. जंगम :** जंगम हा लिंगायत जातीचा पुजारी होता.[५६] छ. संभाजी काळातही बीरशैव समाज होता. त्या भागात जंगमाचे कार्य अस्तित्वात होते. गावातून जंगम बेल, तुळशीपत्र, फुले पुरविण्याचे काम करतांना आढळतो.

**१३. वाजंत्री :** धार्मिक व मंगल कार्यात वादय वाजविणे हे त्याचे काम होते. हा वर्ग छ. संभाजीच्या काळात लग्नप्रसंगी वाद्य वाजवित असे.

**१४. घडशी :** हा बीन वाजविण्याचे काम करीत असे.

**१५. कलाकार :** कलाकार हे उत्सवात व यात्रात नृत्त्यगायन करीत.[५७] मनोरंजनाचे कार्य उत्सव प्रसंगी हा कलावंत वर्ग करीत होता. या कलाकारांना रंजन मुल्य होते व ते समाजाचे मनोरंजन करीत असत.त्यांना प्राप्त झालेल्या कला या मागिल पिढीकडून आलेल्या असत.

**१६. तराळ :** तराळ हे महारच असत. तराळ हे एक वतन असे.[५८] गावच्या रक्षणात त्याची भूमिका महत्त्वाची होती. गावाचे रक्षण करण्याचे काम तराळ करीत असत. त्याला यसकर असेही म्हणत. गावाची वेस सकाळ-संध्याकाळ उघडणे व बंद करणे ही त्याची अत्यंत महत्त्वाची जोखीम होती.

**१७. भोई :** श्रीमंत मालदारांच्या मेणे, पालख्या वाहून नेणे इ. कामे करीत असे. हा वर्ग छ. शिवाजी व छ. संभाजीच्या काळातही होता. गनिमी काव्याच्या लढाईत या वर्गाने महत्त्वाचे कार्य केले होते.

**१८. गोसावी :** हा तुणतुणे वाजविणारा कारागीर होता. भिक्षा मागणे हा त्याचा व्यवसाय होता.तो ही कला एका पिढीकडून दुसऱ्या पिढीच्या हाती देत असे.

बलुतेदारांप्रमाणेच आलुतेदारांचे छ. संभाजीकाळातील मुल्य हे अनन्यसाधारण महत्त्वाचे होते. कला, संस्कृती आणि लोकअभिरूचीची जोपासना करण्याचे कार्य हे सर्व आलुतेदार समर्थपणे करत असत. त्यामुळे त्यांचे स्थान आबाधित होते.

**क. भटका समाज :**

मध्ययुगीन महाराष्ट्रात अनेक भटक्या जाती होत्या. या सर्व जाती जमाती सतत भटकत राहून जीवन जगत असत. आज येथे उदया तेथे अशी त्यांची स्थिती होती. या जातीचे व्यवसाय पुढीलप्रमाणे होते.

**१. कैकाडी :**

महादेव शास्त्री म्हणतात, "बांबू व निरगुंडीपासून टोपल्या, केरसुण्या, पिंजरे व खेळणी तयार करण्याचे काम कैकाडी करत असत."[५९] छ. संभाजीच्या काळातही हा वर्ग अस्तित्त्वात होता. चोरी, जादूगिरी, चेटूक करण्याचाही व्यवसाय कैकाडी करत असत.[६०] तसेच तो करणी करण्यात अग्रेसर असे. ग्रामिण जीवनात छ. संभाजी काळातही त्याचे प्रभुत्व होते. शकुन अपशकुन आणि चेटूक यावर कैकाडी लोकांची श्रध्दा होती.

**२. बेरड :**

बेरड पराक्रमी व शूर होते. गाव व किल्ल्यांचे संरक्षण यासाठी त्यांची नियुक्ती केली जात असे.[६१] छ. संभाजी व शिवाजीच्या काळात हा वर्ग मराठा सरदारांना सहाय्य करणारा होता. हे लोक खंडोबाची पूजा करीत जादूटोणा व मंत्रतंत्रावर त्यांचा विश्वास होता.

**३. वैदू :**

वैदू लोक सुया, दाभन, फण्या, कंगवे, पिना, हस्तिदंताच्या बांगडय फिरते राहून

विकत. डॉ. बैसाने अनिल म्हणतात, “याही समाजात अंधश्रध्देचे प्रमाण आढळते. ते मारुती, मरिआम्मा या देवतांची पूजा करीत, देवतांना पशूबळी देत. जुडीबुटीचे औषध देण्याचाही धंदा हे लोक करीत. या समाजात बालविवाह पध्दत प्रचलीत होती.”[६२] हा समाज अंधश्रध्देने ग्रासलेला होता. या समाजाचे स्थान त्यांच्या अंगीकृत जीवनकार्यावर आधारलेले होते. छ. संभाजी काळातही हा वर्ग लोकांची सेवा करत होता.

### ४. पारधी :

शिकार करणे, औषध विकणे, पहारा देणे, जासुदाचे काम करणे ही कामे पारधी करीत असत. अंबा, भवानी, खंडोबा इ. पुजा करीत. त्यांना कोंबडे, बकरे बळी देत. पारधी जातीत फासे पारधी, भिल्लपारधी, पालपारधी, गायपारधी, हरणपारधी इ. पोटजाती होत्या.[६३] पारधी समाज हा भटक्या विमुक्त वर्गात मोडणारा होता. तो आपले जीवन सतत प्रवास करून घालवित असे. आपले पारंपारिक ज्ञान ते एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे देत असत. महाराष्ट्राच्या काही भागात छ. संभाजी काळातही पारध्यांची काही वस्ती होती.

### ५. कोमटी :

या जातीत जानव कोमटी, वाणी कोमटी व कडू कोमटी असे तीन प्रकार होते. जानव कोमटी जानवे तयार करीत. जानव्यांचा ठोक व्यापार करणे. तांबे, पितळ, लोखंडाची भांडी फिरुन विकणे आणि जुनी कपडे घेऊन नवीन कपडे देण्याचा व्यवसाय कोमटी करीत असत.[६४] हा वर्ग व्यापारी कार्य करीत असे. त्याची उद्यनशीलता लक्षणिय होती. त्याचे कार्य हे आर्थिक प्रतिष्ठेवर अवलंबून होते.

**६. कोल्हाटी :**

या जातीत मराठी, गुजराथी, डुकरे, पाळ, हरका, वले अशा पोटजाती होत्या. बार्शी तालुक्यातील माणकेश्वर हे कोल्हाटयांचे मूळ स्थान होते. दोरावरुन चालणे, उडया मारणे, नाचणे, कसरती करण्याचे काम कोल्हाटी करीत. फण्या व बाहुल्या तयार करुन विकण्याचेही काम ते करीत. डुक्कर कोल्हाटी, खांब कोल्हाटी व हरदास असे पोटभेदही या जातीत आढळतात. डुक्कर कोल्हाटी हे रानडुक्कर मारत.[६५] कोलाटयाचे जीवन हे अशा प्रकारे अस्थिर आणि तेवढेच तारेवरती कसरत करणारे होते. हा कलावंतांचा वर्ग लोकांचे मनोरंजन करीत असे.

**७. बुरुड :** हे लोक वेतापासून टोपल्या बनवीत आणि फिरुन विकत होते.

**८. बेलदार :** बेलदार हे विहीर खोदकाम व खडक फोडण्याचे काम करीत होते.

**९. पाथरवट :** हे लोक विहीर खोदकाम व खडक फोडत होते.

**१०. वडार :** "हे लोक दगड फोडण्याचे काम करीत होते ."[६६] वडार समाज हा कष्टकरी होता. घामगाळून श्रमातून ते आपले जीवन उभे करत असत. या सर्व भटक्या व विमुक्त जातींना त्यांच्या विशेष कार्यामुळे समाजात महत्त्वाचे स्थान होते. हा वर्ग उपजिविकेसाठी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी भटकंती करीत असे. यापैकी काहींनी स्वराज्याच्या सेवेत राहून महत्त्वाचे कार्य केले होते.

अशा प्रकारे भटका समाज हा छ. संभाजी काळातील लोकजीवनामध्ये महत्त्वाची भूमिका पार पाडत असे. अनंत प्रकारच्या हाल अपेष्टा व कष्टाची कामे करूनही त्यांच्या पदरी खडतर जीवन जगण्याची पाळी येत होती.

**ड. आदिवासी समाज :**

शिवकाळाप्रमाणेच छ. संभाजी काळातही महाराष्ट्रात आदिवासी जातीही होत्या.

त्यामध्ये भिल्ल, गोंड, दुबळा, वारली, गावीत, पावरा, रामोशी व ठाकूर या जातींचा समावेश होता.हा वर्ग धाडसी व पराक्रमी असल्यामुळे स्वराज्याच्या उभारणीत या वर्गाने महत्त्वाची कामगीरी पार पाडली होती. डॉ. अनिल बैसाने पुढे म्हणतात, "आदिवासी लोकांची एक वेगळी संस्कृती असून त्यांची स्वतंत्र बोलीभाषा आहे परंतू लिपी नाही. भिल्ल लोक लूटालूट करून सरकारला त्रास देत असत. त्यांचा भूताखेतांवर विश्वास होता. ते कालिका, वनदेवता आणि महादेवाची भक्ती करीत. त्यांना ते पशुबळी देत असत. गोंड लोक ग्रामदेवतांना रक्ताभिषेक करीत असत. त्यासाठी ते डुकराचा बळी देत. दुबळा या जातीतील लोकांचा मंत्रतंत्र, तोडगे, देवास पशूबळी देणे, कोंबडयांचा बळी देण्यावरही त्यांचा विश्वास होता. वारली जातीत भगत व मांत्रिकांना मोठे महत्त्व होते. गावीत व पावरा लोकही मंत्रतंत्र, जादूटोणा, भूतांवर विश्वास ठेवत, पावरा लोक भूतांनी त्रास देऊ नये म्हणून 'भूतका झूला' या देवाची पूजा करीत. रामोशी ही पराक्रमी आदिवासी जात असून रामोशी लुटालूट करून सरकारला त्रास देत. छत्रपतींनी रामोशांच्या शौर्याचा उपयोग स्वराज्यासाठी करून घेतला होता. रामोशांनी हेरगिरी करण्याची कामे केली. ठाकूर जातीचे मुळ स्थान महाराष्ट्रात नाशिक हे होते. मच्छिमारी आणि मजूरी करणे. हे ठाकूर लोकांचे काम करीत. पेरणी करीत असतांना कोंबडयांचा बळी देत असत."[६७] छ. संभाजीच्या काळातही या वर्गात रूढी, अंधश्रध्दा प्रचलीत होत्या. शिवाजी व संभाजीच्या स्वराज्यात शूद्र वर्गही स्वराज्य उभारण्यात पुढे होता. त्यांचे हे स्थान पुढे पेशवाईतही टिकून होते. जीवा महाला स्वराज्याचा पराक्रमी सरदार होता.जीवा महाला प्रमाणेच इतर अनेक क्षेत्रात शूद्र वर्गातील लोकांनी आपला वाटा उचलला होता. छ. संभाजीच्या काळातही पराक्रमी आदिवासींना त्यांच्या कामगिरीनुसार महत्त्वाची जबाबदारी सोपविली जात असे.

हिंदू समाजातील हा पराक्रमी वर्ग वनवासी होता. तो जंगलात राहून आपले जीवन कंठीत असे. त्याची धर्मश्रध्दा व पराक्रम यामुळे त्यांना त्याकाळामध्ये महत्त्वाची जबाबदारी सोपविली जात असे.

**५.४ वतनदार समाज :**

सरंजामशाही हे छ. संभाजीकालीन समाज जीवनाचे वैशिष्टय होते. शिवकाळापासून समाजात वतनदार हा स्वतंत्र घटक होता. गावात पुढील वतनदार वंशपरंपरेने असत. 'वतन या अरबी शब्दाचा वापर मुसलमानी अंमलाच्या काळात रूढ झाला. सरकारकडून एखादया ग्राम अधिकाऱ्याला मिळालेली देणगी म्हणजे वतन होय.'[६८] मोगलांनी अशी पद्धत सुरू केली. त्यामुळे सरदार वर्गास आर्थिक प्रतिष्ठा मिळत असे.

जातधंदा वंशपरंपरागत काम, चाकरी नेमणूक, उत्पन्न अधिकार, मानपान, हक्क, वडिलोपार्जीत मिळकत, जंगम मालमत्ता, जन्मभूमी या सर्वांना वतन शब्द लावतात. वतन धारण करणारा तो वतनदार. जोपर्यंत तो ग्रामअधिकारी गावाचे काम पाही. तोपर्यंत ती जमीन त्याच्याकडे राही. ती जमीन व्यक्तीच्या मालकीची राहत नसून कुटूंबाच्या मालकीची बनत असे. जोपर्यंत कुटुंबातील एखादी व्यक्ती प्रामाणिकपणे आणि प्रभावीपणे गावची नोकरी करीत राहील तोपर्यंत ती जमीन वंशपरंपरेने त्या कुटूंबालाच राही. वतनदारांचे पालनपोषण सारा गाव करीत असे. गावकऱ्यांकडून त्याला रोख किंवा वस्तूरूपाने त्याच्या चाकरीचा मोबदला मिळत असे. हे त्याचे हक्क सनदेत नमुद केलेले असल्यामुळे गावकऱ्याकडून त्याची वसूली तो कायदेशीरपणे करून घेत असे. सारावसुली आणि शेतीचा विकास ही वतनदारांची प्रमुख कर्तव्ये होती. मराठी माणसाने आपल्या जीवनात वतनाला फार महत्त्वाचे स्थान दिले होते. "राजकीय सत्ता प्राप्त करण्याचे वतन हे एक साधन होते."[६९] छ. शिवाजी

महाराजांनी स्वराज्यासाठी या परंपरागत वतनदारांचे महत्त्व ओळखून त्यांना सन्मान दिला होता. छ. संभाजीच्या काळातही ही पद्धत कायम होती. व्यक्तीचा सामाजिक दर्जा आणि प्रतिष्ठा यांचे वतन हे एक गमक होते. त्यामुळे सरकारातील उच्च पदापेक्षा लोक वतन अधिक पसंत करीत. गावच्या स्थैर्यासाठी आणि विकासासाठी सुनियंत्रित अशी वतनसंस्था मध्ययुगातील एक अनिवार्य संस्था होती. गावच्या प्रमुख वतनदारात पाटील, कुलकर्णी, चौगुला, शेटे, महाजन तर परगण्यात देशमुख, देशपांडे व महार या वतनदारांचा उल्लेख करता येईल.

**१. पाटील :**

पाटील हा गावचा 'राजा' होय. शं.ना. जोशी म्हणतात, "पाटीलकीचा उगम जर आपण पाहिला तर म्हणता येईल, जेंव्हापासून 'काळी'वा हितीला आली तेंव्हापासून पाटीलकीची निर्मिती झाली. दुर्गादेवीच्या दुष्काळानंतर जे जे गांव वसाहतीस आणले गेले ते प्रथम पाटलाकडूनच काळी आणि पाटील हा संबंध नित्य आहे."[७०] पाटलाचे मुख्य काम लावणी, संचणी, उगवणी इ. गावातील पडीक जमीन लागवडीखाली आणून तिच्यातून धान्य उत्पादन साधण्याचे काम पाटलाला करावे लागे. अशा रीतीने वसाहतीच्या कार्याला तो फार मोठया प्रमाणावर हातभार लावीत असे. राज्य व्यवहार कोशात म्हटले आहे. "अकृष्ट भूमिनीकर्दिः कर्दिस्तु फळभूमिका" म्हणजेच वर सांगितल्याप्रमाणे नाकीर्दी जमिन कीर्दीस आणून तिच्यापासून फळनिष्पत्ती घडवून आणणे ही पाटलाची जबाबदारी मानली जात असे. त्याला त्याच्या कर्तव्याची सतत जाणीव रहावी म्हणून त्याची निशानी देखील 'नांगर' हीच आहे.[७१] पाटील वर्ग हा गावचे नेतृत्व करीत असे. त्याला कृषक जीवनामध्ये महत्त्वाचे स्थान होते. गावातील जमिनीची लागवड चांगली व्हावी म्हणून त्याच्यावर महत्त्वाची जबाबदारी सोपविण्यात आली होती.

"पाटील हा गोतसभेचा प्रमुख असे. गोतसभेत वतनदार, बलुतेदार, मिरासदार यांचा समावेश होत असे. गावचा महसूल निश्चित करण्याची कामगिरी राजसत्तेची असली तरी हवालदार, कामवीसदार, कारकुन या राजपत्रीत अधिकाऱ्यांना पाटलाची संमती घेतल्याशिवाय शेतसाऱ्याबाबत अंतिम निर्णय घेता येत नसे. अवर्षण अथवा गनिमाच्या हालचालीमुळे गावाचे शिवार पीकले नाही आणि रयतेला सारा देण्याचे बळ राहीले नाही तर पाटील रयतेचे प्रतिनिधीत्त्व सरकार दरबारी करीत. आणि रयतेला सारासूट मिळून देई. आपल्या गावात थळकरी किती आहे, कोणत्या पिकाचे उत्पादन होते, सारा वसूली किती झाली, बाकी किती राहीली ही माहीती सरकारला पुरविण्याचे काम पाटलाचे असे."[७२] छ. संभाजी काळातही पाटील वर्ग ही कामे करीत असे.

गावचा सारा वसूल करण्याची सर्वस्व जबाबदारी पाटलाची असे. गावावर जो सरकारी सारा लादला असेल तो भरून देण्याची हमी तो घेत असे. कोणताही न्यायनिवाडा पाटलाशिवाय पूर्ण होत नसे. गावात शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करण्याची जबाबदारी पाटलाची असे. गावचा पाटील हा मराठा समाजाचा असे. पाटलाशिवाय गावचे सर्व काम अडून राहत असे. तेथे पाटलाची गावात राहून गैरमर्जी ओढवून घेणे हिताची नसे. संत तुकारामाने म्हटले आहे.

*"आता काय खावे, कोणीकडे जावे ।*

*गावात रहावे कोण्या बळे ।*

*कोपला पाटील ये गावीच्या लोका ।*

*आता मज भीक कोण घाली ।।"* [७३]

यावरून पाटलाचे तत्कालीन समाजातील स्थान स्पष्ट होते.

पाटलाची आर्थिक स्थिती कितीही हलाखीची झाली तरी त्याच्या सामाजिक प्रतिष्ठेला बाधा येत नसे. मराठीत एक म्हण आहे.

> "उतरंडीला नसे ना दाणा ।
>
> पण दादला असावा पाटील राणा ।"[७४]

यावरून पाटील या वतनाविषयी लोकमानसात असलेली भावना स्पष्ट होते. शं.ना.जोशी म्हणतात, "रानात स्वतःची इनामी जमीन व इतर जमिनीच्या उत्पन्नावर काही हिस्सा हे पाटलाचे उत्पन्न किंवा पाटीलकीची मिळकत होय."[७५] त्याचे हे अधिकार शिवकाळात अबाधीत होते. छ. संभाजी काळातही पाटलांला गावच्या व्यवस्थेत महत्त्वाचे स्थान होते. मानपान म्हणजे खेडयातील सणासुदीच्या अथवा इतर प्रसंगी पाटलाला मिळणारा अग्रहक्क होय. गावाच्या जत्रेचा तो प्रमुख नायक असे. सणासुदीच्या दिवशी गावकऱ्याकडून त्याला अनेक गोष्टी मिळत. उदा. होळीची पोळी, भाद्रपदात गणेशाची मुर्ती, मकरसंक्रांतीस तिळगूळ, तसेच दसरा, दिवाळी, गुढीपाडवा या सणांच्या दिवशी त्याला अनेक भेटवस्तू मिळत. महार, वाजंत्री, कारागीर यांच्याकडून तो विनामूल्य काम करून घेत असे. यावरून पाटलाची प्रतिष्ठा स्पष्ट होते.

### २. कुलकर्णी :

महसूल व्यवस्थेत पाटलाप्रमाणे कुलकर्णी हाही एक महत्त्वाचा घटक होता. "पाटलानंतर गावात कुलकर्णी वतन महत्त्वाचा परंतु पाटलापेक्षा दुय्यम दर्जाचा मुलकी अधिकारी होय. तो पाटलाचा सहाय्यक असे. त्यालाच गावकुलकर्णी म्हणत. त्याला मिळालेल्या वतनाला 'लेखनवृत्ती' म्हणत. त्याच्याकडे सर्व दप्तर असे. गावाच्या सर्व जमिनीची नोंद त्याच्याकडे असे. पाटलाच्या सर्व कामात त्याला कुलकर्णी मदत

करीत असे. शेतीतील उत्पन्न वाढविण्याकडे त्याला लक्ष दयावे लागत असे. प्रत्येक गावात कुलकर्णी असलाच पाहिजे असे दिसत नाही. एकच कुलकर्णी बऱ्याच गावांचे हिशोब ठेवत असे."[७६] पाटलाप्रमाणेच हे वतन वंशपरंपरेने असे.त्याच्याकडे गावाचा महसूलाचा व जमिन मालकीचा लेखी पुरावा ठेवण्याचे काम होते. कुलकर्णी दोन प्रकारचे भ्रष्टाचार करीत असे. कुळाकडून ज्यादा रक्कम वसूल करणे व जमा झालेल्या पैशाची दप्तरात नोंद न करणे या मार्गाने तो भ्रष्टाचार करीत असे. "जर एखादया वेळी कुलकर्णी घराणे निर्वंश झाले तर एखादा तात्पुरता मुतालीक नेमून नव्या कुलकर्ण्याच्या शोधात गावकरी असत. कुलकर्णी पणाचे वतन अशावेळी संपुर्ण गावाच्या मालकीचे होत असे. हे वतन विकत घेण्यासाठी जो पैसा दिला जात असे त्याला 'शेरणी' म्हणत असत."[७७] आपल्या लेखन कार्यातून कूलकर्णी गावच्या कारभारावर प्रभूत्व ठेवत असे. त्याच्याकडे महसूली नोंदीचे कार्य असे.

पाटील हा गावचा सर्वाधिकारी खरा पण प्रत्यक्षात त्याला कुलकर्ण्याच्या सल्ल्याप्रमाणे वागावे लागे. प्रसंगी एखादा हुशार कुलकर्णी, पाटलाला बाजूला सारून गोतसभेचे नेतृत्व करीत असे. पाटील हा फक्त नामधारी अधिकारी राहत असे. परगना संगमनेर या गावचा पाटील म्हणतो "आपण नावाचे पाटील गावात कारभार कुलकर्ण्याचा आहे." [७८] त्याचे हक्क पाटलासारखे असले तरी त्या हक्कापासून त्याला मिळणाऱ्या वस्तुंचे प्रमाण पाटलापेक्षा कमी असे. गावातील मानपानाबद्दल त्याचे स्थान दुय्यम असे. "गावकऱ्याकडून त्याला अनेक भेटस्वरूपात वस्तू मिळत . उदा. चंभाराकडून पायपोसा, शेतकऱ्याकडून घुगरी, गवत, तूप तर व्यापाऱ्याकडून फळे इ. हक्क कुलकर्ण्याला असत."[७९] त्यामुळे तो गावच्या व्यवस्थेत पाटलाप्रमाणेच प्रभावी व शक्तीशाली घटक होता. अशा प्रकारे कुलकर्णी हा महसूल अधिकारी होता.

### ३. चौगुला :

पाटलानंतर चौगुल्याचे स्थान महत्त्वाचे होते. शं.ना. जोशी म्हणतात, "चौगुला हा मुख्य पाटलाप्रमाणे गावलावनी करणे, गाववसुली करणे व ती वसूली दिवाणांत भरणा करणे, अशी कामे करणारा शेतशिवाराकडील वतनी अधिकारी आहे."[८०] त्याचे हे कार्य छ. संभाजी काळातही प्रचलीत होते. ते पुढे म्हणतात, "परागंदा झालेल्या रयतेला गावात परत आणण्याची कामगिरी तो बजावीत असे. पाटलाप्रमाणे त्याची निशाणी देखील नांगरच होती. गावधान्याच्या कोठारांची देखरेख करणे हे काम चौगुल्याकडे असे. गावातील धान्याची पेवें वगैरे चोरीस गेली तर त्या चोरीचा ठिकाणा लावून देणे हे काम प्रसंगी चौगुल्यावर पडे"[८१] याचा अर्थ असा की तत्कालीन कृषी जीवनाचा तो एक प्रभावी रक्षक होता. चौगुल्याचा गावात बराच दबाव असे. त्याला ठिकठिकाणी हिणविण्याकरीता एका लोकगीतात म्हटले आहे.

*"चौगुल्याच्या लेकी नको बोलूस चढईरू ।*

*कागदाचा भारा तुझ्या बापाच्या डोईवर ।।"*[८२]

अशा प्रकारचे संदर्भसुद्धा चौगुल्याचे महत्त्व सांगण्यात उपयुक्त ठरतात.

या लोकगीतावरून त्याच्याकडे कागदपत्रांची ने-आण असावी असे दिसते. चौगुला सामान्य मराठा जातीतील असे. परंतु काही ठिकाणी ब्राह्मण चौगुले, शिंपी चौगुले, माळी चौगुले, मुसलमान चौगुले आढळतात. चौगुले हे पाटलाचे सहाय्यक असत.

### ४. शेटे, महाजन :

हे महत्त्वाचे वतनदार होते. गावकीच्या कामात गुंतलेला आणखी एक खेडेगावातील वतनदार अधिकारी म्हणजे शेटे, महाजन होय. प्रत्येक खेडेगावात हे वतनदार असतीलच असे नाही. ज्या गावात पेठ किंवा कसबा असेल तेथे हे वतनदार

आढळतात. गावात पेठ वसविण्याचे काम शेटे करीत असत. तर पेठेचा हिशोब ठेवण्याचे काम महाजन करीत असत. गोतसभेत आणि गावातील सर्व सार्वजनिक कार्यात या वतनदारांचा सहभाग असे. "तराजू ही त्याची व्यावसायिक निशाणी होती. या दोन्ही वतनदारांना सरकारकडून इनाम जमीन व गावकऱ्यांकडून काही हक्क व मानपान प्राप्त झाले होते."[८३] शेटे व महाजन यांचे स्थान कुलकर्ण्यांपेक्षा वरचे होते ते गावच्या अर्थकारणात महत्त्वाची भूमिका पार पाडत असत. "गावाची वसाहत जशी पाटलाची जबाबदारी, तशी पेठेची जबाबदारी शेटेची असे."[८४] गावची आर्थिक व्यवहारातील त्याची भूमिका ही खरोखर महत्त्वाची असे. बाजारपेठेचे व्यवस्थापन त्यांना करावे लागत असे. आर्थिक रचनेत शेटे हे महत्त्वाचे कार्य करीत असत.

**५. देशमुख :**

देशमुखांना स्थान महत्त्वाचे होते. खरे गणेश हरी म्हणतात, "देशमुख व देशपांडे हे परगण्याचे वतनदार अधिकारी होते. महाराष्ट्रातील देशमुख हे बहुतेक मराठा असत. वतनात श्रेष्ठ वतन म्हणजे देशमुखी वतन व त्या खालोखाल पाटीलकी त्यानंतर कुलकर्णी व देशपांडे हे दुय्यम दर्जाचे वतनदार, देशमुखी वतन यांस फार मोठी सामाजिक आणि राजकीय मान्यता प्राप्त झाली होती."[८५] त्यामुळे देशमुखास मध्ययुगीन समाजामध्ये महत्त्वाचे राजकीय व सामाजिक स्थान होते. हा वर्ग गावच्या प्रशासनात महत्त्वाचे उच्च स्थान घेऊन होता. शिवाजी महाराजांनी मावळातील वरकड देशमुखास एकत्र करून त्यांना स्वराज्याची शपथ दिली. परगण्यातील बहुतेक गावातून देशमुख व देशपांडयांची जमीन असल्याने गावाशी त्यांचा निकटचा संबंध येत असे. पाटलापेक्षा देशमुखाचा दर्जा उच्च असल्याने त्याचे हक्कही विस्तृत असत. "गावकऱ्याकडून देशमुखाला अनेक वस्तू भेटरूपाने मिळत. उदा. शेतकऱ्यांनी

पिकविलेल्या धान्याचा काही हिस्सा, फळातील काही हिस्सा, चांभाराकडून पायपोशी, कुंभाराकडून मातीची भांडी, नवरात्रात गुरवाकडून प्रसाद त्याला विनामूल्य मिळत असे. काही बाबतीत गावकऱ्यांकडून त्याला रोख रक्कम मिळत असे. प्रत्येक गावाकडून किमान एक होन मिळत असे. दौऱ्यावर असतांना त्याचा ज्या गावात मुक्काम असे. तेथील गावकऱ्यांकडून त्याला शिधा व काही रक्कम मिळत असे. सरकारी जकातीच्या उत्पन्नापैकी दोन टक्के उत्पन्न त्याला मिळत असे. जनावरांच्या खरेदी विक्रीवर त्याला काही ठिकाणी उरूके मिळत. व्यापारी आणि आठवडयाच्या बाजारात येणारे फेरीवाले यांच्याकडूनही त्याला अनेक वस्तू मिळत."[८६] त्यामुळे देशमुख धनसंचय करून आपली सत्ता पंचक्रोशीत आबाधित ठेवत. देशमुखाला जसे काही हक्क होते. तसेच त्याला अनेक कर्तव्यही होती. ज्या गावात पाटील नाही. तेथील पाटीलकीचे काम त्याला करावे लागत असे. आपल्या परगण्यातील वसाहत वाढविणे व लावणी संचयनी करणे, गावातील वाझट जमीन गरजूंना लागवडीसाठी देणे. परगण्यातून दरवर्षी दौरे काढून रयतेची स्थिती पाहणे इ. कामे त्याला करावी लागत.[८७] देशमुख हे प्रतिष्ठीत वतनदार असत. हे पद मराठा व ब्राह्मण जातींकडे असे. थोडक्यात सरकार व रयत यांना जोडणारा देशमुख हा एक महत्त्वाचा दुवा होता.

### ६. देशपांडे :

गावाची काही जमीन देशपांडयाच्या मालकीची असे परगण्यातील कुलकर्ण्याच्या कामावर देखरेख करणे हे त्याचे मुख्य कार्य होते. गावात कुलकर्ण्याचे जे काम ते परगण्यात देशपांडेचे काम होय. परगण्याच्या कामासंबंधी तो देशमुखास जबाबदार असे. या देशपांडेपणाबद्दल त्याला सरकारकडून वतन मिळत असे आणि ही वतनी जमीन सारामुक्त व वंशपरंपरागत असे.[८८] त्याचे कार्य हे देशमुखास सहाय्य

करण्यावर अवलंबून होते. देशमुख व देशपांडे हे परस्पर पूरक कामे करून प्रशासन कामात हातभार लावत असत. त्याचे हे कार्य आर्थिक व्यवस्थेत देखरेखीचे कार्य होते. परगण्याचे हिशोब ठेवणे, तपासणे, हे त्याचे मुख्य काम होय.[८९] कूलकर्णी वर्गास मार्गदर्शन करण्याचे काम देशपांडे करीत. "हक्काच्या बाबतीत देशमुख व देशपांडे यांच्यातील फरक हा गुणात्मक नसून संख्यात्मक होता. देशमुखाला १० फणस असतील तर देशपांडयाला ५ मिळत असत."[९०] यावरून उभयतांच्या हक्काची कल्पना येते. देशमुखाचे स्थान हे देशपांडयापेक्षा दुप्पट महत्त्वाचे होते. त्याची आर्थिक प्राप्ती ही दुप्पट होती. शिवकाळात व छ. संभाजीराजांच्या काळामध्ये वतनदार व लढवय्ये म्हणून देशपांडे अग्रस्थानी होते ते स्वराज्याचे रक्षण करीत असत.

**७. महार :**

पाटील, कुलकर्णी व चौगुल्याप्रमाणेच महार हाही खेडेगावचा वतनदार होता. पाटलाला पाटीलकीचे व कुलकर्ण्यास कुलकर्णीपणाचे आणि महारांना महारकीचे वतन असे. पाटलाला सरकारकडून सारामुक्त जमीन मिळत असे. तसेच त्यांना रयतेकडून काही हक्क व मानपान प्राप्त झालेले होते. पाटील व महार हे वतनदार असले तरी त्यांच्या वतनात आर्थिक आणि अधिकारांच्या बाबत समानता नव्हती.

एस.एन.सेन म्हणतात, "पाटील हा गावचा राजा, प्रमुख अधिकारी, महसुल अधिकारी, पोलिस अधिकारी व न्यायदंडाधिकारी होता."[९१] त्यामुळे त्याचे शोषण होत होते, शिवाय त्याला गुलामगीरीच्या भावनेस सामोरे जावे लागत होते. त्याला त्या व्यवस्थेत उच्च पदस्थांची सेवा करावी लागत असे. परंतु महार हा गाववतनदार असूनही तो गावचा हरकाम्या शिपाई व वेठबिगारी होता. पाटील, कुलकर्णी व शेतकऱ्यांच्या घरी व शेतात आणि सरकार दरबारी महार चोवीस तास राबत राहिले. परंतु त्यांना त्यांच्या कामाचा मोबदला रोख पैशाच्या स्वरूपात न देता बलुते व शिळ्या

अन्नाच्या स्वरूपात दिला गेला. त्यामध्ये त्यांचा उदरनिर्वाह होऊ शकत नव्हता. पाटलाला मिळालेली सारामुक्त जमीन व महारांना मिळालेल्या सारामुक्त जमिनीच्या गुणवत्तेमध्ये फरक असे. याशिवाय बी-बियाणे, बैल व औत नसल्यामुळे महार त्यांना मिळालेल्या इनाम जमिनीत पीक घेऊ शकत नसत. त्यामुळे महारांच्या वतनाला काहीच अर्थ नव्हता. वंशपरंपरेची चाकरी व धंदा हा वतनाचा अर्थ महारांच्या वतनास लागू पडतो. कारण महारांना वतनदारीच्या माध्यमातून रयत आणि सरकारची विभिन्न प्रकारची कामे एक सामाजिक कर्तव्य म्हणून करावी लागत होती. या कामाचा मोबदला मात्र अगदी अल्प होता. त्यामुळेच महार हा वतनदार असूनही आर्थिकदृष्टया तो कमकुवतच राहीला. वतनदारी व्यवस्था ही त्याच्या स्थानावर अवलंबून होती. ज्याचे स्थान उच्च दर्जाचे त्याचा सन्मान अधिक असे. वतन हे वंशपरंपरेने चालत.

### ५.५ मुस्लिम समाज :

शिवपूर्व काळापासून महाराष्ट्रातच नव्हे तर भारतीय समाजात मुस्लीम समाजाची संख्या मोठया प्रमाणावर अस्तित्वात होती. भारतीय समाजात मुस्लीम समाज हा अत्यंत महत्त्वाचा घटक होता. महाराष्ट्रात छ. शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. स्वराज्याच्या स्थापनेपुर्वी महाराष्ट्राच्या विविध भूभागावर आदिलशाही, कुतुबशाही, निजामशाही, इमादशाही आणि बरीदशाहीचे राज्य होते. स्वराज्यस्थापनेसाठी छ. शिवाजी महाराजांना विजापूरची आदिलशाही आणि दिल्लीचे मोघल या मुस्लिम राज्याशी संघर्ष करावा लागला होता.

आर.व्ही.रूसेल म्हणतात, "मुस्लिम जाती शिया आणि सुन्नी हे दोन पंथ होते. बोहरा आणि खोजा या शिया पंथीय मुस्लिम जाती होत्या." [१२] महाराष्ट्रात हे सर्व पंथाचे लोक होते. त्यांच्यात मतभेदही असत. ते विविध संस्था व राजवटीत निष्ठेने सेवा करीत असत. संभाजी काळातही या वर्गाचे स्थान होते. पण वर्ग संख्येने फार

मोठा नव्हता. या जातीतील लोक पुढील कामे करीत असत. कपडे तयार करणे, कपडे शिवणे, कपडे विणणे व कपडयांचा व्यवसाय. कापडांच्या व्यवसायात मुस्लिम लोकांची मक्तेदारी होती. बोहरा आणि खोजा या दोन मुस्लिम जाती प्रामुख्याने कपडयांचा व्यवसाय करीत असत. मुस्लिम लोक विविध प्रकारचा व्यवसाय करीत असत. या व्यवसायावरून त्यात पुढील अनेक जाती निर्माण झाल्या. भावसार, जुलाब, खाटीक, फकीर, अत्तार, भांड, विणकर इ. [१३] हे सर्व गट आपआपल्या कामात प्रविण होते. ते आपली नेमूण दिलेली कामे करत व पोट भरत असत. अशाप्रकारे या पोटजातींनी आपआपले व्यवसाय विकसित केले होते. छ. शिवाजी महाराजांच्या लष्करात मुस्लिम लोक वेगवेगळया पदावर कार्यरत होते. नुरखान बेग हा त्यांच्या सैन्यांत सरनौबत होता. दर्यासारंग आरमार प्रमुख होता.[१४] हे अधिकारी जबाबदारी व निष्ठेने स्वराज्याच्या रक्षणाचे काम करत असत. शिवाजी महाराजांनी मुस्लिम समाजाला सन्मानाची वागणूक दिली. बाबा याकुत या मुस्लिम संतास त्यांनी आपले गुरू मानले होते.[१५] डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, "आपल्या पित्याचेच मुस्लिम समाजाबाबतचे असलेले धोरण छ. संभाजीने पुढे चालविले. त्यांच्या आरमारात दौलत खान, कावजी मोहम्मद, सिध्दीमिस्त्री, जागोजी फर्जद इ. मुसलमान अधिकारी होते."[१६] "ज्या बाबा याकुत या मुस्लिम संताची शिवाजी महाराजांनी स्थापना केली होती. त्यांचे संभाजी महाराजांनी केळशी येथे दर्शन घेतले होते."[१७] मध्ययुगामध्ये उत्तर भागाकडून आलेले मुसलमान हे महत्त्वाच्या पदावर कार्यरत होते. त्यांना राज्यव्यवहारात प्रतिष्ठा होती पण सामान्य माणूस मात्र शोषीत होता. त्याच्या पात्रतेनूसार पोट भरण्यासाठी पडेल ती कामे करावी लागत असत. राज्यकर्ता वर्ग हा मात्र प्रतिष्ठेने जगत असत. याचा अर्थ असा की संत व गुणी मुस्लिमांना मानाचे स्थान होते.

## ५.६ वेठबिगारी :

मध्ययुगीन समाजाचे हे महत्त्वाचे लक्षण होते. कारण जो समाज आर्थिक दृष्टीने पिचलेला असतो. त्याला अशा संकटाला सामोरे जावे लागते. प्राचीन काळापासून मध्ययुगीन काळापर्यंत चालत आलेल्या ऐतिहासिक वारस्यातील अनेक सामाजिक अशा अनिष्ठ रुढीमध्ये वेठबिगार म्हणजे विनावेतन काही काळापर्यंत काम करुन घेण्याच्या प्रथेचा समावेश होता. शिवकाळात महाराष्ट्रात स्वराज्याची स्थापना होऊन मराठी माणसाची राजकीय गुलामगिरी संपुष्ठात आली परंतु स्वराज्यातील स्वातंत्र्याची फळे चाखण्याचे भाग्य समाजात हीन समजल्या जाणाऱ्या अनेक जातींच्या नशिबी आले नव्हते. वेठबिगार या सामाजिक संस्थेचा उगम फार प्राचीन काळी झाल्याचे दिसते. "समाजातील गरीब वर्गाला सरकारला कर देता येत नसल्याने त्यांनी आपली सेवा सरकारला व समाजाला देण्याची पध्दत रुढ झाली होती. बकाळ, ढाकुरी, शुद्र बलुतेदार वर्ग, सुतार, गुरव, बुरुड, धनगर, कुंभार, इ. अतीशुद्र बलुतेदार महार, मांग, चांभार इ. अशा वर्गांना वेठबिगारी अशा नावांनी संबोधले आहे."[१८] मध्ययुगीन समाजाचे हे स्वरूप पाहता त्यातील वेठबिगारीची प्रथा कशी रूजली ते समजू शकते. त्यांच्या शोषणाचे स्वरूप सांगतांना ते म्हणतात, "वेठबिगारी वर्गाकडून ठरलेली विनावेतन सेवा करुन घेण्याचा अधिकार सरकारचे अधिकारी वापरत असत. सामान्यतः किल्ल्यात चालणारे बांधकाम, दुरुस्ती, अन्नधान्य, दारुगोळा किल्ल्यावर चढविणे व इतर दैनंदिन अंग मेहनतीची कामे वेठबिगारांना करावी लागत असत."[१९] या शोषणामुळे वेठबिगारांच्या श्रमाचे मोल हे पडत्या भावाने विकत घेतले जाई. "वेठबिगारीचा त्रास रयतेला होता कामा नये असा छत्रपती संभाजीचा आदेश होता. रयतेला त्यांच्या शेतीच्या कामात कोणताही अडथळा आणू नये. असाही आदेश मराठा सुभेदारांनी १६८५ आपल्या अधिकाऱ्यांना दिला होता. याशिवाय वेठबिगारी ताबडतोब नष्ट करण्यात येईल असे वचनही

सरकारने दिले होते."[१००] मराठेशाहीमध्ये अशा प्रकारच्या वेठबिगारीच्या निर्मुलनाचे काही संदेश असले तरी या प्रथेचे समूळ उच्चाटन झाले होते असे म्हणता येणार नाही.

## ५.७ गुलामगिरी :

मध्ययुगीन भारतीय समाज हा सामाजिक विषमतेने ग्रासलेला होता. जातीप्रथा, अंधश्रध्दा, रुढी व परंपरा या प्रमाणे गुलामगिरी हेही या समाजाचे लक्षण होते. मध्ययुगीन महाराष्ट्रात असलेली गुलामगिरी या संज्ञेचे स्वरुप ग्रीक किंवा रोमन साम्राज्यातील गुलामगिरीपेक्षा वेगळे होते. ग्रीक नगर राज्यात व रोमन साम्राज्यात गुलामांना वाईट वागणूक मिळत असे. त्यामुळे गुलामगिरी हा एक शाप म्हणून ओळखला जात असे. पण भारतात मात्र अशी स्थिती नव्हती. गुलामांना सामान्यपणे चांगली वागणूक मिळत असे. गुलामांपैकी काही जण राजकीय, सामाजिक जीवनात उच्च स्थानापर्यंत पोहचले होते. पाश्चिमात्य देशात वर्णभेदामुळे गुलामगिरी ही संज्ञा बदनाम झाली पण भारतामध्ये गुलामगिरीमध्ये वर्णभेद हे गुलामगिरीचे उगमस्थान नव्हते. मध्ययुगीन काळात गुलामगिरी मुस्लिम समाजाचे एक अपरिहार्य वैशिष्टय होते. "गुलामगिरी या संज्ञेच्या भारतातील उगमाचे स्थान तत्कालीन वस्तुस्थितीमध्ये आहे. सरदार किंवा श्रीमंत व्यक्ती युंध्दात किंवा सुखोपभोगात गुंतलेली असे त्यामुळे घरगुती कामे करण्यास त्या व्यक्तीला सवड नसे कालांतराने घरगुती शारीरिक कष्टाची कामे सरदारांनी करणे कमीपणाचे मानले जाऊ लागले म्हणून ही कामे करणारा विशिष्ट वर्ग निर्माण झाला."[१०१] हा वर्ग त्याकाळात समाजातील व्यवस्थेत सरंजामशाही वर्गाची सेवा करत असे. व याबद्दल तो त्यांच्याकडून वस्तू व सेवेच्या मार्गाने सहाय्य घेत असे. अशा प्रकारे अपरिहार्यता हे या प्रथेचे स्वरुप होते. मध्ययुगीन महाराष्ट्रातीत गुलामगिरीच्या संदर्भात मध्ययुगीन भारतामध्ये हिंदू-मुस्लिम दोन्ही समाजामध्ये गुलाम ठेवण्याची पध्दत होती. मुस्लिम समाजामध्ये स्त्रीया व पुरुष या

दोन्हींचाही समावेश होत असे. यापैकी काही गुलाम देशाबाहेरुन आणले जात. तर काही देशातील असत. युध्दकैदयांना गुलाम बनविण्याची पध्दत होती. खेडयावर छापे घालून खेडूतांना पकडून गुलाम बनवित. काही वेळा दुष्काळी परिस्थितीमुळे आई बाप मुलांना गुलाम म्हणून विकत असत.[१०२] मुस्लिम समाजाचे स्वरुप पाहता गुलामगिरीचे स्वरुप अधिक प्रकर्षाने जाणवते.

"मध्ययुगीन भारतामध्ये गुलामांचे नियमित बाजार भरत गुलामांचा व्यापार हा फायदेशीर व्यवसाय होता. गुलामांचे किंमत ठरविण्याचे निकष वेगवेगळे असत. मुलींची किंमत तिचे सौंदर्य, काम करण्याची क्षमता, एकंदर हुशारी यावर अवलंबुन असे. पुरुष गुलामामध्ये त्याची निष्ठा, शौर्य, काम करण्याची क्षमता इ. गुणांचा विचार करुन किंमत ठरविली जात असे."[१०३] तत्कालीन समाजाचे या प्रथेचे स्वरुप छ. संभाजीच्या काळातही चालू होते

छ. संभाजीने इंग्रजांबरोबर इ.स.१६८४ मध्ये जो तह झाला त्या तहातील एक महत्त्वाचे कलम म्हणजे. महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे ते असे. "इंग्रजांनी माझ्या राज्यातील कोणाही माणसाला गुलाम किंवा ख्रिश्चन करण्यासाठी विकत घेता येणार नाही."[१०४] गुलामांच्या प्रथेस आळा बसावा म्हणून छ. शिवाजी महाराजांनी गुलामांवर कडक जकात लादली होती. "छ. संभाजी त्याही पुढे एक पाऊल गेले. त्यांनी गुलामांच्या व्यापारालाच बंदी घातली."[१०५] हे त्यांचे धोरण प्रगतशील असल्याचे दिसून येते. मराठाकालीन गुलामगिरीचे स्वरुप स्पष्ट करतांना बी.एन. सरदेसाई म्हणतात. "गुलामांना मिळणारी वागणूक व त्यांचे जीवन हे त्यांच्या मालकावर अवलंबून असे. गुलामांना पूर्ण वेळ वाईट वागणूक मिळत असे नाही. काही वेळा गुलाम नसलेल्या माणसापेक्षा गुलामाला चांगली वागणूक मिळत असे. धान्याच्या घरी एखादा शुभ प्रसंग असेल, सणसुद असेल तेंव्हा गुलामांना मालक

चांगली वागणूक देत असे. बऱ्याच वेळा अशा शुभप्रसंगी मालक गुलामांना रोख बक्षिस किंवा जमिन सुध्दा देत असे."[१०६] गुलामांच्या स्थितीचे हे मध्ययुगीन स्वरुप होते.

स्त्रियांच्या गुलामगिरीचे स्वरुप स्पष्ट करतांना प्रा. बी.एन. सरदेसाई म्हणतात, "गुलामांमध्ये पुरुषांपेक्षा स्त्री गुलामांची संख्या जास्त असे, स्त्री गुलामास अनेक प्रकारची कामे करावी लागे. घरकाम, शेतकाम, अतिथीगृहे, घोडयांचे तबेले, शिकारखाना, दारुखाना इ. ठिकाणी स्त्रियांना काम करावे लागे. तसेच लहान मुलांचा संभाळही गुलाम स्त्रीकडे असे बऱ्याचवेळा गुलाम स्त्रियांना (कुणबीण) सुखोपभोगासाठीही ठेवून घेत. गुलाम स्त्रियांबरोबर सुखोपभोग घेणे तत्कालीन रितीरिवाजाविरुध्द नसे."[१०७] छ. संभाजीकालीन समाजही त्यास अपवाद नव्हता.

सारांश : मध्ययुगीन महाराष्ट्रतील गुलामगिरीचे स्वरुप युरोप आणि अमेरीकेपेक्षा वेगळे होते. महाराष्ट्रातील या प्रथेचे स्वरुप पाहता. मानवता हा पैलू महत्त्वाचा वाटतो. गुलामांना त्या काळात माणूस या नात्याने वागविले जात असे.

### ५.८ कुटूंबव्यवस्था :

कुटुंब हा भारतीय जीवनाचा महत्त्वाचा घटक होय. एकत्र कुटुंब पध्दती हे प्राचीन भारतीय संस्कृतीचे वैशिष्टय मानण्यात येते. १० व्या ११ व्या शतकापासून यामध्ये हळूहळू फरक पडू लागला. यादव काळात भावाभावांची भांडणे होऊन मालमत्तेची वाटणी होऊ लागल्याची उदाहरणे दिसून येतात. आर्थिक व कौटूंबिक कारणासाठी जरी भाऊ-भाऊ विभक्त राहत असले तरी ग्रामस्थ त्या कुटूंबाला एकत्र कुटूंब मानण्याकडे लोकांचा कल असे. संपत्तीवर पिता, पुत्र, नातू यांचा हक्क असल्याने मालमत्तेचे विभाजन सहजासहजी शक्य नसे. स्त्रीचा संपत्तीवर हक्क मान्य केला असल्याने पती निधनानंतर पत्नीला पतीची संपत्ती मिळत असे.

डॉ. खोबरेकर वि.गो. म्हणतात, "शिवकाळात एकत्र पध्दती आणि पितृसत्ताक कुटूंब पध्दती होती. घरातील वयस्क पुरुष हा कुटूंबाचा प्रमुख असे. त्याला कुटूंबाचे सर्व सदस्य मान देत आणि त्याच्या आदेशाचे पालन करीत. पिता हाच कुटूंबाचा प्रमुख असे."[१०८] परंपरेने चालत आलेल्या भारतीय समाजव्यवस्थेमध्ये पुरूषाचे स्थान वरचे होते. छ. संभाजी काळातही कुटुंबातील महत्त्वाचे निर्णय पिताच घेत असे. "सामान्यतः तीन पिढया एकत्र राहत अशा कुटूंबात आत्या, काकू, सावत्र आई, बहीण, मावशी सर्वांची मुले एकत्र राहत असत. कुटूंबप्रमुखाला अनन्यसाधारण महत्त्व असे."[१०९] अशा प्रकारे कुटूंब संस्था काम करीत होती. आर्थिक अधिकाराच्या वाटणीचे स्वरुप असे होते. "मालमत्तेची वाटणी करतांना वडील भावाला इतर भांवापेक्षा ज्यादा मालमत्ता मिळत असे. घराण्याची मालमत्ता ही सार्वजनिक मालमत्ता मानली जात असे. एखादया व्यक्तिने स्वतःच्या हिमतीवर वतन किंवा जहागीर मिळविलेले असले तरी सर्व भावांना त्यामध्ये समान वाटा मिळत असे."[११०] यावरुन आर्थिक अधिकाराचे स्वरुप स्पष्ट होते. कुटूंबप्रमुखाला कुटूंबाच्या एकंदर भल्यासाठी मालमत्ता विकण्याचा हक्क असे.[१११] यावरुन अधिकाराची वाटणी कशी होत असे ते लक्षात येते. कुटूंबाचे सामाजीक स्थान स्पष्ट करतांना ते पुढे म्हणतात, "सामाजिक घटक या दृष्टीने कुटूंबव्यवस्थेला खूप महत्त्व होते. पारंपारिक पध्दतीप्रमाणे कुटूंबाला चार प्रकारची कार्य करावी लागत. लैंगिक जीवन, पुर्ननिर्मिती, आर्थिक व शैक्षणिक, व पूर्वापार कल्पनेनुसार धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चर्तुर्विध कार्यांना दिलेली ही मध्ययुगीन पुस्ती होय."[११२] याचा अर्थ असा की छ. संभाजी काळातही समाजात कुटूंबसंस्था महत्त्वाची होती.

## ५.९ आहार :

समाजात शाकाहार आणि मांसाहार अशा दोन प्रकारचा आहार प्रचलीत होता. आपटे द.वि. म्हणतात, "गहू, ज्वारी, व बाजरीच्या भाकरी, भात, ताकाची कढी, ताक, मीठ, हरबरा, मूग, तुरीच्या डाळीची आमटी, भाजीपाला, मसाले, दुध, दुधापासून बनविलेले विविध पदार्थ, दही, तुप, गुळ, साखर, लोणचे, कांदा, चटणी, मुळा, पापड, लाडू, फळे, सुका मेवा, बदाम, खोबरे, पुरणपोळी इ. शाकाहारात समावेश होत होता."[११३] डॉ. वि.गो. खोबरे म्हणतात, "जेवणासाठी ब्राम्हण आणि श्रीमंत लोक प्रसंगानुसार केळीचीपाने, पत्रावळी, सोने व चांदीची ताटे उपयोगात आणत. जेवणांस बसण्यासाठी लाकडी पाट वापरत. ब्राम्हण लोक स्नान, प्रार्थना व संध्या झाल्याशिवाय जेवत नसत. जेवणापूर्वी जेवणास बसण्यासाठी सोवळे नेसले जाई. कांदा, भाकरी, आमटी, चटणी हा कुणब्यांचा प्रमुख आहार होता. ब्राह्मण लोक मांसाहारी नव्हते. समाजातील खालच्या थरातील लोक मासे व मटन खात असत."[११४] यावरून आहार त्या - त्या प्रदेशातील वातावरण व खाद्याची उपलब्धता यावर ठरत असे. उच्च वर्ग शाकाहाराचे पालन करीत असे.

## ५.१० स्त्री जीवन :

कोणत्याही समाजाची जीवनपध्दती किंवा संस्कृती त्या समाजात स्त्रीचे स्थान कोणत्या दर्जाचे आहे. यावर ठरविली जाते. स्त्रियांचा दर्जा ठरवितांना तत्कालीन समाजाचे नेतृत्त्व करणारे विचारवंत, राज्यकर्ते, अस्तित्वात असलेल्या सामाजिक संस्थांच्या अवस्थेवर अवलंबून असते. मराठेपूर्व कालखंडात स्त्रियांचा जो दर्जा होता तोच छ. संभाजीकालीन महाराष्ट्रात थोडयाफार फरकाने कायम होता. स्त्रियांचे जीवन हा तत्कालीन सामाजिक परिस्थितीचा एक महत्त्वाचा पैलू होता.

### १. स्त्रियांना दुय्यम स्थान :

छ. संभाजीच्या काळातही पुरुषप्रधान संस्कृती असल्याने स्त्रियांना समाजात फार स्थान नव्हते. त्यांचा दर्जा दुय्यमच होता. एकत्र कुटुंबात स्त्रीचे स्थान गौणच होते. सासू, सासरे, दीर, जावा, नणंदा व इतर आप्तजन यांची सेवा तिला करावी लागे. सासरी असतांना स्त्रीला खुपच कष्ट करावे लागत. घरात मुलगा जन्माला आला की आनंद होत असे. मुलगा झाल्याचा वृत्तांत नातेवाईकांना ताबडतोब कळविला जाई. पूजाअर्चा, देवधर्म, कुलधर्म, स्त्रियांनाच चालावा लागे. "पडदा पध्दतही उच्चकुलीन मराठा समाजात होती."[११५] हा त्या काळातील मोगल व आदिलशाहीनंतर निजामशाहीचा प्रभाव होता. त्यामुळे छ. संभाजी काळातही स्त्रीजीवनाची उपेक्षा होत होती. डॉ. "हिंदूधर्मशास्त्र व धर्म यांचा विचार केला असता. हिंदू स्त्रियांना फार स्वातंत्र्य होते असे दिसत नाही."[११६] स्वातंत्र्याच्या अभावामुळे गरीब समाजातील स्त्रीयांच्या व्यक्तीत्त्वविकासाला वाव नव्हता. उच्च कुळातील स्त्रियांना मात्र असे कर्तृत्व सिध्द करता येत असे. त्या निर्णय प्रक्रियेतही भाग घेत असत. यावरून तत्कालीन स्त्रियांची स्थिती लक्षात येते.

### २. बालविवाह :

कृ.ना.चिटणीस म्हणतात, "सर्वच जातीत बालविवाहाची प्रथा रुढ होती. राजकुटूंबातही बालविवाह होत असत. ८ ते १४ वर्ष हे मुलींच्या लग्नाचे वय होते. पुरुषांचेही बालविवाह होत असत. त्यामुळे अनेक वेळा स्त्रीवर वैधव्य पत्करण्याची वेळ येई. आपला जीवनसाथी निवडण्याचे मुलींना स्वातंत्र्य नव्हते. तिच्या जोडीदाराची निवड तिचे आई-वडील करीत. एकदा लग्न विधीपूर्वक पार पडले की ते लग्नबंधन कायमचे होत असे. कोणत्याही परिस्थितीत हे बंधन मोडता येत नसे. लग्न हा केवळ पती व पत्नीमधील विषय नसून तो अधिक अधिकांश रीतीने संबंध कुटूंबाशी संबंधीत

असा विषय मानला जात असे. त्यातून सामाजिक व धार्मिक जबाबदारीची निर्मीती होत असे."[११७] बालविवाहाची प्रथा ही त्या काळातील एक अनिष्ठ रूढी होती. लग्न करून मुलीच्या जबाबदारीतून मुक्त व्हावे अशीच तत्कालीन रूढी होती.

**३. बहुपत्नीत्व :**

डॉ. सावंत बी.एस. म्हणतात, "समाजात बहुपत्नीत्वाची प्रथा असल्याने आणि ते एक प्रतिष्ठेचे लक्षण मानले गेल्याने पुरुष कितीही वेळा आणि कोणत्याही वयात लग्न करीत असत. बहुपत्नीत्वाची प्रथा समाजाने व धर्मानेही मान्य केली असल्याने राज्यकर्ते व सरदार अनेक लग्ने करीत असत. अशा परीस्थितीमुळे सवतीमत्सर, द्वेष, संघर्ष, भांडणे यामुळे कुटूंबातील स्वास्थ्य नष्ट होऊ स्त्रीच्या वाटयाला दुःखाशिवाय काहीही येत नव्हते."[११८] तथापी त्या काळामध्ये बहुपत्नीत्वाची पध्दत रूढ होती आणि ती प्रचलित होती. त्यामुळे सामाजिक असमतोल कायम राहत होता.

**४. घटस्फोट :**

ते पुढे म्हणतात, "उच्च जातीमध्ये घटस्फोट किंवा पुनर्विवाह या गोष्टीवर बंधने होती त्यामुळे स्त्रीला नवऱ्याचा व सासूचा छळ सहन केल्याशिवाय पर्याय नव्हता. परंतु पुरुष मात्र दुसरे लग्न करुन पहिल्या पत्नीला घटस्फोट न देता सोडून देऊ शकत असे. त्यामुळे तिच्या वाटयाला दुःख येत असे."[११९] अशा प्रकारची उदाहरणे मोठया प्रमाणावर घडत नसत पण ती अपवादाने आढळत असत.

**५. केशवपन :**

डॉ. गाठाळ एस. एस. म्हणतात, "महाराष्ट्रात ब्राह्मण जातीमध्ये केशवपन करण्याची प्रथा होती. सर्वच ब्राह्मण विधवांचे केशवपन होत होते असे नव्हते. यामध्ये पतीच्या मृतदेहाबरोबरच पत्नीचे केस जाळत असत. पत्नीकडून असे केस आले नाही

तर ब्राम्हण प्रेतास मंत्राग्नी देण्यास तयार होत नसत. त्यामुळे पतीनिधनानंतर लगेचच पत्नीचे मुंढन केले जाई."[१२०] ही केशवपनाची राक्षसी पध्दती मध्ययुगात प्रचलीत होती. स्त्रीयांना विद्रूप करून त्यांना एकाकी जीवन जगण्यावर भाग पाडले जात असे.

**६. सक्तीचे वैधव्य :**

कृ. ना. चिटणीस म्हणतात, "मध्ययुगीन महाराष्ट्रातील विधवांचे जीणे फारच भयंकर असे. तिला अनेक सामाजिक चालीरितींना बळी पडावे लागत असे."[१२१] डॉ. गाठाळ एस. एस. म्हणतात, "विधवेने कसे जीवन जगावे, कोणते नियम पाळावे याबाबत मनुने सांगितलेल्या आचारसंहितेचे विधवा पालन करत असे. विधवेने सर्व सुखाचा त्याग करुन संन्यास जीवन जगावे असा संकेत होता. ज्या स्त्रियांचे पती युध्दात वा सरकारी कामावर असतांना मृत्यू पावले त्यांना सरकारच्या वतीने इनाम मिळे. अशा विधवांची अवस्था बरी होती. विधवांनी सार्वजनिक समारंभात जाऊ नये, दिवसातून एकदाच भोजन घ्यावे, पलंगावर झोपू नये, व्रत व उपवास करावा अशी एक आचारसंहिता होती."[१२२] हे नियम सनातनी धर्मतत्त्वे रूजविण्यासाठी तयार केले होते. व छ. संभाजी काळातही समाजात पाळले जात असत.

**७. स्त्रीशिक्षण :**

पूर्वपरंपरेनुसार बालविवाहाची प्रथा असल्याने बालवधूकडून शिक्षणाची अपेक्षा करता येत नसे. स्त्रियांनी शिकू नये अशीच लोकांची समजूत त्यावेळी होती. राजघराण्यातील काही स्त्रियांना युध्दकला व प्रशासनाचे शिक्षण मिळे पण अशा स्त्रियांचे प्रमाण फार कमी होते. [१२३] शारदा देशमुख म्हणतात, "उच्च व राजघराण्यातील स्त्रियांना व्यावहारीक शिक्षण दिले जात असे. सामान्य स्त्रियांना शिक्षणाचा हक्क नव्हता."[१२४] राजघराण्यातील स्त्रियांना लिहता वाचता येत असे




त्यामुळे त्या राजकीय व्यवस्थेत प्रभावी होत्या. राजघराण्यातील स्त्रियांना प्रशासनाचे शिक्षण मिळत असे. जीजाबाई व ताराबाई यांचा प्रशासनात लौकिक होता तसेच छ. संभाजीची पत्नी येसूबाईने चांगल्या पध्दतीने प्रशासनात भाग घेतला होता याबद्दल पी.एस.जोशी म्हणतात, "Maharani Yesubai seems to have taken part in the administration of C.sambhaji, "who was contantly busy in the work of war-fare against. Moghals during 1680-1690. It is felt by the scholars that she must have given wiser counsel to sambhaji from time to time."[१२५] याचाच अर्थ असा की, छ. संभाजीस येसूबाई वारंवार सल्ला देत असे. "Maharani Yesubai also seems to have conducted Correres - pondence at times. This is apparent from the letter which she had written to the establishment of saint Ramdas at Chaphal."[१२६] यावरून येसूबाई समर्थ रामदासांचा सन्मान करीत होत्या असे दिसून येते. "In that letters she promised that the persons of the army will not create any distrubance in the fair of chaphal. She used to put her seal "Sri. Sakhi Radni Jayati" on her letters."[१२७] चाफळ येथील यात्रेस येसूबाईने अभय दिले होते हे यावरून स्पष्ट होते.

**८. स्त्रियांचा कौटुंबिक मालमत्तेसंबंधीचा हक्क :**

स्त्रीला समाजाने पूर्णपणे दुर्लक्षित करून दुय्यम स्थान दिले होते. स्त्रीला आपल्या वडीलांच्या मालमत्तेत कोणताही हक्क नसे. "तिच्या नवऱ्याच्या मालमत्तेसंबंधी तिचा हक्क पोहचत असे. परंतु हा हक्कही मर्यादित स्वरूपाचा होता. नवरा मरण पावल्यावर त्याला कोणी वारस नसे तो एकत्र कुटुंबातून वेगळा राहिला असेल तर

त्याच्या पत्नीला त्याची मालमत्ता मिळत असे. ”[१२८] या प्रकारचे अधिकार शिवकाळापासून संभाजीकाळात सुद्धा कायम होते.थोडक्यात स्त्रीच्या तिच्या वडीलांच्या मालमत्तेवरील हक्क नवऱ्याच्य मालमत्तेवरील हक्क व तिचे स्त्रीधन यांना समाजाने मान्यता दिली नव्हती. त्यामुळे स्त्रीला तिची मुले किंवा एकत्र कुटुंबातील इतर व्यक्तींच्या दयेवर आपल्या उपजीविकेसाठी अवलंबून रहावे लागत होते. वरच्या वर्गातील स्त्रियांची परिस्थिती चांगली होती. वैधव्याच्या काळात त्यांना चांगली वागणूक मिळत असे. पतीच्या संपत्तीचा व मालमत्तेचा तिला पतीच्या पश्चात लाभ मिळत होता. त्यांना सार्वजनिक जीवनात भाग घेण्याची संधी मिळत होती. कामगार वर्गातील स्त्रीला पुरुषांच्या बरोबरीने अर्थाजन करून संसाराला हातभार लावता येत असे. त्यामुळे कुटुंबात तिला मान मिळत असे. परंतु मध्यम वर्गातील स्त्रियांचा दर्जा मात्र वरील दोन वर्गातील स्त्रियांपेक्षा फारच खालावलेला होता. उच्च जातीची बंधने या मध्यम वर्गातील स्त्रियांवर होती.

छ. शिवाजी महाराजांचा स्त्रियांच्या विषयीचा दृष्टीकोन हा अतिशय उदार होता. त्यामुळे पूर्वीच्या काळापेक्षा त्यांचे जीवन थोडे जास्त सूरक्षीत व मानाचे झाले होते. शिवाजीने आपल्या सैन्याला, परमुलखात बायका पोरे न धरावी अशी सक्त ताकीद दिली होती. सर्वसामान्य समाजामध्ये काही परंपरा अस्तित्वात होत्या उदा. अपत्य प्राप्तीसाठी नवस करणे व अशा नवसाने झालेले पहिले मूल देवाला अर्पण करणे. ज्यावेळी अशा मुली देवाला अर्पण करीत असत. तेंव्हा त्यांना मुरळया असे म्हणत.[१२९] ही पध्दत त्यावेळच्या गुलामगीरीचे उदाहरण म्हणता येईल.

थोडक्यात छ. संभाजीकालीन स्त्रियांची परिस्थिती फारशी चांगली नव्हती असे स्पष्ट होते. कुटुंबात किंवा समाजात जे स्थान पुरूषास होते,ते स्त्रियांना कधीच मिळालेले नाही. भारतीय संस्कृती पुरूषप्रधान असल्यामुळे स्त्रियांना सामाजिक

स्वातंत्र्य नव्हते. प्राचिन काळात स्त्रियांना फक्त मानाचे स्थान होते. पण मध्ययुगीन कालखंडात परधर्मिय आक्रमणामुळे स्त्रियांचे स्वातंत्र्य पुढे चार भिंतीत कोंडले गेले ते कायमचेच. त्यामुळे समाजात तिला दुय्यम स्थान मिळाले. तिला शिक्षण मिळत नव्हते. कारण ती चार - पाच वर्ष वयाची झाली की, तिचा विवाह करीत. थोडक्यात सामान्य स्त्रियांचे जीवन हालआपेष्टा व कष्टाचे होते.

# ब. आर्थिक पैलू

**५.११ प्रस्तावना :**

छ. संभाजीकालीन आर्थिक जीवनाचे आकलन करतांना तत्कालीन साधनांचा आधार घेऊन विवेचन करावे लागते. मध्ययुगीन इतिहासाचे सुस्पष्ट व साक्षेपी आकलन करून त्याआधारे आर्थिक जीवनाची वैशिष्टये स्पष्ट करावी लागतात. के. एम. चिटणीस म्हणतात, "मध्ययुगीन भारताची अर्थव्यवस्था मुख्यत्वेकरून स्वयंपूर्ण होती आणि त्यामानाने सर्वसाधारणपणे लोकांच्या गरजा कमी होत्या."[१३०] तत्कालीन आर्थिक जीवनाचे विश्लेषण करतांना त्यावेळच्या संस्थात्मक जीवनाची वैशिष्टये प्रकाशात आणावी लागतात.

आर्थिक जीवनाचे दोन स्तर होते असे कृ.ना.चिटणीस म्हणतात, "समाजात लोक साधा पोषाख करीत असत. आणि साधे अन्न खात असत. त्यासाठी फारसा खर्च लागणार नाही अशा प्रकारच्या साध्या घरात ते राहत. परदेशी प्रवाशांनी लिहून ठेवलेल्या वृत्तांतामुळे या सर्व गोष्टींना दुजोरा मिळतो."[१३१] तथापि उच्चभू श्रीमंत वर्गाचे जीवन मात्र त्यापेक्षा अधिक अव्वल दर्जाचे होते. प्रा. चिटणीस म्हणतात, उच्चकुलीन आणि सत्ताधारी लोक मात्र चैनीचे आयुष्य जगत. भारी पोषाख, मसालेदार रुचकर खाद्य पदार्थ अपूर्व आणि दुर्मिळ वस्तू, कलावस्तू आणि विविध प्रकारच्या चैनीच्या वस्तू यांना या वर्गाकडून मोठी मागणी असे."[१३२] श्रीमंत लोकांचे जीवन हे अशा प्रकारे ऐषारामी व सुखी होते. त्यांचा भर हा आपल्या जीवनात प्रतिष्ठा व उंची गाठवणारा होता. तत्कालीन आर्थिक जीवनाची वैशिष्टये ही खालीलप्रमाणे नमूद करता येतील.

## ५.१२ शेती :

शेती हा तत्कालीन अर्थकारणाचा पाया होता. डॉ. अ.रा.कुलकर्णी म्हणतात, "पावसाची अनिश्चितता नेहमीचा युध्दाचा प्रसंग आर्थिक मदतीचा अभाव असाहय राज्यकारभार इ. कारणामुळे महाराष्ट्रातील शेती व्यवसाय आणि शेतकरी हे दोन्ही मागासलेल्या अवस्थेत होते."[१३३] छ. संभाजीकालीन शेतीचे चित्र यावरुन स्पष्ट होते. अ.रा.कुलकर्णी यांनी पुढे म्हटले आहे. "शेती व्यवसायाला मनुष्यबळाची फार मोठी गरज असते. कुटुंबातील अबालवृध्द, स्त्री, पुरुष हे शेतीच्या कामासाठी हवे असतात. शिवकाळात प्रारंभी एक मोठा दुष्काळ पडला होता. त्यात बरीच मोठी मनुष्य हानी झाली होती व ती सहजासहजी भरुन निघण्यासारखी नव्हती. रामदास म्हणतात,'वीसा लोकांत एकचि राहिले.' याचा अर्थ महाराष्ट्राची एक पंचमांश लोकसंख्या या दुष्काळात जीवंत राहीली. या विधानातील अतिशयोक्तीचा भाग सोडला तरीही अपरिमित मनुष्य हानी झाली हे विधान आपल्याला मान्य करावे लागेल."[१३४] छ. संभाजी महाराजांना शेतीच्या बाबतीत या प्रतिकूलतेला सामोरे जावे लागणे भाग होते.

तत्कालीन जीवनाबद्दल मध्ययुगीन अर्थकारणाबद्दल मोरलँडने म्हटले आहे, "साधारणपणे लोकसंख्येच्या १/३० भाग सैन्यांत गुंतला होता. हे प्रमाण शिवकालीन महाराष्ट्राला लागू पडेल असे दिसत नाही. मराठी सैन्यांचे जे काही आकडे सभासदांनी आपल्या बखरीत दिले आहे. त्यावरून असे वाटते की, स्वराज्याच्या कार्यात गुंतलेल्या तरूण मावळयांचे प्रमाण उत्तर हिंदुस्तानातील लोकसंख्या आणि सैन्य यांच्या प्रमाणाहून अधिक असावे."[१३५] महाराष्ट्रामध्ये युध्द मोहिमेत सहभागी झालेला तरूण वर्ग हा मोहिमेमध्ये सहभागी होऊन स्वराज्य रक्षणाचा पाईक झाला होता. तसेच त्याच्या जीवनातील चढ उतार हे या मोहिमेतील सहभागावर अवलंबून असत.

प्रा. कुलकर्णी अ. रा. म्हणतात, "शेती व्यवसाय हा अत्यंत कष्टाचा होता. त्यामुळे अधिक मनुष्यबळाची गरज होती पण दुष्काळातील मनुष्यहानीमुळे आणि घरची कर्ती माणसे स्वराज्याच्या कार्यात गुंतल्यामुळे शेती व्यवसायासाठी पुरेसे मनुष्यबळ उपलब्ध होत नव्हते."[१३६] त्यांच्या या मतामध्ये सत्याचा बराच अंश आहे. त्यांनी पुढे म्हटले आहे, "बैलजोडी ही व्यवसायाची महान शक्ती होती परंतु गनीम आपली जनावरे उचलून नेईल याची धास्ती विशेषतः गावापासून दूर राहणाऱ्या अथवा गनिमाच्या शिवेवरील गावकऱ्यांना नेहमी असे जनावरे गेली म्हणजे सारा व्यवसायच मोडकळीला येई. या काळात गुरेढोरे पळविण्याचे प्रकार वारंवार होत."[१३७] त्यावरुन शेतीमधील अस्थिरता स्पष्ट होते.

शेतीमधील उपकरणाबाबत म्हटले आहे. "शेतकऱ्यांची तिसरी गरज म्हणजे शेतकऱ्यांच्या उपकरणांची नांगर अथवा कुळवांची संख्या हे त्या शेतकऱ्याच्या आर्थिक स्थितीचे द्योतक असे एका नांगराचा, दोन नांगराचा चार नांगराचा धनी असा तो गावात ओळखला जाई. उपकरणांची गरज सामान्यतः गावाच्या कारागीरांकडून भागविली जात होती. गावाची आर्थिक रचना ही या शेतीच्या व्यवसायाला पोषक होईल अशा स्वरूपाची त्याकाळात होती."[१३८] बलुतेदार हे छोटे उद्योजक होते. लाकूड आणि इतर सामान देऊन गावकरी, सुतार, लोहार, चांभार इ. बलुतेदारांकडून आपली शेतीची उपकरणे बनवून घेत. शेतीची उपकरणे खरेदी करण्यासाठी सुध्दा सरकारकडून कर्ज देण्याची व्यवस्था केली जाई.[१३९] त्यावरून मध्ययुगीन शेतीचे अर्थचक्र स्पष्ट होते.

### ५.१३ शेतजमीनीचे स्वरूप व प्रकार :

मध्ययुगात शेतजमीनीचे प्रकार व स्वरूप याबाबत अभ्यासक म्हणतात, "गावाच्या शिवाराचे दोन प्रमुख भाग होते. एक वसाहतीची जागा ज्याला 'पांढरी' असे म्हणत.

आणि दुसरी म्हणजे नांगरीची जागा ज्याला 'वगळी' असे म्हणत." काळीचे दोन भाग असत. प्रत्यक्ष लागवडीखाली असलेली जमीन आणि पडीक जमीन. पडीक जमीनीचा काही भाग गावच्या कुरणासाठी, जत्रेसाठी, बाजारासाठी राखून ठेवला जाई. पडीक जमीन लागवडीखाली आणण्याचे सतत प्रयत्न चालू असत."[१४०] शेतीला उत्तेजन देणे हा त्यामागचा हेतू असे. जमीन कसण्याच्या पध्दती विविध प्रकारच्या होत्या असे दिसते की, सर्व जमिनीची मालकी राजाची असली तरी ती कसण्याचे काम राजा स्वतः करू शकत नसे. त्यासाठी तो जमिनीचा मालकी हक्क गावकऱ्यांना देत असे. त्याच्या मोबदल्यात त्यांच्याकडून खंड घेत असे. त्यानुसार वतनदार, मिरासदार, बलुतेदार हे वर्ग निर्माण होत असत. पडीक जमीन कसण्याकरीता काही मुदतीने उपरी लोकांना दिली जात असे. काही काळानंतर सरकारात नजराणा भरून उपरी लोक जमिनीचे मालक बनत.[१४१] जमीनीची मालकी ही अशा प्रकारे कसणाऱ्यांना दिली जात असे.

जमीनीच्या प्रकाराबाबत प्रा. कृ.ना. चिटणीस म्हणतात, "महाराष्ट्रातील जमीनी सामान्यपणे डोंगराळ, गवताळ व काळया मातीच्या सपाट जमीनी अशा तीन प्रकारात विभागल्या होत्या. दुसरे वर्गीकरण उत्तम, मध्यम, कनिष्ठ अशा प्रकारात असून ते पहिल्या तिन्ही प्रतींना लागून करण्यात येत असे."[१४२] जमीनीची प्रतवारी करून त्यांच्या पिकावर महसूल आकारला जात असे. या नोंदी वारंवार तपासून घेतल्या जात असत.

जमीनीचे उपप्रकारही पाडण्यात आले होते. सामान्यपणे प्रत्येक प्रकारची जमीन चार उपप्रकारात विभागली होती. जिरायती जमिनी, बागायती जमीनी वेगळया दाखविल्या जात असत. बागायती जमीनीत फळझाडे लावली जात असत. पाणीपुरवठयाची सोय नसलेल्या जमीनी पाणीपुरवठयाची सोय असलेल्या

जमीनीपासून वेगळया दाखविल्या जात. पाणीपुरवठा असलेल्या जमीनी पाटस्थळ म्हणजे पाटाचे पाणी मिळणाऱ्या व मोटस्थळ म्हणजे विहिरीचे पाणी मिळणाऱ्या अशा दोन प्रकारात विभागलेल्या होत्या. [१४३] या दोन्ही प्रकारावरून शेतीचे स्वरूप लक्षात येते. राज्यातील जमिनीची अवस्था व एकुण स्थितीचा विचार केल्यास सिंचन अवघड होते व पाण्याखालील असलेल्या जमीनीचे क्षेत्र मात्र अतिशय कमी प्रमाणात असल्याचे मान्य करावे लागले.

### ५.१४ पीके :

छ. संभाजीकालीन पिकांचे स्वरूप हे शिवकाळाप्रमाणेच होते. "या काळात खरीप व रब्बी हंगामात नगदी पीके व उदरनिर्वाहाची पीके अशा दोन प्रकारची पीके घेतली जात. ज्या पीकांपासून रोख पैसा मिळतो. त्यांना नगदी पीके म्हटले जाते. ऊस, कापूस,फळे, भाजीपाला ही नगदी पीके होत."[१४४] नगदी पीके पाण्याची जेथे सोय असे तेथेच घेतली जात परंतु ती मोठया प्रमाणावर घेतली जात नसत. शेतातील एखाद्या तुकडयात भाजीपाला पिकविला जात असे. तर शेतीच्या बांधावर फळझाडे लावली जात. परंतु आंब्याचा बागा मात्र पुष्कळ असत. कोकणात देवगड या ठिकाणी आंब्याच्या पुष्कळ बागा होत्या. चिंच, कवठ, बोरे, सिताफळे, रामफळे यांच्याही तेथे भरपूर बागा असल्याचे दिसते. सातारा व पुणे शहरांच्या आजूबाजूला फळबागा मोठया प्रमाणावर होत्या परंतु इतरत्र मात्र फळबागा असल्याचे उल्लेख मिळत नाही.[१४५]

पुढे तत्कालीन प्रादेशिक पीकांबाबत म्हटले आहे. "इतर पिकात ज्वारी, बाजरी, वरई, हरबरा, तूर, मुग, उडीद, गहू, तांदूळ, वरी, नाचणी, कडधान्य यांचा समावेश होत असे. कोकणपट्टीत तांदूळ मोठया प्रमाणावर पिकत असे. देशावर ज्वारी, बाजरी, गहू ही पीके घेतली जात. वऱ्हाड प्रदेशात कापूस, गहू व थोडया प्रमाणात ज्वारी ही पीके घेतली जात. ज्या शेतकऱ्यांची शेती केवळ पावसावर अवलंबून होती

ते शेतकरी फक्त पावसाळयातील खरीप पिके घेत मात्र पाण्याची सोय असलेले शेतकरी रब्बी व उन्हाळी पिके घेत असत."[१४६] त्या - त्या प्रदेशातील गरजांप्रमाणे पीके घेतली जात असत. जमिनीची प्रत व पाण्याची सुविधा यावर पीकांचे उत्पादन अवलंबून असे. "१७व्या शतकातील खेडे हा एक स्वयंपूर्ण घटक होता. खेडयाला पुरेसे धान्य त्या गावाच्या जमिनीत पीकत असे. जास्त धान्य पीकले तर शेतकरी ते धान्य इतरत्र नेऊन विकत असे." [१४७] यावरून तत्कालीन पीकांचे स्वरूप लक्षात येत. उत्पन्नास पोषक अशी पीके घेण्यावर लोकांचा भर होता.

**५.१५ इनामप्रकार व स्वरूप :**

मध्ययुगात इनाम प्रकार प्रचलीत होता. प्रा. कुलकर्णी अ.रा. म्हणतात, "वीस टक्के जमीन वतनदारांच्या ताब्यात असे."[१४८] हे वतनदार त्यामध्ये आर्थिक बाबतील श्रीमंत असत ते त्यामुळे राजकीय व्यवहारातही प्रभूत्त्व गाजवीत असत. इनाम जमीनीबाबत ते पुढे म्हणतात. "सतराव्या शतकात धर्माचे जीवनात विशेष स्थान होते. 'हे राज्य व्हावे हे श्रींच्या मनात फार आहे.' अशा आशयाचे शिवाजी महाराजांच्या पत्रातील उद्‌गार त्यांच्या धर्मावरील श्रध्देचे सूचक आहे. याला अनुसरूनच अनेक धार्मिक संस्थांना अथवा धर्मचरण करणाऱ्या व्यक्तींना गावची काही जमिन इनाम दिलेली असे. मठ, मशिदी, देवालय, संतांच्या समाधी यांना दिलेल्या जमिनीपासून येणाऱ्या उत्पन्नातून त्या संस्थांची देखभाल केली जाई. या देणग्या अथवा इनामे वंशपरंपरागत असत. मात्र ही देवासाठी दिलेली इनामे ज्यांना देवस्थान इनाम म्हणत त्यांचे सत्तांतर करता येत नसे. एखादया व्यक्तीला, संस्थेला अथवा सर्व गोतसत्तेला ते दुसऱ्याला देण्याचा अधिकार नसे."[१४९] देवस्थानात इनाम हे अशा प्रकारे स्थलांतर करता येत नसत. त्याचे कारण म्हणजे ती धार्मिक व सांस्कृतिक इनामे होती.

छ. संभाजी महाराजांनीही चिंचवड, मोरगाव, चाफळ, सज्जनगड इ. देवस्थानाची व्यवस्था नीट चालावी म्हणून पूर्वीची वृत्ती व इनामे चालू ठेवली.[१५०] इनाम प्रकाराबाबत अ.रा. कुलकर्णींनी म्हटले आहे. "हे इनामे ही प्रामुख्याने दोन प्रकारची होती. एक 'सनदी' इनाम आणि दुसरे 'गावनिसबत' इनाम. सनदी इनाम हे राजसत्तेने सनद अथवा फर्माने यांच्याद्वारे निर्माण केलेली असे. अशा इनामांना काही वेळा संपूर्ण सरकारी शेतसारा माफ केला जात असे."[१५१] शिवकाळामध्ये व छ. संभाजी काळामध्ये इनाम देण्याची पध्दती अशा प्रकारे प्रचलीत होती. ही इनामे धार्मिक कार्यासाठी दिली जात असत. गावनिसबत इनाम म्हणजे एखाद्या कारागीराला किंवा सेवकाला समस्त गावकरी मंडळी अथवा गावातील एखादी व्यक्ती आपल्या कक्षेतील काही जमीन त्याच्या सेवेबद्दल इनाम देत असे" ही जमीन बहुदा सारामुक्त असे. अशा इनामांना 'देहांगी' इनाम म्हणत. सरकार व रयत म्हणजेच जनता यांना जोडणारा महत्वाचा दुवा म्हणजे देशमुख होता. देशमुखांना गांवनिसबत इनाम मिळाल्याचे आढळतात.

"निसबती मलाहरजी बीन आपाजी प्रमाने सदरहु इनाम बदल देशमुखी इनाम अपाजी फर्जर्द मलाहारजी यासी करार केले असे देहाये येक चावर व बाग हकलाजीमा बदल देसमुखी सालाबाद चालिले असे तेणेप्रमाणे चालकीजे भोगवटी यांचे कागद व हुनती मारीयात गेली याचे उजूर न कीजे तालीक ले घेऊन असल फिराऊन दीजे"[१५२] राजा आपल्या मुलींना काही इनाम देत असे अशा इनामांना साडीचोळी इनाम असे म्हणत. जिजाबाईने एका कुलकर्ण्याच्या विधवेला १ चावर जमिन इनाम दिली होती. या प्रकारच्या इनामाला चोळीखण इनाम असेही म्हणत.[१५३] त्याचा हेतू निराधार व्यक्तीला सहाय्य करावे हा होता. स्वराज्यात ज्यांनी कामगीरी केली त्यांच्या कुटुंबियांना विशेष सहाय्य केले जात असे. हेच धोरण छ. संभाजी महाराजांनी पुढे चालविले.

## ५.१६ शेतकऱ्यांची परिस्थिती :

शिवकाळामध्ये शेतकऱ्यांची परिस्थिती कशी होती याबाबत पुढीलप्रमाणे माहिती सांगाता येईल. शेती हाच राज्यातील प्रमुख व्यवसाय आणि रयतेच्या उपजिवीकेचे साधन आणि राज्याच्या उत्पन्नाचे प्रमुख माध्यम होते. शेतकऱ्यांना या काळात रयत कुणबी, कुळवाडी अशा विविध नावांनी संबोधिले जात होते. शेतीत कष्ट करणारा रयतेचा वर्ग हाच शेतीचा आधार होता. त्यामुळे रयतेने शेतीत कष्ट करुन मिळविलेले उत्पन्न हेच राज्याचे उत्पन्न होते. जदुनाथ सरकार म्हणतात, ‘‘महाराष्ट्रात विविध प्रकारची आणि प्रतींची जमिन होती.त्यामध्ये खडकाळ, माळरान, काळी, तांबूस, डोंगराळ व नदयांच्या काठावरील सुपिक जमीनीचा समावेश होता. जमीनीत निघणाऱ्या उत्पादनावरून सरकार जमीनीची अव्वल, दूम, सीम, व वांजट अशी प्रतवारी करत. महाराष्ट्रात अव्वल प्रतीची जमीन एकुण जमीनीच्या एक टक्काही नव्हती तसेच ती शेती निसर्गावर अवलंबून होती.’’[१५४] त्यामुळे छ. संभाजी काळात शेतकऱ्यांना दुष्काळाचा सामना करावा लागला. तेंव्हा त्यावेळेच्या प्रशासनाने महत्त्वाच्या उपाययोजना करून दुष्काळाची तीव्रता कमी केली.

शेतकऱ्यांपुढे या काळात अनेक समस्या होत्या. शेती निसर्गातील पर्जन्यवृष्टीवर अवलंबून होती. राज्यात कालवे, धरणे व पाणी पुरवठयाची साधने फारशी नव्हती त्यामुळे या काळात बागायत जमीनीपेक्षा जीरायत जमिनीचे प्रमाण अधिक राहिले. परिणामी शेतात उत्पादन कमी होत असे. शिवकाळ आणि संभाजी काळात शेतीचे चित्र फारसे भिन्न नव्हते. डॉ. सुभाष पाटील म्हणतात,‘‘शेतीसाठी मनुष्यबळ अधिक लागत असे. परंतु दुष्काळामुळे मनुष्यबळाची मोठी हानी झाली. त्याचा परिणाम शेती व्यवसायावर झाला व गावेच्या गावे परागंदा झाली.’’[१५५] दुष्काळामुळे शेतीचे चित्र भयावह होत असे.

छ. संभाजीकाळातही निसर्गाची प्रतिकूलता आणि दुष्काळाची तीव्रता कायम होती. ब्रीज किसोरे म्हणतात, "हा काळ लष्करी धामधूमीचा होता. छ. शिवाजी महाराजांनी स्वराज्यासाठी सुरू केलेला लढा छ. संभाजी, छ. राजाराम, छ. शिवाजी तिसरे व महाराणी ताराबाई यांनी स्वराज्यरक्षणासाठी चालविलेला लढा यासाठी लष्कराची आवश्यकता होती. त्यामुळे तरुण वर्ग लष्कारात सामील झाला. परिणामी शेतावर राबण्यासाठी मजूर व कष्टकरी वर्ग राहिला नाही."[१५६] शेतावर काम करणारा मजूर वर्ग कमी पडत असे. शेतकऱ्यांना शेतीची अवजारे, बैलजोडी, बी-बीयाणे व खताची आवश्यकता असे. हे सर्व मिळणे कठीण होते. थोडक्यात या काळातील शेतकरी अनेक अडचणीत जीवन जगत होता. मात्र तो सतत कष्ट करुन उत्पादन वाढविण्याचा प्रयत्न करीत होता. प्रतिकूल अशा परिस्थितीतून मार्ग काढणे गरजेचे होते. छ. संभाजीच्या काळात दुष्काळाची तीव्रता ही अधिक होती. महाराष्ट्राचा प्रदेश दख्खनच्या पठारात मोडत असून त्यातील शेतीची सुरूवात ताम्र पाषाण युगात झाली. हा प्रदेश पर्जन्यछायेत येतो. ५०० ते ७५० मीमी. च्या दरम्यान पाऊस पडतो. परंतू पाऊस हा अनिश्चित स्वरूपाचा पडत असल्यामुळे या पठारावरील शेतकऱ्यांना वारंवार दुष्काळाशी सामना करावा लागतो. दुष्काळ ही इतिहासाला अपरिचित अशी घटना नाही. इ.स.पुर्व २००० पासून दुष्काळाचे उल्लेख आपल्याला सापडतात. अर्थात काळाच्या ओघाने दुष्काळाचे स्वरूपही बदललेले दिसते.

शिवपूर्वकाळ व शिवाजीच्या काळापासून ते पेशवाईपर्यंतच्या मराठी आमदानीतही बरेच दुष्काळ पडल्याचा ऐतिहासिक कागदपत्रातून उल्लेख मिळतो. १६२९-१६३० मध्ये दख्खनच्या भागात मान्सूनचा पाऊस पडला नाही. या दुष्काळाचे परिणाम सर्व मराठी प्रदेशाला दीर्घकाळ भोगावे लागले. या दुष्काळाचे वर्णन कवी परमानंदाने 'शिवभारत' या ग्रंथात केले आहे."देशात पाऊस न पडल्याने धान्य खूप महाग झाले.

खाण्यास काहीच न मिळाल्याने सर्वत्र हाहाकार उडून पशू पशूस व माणसे माणसास खाऊ लागली."[१५७] दुष्काळाचा प्रभाव एवढा जबरदस्त होता की, त्यामुळे धान्याची टंचाई निर्माण होऊन रयतेवर उपासमारीची पाळी आली. अनेकांनी स्थलांतर केले व कित्येक मरण पावले.

शिवकाळात १६७१ या वर्षी पुणे परगण्यात नेहरणीच्या प्रदेशात दुष्काळ पडल्यामुळे ज्वारीचे पीक बुडाले, रब्बी पिकेही नष्ट झाली, गव्हावर तांबेरा पडला, हरबऱ्यावर घाटी पडली सर्वत्र रब्बीचे पीक बुडाले. पिकांची अतिशय दुर्दशा होऊन सर्वत्र दुष्काळाची गडद छाया पसरली.[१५८] छ. शिवाजीने या दुष्काळग्रस्थांना सहाय्य केले होते. ते कार्य छ. संभाजीने पुढे चालू ठेवले.

वा.सी. बेंद्रे छ. संभाजीकालीन दुष्काळाबाबत लिहितात, "छ. संभाजीच्या काळात इ.स. १६८३ महाराष्ट्रात पावसाळयास सुरवात होऊन पाच महिने अतिवृष्टी होऊन शेतामध्ये समुद्रासारखे पाणी झाले होते. त्यामुळे मोठा दुष्काळ पडला होता."[१५९] पुढे ते म्हणतात, "छ. संभाजीराजांच्या कारकिर्दीत शत्रूच्या परचक्राबरोबर दुष्काळ व प्लेग दोन्हीही निसर्गाची संकटे निर्माण झाली होती. इ.स. १६८४ या वर्षी पश्चिम किनाऱ्यावर दुष्काळ पडला त्यामुळे जनतेने निरनिराळया ठिकाणाहून स्थलांतर केले होते. या काळात तांदळासारख्या धान्याची खूपच टंचाई निर्माण झाली. यावर्षी अंबोला व वसई परिसरात साथीचे रोग होऊन पुष्कळ लोक मरण पावल्याने त्यांना पुरण्यासही वेळ मिळत नव्हता."[१६०] अशा परिस्थितीतून वाटचाल करतांना दुष्काळ निवारण्यासाठी छ. संभाजी महाराजांनी यथायोग्य उपाययोजना केली होती.

१६८६-८७ या वर्षी मराठी मुलखात मोठा दुष्काळ पडला होता. या वर्षाच्या महाराष्ट्राच्या दुष्काळाची परिस्थिती किती भयानक होती. याची कल्पना इंग्रजांनी लंडनला लिहिलेल्या पत्रातून मिळते. ते म्हणतात, "महाराष्ट्रात अवर्षण झाले त्यामुळे

धान्य टंचाई होऊन महागाई वाढली. देवीसारख्या साथीच्या रोगाने अनेक स्त्री-पुरूष, मुले मरण पावली.''[१६१] त्याकाळात असे साथीचे रोग असत. त्यावर काही वैदू औषध देत. परंतु लोक गंडे दोरे घालत असत.

इ.स. १६८७ हे वर्ष सर्वांनाच फार कठीण गेले. दुष्काळ, प्लेग, रोगराई यांनी मोगल सैन्य मृत्यूमुखी पडले. अतीवृष्टीमुळे पुष्कळशी वाताहात झाली. सर्व प्रजा हवालदील झाली होती.[१६२] अशा प्रकारे दुष्काळाचे चटके शेतकऱ्यांना बसत होते. वि.का.राजवाडे म्हणतात, दुष्काळामुळे कित्येकाने घरेदारे व वतने विकली.[१६३] या नोंदी तत्कालीन परिस्थितीची भयानकता स्पष्ट करतात. केवळ शेतकरीच नव्हे तर मिरासदारही दुष्काळाच्या छायेत सापडले होते.

नैसर्गिक कारणांबरोबरच मानवांची कृत्येही दुष्काळास कारणीभूत ठरत असत. सैन्याची बंडे, लढाया, शत्रूच्या आक्रमक हालचाली, शत्रूच्या सैन्याने केलेल्या प्रदेशांची लुट, उभ्या पिकाच्या शेतात सैन्याने केलेले मुक्काम व तेथे उभारलेली छावणी यामुळे पिकांची हानी होऊन दुष्काळी परिस्थिती निर्माण होई. शेती लावणीच्या काळात जर शत्रूसैन्याचे आक्रमण झाले तर शेतकऱ्यांचे सारे परिश्रम व्यर्थ जाऊन दुष्काळाची स्थिती तयार होई.

छ. संभाजीच्या काळात इ.स.१६८३-१६८४ या वर्षी मोगलांच्या सैनिकांच्या हालचालींनी मौजे सेखापूर नाझरे परगणा माण या भागातील पीक खराब केल्यामुळे दुष्काळ पडला.[१६४] वा.सी.बेंद्रे म्हणतात, ''त्यामुळे त्या प्रदेशातील लोकांचे जीवन हे दुष्काळ पिडीतांप्रमाणेच झाल्याचे कागदपत्रावरून दिसून येते. मोगल सैन्याने संभाजी राजांच्या प्रदेशात हल्ले करून सर्वत्र धुमाकूळ माजवला व मुलखाची नासधुस केली. गावे जाळून ओस बनविली. औरंगजेबाचा मोठा मुलगा शहाआलम आपल्या ४० हजार मोगल फौजेने संभाजीराजांच्या प्रदेशात जेथे जात असे तेथे नासधुस करून दुष्काळाची

स्थिती निर्माण करी."[१६५] अशा प्रकारे मोगलांच्या अस्मानी-सुल्तानी आक्रमनामुळे स्वराज्यमुलखात कमालीचे अराजक माजत असे. व दुष्काळाची संकटे अधिक तीव्र होत असत.

जोशी, शं.ना. म्हणतात, "मोगलांच्या धुमाकुळींमुळे व लुटालूटीत मुलुख वैराण व रयत हैराण होत असे. रयत कामगार आपली आपुलकीने स्वराज्यावर विश्वास ठेऊन लावणी व संचणी करीत असत. "लखवा देसाई, मामले तारे गळ याने विनंती केली की गतवर्षी सुल्तान तारा मोगल लष्करासमवेत येऊन कसबे मजकुरी मुक्काम करून घरे दारे, पेठ मोडून पळाले त्या गावात साक्षात देवस्थान तेही छिन्न-भिन्न केली. मोठमोठी देवालये नष्ट केली होता गावात मरण सुटून माणसे मरू लागली."[१६६] अशा प्रकारच्या अत्याचारामुळे मराठी मुलुखातील लोक हैराण झाले होते. त्यांना सुरक्षा आणि जागरूकता हवी होती. ती छ. संभाजी महाराजांनी दिली.

### ५.१७ शेतकऱ्यांच्या कल्याणाचे प्रयत्न :

सतराव्या शतकात दुष्काळामुळे लक्षावधी लोक मृत्युमुखी पडले असे इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांना वाटते. मुसलमानांचे आक्रमण हे सुल्तानी संकट मानले जात होते. तर अस्मानी संकट हे नैसर्गिक आपत्ती मानली जात होती. या दोन्ही संकटाच्या तावडीतून महाराष्ट्राच्या रयतेची अत्यंत दयनीय अवस्था झाली होती. या दुष्काळामुळे पीके नष्ठ होऊन वसलेली खेडी ओस पडली. मोठमोठे मुलूख उजाड झाले. विहिरी, नाले पाण्याअभावी सुकून गेले तेंव्हा महाराष्ट्रातील जनता जिकडे वाट मिळेल तिकडे उदरनिर्वाहासाठी वणवण भटकू लागली.

मराठी राज्यकर्त्यांनी स्थलांतरीत रयतेला व दुष्काळ पिडीतांना तातडीच्या स्वरूपात आर्थिक मदत देऊन पुनर्वसन करण्यासाठी व शेतीची लागवड करण्यासाठी प्रोत्साहन दिले. दुष्काळ पडला असता तातडीची उपाययोजना म्हणून धान्याच्या किंवा

पैशाच्या स्वरूपात, तगाईच्या, कर्जाच्या रूपाने आर्थिक मदत देऊन दुष्काळ पिडीतांना दिलासा देण्याचे प्रयत्न केलेले दिसून येतात. ५ सप्टेंबर १६७६ रोजी छ. शिवाजी महाराजांनी आपल्या अधिकाऱ्यांना असा आदेश दिला की, "ज्याला जे सेत करावया कुवंत माणुसबळ आसेली त्या मार्फाक त्यापासी बैल दाणे संच आसीला तर बरेत जाले. त्यासी किर्द करीत ज्याला सेत करावयास कुवत आहे माणूस आहे आणि त्यास जोताला बैल नांगर पोटास दाणे नाही. त्यावीण तो आडोन निकामी जाला असेल तरी त्याला रोख पैके हाती घेऊन दोचो बैलाचे पैके द्यावे बैल घेवावे व पोटास खंडि दोन खंडि दाणे द्यावे."[१६७] त्यावेळी विनिमयाची पध्दत रूढ असल्याने धान्याचा उपयोग अशा प्रकारच्या व्यवहारात केला जात असे.

बैलाच्या खरेदीसाठी दिलेल्या पैशावर व्याज घेऊ नये शेतकऱ्यांच्या सवडीनुसार हप्त्या हप्त्याने केवळ मुद्दल वसुल करावे असाही महाराजांचा आदेश होता. ते म्हणतात, "पेस्तर त्यापासून बैलाचे व गल्याचे हळूहळू यांचे तवानगी माफीक घेत घेत वसुल घ्यावा."[१६८] यावरून छ. संभाजी महाराज हे शेतकऱ्यांच्या कल्याणाची कामे तत्परतेने करत असत. याची कल्पना येते.

शेतीसाठी नांगर, तिफन, कोळपी, गाडी, कुळव इ. अवजारांची आवश्यकता असे. अशी अवजारे बनवून देण्याचे काम सुतार आणि लोहार करीत असे.चांभार हा विहिरीतून पाणी बाहेर काढण्यासाठी चामडयापासून मोट बनवित असे. "शेतीची अवजारे आणि बी-बियाणांच्या खरेदीसाठी सरकारांकडून पैसा दिला जात असे. शेतीत कष्ट करून जमीन पीकेलच असेही नव्हते. याशिवाय शेतीचा व्यवसाय सुरळीत ठेवणे गरजेचे होते. यासाठी शेतकऱ्यांना शेटे, महाजनांकडून प्रसंगी पंचवीस टक्के दराने घ्यावे लागे. अशावेळी सरकारी खजिण्यातून त्यांना धान्य पुरविले जात असे."[१६९] अशा प्रकारे छ. शिवाजी महाराज दुष्काळ निवारण्यासाठी प्रयत्न करीत होते.

जोशी शं.ना. म्हणतात, "छ. संभाजी महाराजांनीही काही उपाय योजिलेले दिसून येतात. छ. संभाजी राजांच्या कारकीर्दित मराठीराज्यास सतत चार ते पाच वर्ष दुष्काळाचा तडाखा बसला. १६८४ या वर्षी चेऊल प्रांत दुष्काळ पडला असता. रयतेस उपासमारीतून वाचविण्यासाठी छ. संभाजीराजांनी आर्थिक मदत पाठविली."[१७०] दुष्काळ निवारण्यासाठी केलेले उपाय रयतेचे जीवन सुखी करण्यासाठी उपयोगी होते. तसेच कर्जपुरवठा उपलब्ध करून दिला.

कोकण किनाऱ्यावरील चेऊल प्रांतातील दुष्काळपिडीस जनतेस कर्जपुरवठा केल्याचा पुरावा मिळतो. दुष्काळात अनेक माणसे मेली. जे जिवंत राहिले त्यांच्यासाठी सरकारने कर्ज मंजूर केले. ज्या शेतकऱ्यांजवळ बैल नसतील त्यांना बैल देण्याचे आदेश सरकारी अधिकाऱ्यांना देण्यात आले होते.[१७१] तसेच शेतकऱ्यांना शेतीच्या विकासाच्या दृष्टीने पुर्नलावणीसाठी कर्जपुरविले जात होते. एवढेच नव्हे तर देशमुख व कुलकर्णी यांच्याकडून येणारी खंडणीदेखील कमी केली जात होती.[१७२] छ. संभाजी महाराज हे शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी कसे काळजीपूर्वक निर्णय घेत असत याची कल्पना येते. त्यांनी शेतकरी केंद्रबिंदू माणून त्याच्या कल्याणावर भर दिला होता. तसेच पुणे प्रांतात इ.स. १६८६-१६८७ दुष्काळात जमिनीची लावणी संचणीदेखील होऊ शकली नाही. तेंव्हा मौज आसवलीच्या सुर्याजी ढमाळ पाटील यास दिलासा देऊन मुलुख लागवडीखाली आणण्याचे प्रोत्साहन दिलेले दिसते.[१७३] जोवर मुलुख शेतीच्या लागवडीखाली येत नाही. तोवर पिकाचे उत्पन्न वाढणार नाही. याची त्यांना खात्री वाटत होती.

तसेच चेऊल प्रांत १६८७-१६८८ लष्कराच्या धामधूमीमुळे खूप नुकसान झाले होते. तेंव्हा शेतसारा निश्चित करण्यासाठी पाहणी करण्याचे काम सुरू झाले असता. रयेत कामावर यावी म्हणून सुखरूप राहून शेतीची लागवड करावी म्हणून व

रयतेस संभाजीराजांनी अभयपत्रे दिली होती. मोगल सैन्य ज्या गावावर धाडी घालणार त्या त्या गावाचा मुलूख मोगल सैन्य तेथे पोहचण्यापूर्वीच ओस करावयाचा अशा रयतेस संभाजी राजांनी अभिवचने दिली आणि नंतर त्यांना पुनर्वसनासाठी मदतही केली होती.[१७४] इ.स. १६८७ यावर्षी मराठी राज्याच्या काही भागात अवर्षणाची स्थिती निर्माण झाली असता. संभाजी राजांनी शेतकऱ्यांना शेतसारा व व्यापारावरील बारमाही कर यावर्षासाठी माफ केला होता.[१७५] छ. संभाजी महाराजांनी ही टाकलेली पाऊले खरोखर महत्त्वाची समजली पाहीजेत. तसेच मराठी अमदानीत दुष्काळाचेवेळी धार्मिक मठांमार्फत दुष्काळ पिडीतांसाठी अन्नधान्य वाटले जाई. अशा धार्मिक मठांना राज्यकर्त्यांकडून जमिनी इनाम दिल्या होत्या. छ. संभाजीने चिंचवड देवस्थानास गाव इनाम करून दिल्याची सनद करून दिली. त्यामुळे दुष्काळ पिडीतांना मदत मिळू लागली.[१७६] "छ. संभाजी महाराजांनी जावळीसुभ्यात मेढे तालुक्यातील सायगाव येथेही अन्नछत्राबद्दल प्रोत्साहन दिले होते."[१७७] डोंगराळ प्रदेशातील मराठयांना स्वारीवर नेऊन रोजगार मिळून दिला.[१७८]

शिवकाळ व संभाजी महाराजांचा काळ यात फारसा फरक दिसत नाही. छ. संभाजी महाराजांनी अत्यंत दूरदृष्टीने दुष्काळ निवारण्यासाठी पाऊले टाकली होती असेच म्हटले पाहिजे.

### ५.१८ जलसिंचन योजना :

छ. संभाजीकालीन जलसिंचनाच्या विविध योजनांचे स्वरूप पाहता त्यांचे शास्त्रीय अध्ययन केले असता. त्यावर नवा प्रकाश पडू शकतो. डॉ. अ.रा.कुलकर्णी म्हणतात, "केवळ शेतीवर आधारलेल्या आर्थिक व्यवस्थेत पाटबंधाऱ्यांचे महत्त्व किती असते हे सांगण्याची आवश्यकता नाही. शेतीला पाणीपुरवठा करण्याच्या कार्याकडे अगदी अनादी कालापासून राजेलोकांनी लक्ष पुरविल्याची उदाहरणे आढळतात. शिवाजी

महाराज किंवा महाराष्ट्रातील तत्पूर्वीचे राजे पारंपारिक धोरणाचा पाठपुरावा करीत असले तर त्यात काही नवल नव्हते. कारण शेतीला योग्य पाणीपुरवठा हाच एक शेतीसुधारण्याचा मार्ग त्याकाळात उपलब्ध होता."[१७९] त्यामुळे शिवकाळात व संभाजीकाळातही शेतीला योग्य पाणी पुरवठयाचे धोरण आखण्यात आले व ते अनुसरण्यात आले.

महाराष्ट्रात जिराईत जमीनीचे प्रमाण अधिक होते. शेती हा व्यवसाय निसर्गावर अवलंबून होता. कमी पाऊस पडला तर शेतीचे नुकसान होत असे. त्यामुळे शिवकाळात पाणीपुरवठयाकडे कसे लक्ष दिले जात होते ते समजते. विहिर असलेल्या शेतांना 'मोटस्थळ' असे म्हणत. कालवे अथवा विहिरी यांच्या पाण्यावर पिकविल्या जाणाऱ्या जमीनीला 'बागाईत' म्हणत विहिरीच्या पाणी पुरवठयावरही काही मर्यादा होत्या. प्रत्येक शेतात विहिर खणणे अथवा खणली तरी त्यापासून मुबलक पाणी मिळणे या गोष्टी दुरापास्त असत. त्यामुळे गावातील विहिरींची संख्या मर्यादित होती. पुणे परगण्यातील मौजे खोर यागावी बागायतीसाठी जून्या फक्त तीन विहिरी होत्या आणि त्यापैकी गावानजीक महारिकेमध्ये एक होती असा उल्लेख एका पत्रामध्ये आढळतो.[१८०] यावरून पाणीपुरवठा व्यवस्थेचे चित्र स्पष्ट होते.

डॉ. अ. रा. कुलकर्णी म्हणतात, "बंधारे बांधणे, कालवे खोदणे आणि त्यांची देखभाल करणे ही सामान्यतः गावच्या लोकांची जबाबदारी मानली जात असे. ज्यांना पाटाच्या पाण्याचा उपयोग होत असे. असे सारे शेतकरी परस्परांच्या सहकार्याने हे काम करीत होते. या पाण्याचे वाटप कसे करावयाचे यासंबंधीचे करार त्यामध्ये होत. कालवे, बंधारे जरी गावकऱ्यांनी बांधले तरी त्यावर सत्ता सरकारची असे. कारण पाणी ही निसर्गाची देणगी होती. त्यामुळे त्यावर मालकी सरकारची असे. अर्थात सरकार या बांधकामासाठी लागणाऱ्या खर्चाचा काही भाग अथवा संपूर्ण भाग उचलीत

असणे स्वाभाविक आहे. पाटाच्या पाण्याचा वापर करणाऱ्या शेतकऱ्यांना इतरांपेक्षा थोडा जास्त शेतसारा दयावा लागत असे.''[१८१] या सर्व उदाहरणावरून शिवकालीन जागृतता स्पष्ट होते.

छ. संभाजीकालीन सिंचन व्यवस्थेची काही उदाहरणे खालीलप्रमाणे सांगता येतील. डॉ. सुभाष पाटील म्हणतात, ''दुष्काळाच्या संकटापासून बचाव करण्यासाठी कायमस्वरूपी योजना आखण्याचे प्रयत्न संभाजी राजांनी केले होते. कालवे, पाटबंधारे खोदून त्यामार्फत शेतीला पाणीपूरवठा करणे. धरणे, तलाव, विहिरी खोदण्यास शेतकऱ्यांना उत्तेजन देणे इ. योजना मानवी जीवन सुखी करण्यासाठी केल्या होत्या. छ. संभाजीच्या कारकीर्दीत ओहाळास बांध घालून त्या पाण्याचा उपयोग सभोवतालची जमीन पाण्याखाली भिजण्याच्या पध्दतीस सरकारकडून उत्तेजन दिले जाई. सोलापूर प्रांतामध्ये मोहळच्या ओढयामध्ये धरण बांधून पाणी अडविण्याचा असाच प्रयत्न छ. संभाजीने केला होता. हे काम इ.स. १६८२ मध्ये सुरू होऊन इ.स. १६८९-९० पर्यंत चालले असे दिसते.''[१८२] मोहळ येथिल ओढयाचे बांधकाम म्हणजे एका अर्थाने तलाव बांधण्याचा प्रयत्न होता. या तलावाचे अवशेष आजही पहावयास मिळतात. त्यावरून छ. संभाजीची सिंचनदृष्टी स्पष्ट होते.

अशा प्रकारे छ. संभाजीच्या काळातही शिवकाळातील धोरण पुढे नेण्यात आले असे म्हणता येईल. अशा प्रकारे शेती व शेतकरी यांच्या हिताचे सिंचन धोरण होते असे म्हटले पाहिजे.

### ५.१९ जमीन महसूल पध्दती :

जमिन महसुल हे राज्याच्या उत्पन्नाचे प्रमुख साधन होते. शिवकालीन जमिन महसूल पध्दतीचे वर्णन रयतेची पध्दती असे केले जाते. त्यामध्ये जनतेचे कल्याण साध्य करण्यावर भर दिला जात असे. डॉ. कृ.ना. चिटणीस म्हणतात, ''जमीनीचे

स्वरूप, तिच्यावरील पिकांचे स्वरूप पाणीपुरवठयाची उपलब्धता हे व अशा प्रकारचे अनेक घटक महसुलाची आकारणी करतांना विचारात घेतले जात असत.''[१८३] महसूल व्यवस्था ही शेतकऱ्याला जाचक ठरू नये असा शिवाजीचा प्रयत्न होता.

डॉ. अ.रा. कुलकर्णी म्हणतात, शिवकालीन महसूल पध्दत हे थोडक्यात समजून घेणे इष्ट ठरेल. जमीनीचा सारा निश्चित करण्यापूर्वी जमीनीची मोजणी करणे आवश्यक होते. मोजणीसाठी जे साधन वापरीत त्यास 'शिवकाठी' असे म्हणत.'' [१८४] छ. संभाजीच्या काळात अशी शिवकाठी वापरली जात असे. तीचा उपयोग जमिनीचे मापन करण्यासाठी होत होता.

सभासद बखरीत म्हटले आहे. ''पांच हात पांच मुठीची काठी, हात चवदा तसूच असावा हात व मुठी मिळून बैशी तसूंची लांबी काठीची. वीस काठया औरस चौरस त्याचा बिघा एक, बिघे एकशेवीस यांचा एकचावर. अशी जमीन मोजून, आकारून गावाची गावं चौकशी केली.'' [१८५] छ. संभाजी महाराजांनी शिवकाळातील महसूल व्यवस्थेत सुधारणा करून तीच महसूल व्यवस्था पुढे चालविली.

संभाजीकालीन कृषी जीवन स्पष्ट करतांना डॉ. सदाशिव शिंदे म्हणतात, ''या देशाचा परंपरागत शेती व्यवसाय हा शिवशाहीच्या काळातही प्रमुख उत्पन्नाचे व पोटापाण्याचे साधन होते. शिवाजीराजांनी आपल्या राज्यातील सर्व जमीनीची मोजणी करावयाचे योजून त्यानुसार शेतसारा आकारणीचे योजना विकसीत करावयाच्या पध्दतीचा अभ्यास केला. आण्णाजी दत्तो यांनी राज्यातील सर्व जमीनीची मोजणी केली. त्यावेळी मोजणीची पध्दत तसू, शिवशाही काठी आणि बिघा या परीमार्गांनी केली जात असे. पिकाऊ जमीन, नापिक जमीन, पड, जंगल, कुरण यांवर जमीनीच्या प्रतीनुसार सारा आकारला जाई. जमीनीची प्रत तेथिल स्थानिक शेतकरी व परंपरागत पध्दतीनुसार व ग्रामस्थांच्या मदतीने ठरविली जाई.

अव्वल जमीन, बागायती जमिन, निमबागायती, एकपिकी, दोनपिकी, पूर्ण जिरायत, फळबागा वगैरे सध्याच्या पध्दतीसारखीच पध्दत असे. व पीकपाहणी केली जाई. परगणा अधिकारी, ग्रामअधिकारी, पाटील इ. मंडळी अहवाल तयार करीत. जमीन महसूल धान्याच्या रुपाने वसूल करीत असत. एकूण उत्पन्नाच्या ३३ टक्के सारा दयावा लागे."[१८६] छ. संभाजीकालीन महसूल पध्दती शिवकालीन पध्दतीवर आधारलेली होती.

डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, "तत्कालीन १६ कर असे होते.

१. नारळ, सुपारी, भात यांवर कर घेतला जाई. इ.स. १६८५ पूर्वी १०० नारळामागे ५।। व सुपारीस दरमणाला, नारळास ।। व सुपारीस १०।। टक्के असा कर आकारला गेला.

२. मिठागार/घरावर कर

३. व्यापाऱ्यांवर व्यवसायकर

४. गाई, म्हशी यांच्यावर कर

५. दत्तक घेणारास कर

६. उत्पन्न कर

७. नगदी पिकावर करआकारणी होत असे. ऊस, आले, हळद, भाजीपाला, कांदा, बटाटे, केळी वगैरे

८. पाटाच्या पाण्याची सोय

९. वतनदारांकडून त्यांचे उत्पन्नाच्या प्रमाणात कर घेतला जाई. पाण्याची सोय असेल तेथे पाणीपट्टी द्यावी लागे.

१०. इनामदारांकडून खंडणी वसूल केली जाई. (१६८१-८५) उदा. १९ ऑक्टोबर, १६८३ चे पत्रातून केसो त्रिमल लिहितात - विनायक उमाजी सुभेदार व कारकून सुभा प्रा.।। पुणे यांना पूर्वी प्रांतचे देशकुलकर्णी सनिध येऊन विनंती केली. देशमुख व देशकुलकर्णी यांस पेशगी रा. दादाजी कोंडदेव सुभेदार तोही इनामत खंडणी दरसालास दिधली होनु ४०० देशमुखास ३०५ व देशकुलकर्णी होनु ९५ एकूण ४०० होनु खंडणीचा तह दिधला. त्याप्रमाणे गलबलिया वसूल होत आला आहे. हाली १०/५ साले गलबला जाला आहे....

११. इनामपटटी - इनामपटटी ही इनामदारांकडून क्वचित्प्रसंगी वसूल केली जात असे. मठांना व साधुसंतांना दिलेल्या इनामांवर हा कर माफ केला होता.

१२. मिरासपटटी - मिरासदारांकडून त्यांच्या मिराशी संपत्तीतून हा कर वसूल केला जाई.

१३. व्यवसायकर - राज्यातील सर्व व्यावसायिकांकडून हा कर वसूल केला जाई.

१४. सराफी किंवा सराफकर - सराफ हे पैशाची नाण्यांची अदलाबदल करण्याचा व्यवसाय करीत. तसेच सावकारी धंदा करीत, त्यांना कर द्यावा लागे.

१५. सुतार, न्हावी, गुरव, सोनार, धोबी, लोहार, तेली, तांबोळी, साळी, कोष्टी, कुंभार सर्व धंदेवाल्यांना कर द्यावा लागे.

१६. वेठबिगारी - गुलामांवर कर-आकारणी केली जाई."[१८७] या सर्व नोंदी कररचना व कारभार स्पष्ट करणाऱ्या आहेत. या करावरून सरकारची जागरूकता लक्षात येते.

शिवाजी महाराजांनी मुलकी व्यवस्थेसाठी जे घटक निर्माण केले होते. ते छ. संभाजीच्या कारकीर्दीत कायम होते असे म्हणता येईल.

**५.२० ग्रामीण व्यवसाय :**

ग्रामीण कारागिरांची व त्यांच्या उद्योगधंद्यांची माहिती परमानंदने आपल्या 'शिवभारत' या ग्रंथात दिली आहे.[१८८] त्यावरून सतराव्या शतकातील खेडयातील उद्योगधंदयांची कल्पना येते. परमानंदाने उल्लेख केल्याप्रमाणे शिवकालीन खेडयात सोनार, लोहार, तांब्याची भांडी तयार करणारे तांबट, सुतार, चांभार, कुंभार, विणकर, दोरखंडे वळणारे मांग, तेली, घोंगडी विणणारे धनगर, बांबूपासून वस्तू तयार करणारे बुरूड, शिंपी, न्हावी, परीट, माळी, गवंडी, रंगारी असे अनेक कारागीर खेडयात नाना उद्योग करून आपली उपजिवीका करीत असत. त्यांची ही सर्व कामे छ. संभाजीकाळात चालू होती. हे सर्व कारागीर म्हणजे जणू त्याकाळातील लघूउद्योजक होते.

याशिवाय काही धंदेवाईक गायक, वादक, टाळकरी, विणकरी आपल्या कलेवरच पोट भरत असत. तांबोळी पाने सुपारी विकण्याचा धंदा करीत, दारू काढणारे व विकणारे कलाल, बांगडयांचा धंदा करणारे कसार, मूर्ती तयार करणारे मूर्तीकार असे असंख्य लोक खेडयात उद्योग करून, हस्तव्यवसाय करून आपले पोट भरीत असत. त्यातील कुशल कारागीर आपल्या वस्तू आठवडयाच्या बाजारात विकण्यास आणीत.

**५.२१ व्यापार :**

चौल, दाभोळ,कल्याण, भिवंडी, पेल हे व्यापारी केंद्रे होती असा उल्लेख फॅक्टरी रेकॉर्डस मध्ये आढळतो. चौल दाभोळ या बंदराचीतर सुरत आणि गोव्याशी तुलना केली जात असे. मध्ययुगीन महाराष्ट्र व्यापाराच्या क्षेत्रात कोठे होता हे स्पष्ट करतांना डॉ. कृ.ना. चिटणीस म्हणतात, "मध्ययुगीन काळामध्ये महाराष्ट्र मुस्लिम सत्ताधीशांच्या वर्चस्वाखाली होता आणि त्यानंतर मराठा सत्ताधीशांच्या अंमलाखाली

होता. महाराष्ट्राच्या आयात व्यापारामध्ये क्रयवस्तू आणि चैनीच्या वस्तू यांचा अंतर्भाव होत असे. अन्नपदार्थ, कापड, मसाले, औषधे, घोडे, तांबे, पारा आणि तत्सम वस्तूंचा समावेश क्रयवस्तूंमध्ये होत असे. मलमल आणि रेशिम कापड, मौल्यवान रत्ने, मोती, हत्ती यांचा समावेश चैनीच्या वस्तूंमध्ये होत असे. महाराष्ट्राच्या निर्यात व्यापारामध्ये गहू, बाजरी, कापड, मलमल, आणि डाळी यांचा समावेश होत असे."[१८९] यावरून आयात निर्यातीचे चित्र स्पष्ट होते. महाराष्ट्राचा व्यापार त्याकाळात इतर प्रदेशांशी होत असे. परदेशी व्यापारही समृध्दीचे प्रतीक होता. शिवकालीन महत्त्वाची बंदरे पुढील प्रमाणे होती. "गुजरात आणि मलबार प्रमाणेच महाराष्ट्रालाही कोकण किनाऱ्यावरील चांगल्या बंदराचे वरदान मिळाले होते. या बंदरातून अरबस्तान आणि इराण या परदेशांबरोबर आणि भारतीय किनाऱ्यावरील गुजरात आणि मलबार यांच्याबरोबर सागरी व्यापार चालत असे. कोकणातील सागरी व्यापार वसई, ठाणे, चौल, दंडराजापूरी, मांडला, दाभोळ, संगमेश्वर, विजयदुर्ग आणि बांधा येथून चालत असे. ठाणे व वसई ही कोकणातील दोन बंदरे गुजरातमध्ये होती. चौलदंडराजापूरी ही बंदरे अहमदनगरच्या निजामशाही राज्यात होती. तर दाभोळ, संगमेश्वर, विजयदुर्ग आणि बांधा यांची मालकी विजापूरच्या आदिलशहाकडे होती. चौल हे एका रूंद नदीच्या मुखाशी वसलेले होते आणि तेथील व्यापारासाठी प्रसिध्द होते. डिसेंबरपासून मार्चपर्यंत व्यापार अतिशय जलद होत असे. आणि मलबार व इतर ठिकाणाहून येणारी अनेक जहाजे त्याला भेट देत असत. मलबार येथून येणारी जहाजे, मसाले, सुपारी, नारळ, औषधे, ताडगुळ, मेण, पारा, हिंगूळ, तांबे हा व्यापारी माल लादून येत असत. या वस्तूंना येथे फार मोठी मागणी होती आणि यातील काही वस्तू गुजरातमधील इतर ठिकाणी नेण्यात येत असत. तेथील व्यापाऱ्यांनी आणलेल्या जहाजातून या वस्तू नेण्यात येत असत. डिसेंबर ते मार्च या सागरी वाहतूकीच्या काळात चौल येथे माणसांची अतिशय गर्दी होत असे. दंडराजापूरी हे सुध्दा चौलप्रमाणे

एक बंदर होते. येथे अनेक गुजराथी व मलबारी लोकांची जहाजे तेथे येत असत. दंडराजापूरी येथे वस्तूंचा फारसा व्यापार चालत नसावा असे वाटते. मांडलाच्या सागरी बंदरामध्ये मसाले, तांबे, पारा, नारळ आणि निरनिराळया ठिकाणाहून येणारी सुपारी येत असे. या मालाला देशाच्या वरच्या भागात व्यापार करणाऱ्यांकडून मोठी मागणी असे. दाभोळ हे वासिष्ठी नदीच्या मुखाच्या उत्तर किनाऱ्यावर वसलेले होते. त्या नदीला अंजनवेल नदी असेही म्हणण्यात येत असे. ते एक प्राचीन किर्तीचे बंदर होते. मध्ययुगीन काळामध्ये तेथेही व्यापार भरभराटीला आला होता. दाभोळला मक्का एडन येथून येणारी अनेक जहाजे भेट देत असत. तसेच दीव आणि मलबार येथूनही तांबे, पारा, लाल रंग यांनी भरलेली जहाजे येत असत. या वस्तू देशांतर्गत भागामध्ये विक्री व वितरणासाठी पाठविण्यात येत असत. देशांतर्गत भागामधून बरेच कापड, गहू, बाजरी, डाळी या वस्तू नदीवाटे बंदरात येत असत. आणि तेथून पुढे विविध देशांना निर्यात केल्या जात असत. वाघोटान नदीवरील विजयदुर्ग हे शहर कोकण किनाऱ्यावरील एक चांगले बंदर होते. विजयदुर्ग भागामध्ये विडयाच्या पानांच्या वेलींचे मळे होते. विडयांची पाने लहान जहाजांमध्ये भरली जात आणि विविध ठिकाणी विक्रीसाठी पाठविली जात. कोकणच्या किनाऱ्यावर सर्वात दक्षिणेकडे बांधा हे एक महत्त्वाचे ठिकाण होते. बांधा हे बंदर अगदी सुरक्षित होते आणि तेथे निर्यातीसाठी अनेक वस्तू असत. तेथील व्यापारी मलबार व्यापाऱ्यांबरोबर जमीनमार्गाने आणि समुद्रमार्गाने व्यापार करीत असत. मलबारी लोक नारळ, औषधे, मिरे, मसाले आणत असत. जातांना तांदुळ, बाजरी, डाळी या वस्तू नेत असत. कोकणामध्ये या वस्तू मोठया प्रमाणात पीकवत असत. या बंदरामध्ये एडन येथून अनेक जहाजे येत असत.”[१९०] मराठयांचा विदेशी व्यापार हा एक उपेक्षीत पैलू आहे. त्याबाबत अधिक संशोधनाची गरज आहे.

मराठेकालीन सागरी व्यापाराचे स्वरूप हे विविधतेने नटलेले होते. चौलदंडराजापूरी, दाभोळ, केळशी, विजयदुर्ग, रत्नागिरी, सिंधुदुर्ग ही शिवकालीन महत्त्वाची बंदरे होती. यापैकी चौलदंडराजापूरी, दाभोळ, विजयदुर्ग यांना सागरी व्यापाराचा पूर्वेतिहास होता. सुमारे १६७० मध्ये शिवाजीराजाने चौल घेतले. चौल हे प्रामुख्याने रेशामी कापडासाठी प्रसिध्द होते. चौलहून रेशमी कापड, अफू आणि नीळ निर्यात होत असे. १६६२ मध्ये दाभोळ शिवाजीराजांच्या अमलाखाली आले. दाभोळहून मुंबई येथे ईस्ट इंडिया कंपनीला मीरे, लाख आणि सुरतेपेक्षा कमी भावामध्ये जाडेभरडे कापड या वस्तू विकल्या जात असत. दाभोळच्या मलबार आणि खंबायत बरोबरसुध्दा व्यापार चालत असे.[१९१] त्यावरून तत्त्कालीन प्रमुख बंदरांशी मराठी सत्तेचे व्यापारी संबंध असल्याचे सिद्ध होते.

"राजापूर येथे मीरे, वेलदोडे, सुतीकापड, सुतीधागा यांचा व्यापार चालत असे. इंग्लिश आणि फ्रेंच दोघांच्याही वखारी राजापूर येथे होत्या. फ्रेंच लोक लोखंड, शिसे यांचा व्यापार करीत असत. रत्नागिरी जिल्हयातील सागरी बंदरे, सुतीकापड, रेशमीकापड, धान्य, लाख आणि मीरे या वस्तू निर्यात करीत असत. मीरे ही तेथील प्रमुख निर्यात वस्तू होती."[१९२] अशा प्रकारे या सर्व जिनसा मराठी सत्तेला संपन्न करणाऱ्या होत्या. सागरी व्यापार महाराष्ट्राला वरदान ठरणारा होता.

छ. संभाजीकालीन आयात निर्यात धोरण असे होते. परदेशातून येणाऱ्या व जाणाऱ्या मालावर जकात बसविली जाई. "इ.स.१६८४ मध्ये इंग्रजांच्याबरोबर यासंबंधीचा तह झाला होता. त्या तहातील कलमातून आयात निर्यातीवरील करांची कल्पना येते. इंग्रजांना व त्यांच्या व्यापाऱ्यांना माझ्या प्रदेशात जा-ये करण्यास मुभा राहिल. तेथे फॅक्टरी काढू शकतील. पण मालाची ने-आण करण्यास त्यांना जकात भरावी लागेल. जकातीसाठी त्यांना अधिकारी त्रास देणार नाही. मात्र चोरी लूट

केल्यास त्यांना न्यायासनाकडे उभे राहावे लागेल. वादळ वगैरे झाल्यास जकातकर घेतला जाऊ नये.आयात मालावर जकात घ्यावी ही पध्दत शिवाजी महाराजांपासून चालू होती. ती तशीच चालू होती. आयात मालावर २।। टक्के जकात होती. निर्यात माल जकातमुक्त होता. नियमबाहय जकात आकारली जाऊ नये. असे नियम अधिकारी पाळीत. लाकडाची खरेदी करणे व ती जकातीशिवाय नेणे यास परवानगी पूर्वी दिली नव्हती आताही दिली नव्हती. इंग्रजांनी नागोठणे व पेण येथे वखारी उघडल्यास घाटावरील मालास आयात निर्यातीस जकात घेतली जाईल, सोने व चांदी आणून टाकसाळीचा धंदा करणाऱ्यास व्याज आकारले जाई. वरील प्रकारची कलमे इ.स. १६८४ मध्ये संभाजीराजांनी इंग्रजांबरोबर केलेल्या करारात होती."[१९३] यावरून व्यापाराची विविधता स्पष्ट होते. आयात-निर्यातीचा आकारणींचा माल खालीलप्रमाणे होता.

१. खालील मालांवर निर्यातीसाठी कर भरावा लागे. गूळ, मसाले, ऊस, सुंठ, तंबाखू, कापड, कांबळी, घोडे, म्हशी, बैल इ.

२. परप्रांतातून येणाऱ्या मालावर कर आकारला जाई. त्यास 'चुंगी' किंवा 'मजुरा' असे म्हणत. धान्ये, मसाल्याचे पदार्थ, कस्तुरी, केशर, गूळ, साखर, लसूण, कांदा, हळद, मिरी, दालचिनी, तूप, मध, तेल, विविध प्रकारची कापडे, वेगवेगळया टोप्या, कांबळी, नारळ, संत्री.

३. धनगरांना आपल्या शेळयामेंढयांच्या उत्पन्नातून कर म्हणून घोंगडया द्यावा लागत.

४. मागसका - विणकरांना एका मागास १/४ टका किंवा वस्तुरूपाने कर द्यावा लागे.

५. पायपोशी - चांभार लोकांना पादत्राणांचा जोड पाटील कुलकर्ण्याला दरवर्षी मोफत द्यावा लागे.

६. वेठबिगार - मोफत चाकरी करून घेण्याचा, गांवच्या वतनदारांना हक्क असे.

७. मोहतर्फा - व्यापाऱ्यांकडून हा कर घेतला जाई. बाजारात पाल टाकण्यास गावच्या अधिकाऱ्याकडून परवानगी घेतली जाई.

८. फर्माईश किंवा फरमाश - वेठबिगारीतून मुक्तता मिळविण्यासाठी पैसे देऊन सुटका करता येत होती.

९. हेजीबपट्टी (संदेशपट्टी) - ज्याला संदेश द्यावयाचा आहे त्याचेकडून हा कर घेतला जाई.

१०. खर्चपट्टी - गावातील रस्ते, पूल किंवा इतर सुधारणा करण्यासाठी ही द्यावी लागे.

११. तूरपट्टी - घसारा म्हणून नाशवंत मालावर ही आकारली जाई.

१२. कापूरपाईक - मशालधारकांच्या खर्चासाठी.

१३. नफर टका - हलक्या प्रतीच्या कामासाठी.

१४. कोतवाली - कोतवालाच्या पगारासाठी.

१५. कर इमारती अथवा इमारतपट्टी - सरकारी इमारतीसाठी.

१६. गडछावणी - गडावरील सैनिकांच्या निवासाच्या व्यवस्थेकरिता.

१७. करसाई किंवा कारसाई - गडावरील व्यवस्थेसाठी वस्तूरूपाने पुरवठा करणे.

१८. नदी टोकरा - नदी पार करण्यासाठी केलेल्या सरकारी सुविधेसाठी.

१९. कर्जाची पटटी - सरकारी कर्जफेडीसाठी.

२०. कापडपट्टी - कापडाची निर्मिती व विक्री करणारे यांसकडून.

२१. बीखार टका - रोगराईच्या नियंत्रणासाठी.

२२. गादी, तंबाखू वेलेकटी किंवा उल्फापट्टी, (शिधा - सरकारी अधिकर)जंगमपट्टी, दसरापट्टी, मेजवानीपट्टी, तोरणपट्टी, गावटका, ठाणपट्टी, मोहीमपट्टी, बकरापट्टी इ., सुपारी, केळी, मासे, फण्या, बांबू, जोडे, चढाव, दिवे, मच्छीमारांची जाळी, गाडया, छोटया नावा इ. वर कर आकारला जाई,

२३. जनावरांच्या खरेदी-विक्रीवर कर आकारला जाई. त्यास 'शिंगोटी' असे म्हणत. त्याचप्रमाणे म्हशी, बैल, गायी यांच्या खरेदी-विक्रीवर कर घेतला जाई.

२४. संभाजी राज्यांच्या कारकीर्दीत 'वनटका' नावाचा कर जनावरांवर आकारला जाई.

२५. दोनपेक्षा अधिक म्हशी पाळणाऱ्यांना कर दयावा लागत असे.

२६. गुलामावरील कर - पुरूष किंवा स्त्री गुलाम खरेदीवर कर आकारला जाई.

२७. मीठावर कर आकारला जाई.[१९४] अशा प्रकारे आर्थिक ग्रामीण जीवनाचे स्वरूप या कर रचनेवरून स्पष्ट होते.

शिवकालीन अंतर्गत व्यापार हा तत्कालीन समृध्दीचे उदाहरण होय. व्यापाराशिवाय राज्य सुसंपन्न होणार नाही याची खात्री शिवाजी महाराजांना होती. त्यामुळेच त्यांनी व्यापारी लोकांना जकातकरात सुट दिली तसेच अनेक सवलती दिल्या. आज्ञापत्रातील पुढील संदर्भावरून त्यांचे व्यापारविषयक धोरण समजण्यास मदत होते. "साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा, साहुकाराच्या योगाने राज्य आबादान होते. न मिळालेल्या वस्तूस राज्यात येतात. ते राज्य श्रीमंत होते."[१९५] त्यामुळे त्यापारी व सावकार यांना उत्तेजन देण्याचे धोरण स्वराज्यात आखले होते.

ते संभाजीने पुढे चालू ठेवले होते. अंतर्गत व्यापाराचे स्वरूप दळणवळण साधनांच्या अभावामुळे मर्यादित बनलेले दिसून येते. खेडयातून चालणारे आपआपसातील देवाणघेवाणीशिवाय गावात उपलब्ध नसलेल्या वस्तू शेजारच्या आठवडी बाजार भरणाऱ्या कसब्यातून आणले जात. कसबा म्हणजे आठवडी बाजाराचे ठिकाण त्यामुळे कारागिराला आपल्या वस्तू निरनिराळया ठिकाणी विकण्याची संधी मिळत असे.

कसब्याच्या ठिकाणी पेठ असे. पेठेत निरनिराळया ठिकाणच्या वस्तूंची कायम दुकाने असत. शिवाजीने नव्या बाजारपेठा स्थापन करण्यास प्रोत्साहन दिले होते. तशी योग्य कामगिरी करणाऱ्या शेटे, महाजनास कर सवलत देखील दिली जात असे. शिवकाळात अनेक नव्या बाजारपेठा निर्माण करण्यात आल्या. शिवापूर, खोलपूरा, विठापूरा, जिजापूर इ. नावाच्या नव्या बाजारपेठा स्थापन करण्यात आल्या होत्या. छ. संभाजी महाराजांनी देखिल व्यापाऱ्यांना वसाहतीसाठी जकातीचा कौलनामा दिला होता. जकात सुटही दिली होती. १६८७ चेऊलला धामधुम व दुष्काळाचा तडाखा बसला असता व्यापार उध्वस्थ झाला म्हणून छ. संभाजीने त्यांना कौलनामा देऊन व्यापाराचे बारमाही वसुल माफ केले. त्यांना वसाहत करण्यास प्रोत्साहन दिले.[१९६]

लष्कराच्या धामधुमीमुळे वसाहत मोडली म्हणजे व्यापार बाजार ठप्प होत असे. अशावेळी वसाहत करून बाजार भरविण्याचे प्रयत्न शिवकाळाप्रमाणेच छ. संभाजीराजांनी देखिल आपल्या कारकीर्दीत व्यापाराला उत्तेजन देण्यासाठी नविन पेठा बसविण्यास प्रोत्साहन दिले, खुम, वाणी ,बकाल यांना संरक्षण देऊन सवलती दिल्याचे दिसते.[१९७] शिवकाळात अंतर्गत व्यापार दोन प्रकारचा होता. नदीमार्गे होणारा व्यापार व खुष्कीच्या मार्गाने केला जाणारा व्यापार. व्यापाराचे हे मार्ग संभाजीकाळातही कायम होते.

**१. नदीच्या मार्गाने होणारा व्यापार :**

महाराष्ट्रात गोदावरी व कृष्णा या दोन मोठया नदयांशिवाय इतर नदया फारशा मोठया नाहीत. गोदावरी नदी पश्चिमेकडून पुर्वेकडे वाहते. व ती महाराष्ट्राचा ३०० मैलाचा प्रदेश व्यापते. गोदावरी नदी प्रामुख्याने नाशिक, अहमदनगर, औरंगाबाद, नांदेड जिल्हयातून वाहते. याशिवाय भीमा व निरा या नदयांचाही महाराष्ट्राच्या आर्थिक विकासात महत्त्वाचा वाटा आहे. या नदयांमध्ये शिवकाळात होडयांची वाहतूक चालत असे या नावामधून थोडया अंतरावर वस्तू व मानसे पोहचविल्या जात असत. इंग्लिश फॅक्टरी रेकॉर्डसमधील संदर्भानुसार शिवकाळात पेण, कुलाबा जिल्हयातील आंबा व नागोठाणा या नदयांमधून व्यापारी मालाची वाहतूक होत असे. मुंबईतील इंग्रज व्यापारी शिवाजी व संभाजीही या नदयांमधून मालाची वाहतूक करून व्यापार करीत असत.[१९८] जलमार्गाने चालणारा व्यापार हा आर्थिक जीवनाशी निगडीत होता.

**२. खुष्कीच्या व घाटमार्गाने होणारा व्यापार :**

शिवकाळात कोकण आणि देश यांना जोडणारे घाटमार्ग भरपूर होते. महाराष्ट्रातील पठार पश्चिम, वायव्य आणि उत्तर या बाजूला सहयाद्री विंध्य व सातपुडा पर्वत यांनी बंद झाले आहे. या पर्वत रांगामधून पलीकडे जाणारे रस्ते नसते तर अंतर्गत व्यापार करणे अशक्य झाले असते. शिवकाळात जुन्नर व कोकण यांना जोडणारा पिंपरी घाट, मुंबई व पुणे यांना जोडणारा खंडाळा घाट, रत्नागिरी व कोल्हापूर यांना जोडणारा आंबा घाट व फोंडा घाट, जुन्नर व मुरबाड यांना जोडणारा नाणे घाट इ. अनेक घाटमार्ग व्यापारासाठी व वाहतूकीसाठी वापरले जात होते. या घाटातील रस्त्यांवर ठिकठिकाणी जकात नाके होते. व प्रत्येक ठिकाणी घाटपांडे नावाचा अधिकारी असे. वाहनाचा प्रकार, व्यापारी मालाचा प्रकार, व्यापारी मालाचे वजन

यावर वाहतुक अवलंबून असे. एका बैलावरून वाहून नेलेले धान्य व मीठ यावर अवलंबून डाळीवर तीन रुके, तंबाखुवर सहा रुके कर घेतला जात असे.[१९९] ही कररचना छ. संभाजीने थोडयाफार फरकाने चालू ठेवली होती.

**५.२२ उद्योगधंदे :**

मध्ययुगीन महाराष्ट्रात विविध प्रकारचे उद्योगधंदे प्रचलीत होते. चौल, दाभोळ, कल्याण, भिवंडी, पेण ही भरभराटीस आलेली औद्योगिक केंद्रे होती.

**१. मीठ उत्पादन व्यवसाय :**

हा व्यवसाय एक प्रमुख व्यवसाय असल्याचे दिसून येते. शिवराजांच्या राज्यास फार मोठा समुद्रकिनारा लाभला होता. कोकण किनारपटटीचा सर्व प्रदेश स्वराज्यात सामील होता. समुद्र किनाऱ्यावरील सोयीस्कर असणाऱ्या बहुतेक ठिकाणी मिठागरे बांधून मीठ उत्पादन केले जात होते. या खेडयातील शेतकरी शेतीचा एक हंगाम घेतल्यानंतर उरलेल्या वर्षभराचा काळ मीठ उत्पादन करीत असे. ठाणे, पनवेल, नागोठणे, पेन, खेदंडा हे मीठ उत्पादनाची प्रमुख केंद्रे बनली होती. तळकोकणातून मोठया प्रमाणावर तयार होणारे मीठ देशावर व इतर शेजारी राज्यात निर्यात होत असे. शिवाजीने आरमार व व्यापारी जहाजे बांधली होती. गलबत या व्यापारी जहाजातून समुद्रमार्गे अरब व आफ्रिकन राष्ट्रात मीठाची निर्यात होत असे. चोल हे बंदर आयात निर्यातीसाठी अतिशय प्रसिध्दीस आले होते. [२००] संभाजी काळातही या बंदराचा उपयोग व्यापारासाठी केला जात असे.

**२. कापड उत्पादन व्यवसाय :**

मध्ययुगीन महाराष्ट्रात कापडनिर्मितीचा धंदा सर्वात मोठा होता. हातमागाच्या सहाय्याने विविध भागात कापड उत्पादन होत असे. स्त्रियांसाठी वापरावयाच्या

साडया अनेक नावाने व अनेक रंगात तयार केल्या जात असत. उदा. कोचकी, महाबान, मुंगीपाटण, ताफता, मुसदर, पाटण, महामुदी इ. नावांनी या साडया ओळखल्या जात. चोळखणाचेही अनेक प्रकार व रंगात उत्पादन केले जाई. पुरूष वापरत असलेले धोतर, अंगरखे, पागोटे, पगडया, लांब कोट, लांब झगे, शाली हे वस्त्रे तयार केली जात. सुती कापडाप्रमाणेच रेशीम कापडदेखिल उत्पादन केले जात होते. डॉ. अ.रा.कुलकर्णी म्हणतात, "बंजारा, बोहरा, पारशी, सौदागर, बनीया, या व्यापारी जमाती होत्या. बंजारा हे राजस्थानच्या भागातील बनीया हे गुजरातमधील व्यापारासाठी प्रसिध्द होते. दक्षिणेकडे आणि भारताच्या इतर भागात त्यांचे प्रतिनिधी असत. बोहरी लोक समुद्रमार्गाने, खुष्कीच्या मार्गाने व्यापार करीत. कोकण किणाऱ्यावर दाभोळ, राजापूर, चौल, हुबळी, येथे कापड विणण्याचा व्यवसाय मोठया प्रमाणावर होता. धारवाड येथे साडया मोठया प्रमाणावर तयार होत." [२०१] थोडक्यात चौलला रेशमाचा धंदा मोठा होता. घोडयांचा व्यापार याच बंदरातून होत असे. दक्षिणेची ही मोठी बाजारपेठ होती. चौलमधून मोठ्याप्रमाणात कापड तयार होत असे. "जरीचे कापड देखील महाराष्ट्रातून निर्माण केले जात होते. जरीच्या कापडामध्ये चांदी, सोन्याचे धागे वापरून नक्षीकाम व बेलबुट्टी किनार तयार केली जात होती. हे कापड अतिशय महाग होते."[२०२] महाराष्ट्रातील या वस्त्रांना देशात आणि बाहेरही मागणी होती.

### ३. धातुउद्योग :

प्रा. सावंत बी.एस. म्हणतात, "मध्ययुगीन महाराष्ट्रात धातुकामाचा उद्योगधंदाही बऱ्याच प्रमाणात चालत होता. लोखंड, सोने, चांदी, जस्त या धातूपासून विविध वस्तू बनविण्याचा व्यवसाय करणारे कारागिर राज्यात सर्वत्र होते. सोने, चांदी व तांबे या धातुंना नाणी पाडण्यासाठी मोठी मागणी होती. सोने, चांदी यांना दागिने

बनविण्यासाठी विशेष मागणी होती. तत्कालीन कागदपत्रामध्ये सोन्याच्या व चांदीच्या दागिण्यांचे अनेक उल्लेख आढळतात. यामध्ये सोन्याची कडी, सरी, बाळी, माळा यांचा समावेश होत असे. दागिने बनविणारे अनेक कारागीर खेडे व शहरात असत. तांब्याचा वापर देवळामध्ये कळसाचे वरचे भाग बनविण्यासाठी व हलकी नाणी तयार करण्यासाठी केला जात असे."[२०३] छ. संभाजीच्या काळातही धातुकाम करणारे कारागीर महाराष्ट्रात मोठया प्रमाणावर होते.

**४. लाकडाचा उद्योग व जहाजबांधणी व्यवसाय :**

इमारतीच्या लाकडाच्या मोठया कारखान्याबद्दल कोठेही माहिती मिळत नाही. परंतु घरे व इमारतीच्या लाकडाची जरूरी भासत होती. ही गरज सर्वसाधारणपणे स्थानिक लाकूडउद्योगातून भागविली जात असे. इमारतीचे लाकूड वसईमध्ये तयार होत असे. त्यात लांब तुळया, मध्यम आकाराच्या खांडतुळया दहा हात लांबीच्या मोळीच्या तुळया खांब, माळवदासाठी कडया, सरसोट इ. समावेश होत असे. कुरणातील काढलेले लाकूड बैलावरून वाहून नेतांना रुपयावर चारआणे इतका कर द्यावा लागत असे. मराठा राजवटीत जहाजबांधणीचा उद्योग होता. जहाजबांधणीसाठी लाकूड पुरविले जात असे. शिवाजीने या उद्योगाची सुरूवात केली. कल्याण भिवंडी हा प्रदेश जिंकल्यापासून शिवाजीने जहाजबांधणी सुरू केली. कोकण किणाऱ्यावरील कल्याण, भिवंडी, पनवेल, राजापूर, देवगड, मालवण अशा अनेक बंदरावर शिवाजीचा जहाजबांधणीचा आणि दुरूस्तीचा उद्योग चालू असे. जहाजबांधणीसाठी आवश्यक असणारे सागाचे लाकूड कोकणच्या जंगलातून उपलब्ध होते. स्थानिक कारागीरही उपलब्ध होते.[२०४] छ. संभाजीकालीन संरक्षण व्यवस्थेत आरमाराला महत्त्वाचे स्थान होते. त्यामुळे आरमारी व्यवस्थेकडे विशेष लक्ष दिले जात असे.

**५. कागदनिर्मिती उद्योग :**

डॉ. बिरादार टी.के. म्हणतात, "मध्ययुगीन महाराष्ट्रात कागद निर्मितीचा उद्योग चालू होते पण त्याचे स्वरूप अतिशय प्राथमिक व मर्यादित होते. बांबूच्या लगदयापासून तयार केला जाणारा कागद दुय्यम दर्जाचा व पिवळसर रंगाचा होता. पांढरा कागद मोगल साम्राज्यातून आयात केला जात असे. कागदाचा कारखाना जून्नर येथे होता."[२०५] अशा प्रकारे तयार झालेला कागद हा पत्रव्यवहार किर्द लिहीण्यासाठी होत असे. त्यामध्ये जमा व खर्च यांची नोंद केली जात असे. हा कागद लिहिण्यासाठी वापरला जात असे.

**६. काचनिर्मिती उद्योग :**

"पुणे व सासवड या ठिकाणी काचनिर्मिती करण्यात येत असे. आरसे, झुंबर, बांगडया इ. वस्तू तयार केल्या जात. हा उद्योग देखिल मर्यादितच होता."[२०६] त्यावर जगणारे कारागीर हे आपल्या कौशल्यामुळे महत्त्वाचे स्थान घेत असत. त्यांना वेतनही चांगल्या प्रकारे मिळत असत.

**७. मच्छिमारी व्यवसाय :**

कोकण किनाऱ्यावरील अनेक बंदरातून मच्छिमारीचा व्यवसाय चालत असे. पेण, रोहा, कल्याण, पनवेल, नागोठणे, या बंदरातून हा मच्छिमारी व्यवसाय करणाऱ्या लोकांची संख्या बरीच होती. कोकणात सर्वत्र त्याचा आहारात उपयोग केला जाई. शिवकाळात कुलपे तयार करून विकणारे कारागीरही होते.[२०७] छ. संभाजीकाळातही हा कारागीरांचा वर्ग सक्रिय होता तो आपली कार्य योजकतेने करीत असे. या कारागीरांना चांगली मागणी होती.

### ५.२३ दळणवळण व वाहतुकीची साधने :

दळणवळणाची व वाहतूकीची साधने अतिशय मागासलेली व तुटपूंजी दिसतात. शिवकाळात आजच्यासारखी साधने नव्हती. वाहतुकीसाठी बैल, गाढव, म्हैस, उंट, बैलगाडया, डोली, होडया, यांचा वापर केला जाई. तुकाराम महाराजांच्या साहित्यात उंटाचा उपयोग माल व वाहतुकीसाठी केल्याचा उल्लेख आढळतो. काहीवेळा मानवी श्रमही माल वाहतूकीकरता उपयोगात आणले जात. कोकणात तांदुळ, नारळ, मीठ इ. मालाच्या वाहतुकीकरता लहान लहान होडयांचा वापर केला जाई. पालखी हे अत्यंत सोईचे साधन होते.पालखी हे श्रीमंताचेच वाहन होते. रस्त्यावर अनेकवेळा चोर, दरोडेखोर असल्यामुळे एकटयाने प्रवास करणे धोक्याचे होते. हीच साधने छ. संभाजीच्या काळात अस्थित्वात होती. त्यामुळे प्रवासी व व्यापारी लोक सोबत शशास्त्र संरक्षण बाळगत असत.[२०८] त्यामुळे त्यांना चोरांचे भय वाटत नसे.

### ५.२४ व्यापारी वस्तू :

बाजारपेठा आणि व्यापारी केंद्रातून पुढील वस्तूंची खरेदी-विक्री व आयात निर्यात होत असे. या वस्तूंचा अभ्यास केला असता. तत्कालीन आर्थिक जीवनाची कल्पना येते.

#### १. अन्नधान्य :

गहू, मुग, डाळी, मसूर, उडीद, भात, मका, नाचणी, तीळ, बाजरी, दुध, मासे, गुलकंद, साखर, नारळ, गुळ, मीठ, तेल, तूप इ.

#### २. फळफळावळ व इतर खाद्यपदार्थ :

कलींगडे, नारळ, फणस, उस, लिंबे, केळी, आंबे, अननस, खजूर, बदाम, सुपारी, काजू, भाज्या, पाने, दूध, लोणी व मांस इ.

**३. मसाल्याचे पदार्थ :**

लवंगा, लसूण, कांदा, मोहरी, कापूर, केशर, गुलाल, वेलदोडे, चिंच, खडीसाखर, सुंट, हळद, चंदन, आफू, खोबरे, मध, हिंग इ. मसाल्याच्या जिनसा विक्रीस येत.

**४. कापड :**

कापड विविध प्रकारचे येत असे. त्यात रेशमी कापड, धोतर, पासोडया यासारखी सुती कापड, जाडे भरडे कापड, रंगीत कापड, शाली, मलमल, साडया, मखमल, लुगडी, धोतरे, कांबळी, पासोडी, मखमलीच्या टोप्या, सुत, ताग इ. उल्लेख आढळतात.

**५. प्राणी :**

घोडा, बैल, उंट, शेळी, म्हैस यांचा समावेश होता.

**६. इतर संकीर्ण वस्तू :**

धातूमध्ये जस्त, तांबे, शिसे इतर संकीर्ण वस्तूमध्ये पायपोस, साबण, गाडया, पलंग, कंदिल, भांडी, तांबे, जस्त, घडयाळ, सौंदर्यप्रसाधने इ. समावेश करता येईल.[२०९] या सर्व वस्तूंची निर्मिती आयात निर्यात यावर तत्कालीन व्यापार आधारलेला होता. छ. संभाजीकालीन व्यापार संपन्न व समृद्ध होता. सरंजामदार वर्ग वस्तू व सेवांचा वापर करून प्रतिष्ठेचे जीवन जगत होता.

**५.२५ वस्तूंचे भाव :**

कृ.ना. चिटणीस म्हणतात, "वस्तूंच्या किंमतीवरून आपणांस अंतर्गत व्यापाराची कल्पना येते. खेळता पैसा वस्तूंना असलेली मागणी, व्यापाराच्या वस्तूंची उपलब्धता, वाहतुकीच्या साधनांची अवस्था आणि नैसर्गिक आपत्ती या सर्व गोष्टींचा वस्तूंच्या किंमतींवर परिणाम होत असतो. मागणी आणि पूरवठा यावरून वस्तूंचे भाव नियमित केले जात असत."[२१०] छ. संभाजीचे हे धोरण किंमती नियंत्रीत ठेवण्यात पोषक

ठरले. युध्द परदेशी लोकांचा व्यापार राजकीय हेतू यांच्या आगमनामुळे किंमती कमी जास्त होत असतात. दैनंदिन वस्तू, धान्य व भाव प्रत्येक ठिकाणी वेगवेगळे होते आणि तत्कालीन साधनात अन्नधान्य, भाजीपाला व इतर वस्तू याबद्दल कितीतरी उल्लेख आढळतात.

**५.२६ चलन :**

शिवकालीन अर्थव्यवहार हे प्रगत चलनाद्वारे होत. इ.स. १६७४ साली राज्याभिषेकानंतर शिवाजीराजांनी स्वतःची नाणी पाडली होती. प्रा. कृ.ना.चिटणीस म्हणतात, "आपल्या हिंदू आदर्शांना व परंपरांना धरूनच शिवाजी महाराजांनी आपल्या नाण्यांसाठी मूळ प्रमाणभूत नाणे म्हणून विजयनगरच्या 'होन' या नाण्याचा स्वीकार केला आणि स्वतःचे शिवराई हे सोन्याचे नाणे विजयनगरच्या सोन्याच्या नाण्यांच्या धरतीवर पाडून घेतले."[२११] हे त्यांच्या स्वराज्याचे खरे वेगळेपण होते.

"जरी विजयनगर प्रमाणेच होन हे नाणे परिमान म्हणून शिवाजी महाराजांनी उपयोगात आणले तरी एकंदरीत परिस्थितीच्या दबावाने त्याला होन नाण्याचे प्रमाणभूत वजन ५२ ग्रेन होते. ते कमी करून ४२ ग्रेन करावे लागले होते असे दिसते. याबाबतीत त्याला पुर्वेसुरी नव्हतेच असे म्हणता येणार नाही. कारण चोल, चालुक्य, यादव यांच्या नाण्यांपैकी काही नाणी वरीलप्रमाणे कमी केलेल्या वजनाची आढळून आली आहेत. मात्र शिवाजी महाराजांनी प्रचलित केलेली 'होन' ही नाणी व्यापारीवर्ग व जनता यांच्या एकंदर अनेक प्रकारची नाणी महाराष्ट्रात त्या काळी चलनात आलेली आढळून येतात."[२१२] हा बदल लक्षणीय म्हटला पाहिजे. शिवाजी महाराजांच्या काळातील या नाण्यांबद्दलची उल्लेख असलेली मराठी भाषेतील कागदपत्रे फार दुर्मिळ असलेली आढळतात.

सभासदांची बखर या ग्रंथात शिवाजी महाराजांच्या खजिन्यात ३२ प्रकारच्या होनांची नावे दिली आहेत. ती अशी शिवराई होन, देवराई होन, अचुतराई होन, रामचंद्रराई होन, कावेरीपाख होन, गुत्ती होन, सतलामी होन, धारवाडी होन, आदवानी होन, ताडपत्री होन, निशानी होन, सणगरी होन, गडमल होन, एलोरी होन, शैलगुटी होन, पादशाही होन, इब्राहिमी होन, पुतळी होन, गंबार व मुहर यापैकी शिवराई होन व्यतिरिक्त सर्व होन महाराष्ट्राबाहेरून आलेली होती.[२१३] या होनामध्ये संभाजी महाराजांनी भर टाकली. व स्वतःचे नाणेही काढले.

"शिवाजी महाराजांनी चांदीची नाणी जवळजवळ पाडलेली नव्हती. त्यांच्या काळात चलनात आलेली चांदीची नाणी बाहेरून महाराष्ट्रात आली. ही नाणी आब्बासी, लारी, रियाल, अश्रफी, महमुदी अणि रूपया या नावाने ओळखली जात. आब्बासी नाणे इराणी होते. त्याची किंमत १६ पेन्स होती. असे फ्रायर म्हणतो. 'लारी' हे चांदीचे नाणे इराणच्या आखातातील लारी नावाच्या गावी पाडलेले होते. पुढे महाराष्ट्रात चौल, दाभोळ, भिवंडी या ठिकाणी लारी पाडली जात असत. लारी सुद्धा त्यांच्या गावावरून ओळखत असत. उदा. बसरा लारी, भिवंडी लारी इ. लारी हे नाणे सहा पेन्स किंमतीचे होते. रियाल हे चांदीचे नाणे स्पॅनीश होते. व त्याची विनिमयाची किंमत दोन रूपये इतकी होती. शिवाजी महाराजांनी जवळजवळ २५००० तांब्याची नाणी व्यवहारात आणली होती."[२१४] संभाजी महाराजांनी या नाणक व्यवस्थेमध्ये सुधारणा करून ती अद्ययावत केली.

डॉ. वि. गो. खोबरेकर म्हणतात, "शिवाजी महाराजांनी चांदीची नाणी पाडली नसावी. शिवकालीन होन व त्याच्या खालोखाल प्रताप, धरण, चवल, दुवळ, वीस, पल, ही नाण्यांची नावे शिवाजी महाराजांच्या राज्यव्यवहार कोशातील ३८ ते ४१ श्लोकात आढळतात. या नाण्यांचे एकमेकांशी असलेले किमतीचे नाते व पटी यांचे

कोष्टक पुढीलप्रमाणे २ प्रताप = १ होन, ४ धरण = १ होन, ८ चवल = १ होन, १६ दुवल = १ होन, ३२ ब्याल = १ होन, ६४ वीस = १ होन,

होनांच्या खालोखाल शिवकाळात टंक्का हेही नाणे प्रचलित होते. टंक्क्याच्या खालचे तांब्याचे नाणे रुके होय. एक टंक्का म्हणजे ४८ रूके असा हिशोब दिसतो. सजगाणी व शिवराई ही एकाच किमतीची पण नावाने भिन्न असलेली नाणे शिवकाळात प्रचारात होती आणि त्यांची किंमत ६ रूके होत असे."[२१५] अशा प्रकारे शिवकालीन चलन व्यवस्था संभाजी राजांनी पुढे चालविली. शंभू राजांनी छ.शिवाजी महाराजांच्या शिवराईच्याच आधारावर शिवराई हे नाणे पाडले. याचे वर्णन करतांना डॉ. चंद्रशेखर गुप्त लिहीतात, "धातू - तांबे, वजन १६० ग्रेन, आकार वाटोळा, व्यास - ०.७, पुरोभाग बिंदुमय वर्तुळात दोन ओळीत देवनागरी लिपीत लेख - छत्रपति, पृष्ठभाग बिंदुमय वर्तुळात तीन ओळीत देवनागरी लिपीत लेख श्री राजा शंभु."[२१६] या नाण्याचे स्वरूप हे प्रगत होते. छ. संभाजीने तयार केलेले हे नाणे शिवकाळाप्रमाणेच प्रतिष्ठेचे बनवले होते.

### ५.२७ वतन व्यवस्था

वतनदारी पध्दत भारतात फार प्राचीन आहे. अखिल समाजाची उभारणीच वतनावर झाली होती. वतनाचा संबंध भूमीशी येतो. मानवाच्या निर्वाहाचे भूमी हेच साधन होते. व्यापार व उद्योगधंदे यांची वाढ हल्लीप्रमाणे तेंव्हा झाली नव्हती. अन्न वस्त्र याच त्या काळातील मुख्य गरजा असून एकवेळ वस्त्र नसले तरी चालेल पण अन्न पाहिजे इतकी अन्नास मनुष्याच्या जिवनास अद्बितीय स्थान होते. त्यांची निवांत झाल्यावर मनुष्य बिनघोर होत असे. ते अन्न भुमीपासून मिळत असल्यामुळे मनुष्य भुमी म्हणजे जमीन संपादित करण्याकरीता जीवाचे रान करीत असे. जमीन ही सुध्दा एका पिढीपुरती मिळवावयाची नसून एकाच घराण्यात पिढयानपिढया चालत

राही. ही जमीन खरेदी करून मिळे किंवा गावची व सरकारची सेवा करण्याकरीता मिळे. गावात दोन प्रकारचे नोकर असतात. एक गावाचा नोकर व दुसरा सरकारचा नोकर. गावापाशी नोकराला द्यावयास पैसा नसे तसा सरकारपाशीही आपला सर्व राज्यकारभार चालविण्यास जी रोख रक्कम प्रत्येही लावावयाची ती नसे या कारणाने गाव व सरकार आपापली कामे आपल्या सेवकांना भूमी इनाम देऊनच करून घेत.[२१७] वतनदारांचे स्थान अशा प्रकारे त्यांच्या कर्तृत्वावर आधारलेले होते.

मध्ययुगीन महाराष्ट्रात वतन आणि वतनदारीचे महत्त्व अत्यावश्यक होते. समाजातील व्यक्तीचा दर्जा त्याची राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक क्षेत्रातील प्रतिष्ठा मोजण्याचे वतन हेच त्याकाळातील मोजमाप होते. प्राचीन भारतातील हिंदू राज्य प्रशासनामध्ये खेडेगाव व जिल्हा पातळीवर जे अधिकार असत त्यांना परंपरेने हक्क म्हणून काही जमिनी मिळत असत.[२१८] वतनदाराचे अधिकार व त्यांचे मानपान ही मध्ययुगातील पध्दती होती. तिचे आकलन या सर्व उदाहरणावरून होते. छ. संभाजीचा काळ त्यास अपवाद नव्हता.

वतनाची निर्मिती व त्यातून निर्माण झालेले वतनदार यामुळे वतनदारांची संख्या मोठ्या प्रमाणात वाढलेली आढळते. यापाठीमागील प्रमुख कारण असे की, वतनावरून व्यक्तीचा दर्जा आणि वतनासोबत असणारे हक्क मानपान यामुळे छ. किंवा त्यांचे सरदार या सर्वांना वतनदार असणे आवश्यक वाटत होते. यामुळेच वतनाच्या वेगवेगळया प्रकारची निर्मिती झाली असावी. गाव वतनदार, परगणे वतनदार, पेठेचे वतनदार व इतर वतनदार. प्रामुख्याने वरील वतनदार हे व्यवसाय, धंदा, परंपरा, धार्मिक विधी व जात या कारणांमुळे निर्माण झाल्याचे सांगता येईल.[२१९] हे वतनदार छ. संभाजीकाळात आपल्या अधिकार व कर्तव्याबाबत जागरूक होते.

छ. संभाजीमहाराजांच्या वतनविषयक धोरणांचा आढावा घेतला असता. एक गोष्ट प्रकर्षाने निदर्शनास येते. ती म्हणजे संभाजी महाराज आणि शिवाजी महाराज यांच्या दृष्टीतील वतनदारांकडे पाहण्याचे साम्य "अवघे वतनदार एकमते राहोन गनिमांस सजा द्यावी."[२२०] छ. संभाजी महाराजांनी वतनदारांच्या क्षमतांचा स्वराज्यसंवर्धनासाठी उपयोग कसा केला ते या उदाहरणावरून स्पष्ट होते. त्या धोरणाचे सुत्रकथनही त्यांनी केले आहे. दोघाही पितापुत्रांनी स्वराज्याच्या वाढीसाठी वतनदारांचा उपयोग करून घेतल्याचे एक समान धोरणात्मक सूत्र त्यांच्या वतनविषयक धोरणात दिसते.

"मसऊ राजमान्य राजश्री देशमुखानी त ।।

कानदखोर यास प्रती कवी कलश छंदागामात्य असीर्वाद सु ।।

बगत समानीन अलफ तुमचे विशई राजश्री बभाजी नावडकर याने हुजूर येऊ कितेक रदबदल केली साल गु ।। राजश्री स्वामीनी मानिलेस तुम्हाकडे पाठविले होते. तुमचा मुद्दा मनास आणून हुजूर आले त्याउपरी तुमच्या मुद्यामवाकीफ सरंजामी जालीनाही दिसगत लागली म्हणून तुम्ही दिलगीर जाहले आहा म्हणून कला आले त्यावरून आम्हा राजश्री छत्रपती स्वामीस तुमचे दिभई विनंती करून तुम्हास भेटीस यावयाची आज्ञा केली आहे. पमदर्शने स्वार होऊन येणे राजश्रीची भेटी होईल. तुमचा मुद्दा मनास तदनुसार पारपत्य करून देऊ या प्रसंगी तुम्ही आपली एकनिष्ठा राजश्रीचया पायासी जाहीर करून अवघे वतनदार येकमते राहोन याचमान सजा द्यावी. आपली सरफराजी करून घ्यावी तुम्ही इनामी आहा राजश्रीत व आम्हास तुमचा भरवसा आहे जाणिजे रा ।। घ १ रमजान पान - हुजूर"[२२१]

छ. संभाजी महाराजांनी निरनिराळया वतनांच्या संबंधात निर्माण झालेल्या झगडयांचे, भांडणांचे स्वतः निवाडे दिल्याचे दिसतात. छ. संभाजीची कारकीर्द ही

जरी अल्प असली तरी ज्या तडफेने त्यांनी राज्यकारभार केला व सर्वत्र दरारा प्रस्तापित केला यावरून त्यांच्या ठाई असलेली प्रशासकीय क्षमता निदर्शनास येते. वेगवेगळया कारणावरून वेगवेगळया वतनदारांमध्ये जी भांडणे निर्माण झाली त्यासंबंधातील छ. संभाजी महाराजांनी दिलेले न्यायनिवाडे पुढीलप्रमाणे सांगता येईल.

"बेरड नाईकाचे भांडण तोडण्यासाठी संभाजीने खंडई पानवडीकर, यसोजी सुपेकर, इ. अनेक बेरड नाईकास बोलावून त्याचा वतनदाराला न्याय दिला." [२२२]

"अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री गंगाजीदामजी सुभेदार व कारकून प्रांत राजापूर गोसावी यासि, सेवक प्रल्हाद निराजी न्यायाधिश नमस्कार सु ।। समान समानीय आलफता । देवऊल येथिल देशमुखिचा वेव्हार तिमाजी ना । बिनकान्होजी ना । देशमुख यामध्ये व रामाजी गोविंद यामध्ये वेव्हार लागोन हुजूर भांडत आले. हुजूर यांचा करीना राजश्री छंदागामत्य याही मनास आणीन निवाह केला की राजश्री छत्रपती स्वामींचा तह की ज्याचे वृत्तीस तीस पसतीस वर्ष भोगवटा चालला असेल तोच खरा दुसरियास कथला करावयासी संमंध नाही म्हणोन आज्ञा तरी तिमाजींना त्याचे देशमुखीचा भोगवटा सालाबाद आजी तीस वरसे चालत आला आहे. त्या प्रो । चालो देणे रामाजी गोविंद नवाब कथला करितो त्यास कथ्लाकरावयास संमध नाही सालाबाद चालत आहे. त्याप्रमाणे चालो देणे या पत्राची तालीक लेखोन घेऊन असल तिमाजी ना । यांस देणे छ-१२ माहे राबिलावल."[२२३]

या दोन निवाडयांचा अभ्यास केला असता छ. संभाजी महाराज हे किती काटेकोर, समतोल आणि सम्यकू बुध्दीने निवाडे करत असत त्याची प्रचिती येते. त्यांच्या प्रखर न्यायबुध्दीचे यथार्थ दर्शन या न्यायनिवाडाच्या शास्त्रीय अभ्यासनावरून स्पष्ट होते.

छ. संभाजी महाराजांनी शिवाजी महाराजांप्रमाणे जूनी वतने पुढे चालू ठेवली होती. जून्या वतनदारांच्या हक्कांचे संरक्षण करणे हे तत्कालीन छत्रपतींनी आपले कर्तव्य मानले होते. ज्योतीष्य पणाचे वतन शिवाजी महाराजांनी त्यांना काही हक्क देऊन चालविले होते तेच छ. संभाजी राजांच्या कारकीर्दीत तसेच पुढे चालू ठेवले गेले.[२२४]

छ. संभाजी महाराजांनी सर्वसाधारण परिस्थितीत तर वतनदारांचा संभाळ केला परंतू ज्यावेळी नैसर्गिक आपत्तीसारख्या आपत्ती येत असत. अशावेळी संपूर्ण वतनदारी संस्थाच धोक्यात येण्याची शक्यता असे. यासारख्या वतनदारी परिस्थितीत संस्थेवर गंभीर आणि खोलवर असे परिणाम होत असत. अशा स्थितीत संभाजी महाराजांनी आपल्या वतनदारांना वतने विकण्याचा किंवा इतरांना ती देण्याची परवानगी दिली होती. अशी मुभा केवळ वतनदारांना मदत व्हावी म्हणूनच त्यांनी दिली होती.[२२५] यावरून दुष्काळासारख्या अतीकठिण परिस्थितीत वतनदारांना संरक्षण देण्यासाठी किंवा त्यांना पाठबळ मिळण्यासाठी छ. संभाजी महाराजांनी वेगवेगळया प्रकारच्या सवलती दिल्या होत्या असे दिसते.

थोडक्यात छ. संभाजी महाराजांनी आपले पिता छ. शिवाजी महाराजांनी आखलेले व अंगीकारलेलेच वतनविषयक धोरण पुढे चालविल्याचे दिसते.

### ५.२.१८ छ. शिवाजी व छ. संभाजी यांच्या आर्थिक परिस्थितीची तुलना :

डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, "छ. संभाजीच्या कारकीर्दीत गोवेकर, फिरंगी, जंजीरेकर हबशी, मुंबईचे इंग्रज आणि मुख्य शत्रू औरंगजेब या सर्वांशी तोंड देतांना खजिना रिकामा झाला. रयत परकीय आक्रमणामुळे गांजली त्यामुळे कराचे उत्पन्न घटले अनेक अधिकारी व सेवक फितूर झाल्यामुळे शासन कमकुवत झाले, दुष्काळामुळे

प्रजा गांजली, त्यामुळे करवसुली थांबली, प्रजेस सवलती द्याव्या लागल्या, मोगलांची लुट आणि जाळपोळ, शेते लुटणे, पिकांचे नुकसान करणे इ. शेतकरी हैराण झाला. स्वास्थही नाहीसे झाले. पोर्तुगीज मोहीमेच्या वेळी घेतलेले फ्रेंचांचे १५००० पॅगोडा कर्जाचा बोजा होता. या सर्व कारणांमुळे राज्याची आर्थिक स्थिती हलाखीची झाली. एकंदरीत राज्य आर्थिकदृष्टया कंगाल झाले."[२२६] त्यामागे दुष्काळ व परचक्र ही दोन कारणे होती.

### ५.२९ समारोप :

मध्ययुगीन सामाजिक व आर्थिक जीवन हे परंपरावादी व सनातनी होते. समाज वर्ण व्यवस्थेमध्ये बांधलेला होता. रूढी व परंपरांनी ग्रासलेला होता. तसेच या समाजाचे अर्थकारण हे मध्ययुगीन सरंजामशाही व्यवस्थेची चौकट भक्कम करणारे होते. शिवाजी महाराजांनी तत्कालीन व्यवस्थेमध्ये काही बदल केले उदा. चातुवर्ण्यातील शेवटच्या वर्णालासुध्दा मानाचे स्थान प्राप्त झाले. तलवार चालविणे किंवा लेखणीचा वापर करणे ही कोणत्याही एका जातीची मिरासदारी ठेवली नाही. महार, रामोशी, यासारख्या दुर्लक्षित जातीकडे महत्त्वाची कामे सोपविली. शिवाजीने महाराष्ट्रातील प्रजेमध्ये आत्मविश्वास निर्माण केला. सर्व जातीचा दर्जा समान आहे हे दाखवून दिले. मदारी मेहेतर हा शिवाजी बरोबर सतत असे. आग्रा भेटीच्या वेळी त्याने केलेली कामगीरी सर्वश्रुत आहे. यावरून जातीव्यवस्थेबद्दल 'Career's open to talent' दिसून येते. संभाजी महाराजांनी सुद्धा हे धोरण चालू ठेवले. त्यांनी जातीपेक्षा गुणवत्तेवर आधारलेल्या नेमणूका करण्यावर भर दिला. प्रत्येकाला त्याच्या क्षमता व पात्रतेनुसार पद मिळेल आणि स्वराज्याशी तो एकनिष्ठ असेल तर त्याला प्रगतीचा पुढचा मार्ग सदैव मोकळा राहील हे छ. संभाजींचे धोरण होते.

स्त्रियांच्या बाबतीत त्यांना फारशा सुधारणा करता आल्या नसल्या तरी स्त्री ही विटंबना करण्याची वस्तू नाही तर तिला समाजामध्ये मानाचे स्थान दिले पाहिले असा दृष्टीकोन दिसून येतो. परंतू त्यांना हे बदल अमूलाग्रपणे करता आले नाहीत कारण त्यांना काळ थोडा लाभला. तर संभाजी महाराजांचा काळ हा तर एका दशकाचाच होता. या काळात त्यांनी काही सुधारणा केल्या.

आर्थिक आघाडीवर संभाजी महाराजांनी केलेल्या सुधारणा या शिवाजी महारांजांप्रमाणेच रयतेचे राज्य प्रस्थापित करण्याच्या होत्या. त्यांची महसूल व्यवस्था लोकाभिमुख होती.

दुष्काळ निवारण्यासाठी त्यांनी काही ठाम पाऊले टाकली. सिंचन सुविधेमध्ये बदल केले. सोलापूर जिल्ह्यात मोहोळ येथे दुष्काळाच्या काळात एका ओढ्यावर बांध घालण्याचा आदेश त्यांनी दिला होता. शिवकालीन साठवण व पाणीपुरवठा पद्धतीत फेरफार करून हे धोरण संभाजी महाराजांनी सुधारक दृष्टीने पुढे चालवले. त्यांच्या काळात दूरदृष्टीमुळे अंतर्गत व बाहय व्यापार सुधारला. व्यापाऱ्यांना सवलती दिल्याचे दाखले मिळतात. निसर्गाची प्रतिकूलता होती. पण त्यांनी टाकलेली ठाम पाऊले पाहता तत्कालीन सामाजिक व आर्थिक जीवनात त्यांनी केलेले बदल वरदान ठरले. जर संभाजीराजांना आणखी दोन तीन दशकाचा कालावधी लाभला असता तर ते एक दूरदर्शी राज्यकर्ते ठरले असते.

एकूणच शिवरायांचे प्रगत धोरण संभाजी महाराजांनी पुढे चालविले असे म्हणता येईल . अशा प्रकारे तत्कालीन लोकजीवनाचे उभे आडवे धागे हे सामाजिक व आर्थिक संस्थांचा उलगडा केला असता. त्यावरून तत्कालीन व्यवस्थेचे चित्र स्पष्ट होते. पुढील प्रकरणात धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचा अभ्यास केला आहे.

## संदर्भ ग्रंथसूची :


१. भावे वा.कृ., "शिवकालीन महाराष्ट्र", वरदा प्रकाशन पुणे,
दुसरी आवृत्ती १९९८ पृष्ठ २९

२. कित्ता पृष्ठ २९

३. कित्ता पृष्ठ ३०

४. डॉ. कुलकर्णी अ.रा., "शिवकालीन महाराष्ट्र", राजहंस प्रकाशन, पुणे,
प्रथम आवृत्ती १९९३, पृष्ठ २१

५. कित्ता पृष्ठ २२

६. नाडगोंडे गुरुनाथ, "सामाजिक संशोधन पध्दती", फडके प्रकाशन,
कोल्हापूर, प्रथम आवृत्ती १९८६, पृष्ठ १८७

७. कित्ता पृष्ठ १८८

८. Brockhamption, "Dictionary of word History", Helicol publicing Ltd , london, 1994, page 530

९ Good and Hatt, "Social Resurch Method",
Ravar Publication, New Dilhi 2006, Page 5

10. Ibid

११. अत्रे शुभांगणा, "महाराष्ट्र संस्कृती", डायमंड पब्लीकेशन, पुणे,
प्रथम आवृत्ती २००८ पृष्ठ २५

१२. चिटणीस कृ.णा., "मध्ययुगीन भारतीय संकल्पना व संस्था", भाग दोन, तिसरी आवृत्ती, पृष्ठ १०५

१३. कुलकर्णी एम.जी., "भारतीय समाजव्यवस्था", परिमल प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती १९७५, पृष्ठ ११८

१४. डॉ. कुलकर्णी अ.रा. ,उपरोक्त पृष्ठ २२

१५. कुलकर्णी. एम.जी., उपरोक्त पृष्ठ ११९

१६. बिरादार टी.के., "मराठयांच्या इतिहास", विदयाभारती प्रकाशन, लातूर, प्रथमावृत्ती २०००, पृष्ठ ५२६

१७. प्रा. सावंत "मराठयांचा प्रशासकीय सामाजिक व आर्थिक इतिहास", विदया प्रकाशन, नागपूर, प्रथमआवृत्ती १९९७, पृष्ठ ५६

१८. सहस्त्रबुध्दे पु.ग., "महाराष्ट्र संस्कृती", कॉन्टीनेंटल प्रकाशन, पुणे, तृतीयआवृत्ती २००३ पृष्ठ १८२

१९. डॉ. गवळी पी.ए., "पेशवेकालीन महाराष्ट्र", कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद, प्रथमाआवृत्ती २०००, पृष्ठ ६७

२०. भगत दत्ता (संपा.), "कृष्णाजी अनंत सभासदकृत श्री शिवछत्रपतींचे चरित्र" प्रतिमा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती २००१, पृष्ठ १४४

२१. देशपांडे प्र.न. (संपा.), "छ. शिवाजी महाराजांची पत्रे", सुषमा प्रकाशन, धुळे, प्रथमावृत्ती १९८३, पत्र क्रं. २१, पृष्ठ २६

२२. कित्ता पृष्ठ १३३, पत्र क्रं. ११०

२३. भगतदत्ता (संपा.) उपरोक्त पृष्ठ १४६

२४. सावंत बी.एस. उपरोक्त पृष्ठ १५७

२५. डॉ. गवळी पी.ए. उपरोक्त पृष्ठ ६६

२६. बाहेकर एस.ए., "आद्यक्रांतीकारक शहाजीराजे भोसले", कसब प्रकाशन, जळगांव, प्रथमआवृत्ती १९९८, पृष्ठ ६३-६४

२७. कर्वे इरावती, "मराठी लोकांची संस्कृती", देशमुख अॅण्ड कंपनी, पुणे, दुसरी आवृत्ती १९६२, पृष्ठ २०

२८. Ghurye G.S., Caste and Race in India, Popular Prakashan, Bombay, fifth edition 1969, page 201,202

२९. कर्वे इरावती, उपरोक्त पृष्ठ २०

३०. बीरादार टी.के. उपरोक्त पृष्ठ ५२८

३१. डॉ. कुलकर्णी अ.रा. उपरोक्त पृष्ठ ३९

३२. कित्ता पृष्ठ ३९

३३. कित्ता पृष्ठ ४९

३४. कित्ता पृष्ठ ४९

३५. पवार आप्पासाहेब (संपा.), ताराबाईकालीन कागदपत्रे खंड १, प्रकाशक शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर, १९६९, पत्र क्रं. २३०

३६. कर्वे इरावती, उपरोक्त पृष्ठ २८

३७. प्रा. सावंत बी.एस., उपरोक्त पृष्ठ १५४

३८. ओतुरकर रा.वि. (संपा.), "पेशवेकालीन आर्थिक व सामाजिक पत्रव्यवहार" प्रकाशक भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९५० पत्र क्रं १३६

३९. डॉ. कुलकर्णी अ.रा., "मध्ययुगीन महाराष्ट्र", डायमंड प्रकाशन, पुणे, प्रथम आवृत्ती २००७, पृष्ठ ६१

४०. कित्ता पृष्ठ ६१,६२

४१. प्रा. सावंत बी.एस. उपरोक्त पृष्ठ १५४

४२. डॉ. अ.रा. कुलकर्णी, उपरोक्त "मध्ययुगीन महाराष्ट्र", पृष्ठ ६२

४३. प्रा. सावंत बी.एस. उपरोक्त पृष्ठ ६२

४४. आत्रे त्रि.ना.,"गावगाडा", वरदा बुक्स प्रकाशन, पुणे, पुर्नर्मुद्रण १ जानेवारी १९९५, पृष्ठ ११६

४५. ओतूरकर रा. वी. (संपा.), उपरोक्त लेख २५

४६. डॉ. कठारे अनिल व डॉ. कदम वसंत, "पेशवेकालीन महाराष्ट्र", पुनम प्रकाशन, कंधार, प्रथमावृत्ती २०१०, पृष्ठ २६

४७. डॉ. कुलकर्णी अ.रा.,उपरोक्त "मध्ययुगीन महाराष्ट्र", पृष्ठ ६४

४८. डॉ. गवळी पी.ए., "पेशवेकालीन महाराष्ट्र" , कैलास प्रकाशन औरंगाबाद, प्रथम आवृत्ती २०००, पृष्ठ ६९

४९. प्रा. सावंत बी.एस., उपरोक्त पृष्ठ १५४

५०. डॉ. कुलकर्णी अ.रा. उपरोक्त "मध्ययुगीन महाराष्ट्र", पृष्ठ ६५

५१. डॉ. गवळी पी.ए., उपरोक्त पृष्ठ ६६

५२. आत्रे त्रि.ना., उपरोक्त पृष्ठ ११८

५३. कित्ता पृष्ठ ११८

५४. डॉ. कुलकर्णी अ.रा. उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ४१

५५. कित्ता पृष्ठ ४१

५६. डॉ. कुलकर्णी, अ.रा. उपरोक्त "मध्ययुगीन महाराष्ट्र", पृष्ठ ६४

५७. आत्रे त्रि.ना., उपरोक्त पृष्ठ ११८

५८. जोशी शं.ना.,(संपा.), "शिवकालीन पत्रसारसंग्रह खंड १", प्रकाशक शिवचरित्र कार्यशाळा पुणे, लेख ६४

५९. जोशी महादेवशास्त्री,(संपा.), "भारतीय संस्कृती कोश" खंड १, प्रकाशक भारतीय संस्कृती कोश मंडळ, पुणे, १९६५, पृष्ठ ५४०

६०. कित्ता पृष्ठ ५४०

६१. डॉ. कठारे अनिल, "शिवकाळ व पेशवाईतील महारांचा इतिहास", कल्पना प्रकाशन, नांदेड तृतीयआवृत्ती २००९, पृष्ठ १८४

६२. डॉ. बैसाने अनिल व डॉ. पाटील सुभाष, "मराठाकालीन समाज आणि अंधश्रध्दा", कल्पना प्रकाशन, नांदेड, प्रथमआवृत्ती २००५, पृष्ठ ३१

६३. कित्ता पृष्ठ ३२

६४. कित्ता पृष्ठ ३२

६५. कित्ता पृष्ठ ३२

६६. कित्ता पृष्ठ ३२

६७. कित्ता पृष्ठ २७,३०

६८. डॉ. कुलकर्णी अ.रा., "उपरोक्त शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ २४

६९. कित्ता पृष्ठ २५

७०. जोशी शं.ना., "मराठेकालीन समाजदर्शन", अ.वि.गृहप्रकाशन, पुणे, प्रथमआवृत्ती १९६०, पृष्ठ ४

७१. कित्ता पृष्ठ ४

७२. डॉ. कुलकर्णी अ.रा., उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ २६

७३. तुकारामांची गाथा, अभंग क्र ३८८१

७४. आत्रे त्रि.ना., उपरोक्त पृष्ठ ११३

७५. जोशी शं.ना., उपरोक्त पृष्ठ १२

७६. डॉ. कुलकर्णी अ.रा., उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ २९

७७. गायकवाड, सरदेसाई, थोरात, हनमाने, "मराठेकालीन संस्था व विचार", फडके प्रकाशन, कोल्हापूर, १९९०, पृष्ठ ६७

७८. कुलकर्णी अ.रा., उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र" पृष्ठ ३१

७९. कित्ता पृष्ठ ३१

८०. जोशी शं.ना., उपरोक्त पृष्ठ ४५

८१. कित्ता पृष्ठ ४८

८२. कित्ता पृष्ठ ४९

८३. गायकवाड व इतर, उपरोक्त पृष्ठ ७०

८४. डॉ. अ.रा.कुलकर्णी, उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ३४,३५

८५. खरे गणेश हरी, "महाराष्ट्राचा इतिहास", मध्ययुगीन कालखंड भाग १, प्रकाशन महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, प्रथम आवृत्ती २००१, पृष्ठ ३७

८६. डॉ. अ.रा.कुलकर्णी, उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ १५३

८७. कित्ता पृष्ठ १५३

८८. कित्ता पृष्ठ ३८

८९. सावंत उपरोक्त पृष्ठ १५२,१५३

९०. डॉ. अ.रा.कुलकर्णी, उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ३८,३९

९१. Sen S.N., "Administrative System of the Marathas", publication K.P. Bagehi and Company, Calcutta, 3rd ED,1976, page 129;130

९२. Russell R.V., "Tribes and cast of central provinces of India", Published Under the orders of the central provinces Administration in forur vol 1 Bombay, 1925, page 249

९३. Ibid

९४. राजवाडे वि.का.(संपा.), "मराठयांच्या इतिहासाची साधने", प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, खंड ९, लेख १

९५. भगत दत्ता (संपा.),कृष्णाजी अनंत सभासद कृत, "श्री शिवछत्रपतींचे चरित्र", प्रतिमा प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती २००१, पृष्ठ २४६

९६. डॉ. शिवदे सदाशिव, "छ. संभाजी", डायमंड प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती २००८, पृष्ठ ४३३

९७. डॉ. गोखले कमल, शिवपुत्र संभाजी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन,पुणे, सुधारीत आवृत्ती २००१, पृष्ठ ४३४

९८. प्रा. सावंत बी.एस. उपरोक्त पृष्ठ १५५

९९. कित्ता पृष्ठ १५५

१००. डॉ. कठारे अनिल व डॉ. घोडके जयश्री,"शिवकालीन महाराष्ट्र", अल्फाप्रकाशन नांदेड, प्रथमावृत्ती डिसेंबर २००८, पृष्ठ ४२

१०१. डॉ. सरदेसाई बी.एन., "मराठयांचा सामाजीक आर्थिक व सांस्कृतिक इतिहास", फडके प्रकाशन, कोल्हापूर, प्रथम आवृत्ती मार्च २००१,पृष्ठ ४९

१०२. कित्ता पृष्ठ ५०

१०३. कित्ता पृष्ठ ५०

१०४. डॉ. खोबरे वि.गो. समाविष्ट, "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ",(संपा.) पवार जयसिंग, मंजुश्री प्रकाशन कोल्हापूर, प्रथमआवृत्ती १९९०, पृष्ठ २२५

१०५. कित्ता पृष्ठ २२५

१०६. सरदेसाई बी.एन., उपरोक्त पृष्ठ ५१

१०७. कित्ता पृष्ठ ५२

१०८. डॉ. खोबरेकर वि.गो., "मराठेकालीन कोकणचे सामाजिक व आर्थिक जीवन", प्रकाशक इतिहास संशोधन मंडळ, मुंबई १९९७, पृष्ठ ४८

१०९. सरदेसाई बी.एन,. उपरोक्त पृष्ठ ५३,

११०. कित्ता पृष्ठ ५४

१११. कित्ता पृष्ठ ५४

११२. कित्ता पृष्ठ ५५

११३. आपटे द.वि. व ओतुरकर रा. वि.(संपा.), "महाराष्ट्राचा पत्ररुप इतिहास", विद्यार्थी गृह प्रकाशन, पुणे, प्रथमआवृत्ती १२३, पृष्ठ ५५

११४. डॉ. खोबरेकर वि. गो., उपरोक्त पृष्ठ ९१,९२

११५. डॉ. गाठाळ. एस.एस., "मराठयांचा इतिहास", कैलास पब्लिकेशन, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती, २०१०, पृष्ठ ४०४

११६. डॉ. सरदेसाई बी.एन., उपरोक्त पृष्ठ ५६

११७. चिटनिस कृ,ना., "मध्ययुगीन भारतीय संकल्पना व संस्था", भाग २, तिसरी आवृत्ती, २००८ पृष्ट १३१

११८. प्रा. सावंत बी.एस., उपरोक्त पृष्ठ १६४

११९. कित्ता पृष्ठ ११९

१२०. डॉ. गाठाळ एस.एस., उपरोक्त पृष्ठ ४०५

१२१. कृ.ना.चिटणीस, उपरोक्त "मध्ययुगीन भारतीय संकल्पना व संस्था", भाग २, पृष्ठ १३२

१२२. डॉ. गाठाळ एस.एस., उपरोक्त पृष्ठ ४०५

१२३. कित्ता पृष्ठ ४०५

१२४. देशमुख शारदा, "शिवकालीन व पेशवाईतील स्त्रीजीवन", प्रकाशन टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे, प्रथमआवृत्ती १९७३, पृष्ठ १८९

१२५. Joshi P.S., C. Sambhaji, Publication Cand and Co., Delhi, first published 1980. Page 292

१२६. Ibid, page 292

१२७. Ibid, page 293

१२८. प्रा. सावंत बी.एस., उपरोक्त पृष्ठ १६६

१२९. गायकवाड सरदेसाई, थोरात हनमाने, "मराठेकालीन संस्था व विचार", फडके प्रकाशन, कोल्हापूर, द्वितीय आवृत्ती १९८७, पृष्ठ ७२

१३०. चिटणीस कृ.ना., "मध्ययुगीन भारतीय संकल्पना व संस्था", भाग ३, प्रकाशन चिटणीस प्रकाशन पुणे, दुसरी आवृत्ती २००५, पृष्ठ १

१३१. कित्ता पृष्ठ १

१३२. कित्ता पृष्ठ १

१३३. डॉ. अ.रा. कुलकर्णी, उपरोक्त, "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ५२

१३४. कित्ता पृष्ठ ५२

१३५. कित्ता पृष्ठ ५२

१३६. कित्ता पृष्ठ ५२

१३७. कित्ता पृष्ठ ५२

१३८. कित्ता पृष्ठ ५३

१३९. कित्ता पृष्ठ ५३

१४०. प्रा. सावंत बी. एस., उपरोक्त पृष्ठ १८८

१४१. कित्ता पृष्ठ १८८

१४२. कृ.ना.चिटणीस, "मध्ययुगीन भारतीय संस्था व संकल्पना",भाग २, प्रकाशक चिटणीस प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती २००७, पृष्ठ २८

१४३. कित्ता पृष्ठ २८

१४४. प्रा. सावंत बी. एस., उपरोक्त पृष्ठ १९०

१४५. कित्ता पृष्ठ १९०

१४६. कित्ता पृष्ठ १९०

१४७. कित्ता पृष्ठ १९०

१४८. कुलकर्णी अ. रा., उपरोक्त पृष्ठ ४६

१४९. कित्ता पृष्ठ ४६

१५०. डॉ. गोखले कमल, "शिवपुत्र संभाजी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन", पुणे, चौथी आवृत्ती २००१, पृष्ठ ४३६

१५१. कुलकर्णी अ.रा., उपरोक्त पृष्ठ ४७

१५२. पुरंदरे कृ.वा.(संपा.), "शिवचरित्र साहित्य", खंड ९, प्रकाशक भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९३०, पृष्ठ १८

१५३. कुलकर्णी अ.रा., उपरोक्त पृष्ठ ४७

१५४. Sarkar Jadunath, "Shivaji and His Times", Publication, Orient Longman Ltd.,Delhi, fifth edition 1973, page 24-25

१५५. डॉ. पाटील सुभाष, "शिवकाळ व पेशवाईतील दुष्काळाचा इतिहास", पुनम प्रकाशन, नांदेड, प्रथम आवृत्ती २०११, पृष्ठ ३६

१५६. Brij Kisore, Tara bai and Her Times, Publication, Asia House Delhi, first edition, 1963, Page 38

१५७. दिवेकर सदाशिव महादेव (संपा.), कवी परमानंदकृत "शिवभारत" शब्दवेध प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती १९९८, पृष्ठ ७१,७२

१५८. पुरंदरे कृष्णाजी वासुदेव (संपा.), "शिवचरित्र्य साहित्य", खंड ७, प्रकाशक, चिटणीस भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९३८, लेख ५४

१५९. बेंद्रे वा.सी., "श्री छत्रपती संभाजी महाराज यांचे चिकित्सक चरित्र", प्रकाशक पी.पी.एच. बुकस्टॉल, मुंबई, द्वितीय आवृत्ती, पुष्ठ २३२

१६०. कित्ता पृष्ठ २१५

१६१. कित्ता पृष्ठ २१६

१६२. जोशी शं.ना.(संपा.), "छ. संभाजी कालीन पत्रसार संग्रह",प्रकाशक भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, ले. २३४, पृष्ठ ७७

१६३. वि.का. राजवाडे (संपा.), "मराठयांच्या इतिहासाची साधने", प्रकाशक भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, खंड ३, ले. २२

१६४. खरे गणेश हरी, "शिवचरित्र साहित्य खंड ६", प्रकाशक भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९३७, ले, ४३

१६५. बेंद्रे वा.सी., उपरोक्त पृष्ठ २७०-७१

१६६. जोशी शं.ना. (संपा.), उपरोक्त "छ. संभाजीकालीन पत्रसार संग्रह", ले. ५८

१६७. आवळकर शा. वि., शिवचरित्र साहित्य, खंड ९, प्रकाशक, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९४४, लेख ५५, पृष्ठ ५८

१६८. कित्ता पृष्ठ ५८

१६९. कित्ता पृष्ठ ५८

१७०. जोशी शं.ना. (संपा.), "उपरोक्त संभाजीकालीन पत्रसार संग्रह", ले. १२३

१७१. कित्ता ले. ७०-७१

१७२. कित्ता ले. ६९

१७३. कित्ता ले. ४५

१७४. बेंद्रे वा.सी., उपरोक्त पृष्ठ २७७

१७५. जोशी शं.ना. (संपा.), "उपरोक्त संभाजीकालीन पत्रसार संग्रह", ले. २८५

१७६. डॉ. अ.रा.कुलकर्णी, उपरोक्त, " शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ५९

१७७. जोशी. शं.ना. (संपा) "शिवकालीन पत्रसार संग्रह" खंड ३, लेखांक ६८५,

१७८. जोशी. शं.ना. (संपा) "शिवकालीन पत्रसार संग्रह" खंड २, लेखांक २१०५,

१७९. बेंद्रे वा.सी., उपरोक्त पृष्ठ १९९,२००

१८०. कित्ता पृष्ठ ६०

१८१. कित्ता पृष्ठ ६०

१८२. डॉ. पाटील सुभाष, उपरोक्त पृष्ठ ३२४

१८३. कृ.ना. चिटणीस, उपरोक्त, "भारतीय संकल्पना व संस्था भाग २", पृष्ठ ३०

१८४. डॉ. कुलकर्णी अ.रा. उपरोक्त, "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ६१

१८५. कित्ता पृष्ठ ६१

१८६. डॉ. शिवदे सदाशिव, उपरोक्त पृष्ठ ४१८

१८७. कित्ता पृष्ठ ४१९

१८८. दिवेकर (संपा.),उपरोक्त, "शिवभारत", पृष्ठ २७६

१८९. कृ.ना.चिटणीस, "मध्ययुगीन भारतीय संस्था व संकल्पना", भाग ३, प्रकाशन, रा.कृ.चिटणीस,पुणे, दुसरी आवृत्ती २००५, पृष्ठ १०३

१९०. कित्ता पृष्ठ १०४,१०५,१०६

१९१. English Records on Shivaji (1659-1682) Publication of the Shivcharitra karyalay, poona 1931, Page 318,319,320

१९२. कृ.ना. चिटणीस, उपरोक्त पृष्ठ १०६,१०७

१९३. डॉ. शिवदे, उपरोक्त पृष्ठ ४१९

१९४. कित्ता पृष्ठ ४२०,४२१

१९५. जोशी. प्र.न., "रामचंद्रआमात्यकृत आज्ञापत्र", व्हिनस प्रकाशन, पुणे,

चौथी आवृत्ती १९९७, पृष्ठ २७

१९६. शिवचरित्र साहित्य खंड ९, लेखांक ७०, १९४

१९७. जोशी शं.ना. संपा, छ. संभाजीकालीन पत्रसार संग्रह लेखांक १०४

१९८. प्रा. सावंत बी. एच., उपरोक्त पृष्ठ २२४

१९९. कित्ता पृष्ठ २२५

२००. प्रा. बिरादार टी. के., उपरोक्त पृष्ठ ५१२

२०१. डॉ. कुलकर्णी अ.रा.,उपरोक्त "शिवकालीन महाराष्ट्र", पृष्ठ ११५

२०२. प्रा. बिरादार टी. के., उपरोक्त पृष्ठ ५११

२०३. प्रा. सावंत बी.एस., उपरोक्त पृष्ठ २१४

२०४. कित्ता पृष्ठ २१५

२०५. प्रा. बिरादार टी. के., उपरोक्त पृष्ठ ५१४

२०६. कित्ता पृष्ठ ५१५

२०७. कित्ता पृष्ठ ५१५

२०८. भावे वा.कृ., उपरोक्त पृष्ठ २२२,२२३

२१८. गवळी पी.ए., "सरंजामशाही",प्रियदर्शनी प्रकाशन कोल्हापूर, प्रथमावृत्ती १९९१

पृष्ठ ४७

२१९. कित्ता पृष्ठ ४८

२२०. राजवाडे वि.का.संपा, "मराठयांच्या इतिहासाची साधने", खंड १५, लेखांक २७९

२२१. शिवचरित्र साहित्य खंड ५, लेखांक ८७२

२२२.  राजवाडे वि.का. ''मराठ्यांच्या इतिहासाची साधने'' खंड २१, लेखांक ४५

२२३. पाटील भिमराव, ''छ. शिवाजी-संभाजी व राजाराम महाराजांचे वतन विषयक धोरण'', कैलास प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ४०२२

२२४  जोशी शं.ना. (संपा), ''छ. संभाजीकालीन पत्रसार संग्रह'' पत्र क्रं २८६

२२५  ''शिवचरित्र साहित्य खंड १'', लेखांक ३७.

२२६.  राजवाडे वि.का., उपरोक्त ''मराठ्यांच्या इतिहासाची साधने'' खंड २० लेखांक २२

# प्रकरण ६ वे

# छ. संभाजीकालीन धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचे पैलू

# प्रकरण ६ वे

# छ. संभाजीकालीन धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचे पैलू

## *भाग १ : धार्मिक जीवनाचे पैलू*

### ६.१ प्रस्तावना :

छ. संभाजीकालीन लोकजीवनाचा धर्म हा महत्त्वाचा पैलू होता. धार्मिक जीवनामध्ये बदललेल्या परिस्थितीत छ. संभाजी महाराजास अधिक संघर्ष करावा लागला. शिवकाळामध्ये प्राप्त झालेल्या स्वातंत्र्याचे प्राणपणाने रक्षण करणे ही प्रमुख जबाबदारी होती. डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, "संभाजी महाराजांना औरंगजेबाच्या धर्मयुध्दास आव्हान देणे क्रमप्राप्त झाले. औरंगजेबाने आपले सैन्यबळ, संपत्ती, मातब्बर सेनापती आणि राजनैतिक सामर्थ्य यांना त्यासाठी पणाला लावले व या जिहादात विजेते होण्यासाठी आटोकाट प्रयत्न केला. छ. संभाजी महाराजांनी त्यास कडवा प्रतिकार केला. आणि त्याच्या चौफेर हल्ल्याला समर्थपणे तोंड दिले."[१] डॉ. कमल गोखले यांच्या मते, "औरंगजेब स्वसामर्थ्याने स्वराज्य नष्ट करण्यासाठी स्वतःच दक्षिणेत आला संभाजीराजांनी स्वसंरक्षण करता करता महाराष्ट्र धर्म वाढविण्याचे काम करावयास अवसर आणि संधीच मिळाली नाही. राज्यकारभारात बहुतेक शक्ती खर्च होत असली तरी त्यांनी धार्मिक विषयाकडे दुर्लक्ष केले नाही."[२] छ. संभाजीकालीन समाजजीवनाची वैशिष्टये पाहता हा समाज धर्मप्रधान होता. असे म्हणता येईल.

शिवकाळामध्ये प्राप्त झालेले स्वातंत्र्य हा हिंदवी स्वराज्याचा परीपाक होता. ६ जून १६७४ रोजी छ. शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक झाला होता. त्यानंतर ६

वर्षांनी महाराजांचा मृत्यू झाला त्यामुळे मोघलांनी हिंदवी स्वराज्याविरूध्द अखेरची लढाई सुरू केली. छ. संभाजीस या लढाईला प्रत्युत्तर देणे भाग होते. डॉ. पी. जी. जोशी यांनी संभाजी मोघल संघर्षाचे तीन टप्पे पाडले आहे. ते म्हणतात. "The war with which Chhatrapati Shivaji was against the moghals since 1670 had not ended with the death of Shivaji - Therefor, it was continued by Sambhaji during the period of his reign (1680-1689 A.D.) finally, in that war he was captured alive by the moghals and Aurangabad put him to a cruel death." [३]

यावरून असे दिसते की, संभाजी महाराजांना भविष्यकाळामध्ये सर्वंकष संघर्षाला सामोरे जावे लागले. मोगल सम्राट औरंगजेबाने महाराष्ट्रावर आक्रमण केले होते आणि हिंदवी स्वराज्य पूर्णपणे बुडवावे, इस्लामचा प्रसार करावा आणि लोकांवर जाचक अटी व कर लादावेत या इराद्याने औरंगजेबाने महाराष्ट्रात तळ ठोकला होता, परंतु संभाजी काळात शूर मराठा सरदारांनी मोगलाशी निकराची झुंज दिली आणि औरंगजेबाचे हे कडवे धोरण हाणून पाडले.

संभाजीकालीन धार्मिक धोरणांची ठळक वैशिष्टये खालीलप्रमाणे सांगता येतील.

## ६.२ औरंगजेबाचे धार्मिक धोरण व छ. संभाजीचे प्रत्युत्तर

मोघल सम्राट औरंगजेबाचे धार्मिक धोरण अधिक कडवे आणि धर्मवेडे होते. त्यामुळे त्याने हिंदूंवर 'जिझिया' कर लावला. व त्यांना 'काफर' समजून त्यांचा छळ सुरू केला. सम्राट अकबर आणि औरंगजेब यांची तुलना करता संभाजीचे धोरण हे भिन्न होते. त्यामध्ये जमीन आसमानचे अंतर होते. त्यामुळेच औरंगजेबाच्या काळात छ. शिवाजी महाराजांच्या रूपाने हिंदवी स्वराज्य स्थापन झाले. त्याचा वारसा छ. संभाजीस लाभला.

"अकबराने उदार धार्मिक धोरणाचा अवलंब केल्याने त्याच्या शासन काळात इस्लामचे राजधर्माचे स्थान गेले. काही काळ मोघलांनी हेच धोरण चालविले. शहाजहानच्या काळात पुन्हा हिंदूद्वेषाचे धोरण सुरू झाले. औरंगजेब कट्टर सुन्नी होता. तो कुराणाप्रमाणे चालत असे. म्हणूनच इस्लामला राजधर्म घोषित करून त्याने त्याच्या प्रचाराचा पूर्ण प्रयत्न केला."[४] औरंगजेबाच्या प्रदूषित धोरणामुळे स्थानिक समाजामध्ये विषमता व असमानतेची भावना पसरली व तिचे पर्यावसन प्रतिक्रियात्मक उठावात झाले. पुढे. प्रा. ना. सी. दीक्षित म्हणतात, "औरंगजेब भारताला काफिरांचा देश मानित होता. त्या देशाला इस्लाममय बनविण्यासाठी जिहाद पुकारणे तो स्वतःचे धार्मिक कर्तव्य समजत असे. अशा प्रकारे संपूर्ण देशावर विजय मिळवून येथील प्रजा इस्लाम बनत नाही तोपर्यंत त्या प्रजेला कोणतेही राजकीय, आर्थिक अधिकार, सवलती दयावयाच्या नाहीत. असे सम्राटाचे धोरण होते."[५] त्यांनी हिंदूस दुय्यम दर्जाची वागणूक दिली त्यामुळे हिंदू प्रजा नाराज होऊन ती आपल्या भावना व्यक्त करू लागली. औरंगजेबाची भूमिका हिंदूविरोधी होती. "याच भूमिकेतून त्याने सर्वप्रथम देशात व दरबारात इस्लामला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यानंतर गैरमुस्लिम रितीरिवाजांवर प्रतिबंध लावला. व मुस्लिम कायद्याचा अंमल जारी केला. त्यांची नीट अंमलबजावणी होते किंवा नाही. यावर लक्ष ठेवण्यासाठी खास धर्मनिरीक्षकांची नियुक्त केली. कुराणानुसार अनुचित प्रकार अनुचित आहे म्हणून दरबारातील गाणे बजावणे बंद केले. तसेच झरोकादर्शन, सम्राटाची तुला इ. प्रथा बंद केल्या. मंदिरांच्या जीर्णोध्दारावर प्रतिबंध लावण्यात आला. उलट हिंदूंच्या मंदिरांच्या धार्मिक मंदिरांचा, धार्मिक क्षेत्रांचा विध्वंस करावा अशी औरंगजेबाची प्रांतीय शासकांना आज्ञा होती."[६] त्यामुळे हिंदू प्रजा असंतुष्ट झाली व कडवी प्रतिक्रिया व्यक्त करू लागली.

मोगल सम्राट औरंगजेबाचे धार्मिक धोरण हे कडवे व लोकविरोधी होते. "सम्राटाच्या आदेशानुसार बनारसचे विश्वनाथ मंदिर, मथुरेचे श्रीकृष्ण मंदिर,

सौराष्ट्रातील सोमनाथ मंदिर यांचा विध्वंस करण्यात येऊन त्या जागी मशिदी उभारण्यात आल्या. मंदिरामध्ये गाईचा वध करणे. देवतांच्या मुर्ती पायदळी तुडविणे या गोष्टी नेहमीच्याच होऊ लागल्या."[७] त्याच्या या धोरणामुळे हिंदू प्रजा संतप्त होऊन वेळ मिळेल त्याप्रमाणे सम्राटाविरोधी राग व्यक्त करीत असे. हिंदू मेळावे, सण, यावर प्रतिबंध लावण्यात आला. अनेक हिंदू अधिकाऱ्यांना औरंगजेबाने नोकरीतून काढून दिले. परंतु मुसलमान अधिकाऱ्यांच्या अकार्यक्षमतेमुळे हिंदूंना पून्हा कामावर घेण्यात आले.[८] त्यामुळे अधिकारी विरोधी गेले.

डॉ. वि.भा. आठल्ये यांनी बादशहाच्या धार्मिक धोरणाबाबत म्हटले आहे. "बादशहाने १२ एप्रिल १६७९ रोजी आज्ञा जारी केली व हिंदूंवर जिझिया कर त्याने पून्हा जारी केला. प्रत्येक हिंदूला त्याने मुस्लिम धर्माचा स्वीकार न केल्याबद्दल जिझिया कर द्यावा लागत असे. मग तो शेतकरी असो, जमीनदार असो, सरकारी नोकरीत काम करणारा कर्मचारी असो, हिंदूंना अत्यंत नम्र होऊन हा कर स्वहस्ताने भरावा लागे. जिझिया कर देणाऱ्यांचे तीन वर्ग करण्यात आले होते. वरिष्ठ वर्गीय हिंदूंना ४८ दर्हम (नाणे) वार्षिक कर द्यावा लागे. द्वितीय श्रेणीच्या हिंदूंना ४० दर्हम (नाणे) वार्षिक कर द्यावा लागे. तृतीय श्रेणीच्या हिंदूंना १२ दर्हम (नाणे) वार्षिक कर द्यावा लागे. १ दर्हम = ४ आण्यांहून काही जास्त असे. स्त्रीया, मुले, गुलाम, दरिद्री लोकांना हा कर लागू केला नव्हता. या करामुळे हिंदूवर अतिशय वाईट परिणाम झाला. (छ. शिवाजीने या कराबद्दल निषेध्द करणारे पत्र औरंगजेबाकडे पाठविले होते.) भारतात आलेला प्रवासी मनुची म्हणतो की, ज्या हिंदूंमध्ये जिझिया कर देण्याची ताकद नव्हती असे हिंदू इस्लाम धर्माचा स्वीकार करीत व जिझिया देण्यापासून स्वतःची सुटका करून येत."[९] अशा प्रकारच्या जाचक करामुळे हिंदू प्रजा नाराज होऊन ती शिवाजीच्या हिंदवी स्वराज्याकडे वळणे साहजिकच होते. आठल्ये पुढे म्हणतात,

"औरंगजेबाने हिंदूंच्या तिर्थस्थानांवर स्नान करण्यासाठी कर लावला. प्रत्येक हिंदूला प्रयागमध्ये गंगास्नान करण्यासाठी ६रूपये ४ आणे यात्रा कर म्हणून दयावा लागे. अशा प्रकारचे कर इतर तिर्थस्नानांवरही लागू करण्यात आले होते." [१०] या प्रकारचे कर म्हणजे हिंदू प्रजेची लूटच होती. त्यामुळे जनता असंतृष्ट झाली.

बादशहाने हिंदू - मुसलमानांच्या बाबतीत पक्षपाती धोरण ठेवले. त्याने मुसलमान व्यापाऱ्यांकडून चुंगी वसूल करणे बंद केले. पण हिंदू व्यापाऱ्यांकडून मात्र ५ टक्के चुंगी कर वसूल करण्यात येऊ लागला. [११] या प्रकारचा भेदभाव हा हिंदू व्यापारी वर्गात असंतोष प्रकट करणारा होता.

सर्व हिंदूंना आपल्याबद्दल धाक वाटावा म्हणून असे जाचक कर लावण्यात आले होते. जे हिंदू मुसलमान होते त्यांना सरकारी नोकऱ्या देण्यात येतील असे घोषित करण्यात आले. इस्टेटीवरून दोन व्यक्तींमध्ये भांडण झाले तर जी व्यक्ती इस्लामचा स्वीकार करेल अशा व्यक्तीस ती संपत्ती बादशहा देत असे. [१२] या प्रकारे धर्मांतरास प्रलोभन देऊन बादशहाने इस्लामीकरणाची लाट सुरू केली. ही बाब चिंताजनक व संतापजनक होती. "सर्व हिंदूंवर पालखीत बसणे, हत्ती किंवा घोडेस्वार होणे, आपल्याजवळ शस्त्र वा हत्यार बाळगणे इ. बंदी घालण्यात आली. अशा रितीने औरंगजेबाने सर्वच हिंदूंचा छळ केला. हिंदूंचे इस्लामीकरण करण्याच्या बाबतीत त्याने आपली सर्व बुध्दी पणाला लावली." [१३] या प्रकारची बंधने म्हणजे धार्मिक स्वातंत्र्यावर गदाच होती.

"अशा प्रकारे औरंगजेबाने हिंदूंना अनेक मार्गाने कष्ट देऊन त्यांना मुसलमान होण्यास भाग पाडले. त्यावेळी मोगल शासन म्हणजे एक धर्मप्रचारक संस्थाच बनली होती. भारताला इस्लाम देश बनविण्याच्या औरंगजेबाच्या या नीतीला अनेक प्रदेशात अनेक जमातींनी विरोध केला. त्याच्या हिंदू द्वेषाची प्रतिक्रिया म्हणून अनेक ठिकाणी

मशिदीची तोडफोड झाली. मुसलमानांच्या नमाजाचा आवाज बंद करण्यात आला. जिझिया वसुल करणाऱ्यांना मारपीट झाली.''[१४] राजसत्ता धर्मांध झाल्यामुळे हिंदू-मुस्लिम समाजात अंतर पडू लागले ही विषमता भेदक होती.

औरंगजेबाच्या हिंदूविरोधी धोरणाला दक्षिण भारतात केवळ मराठयांनी प्रतिकार केला. मावळे, मराठयांना संघटीत करून छ. शिवाजी महाराजांनी नाशिक ते कोल्हापूर व पश्चिमेला कोकण किनारपटटी या परीसरात स्वतंत्र राज्य स्थापन केले. हिंदूंचे हे स्वतंत्र राज्य स्वराज्य म्हणून प्रसिध्द होते.

विजापूरच्या अफजलखान, सिध्दीजोहर इ. सरदारांना यशस्वी टक्कर देऊन छ.शिवाजी महाराजांनी मोगल प्रदेशावर हल्ले करावयास सुरवात केली. त्याला चिरडून टाकण्यास पाठविलेल्या शाहिस्तेखानाची फजिती करून शिवाजीने त्याला स्वराज्य सोडून देण्यास भाग पाडले. मोघलांशी उघड मैदानावर सामना न करता. शिवाजीने महाराष्ट्राच्या भौगोलिक स्थितीचा फायदा घेऊन डोंगरी किल्ल्यांच्या आश्रयाने गनिमी काव्याचा अवलंब केला. परंतु औरंगजेबाने पाठविलेल्या जयसिंगाने स्वराज्याची केलेली जाळपोळ थांबविण्यासाठी छ. शिवाजी महाराजांनी पुरंदरचा तह मान्य केला (१६६५)व आग्र्याला औरंगजेबाच्या भेटीस जाण्याचे मान्य केले. तेथे आपल्या स्वभावाप्रमाणे दगा करून औरंगजेबाने छ. शिवाजी महाराजांना संभाजीसह नजरकैद केले. परंतु पोलादखानाच्या पोलादी पहाऱ्यातून मराठयांचा हा राजा प्रत्यक्ष औरंगजेबाच्या नजरकैदेतून निसटला व १६७४ मध्ये स्वतःला राज्याभिषेक करून घेतला. आणि १६८० मध्ये त्यांचा मृत्यू झाला.[१५]

छ.शिवाजी महाराजांनी स्थापन केलेले स्वराज्य म्हणजे बादशहाला प्रतीशहच होता असे म्हटले पाहिजे. शिवाजीला चिरडून टाकण्यासाठी औरंगजेबाने कितीही भाषा वापरली असली तरी शिवाजी जिवंत असेपर्यंत दक्षिण भारतात पाऊल

टाकण्याची औरंगजेबाची हिंमत झाली नाही. छ. शिवाजीच्या मृत्यूनंतर मात्र तो प्रचंड सैन्यांसह तो दक्षिणेत उतरला (१६८१). विजापूर व गोवळकोंडा जिंकल्यावर औरंगजेबाने आपली संपूर्ण शक्ती मराठयांना नेस्तनाबूत करण्यासाठी लावली.

यावेळी संभाजीराजे मराठयांचे छत्रपती होते. त्याने अतिशय शौर्याने व धाडसाने मोगलांना प्रतिकार केला. पण ते गाफिल अवस्थेत पकडले जाऊन ते औरंगजेबाकडून मारले गेले (१६८९). संभाजीच्या वधामुळे स्वराज्य धोक्यात आले. छ. शिवाजी महाराजांनी स्थापन केलेले हे हिंदू राज्य नष्ट होण्याचा प्रसंग आला.[१६] औरंगजेबाच्या दक्षिणेवरून आक्रमणाची परिणती ही निर्णायक संघर्षास झाली. छ. संभाजीने इस्लाम धर्म न स्वीकारता वीरमरण पत्करले ही बाब सामान्य जनतेला प्रेरक ठरली.

### ६.३ छ. संभाजी महाराजांचे साधु संतांना साहाय्य :

छ. संभाजी राजांनी साधू संतांना साहाय्य केले. डॉ. कमल गोखले म्हणतात, "शिवाजी महाराजांच्या प्रमाणे देवदेवता सत्पुरूष यांच्या आशीर्वादावर आणि कृपेवर संभाजी महाराजांचा नितांत विश्वास होता. वडिलांच्या मृत्यूनंतर वारसाहक्कांसाठी त्यांना जे लढावे लागत होते. त्या दुःखद मनस्थितीत त्यांना संतमहंतांचा आशीर्वाद हवा होता.त्यामुळे पन्हाळावरून रायगडला जातांना ते मौजे कोरटी येथे सदाव्रती मल्हार गोसावी यांना भेटले."[१७] त्यांच्या या धोरणांमुळे स्थानिक साधुसंत हिंदू धर्मरक्षणासाठी सज्ज बनले. दि. १९/१०/१६८० रोजी ज्या बाबा याकूद अवलिया फकीर यांची शिवाजी महाराजांनी स्थापना केली होती. त्यांचे संभाजी महाराज यांनी केळशी येथे दर्शन घेतले व २५/१०/१६८० ते रायगडाला परत आले.[१८] संभाजी महाराजांचा दृष्टीकोन हा इस्लाम धर्माच्या विरोधात नव्हता. ते सर्वधर्म समभावाचे सुत्र पाळत. जोशी शं.ना. म्हणतात, "पन्हाळयाहून रायगडावर जातांना रा.स्वामी,

रा. गोसावी म्हणजे मल्हार गोसावी सदाव्रती यास भेटले, संभाषण प्रसंग झाला. बहुत प्रामाणिक ईश्वरभक्त पाहून बंद केलेला अग्रहारगांव चालवावा. ऐसा इत्यर्थ करून तो दिला."[१९] छ. शिवाजीप्रमाणेच हे सुध्दा साधूसंतांना माणत असत व त्यासाठी योग्य ते सहाय्य प्रचिती या उताऱ्यावरून येते.

सर्व धर्मातील साधू व संत तसेच बैरागी यांचा त्यांनी आदर केला. शिवाजी महाराजांप्रमाणेच समाजकार्य करणाऱ्या या साधुसंतांना आणि विद्वानांना त्यांनी यथायोग्य साह्य केले. स्वराज्य रक्षणात त्यांची महत्त्वाची भूमिका लक्षात घेऊन त्यांना त्यांनी सतत प्रोत्साहन दिले व त्यास योग्य वेळी अनुदानही दिले.

**६.४ धार्मिक इनाम :**

डॉ. ए.आर. कुलकर्णी म्हणतात, "सतराव्या शतकात धर्माचे जीवनात विशेष स्थान होते. 'हे राज्य व्हावे हे श्रींच्या मनात फार आहे.' अशा आशयाचे शिवाजी महाराजांच्या पत्रातील उद्‌गार त्यांच्या धर्मावरील श्रध्देचे सूचक आहे. याला अनुसरूनच अनेक धार्मिक संस्थांना धर्मचरण करणाऱ्यांना गावाची काही जमीन इनाम दिली असे."[२०] छ. संभाजी महाराजांनी स्वराज्याच्या रक्षणासाठी स्वीकारलेले इनाम देण्याचे धोरण हे तत्वास मुरड घालणारे होते. "त्याचप्रमाणे संभाजी महाराजांनी चिंचवड, मोरगांव, सज्जनगड, चाफळ इ. देवस्थानांची व्यवस्था नीट चालावी म्हणून पूर्वीची वृत्ती व इनामे चालू ठेवली."[२१] त्यांचे हे धोरण शिवाजी महाराजांच्या धोरणास पोषक असे होते. संभाजी महाराजांनी स्वराज्याच्या मुलकी व न्यायालयीन विषयाप्रमाणेच धार्मिक कारभाराकडे जातीने लक्ष दिलेले दिसते. ज्या देणग्या दिल्या जात. त्यांची अंमलबजावणी व उपयोग नीट होतो किंवा नाही याकडे त्यांचे बारकाईने लक्ष असे.[२२] हे लक्ष म्हणजे त्यांचा चोख दृष्टीकोन होता.

श्री. देव चिंचवडकर यांना निजामशहा, मलीकअंबर, आदिलशहा, शहाजी आणि

शिवाजी महाराजांच्या वेळेपासून बागा व इनाम चालत आले होते. श्री. देव स्वामी पिढी दर पिढी राहून, अन्नछत्र, गरीबगुरीब व फकीर जो कोणी येतो त्यास अन्न उदक देत असत. यासाठी गाव इनाम करुन दिला होता. संभाजी महाराजांना हे चालविणे अगत्य वाटल्यावरुन त्यांनी दि. २२-०१-१६८३ येथे पुणे येथिल देशाधिकाऱ्यास इनाम चालविण्याविषयी लिहीले.[२३] अशा प्रकारे त्यांचे धोरण हे स्वराज्यास बळकटी आणणारे प्रगतशील धोरण होते.

मोरगांव येथील मोरेश्वर गोसावी यांना शिवाजी महाराजांनी मौजे लोणी, पणदरे, कासड, सेलगाऊ येथे इनाम दिले होते. तेच संभाजी राजांनी चालू ठेवले. ही सनद चालू ठेवण्यासाठी पुण्याचा सरसुभेदार नागोजी बल्लाळ याने सुपे व इंदापूर येथील हवालदार आणि कारकून यांना दि. ७/२/१६८१ रोजी लिहिले. कुटुंबासमवेत मोरेश्वर गोसावी राहात असत. त्यांना लष्करातील सुभेदार, जुमलेदार व कारकून यांचा उपद्रव होऊ नये अशी संभाजी राजांची इच्छा होती. ते दि. १६/११/१६८० रोजी त्यांना आज्ञा करतात, "राजश्री मोरेश्वर गोसावी कऱ्हेपठार येथे कुंटुंबेसी राहाताती. तरी तुम्ही येता जाता त्यांच्या माणसांस शेता पोतास गुराढोरास काडीची तसवीस देत नव जाणे. निरोपद्रव सुखरूप राहेती ते करणे. जेथे त्याला अनकूल पडेल तेथे जाऊन राहिले तरी सुखे राहो देणे. त्यांचे वाटेस नव जाणे."[२४] अशा प्रकारे त्यांचे धोरण हे स्वराज्याला स्थैर्य देणारे होते.

### ६.५ छ. संभाजी व समर्थ रामदास :

छ. शिवाजी प्रमाणेच संभाजीराजेही समर्थ रामदासांचे थोरपण जाणून होते. राज्यारोहणानंतर छ. शिवाजी सर्व राण्यांसह सज्जनगडावर गेले होते. तेंव्हा छ. संभाजीही त्यांच्या बरोबर होते. शिवाजी महाराजांच्या निधनानंतर संभाजी महाराज रामचंद्रपंत अमात्य यांच्यासह जेष्ठमासी सज्जनगडावर येऊन समर्थांचे दर्शन घेऊन

गेले.[२५] छ. शिवाजीप्रमाणेच छ. संभाजीराजेही स्वराज्यरक्षणामध्ये समर्थ रामदासांकडून प्रेरणा घेत असत.

डॉ. कमल गोखले म्हणतात, "चाफळ येथे श्रीरामाचा उत्सव करणे हे राज्यव्यवस्थेचे अंग होते. श्री. समर्थांची आज्ञा मान्य करून श्रींच्या कार्याचा अंगीकार करणे श्रींचा उत्सव चालविणे हा एक राजकारणाचा भाग आहे. असे शिवप्रभू अखेरपर्यंत समजत असत. शंभूछत्रपतींनी तेच धोरण अंगीकारले. त्यांनी कऱ्हाड, सातारा, सज्जनगड, चाफळ इ. ठिकाणच्या अधिकाऱ्यांना आज्ञा करून उत्सवाच्या व्यवस्थेसंबंधी पत्रे पाठविली. संभाजी महाराजांनी ज्याप्रमाणे इतर देवस्थानांची व्यवस्था आणि सत्पुरूष यांची वर्षासने पुर्ववत चालू ठेवली होती. त्याचप्रमाणे त्यांनी चाफळ येथिल श्री. रामदास स्वामींच्या श्रीरघुनाथ देवाच्या पूजा नैवेद्यासाठी आणि देवांच्या सेवकांना जी मोईन शिवाजी राजांनी १६७५ सालातील वर्षप्रतिपदेस करून दिली होती. ती संभाजी महाराजांनी दि. १८/१०/१६८० रोजी तशीच चालविण्याची आज्ञा देशाधिकारी व देशलेखक, काशीरंगनाथ प्रांत जावळी यांस दिली."[२६] अशा प्रकारे त्यांच्या ठाम पाऊलामुळे श्रीराम जन्मउत्सवास उचित सन्मान दिला.

श्रीरामदास स्वामींना अतीत-अभ्यागत आणि नित्यनैमित्तिक चालविण्यासाठी शिवाजी महाराजांनी तांदूळ, कणिक, डाळी, तूप, मीठ, सुपारी, दिव्यास तेल, कात असे एकुण एक मण, साडे एकोणतीस शेर, साडेचार टाक आणि दरमाहे तीन तीन शेर, ५०० विडयांची पाने आणि एक दुभती म्हैस अशी मोईन करून दिली होती. ही मोईन अशीच चालू ठेऊन संभाजी राजांनी जावळीच्या अधिकाऱ्यांना सांगितले की जोपर्यंत म्हैस दुभती असेल तोपर्यंतच ठेवावी. म्हैस दूध देईनाशी झाली की ती जमा करून दूसरी द्यावी. नंदादीपासाठी देण्यात येणारे तेल रामदासांच्या समुदायाला देण्यास बजाविले.[२७]

१६८३-१६८४ मध्ये मराठे आणि पोर्तुगीज यांच्यात युध्द चालू होते. सौन्देकरांनी पोर्तुगीजांना मदत केल्यामुळे राजे त्यांच्यावर स्वतः चालून गेले होते. मराठयांच्या आरमारात काही मुसलमान होते. त्यातल्या एका अधिकाऱ्यांनी कारवारला एक गाय विकत घेऊन खाण्यासाठी तिला मारले. ही बातमी संभाजी राजांना समजताच त्यांनी त्याला जाहीर रीतीने फाशी दिली. 'गोब्राम्हण प्रतिपालक' या बिरूदावलीने प्रसिध्द असलेल्या शिवप्रभूंच्या कीर्तीला शोभेल असेच हे संभाजीराजांचे कृत्य होते.[२८] या सर्व नोंदी लक्षणीय आहे. गोवध बळीचेधोरण त्यांनी कठोरपणे पाळले व अनुकरले होते.

१६८४ सालच्या ऑगष्ट महिन्यात सुलतानतारा या मोघल सरदाराने लष्करासमवेत तोरगल, नवलगुंद येथे स्वारी केली. नवलगुंद हे धारवाड जिल्हयातील तालुक्याचे ठिकाण आहे. सुलतानाने तेथे मुक्काम करून घरे, वाडे, पेठा, मोडून आणि जाळून नष्ट केल्या गावातील साक्षात देवस्थाने छिन्न विछिन्न केली. मोठी देवालये उध्वस्त केली. गावात रोगराई होऊन माणसे मेली. रयत, वाणी, दिवाण लोक गावे सोडून जावू लागली. अभयाचा कौल दिल्यानंतर तेथे देवतांची स्थापना करण्यात आली. ग्रामदेवस्थानाच्या दिवसापासून पांढरी बसली होती. पुरातन स्थळातील मूर्ती दुरात्म्यांनी विच्छिन्न केल्या होत्या.

'महाराज राजश्री महाराष्ट्रराजा आहे. देवस्थाने छिन्नभिन्न असू नये. या कारणे देवालय बांधावी उरंजा चालवावी, हयात आपण स्वामी मिळोन जे करणे ते करीत आहो तूर्त नवलगुंदासारखे गावात देवस्थान देवळेच नाहीतसे झाले आहे. देवळे इमारती बांधाव्या. तूर्त मुर्ती स्थापना करून पूजा चालवावी. नित्य पुराण श्रवण चालावे सर्वांच्या मते विचार पडला की, हिंदूकीची गोष्ट खरीच उदंड खर्चवेच महाराजांचे दरबारात होऊन जातो अगर पडजंगलही पडते. त्यापरीस श्रीचे उरजे अर्पित राजगृहातून जरी

वेच जाहला नाही तरी ज्याचे नांव त्याचे पुण्य महाराज छत्रपती साहेबांस श्रेय येईल.' [२९] डॉ. कमल गोखले यांनी केलेली ही नोंद महत्त्वाची आहे. हिंदूंचे धार्मिक स्वातंत्र्य अबादित ठेवण्यासाठी छ. संभाजीराजांनी टाकलेली पाऊले खरोखरच महत्त्वाची म्हटले पाहिजे. त्यामुळे हिंदवी स्वराज्य अधिक बळकट व शशस्त्र बनले.

**६.६ धर्मशुद्धीकरण चळवळ :**

इंग्रज, पोर्तुगीज, मोघल हे हिंदूंना बाटवित. हिंदूंनी इस्लाम धर्म स्वीकारला नाही तर मोघल त्यांना कैदेत ठेवत. धर्मांतरास नकार दिल्यास त्यांची कत्तल करीत. या गोष्टीला आळा घालण्यासाठी संभाजीने प्रयत्न केल्याचे दिसून येते. मुसलमानांचे कटटर हिंदूविरोधी धोरण हे धर्मांतरास प्रोत्साहन देणारे होते. डॉ. पी. एस. जोशी म्हणतात,"Thus Sambhaji continued the liberal policy of Chhatrapati Shivaji of converting to Hinduism the Hindus who were forcibly converted to Islam."[30] या उदाहरणाचा तपशील देतांना डॉ. सदाशिव शिवदे म्हणतात, "शिवाजी राजांप्रमाणेच संभाजी राजांच्या कारकीर्दीत बाटलेल्या लोकांना परत शुध्द करून स्वधर्मात आणण्याचे प्रयत्न होत असत. त्यासंदर्भातील एक नोंद पुढीलप्रमाणे सांगता येईल. गंगाधर रघुनाथ कुलकर्णी कसबे हरसूल हा ब्राम्हण मोघलांपाशी सेवेशी होता. कित्येक दिवस चाकरी करीत असता. मोघली यावरी बलात्कार करून बाटविला. भ्रष्ट करून यांस तीन महिने बंदीखाणी निर्बंध ठेवीला होता. तेथे यवनांसी अन्नोदक संसर्ग घडला. त्यानंतर यास भाग्य अडीच सद्दी मनसब देऊन चाकर करून ठेविला. पाच वर्षे चाकरी करीत होता. स्नानसंध्यादिक करणेंकरितां न ये यास्तव राहिलें. पांच वर्षात अन्नोदक संसर्ग केला नाही. दौलत करीत असतां भाग्याचे सुख टाकून, अंतःकरणी अनुताप मानून आपले जातींत यावें यास्तव दौलत संपत्ती टाकून, अनूतापास्तव राजश्री, छत्रपती स्वामींपाशी

रायगडास येऊन एक वर्ष गंगाधर रंगनाथ दरबारी आपणांस प्रायश्चित द्या म्हणवून सरकारकून व न्यायाधीश व उपाध्ये व दानाध्यक्ष व भलेभले व ब्राम्हण व समस्त आपले ज्ञातीस शरण येऊन प्रायश्चित मागत होता."[३१] छ. संभाजी महाराजांनी त्यास सिध्द करून पून्हा हिंदू धर्मांत घेतले होते. अशा प्रकारे छ. संभाजीचे धोरण हे शुध्दीकरणांस पोषक होते. त्यामुळे हिंदू प्रजेमध्ये आत्मविश्वासाची भावना वाढीस लागली.

डॉ. कमल गोखले म्हणतात, "प्रायश्चित देऊन शुध्दीकरणाची अनेक उदाहरणे असण्याची शक्यता या पत्रावरून येते. संभाजीराजांनी हे धर्मकार्य केले यात शंका नाही."[३२] अशा प्रकारे छ. संभाजीकालीन ध्येयधोरणे हे हिंदू प्रजेचे धार्मिक स्वातंत्र्य अबाधित ठेवण्यासाठी पोषक ठरले. हिंदूंची संख्या कमी होऊ नये म्हणून मुसलमान झालेल्या बऱ्याच हिंदूंना त्यांनी परत हिंदू धर्मात घेतले.

### ६.७ हिंदू मंदिरांचा जीर्णोध्दार व उभारणी :

छ. संभाजीच्या प्रशासकीय अधिकाऱ्यांनी जुन्या मंदिरांचा जीर्णोध्दार करून नविन मंदिरे उभारली. प्रा. पी. एस. जोशी म्हणतात, "The Mughal army devastated the territory of Torgal and Navalgund of the Dharwad district in 1684. As it had also destroyed Hindu temples in that area, Lakhava Lingappa Desai of Mamle Torgal requested the officer of Kasba Navalgund to construct temples. Therefore, that officer gave an inam to Venkatibhat Kashinathbhat Varanashikar and arranged for the construction of a temple at Navalgund."[33] याचा अर्थ असा की मोघल सैन्य बऱ्याच वेळा हिंदू मंदिरे उध्वस्त करीत असत, संभाजीराजांनी आपल्या अधिकाऱ्यांना

मंदिरे उभारण्याचा अधिकार दिला. अनेक जुन्या मंदिरांची डागडुजी करून त्यांना इनामे देण्यात आली. पण छ. संभाजी महाराजांनी असा त्रास मुस्लिम प्रार्थनास्थळांना दिला नाही.

अशा प्रकारे छ. संभाजी महाराजांचे हे धार्मिक धोरण स्थानिक हिंदू प्रजेला न्याय देणारे होते. तसेच मोघलांचे आक्रमक धर्मवेडास हिंदूंनी चोख उत्तर दिले. हेच छ. संभाजी महाराजांच्या धोरणांचे यशसूत्र होते. त्यांनी शिवाजी महाराजांप्रमाणे न्यायबुध्दी व सहिष्णू समतोलदृष्टी अनुसरली असे म्हणता येईल.

**६.८ ग्रामदेवता :**

महाराष्ट्रीय समाजातील सर्व जातीजमातीतील लोकांची विचारसरणी सारखी असल्यामुळे त्यांची वागणूक व राहणीमानही सारखेच होते. परंपरेने चालत आलेल्या चालीरिती, रूढी, परंपरांवर व धार्मिक रितीरिवाजांवर विश्वास असल्याने त्यांचा देवभोळेपणा हा अमर्याद होता. जे समज पिढयानपिढया संक्रमित होत येत ते सत्य मानले जात. त्यांच्याविषयी कोणतीही शंका न घेता तेच अंतिम प्रमाण मानले जात असे. लोक शूर व पराक्रमी होते, काटक, धीट, सतत उदयोगी व प्रयत्नशील होते. तरीही यश संपादन करण्यासाठी केवळ प्रयत्न कारणीभूत नसतात तर देवदेवतांना नवस करणे, मुहूर्त पाहणे, अनुष्ठान, अभिषेक, पूजाअर्चा, व्रतवैकल्य इ. मार्गाचा अवलंब करणे आवश्यक असते. अशी समजूत असल्यामुळे छ. संभाजीकालीन समाजावर अंधश्रध्देचा मोठा प्रभाव पडलेला होता. असे दिसून येते.

ग्रामदेवता आणि दृष्ठ आत्मे यांच्या उपासनेला खासकरून वाढविणारा एक लोकप्रिय धर्मप्रकार रूढ असावा असे दिसून येते. प्रत्येक गावात नियमितपणे ग्रामदेवतांची उपासना व आराधना केली जाई. ग्रामदेवता या गावाचे संरक्षण करतात त्यांची पूजा अर्चा केल्याने गावावरील संकटाचे विमोचन होते अशी तत्कालीन

समाजाची समजूत होती. त्यामुळे ग्रामदेवतांना संतृष्ट ठेवण्यासाठी गावातील लोक एकत्र येऊन सामूहिकपणे पूजा करीत.

दसऱ्याच्या दिवशी ग्रामदेवतांना बकऱ्याचा बळी देत. नैसर्गिक आपत्ती प्रसंगीही बळी देण्याचा नवस मानून तो फेडला जाई. गावात साथीच्या रोगांची लागण झाल्यास पशुबळी देत. ग्रामदेवता ही संकटकाळात शक्ती देणारी समजली जाई. व ती शक्ती गावकऱ्यांचा आनंद व भरभराटीविषयी असे. बळी दिल्या जाणाऱ्या पशूंमध्ये बकरा, कोंबडे यांचा समावेश होत असे. काही जाती जमातीचे लोक डुक्कर, बकरी, बैल, रेडे या पशुंचाही बळी देत असत. प्रसंगी ग्रामदेवतांना नरबळीही दिला जात असे. मुंजा ,वेताळ, म्हसोबा, समाई, मरीआई, कमळजादेवी, पीर, खंडोबा, मारूती इ. अनेक ग्रामदेवतांचे उल्लेख वाचावयास मिळतात.

संभाजीकालीन महाराष्ट्रातील समाज आणि धार्मिक जीवनातील परंपरेने चालत असलेल्या श्रध्दांच्या केंद्रस्थानी स्थानिक ग्रामदेवता आणि समाजाचा भूताखेतावरील अंधविश्वास असून डॉ. अनिल बैसाणे व डॉ. सुभाष पाटील म्हणतात, "खेडेगावातील जी संरक्षण दैवते त्याच गावाच्या ग्रामदेवता अशी संक्षिप्त व्याख्या त्यांनी दिली आहे. तसेच ग्रामदेवतांचे स्वरूप हे धुसर असल्याचेही त्यांनी नमुद केले आहे."[३४] ग्रामदेवतांचे स्थान हे लोकादरावर आधारलेले असे. जनमानसामध्ये ज्यांचे स्थान पवित्र व आदरनीय असे अशा ग्रामदेवता लोकप्रिय असत. ग्रामदेवता या खेडयांमध्ये दुर्लक्षित अशा जागेत शेंदूर लावून ठेवलेल्या आढळतात. सामान्यपणे उंच टेकडीवर, ओढा अथवा नाल्यांच्या काठावर, विहिर किंवा तलावाजवळ, पिंपळ व वटवृक्षाच्या खाली तसेच गावाच्या वेशीवर वसविलेल्या असतात.[३५] या ग्रामदेवतांचे पूजन केल्याशिवाय लोक चांगल्या कामांचा शुभारंभ करत नसत. अनेक जाती जमातींचे लोक अनेकविध कारणांसाठी आपापल्या ग्रामदेवतांना बळी देण्याचा नवस

मानीत व बळी देऊन फेडत. असे नमूद करण्यात आले आहे. त्यावरून तत्कालीन समाजातील अंधश्रद्धेचे स्वरूप लक्षात येते.[३६] मांग लोक मंगळवारी व शुक्रवारी देवीला तर रविवारी देवाला कोंबडे व बकऱ्याचा बळी चढवित. कुंभार ही भारतभर आढळनारी जात भवानीदेवी, शीतळामाता, समाई या देवतांच्या पूजाअर्चा करीत. काही प्रसंगी या ग्रामदेवतांना कुंभार लोक पशुबळी देत असत.[३७] मध्ययुगीन भ्रामक समजुतीवर त्यामुळे प्रकाश पडतो. "ग्रामदेवतांची पूजा करणारे ब्राम्हणच नसत तर इतर जातीही असत. उच्च किंवा नीच जातीपैकी कोणीही आपण पुर्वजांचे वारस आहोत असे म्हणवितांना अभिमान किंवा मत्सर बाळगित नसत."[३८] जर ग्रामदेवतांना त्यांची परंपरागत देणी दिली नाहीत किंवा त्यांना डिवचले तर संतापाने त्या सूड घेतात असे मानले जाई. संभाजीकालीन लोकजीवनही त्यास अपवाद नव्हते.

**६.९ लोकप्रिय देवता :**

डॉ. खोबरेकर वि.गो. म्हणतात, "मध्ययुगीन महाराष्ट्रात विठोबा, तुळजापूरची भवानी, खंडोबा आणि महालक्ष्मी या लोकप्रिय देवता होत्या. विठोबा या देवतेची दोन नावे रूढ आहे. विठोबा आणि पांडूरंग त्याची मुख्य मूर्ती पंढरपूर येथे आहे. आणि तेच वारकरी संप्रदायाचे मुख्य पीठ आहे. आषाढी आणि कार्तिकी एकादशी हे दोन दिवस पंढरपूरच्या यात्रेसाठी पवित्र मानत असत. देशाच्या कानाकोपऱ्यातून या वार्षिक उत्सवाला लाखो भाविक विठ्ठल पूजेसाठी पंढरपूरला येत असत."[३९] मराठी संतांनी अप्रत्यक्ष अभंगवाणीने विठ्ठल भक्ती महाराष्ट्र समाजात रूजविली होती. वारकरी संप्रदायाचा प्रभाव हा शिवकाळाप्रमाणे छ. संभाजीकाळातही कायम होता.

ते पुढे म्हणतात, "तुळजापूरची भवानी ही दूसरी लोकप्रिय देवता आहे. बहुतेक मराठे तुळजापूरच्या भवानीचे भक्त होते. ही देवता वाघावर बसलेली सुंदर आणि

नेहमी पापी कुटील राक्षसांचा नाश करण्याच्या पावित्र्यात दर्शविलेली असते. ही मराठयांची पालनकर्ती मानली जाते. शिवाजी महाराजांनी भवानीपासून स्फूर्ती घेतली होती."[४०] महाराजांनी तिच्या स्मरणार्थ प्रतापगड येथे मंदिर बांधले आहे.

जेजुरीचा खंडोबा ही मराठयांची तिसरी लोकप्रिय देवता असून पालनकर्ती देवता समजली जाते. तिला भवानीदेवी इतके स्थान आहे. खंडोबा या शब्दाचा अर्थ तलवारीचा (बा) बाप की जो प्रदेशरक्षण करतो तो दक्षिणेचा पालनकर्ता होय. उजव्या हातावर तलवार घेऊन घोडयावर स्वार अशी याची प्रतिमा असून त्याच्या शेजारी त्याची पत्नी म्हाळसा बसलेली असते. सतराव्या शतकातील मराठयांची खंडोबा आणि भवानी मोठी दैवते होती.[४१] पराक्रम आणि शौर्य यांची उपासना करण्यासाठी या देवतांना विशेष आदराचे स्थान होते. महालक्ष्मी ही महाराष्ट्राची प्राचीन देवता आहे. ती अंबाबाई या नावाने ओळखली जाते. तिची मुख्य मूर्ती कोल्हापूरला आहे. महाराष्ट्रातील सर्व जातीचे लोक हीचे भक्त आहेत.[४२] लोक नाशिक, पैठण, त्र्यंबकेश्वर या ठिकाणांनाही भेटी देतात. वरील स्थाने आणि देवता यांच्या यात्रा करणे हे देखिल एक पुण्यकर्म मानले जाते. यांची ब्राम्हणांपासून ते अस्पृशानपर्यंत सर्वजन भक्ती करीत.करवीर नगरीची महालक्ष्मी स्वराज्याचे लोकदैवत होते. पराक्रम गाजविणारा व मोहिमा करणारा सरदार वर्ग हा या देवीची उपासना करत असे.

या सर्व चर्चेचे सार असे की, छ. संभाजी काळातही महाराष्ट्र हा जसा पराक्रमी होता. तसाच तो भावनिकही होता. वारकरी पंथाप्रमाणे शक्तीपूजाही लोक करत असत. त्यामुळे आंबाबाई, तुळजाभवनी, लक्ष्मी इ. देवतांची पूजाही लोक मनभावनेने करत असत.

### ६.१० भक्तीसंप्रदाय :

डॉ. कृ.ना.चिटणीस म्हणतात, "हिंदू धर्मामध्ये भक्तीला अनन्यसाधारण महत्त्व आहे. भक्ती ही निर्गुण निराकार अशा परमेश्वरापासून ते सगुण व साकार अशा परमेश्वरापर्यत करण्याची पध्दत हिंदू धर्मात आहे. भक्तीने केलेले महत्कार्य स्तुत आहे."[४३] त्यावरून मध्ययुगीन समाज जसा भक्तीप्रधान होता तसाच तो छ. संभाजी काळातही भक्तीने ओथंबलेला होता. भक्तीचे बळ हे प्राचीन काळापासून वेळोवेळी दिसून आले आहे. भक्ती व तीचे महत्त्व पुराणापासून वेगवेगळया धर्मग्रंथातून प्रकट झाले आहे. प्राचीन काळानंतर अश्मयुगात हीच भक्तीची परंपरा भारतात ठिकठिकाणी दिसून आली आहे. भक्तीला किंवा भक्तीपंथाला दिलेले नांव हे एखाद्यावेळेस वेगळे असण्याची शक्यता आहे. परंतु त्यांचा हेतू मात्र ईश्वराची आराधना करणे व त्या आराधनेतून मोक्ष मिळविणे असा दिसून येतो. प्रत्येक कालखंडामध्ये एखादा विशिष्ट भक्तीसंप्रदाय हा त्या काळात प्रसिध्द पावतो व त्याचा प्रसार इतर भागांमध्ये होतो.

मध्ययुगात दक्षिणेकडे शैव व वैष्णव पंथाचा प्रभाव पडला व त्यांचा प्रसार पुढे उत्तरेकडे झाला. सर्व पंथांचा उद्देश एकच असतो व तो म्हणजे भगवत्भक्ती निर्माण व्हावी हीच. भक्तीची सुरवात वेदकालापासून झाली. व तीचा विकास भागवतामध्ये झाला. भक्तीच्या स्वरूपाबद्दल डॉ. चिटणीस म्हणतात की, "भक्तीचा उगम प्रेमात होतो. तिची वाढ प्रेमात होते. व तिचे पर्यावसनही प्रेमात होते. हे प्रेम लौकिक नसून अलौकीक आहे. परमेश्वराबद्दलचे हे प्रेम म्हणजेच भक्ती ती सौदा जाणित नाही. तिला भीती माहित नाही. तिला मोबदल्याची अपेक्षा नाही. भक्तीमध्ये स्वार्थीपणाचा कलंक नाही, अपेक्षापूर्तीचा डाग नाही, लौकीकतेचाही गंध नाही, परमेश्वरावरील प्रेमाचा हा उत्स्फूर्त वर्षाव आहे."[४४] भक्तीपंथाचा हा प्रभाव मध्ययुगात कायम होता.

छ. संभाजी काळातही या पंथाचा मराठी मनावर प्रभाव होता. भक्तीपंथ हे प्रामुख्याने विष्णू व शिव या देवतांभोवती केंद्रीत झाले आहे. इतर देवतांना त्यामध्ये नंतर समाविष्ठ करण्यात आले. शिव किंवा शंकर ही देवता महाभारत काळापासून लिंगस्वरूपात उदयास आली. लिंगपूजा आर्यांना माहित नव्हती. शिव किंवा शंकर व शैवपंथ यांच्यापासून विष्णू किंवा वैष्णव पंथाचा उदय हा वेगळया काळात झाला. वैदिक काळात विष्णू ही देवता शेतकरी लोक यांची मानलेली आहे. ही देवता सुपिकता व उत्पादकता यांचीही मानलेली आहे. विष्णू या देवतेचे "महाभारतामध्ये वासुदेव कृष्णाचे व नारायण यांच्याही एकात्म्य दाखविण्यात आले आहे. नारायण हा मुळ द्रविडांचा देव म्हणून मानला जात असे. प्रागैतिहासिक काळात सर्प देव होता.[४५] शैव व वैष्णव पंथाने भक्तीसंप्रदाय अधिक बळकट केला. या संप्रदायांना सहाव्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत चांगली गती प्राप्त झाली. त्याचे प्रमुख कारण म्हणजे बौध्द व जैन धर्म, वेद व देव यांनाच आव्हान देऊ लागले. या आव्हानांना उत्तर म्हणून शंकराचार्यांनी अद्वैत तत्वज्ञानाचा प्रसार केला. शैव व वैष्णव या दोन्ही पंथात अनेक संत होऊन गेले.

मध्ययुगीन महाराष्ट्रातल्या धार्मिक पंथाचा विचार केला असता असे दिसून येते की, वैष्णव पंथ किंवा भागवत्धर्म हळूहळू मुळ धरू लागलेला होता. मध्ययुगीन महाराष्ट्रात नाथ, महानुभाव, वारकरी, दत्त व समर्थ असे पाच भक्तीसंप्रदाय होते.

डॉ. खोबरेकर वि.गो. "वारकरी पंथ किंवा वारकरी संप्रदाय हा महाराष्ट्र आणि कोकण यातील मध्ययुगीन वैष्णव संप्रदायाचे रूप होय."[४६] हा पंथ महाराष्ट्रात ज्ञानेश्वरापासून रूढ होता. पुढे तो संत तुकाराम व एकनाथांनी अधिक जोपासला. छ. संभाजी काळातही वारकरी पंथ तेवढाच प्रभावी होता. यापैकी वारकरी संप्रदाय या काळात महाराष्ट्रात मुळ धरत होता. या पंथाचे अनुयायी पंढरपूर येथिल विठ्ठलाची

भक्ती करत असत. या संप्रदायात केवळ विष्णूचीच भक्ती शिकविली जाई आणि तोच मार्ग मुक्तीचा मार्ग म्हणून ओळखला जात असे. वारकरी संप्रदायानुसार पंढरपूरच्या विठोबाची भक्ती हे तत्व सर्वमान्य होते. पंढरपूरच्या प्रमुख देवता म्हणजे विठोबा व रखुमाई दरवर्षी पंढरपूरला चार यात्रा भरतात व वारकारी या जत्रांना जात असत.

ते पुढे म्हणतात, "वारकरी हा एक पंथ आहे. एका विधीनंतर या पंथात प्रवेश करता येतो. त्याला पंथाची शपथ घ्यावी लागते. तसेच पंथाची तत्वे स्वीकारावी लागतात. ती त्याला जो धार्मिक मनुष्य देतो त्याला महाराज किंवा बुवा म्हणतात. त्या मानसाला गुरू म्हणतात. तो गुरूमंत्र देतो. शिष्याला काही गोष्टी सोडण्याची शपथ घ्यावी लागते. गळयात तुळशीची माळ घालावी लागते. शरीराच्या काही भागावर गोपीचंदाचे टिळे लावावी लागतात. प्रत्येक एकादशीला उपवास, विठोबाची पूजा, वर्षातून एकदा पंढरपूरच्या विठोबाचे दर्शन करावे लागते. या वार्षिक यात्रेला वारी म्हणतात. म्हणून वारकरी याचा अर्थ वारंवार पंढरपूरला जातो तो."[४७] आषाढी कार्तिकीची वारी नियमितपणे करणारे असंख्य विठ्ठलभक्त त्याकाळात कार्यरत होते. मराठी साहित्याची परंपरा ज्ञानेश्वरांनी तेराव्या शतकात लिहलेल्या भगवत्‌गीतेवरील 'ज्ञानेश्वरी' या टीका ग्रंथापासून होते. हा ग्रंथ वारकरी पवित्र मानतात. व ते ज्ञानेश्वरांना पहिला वारकरी म्हणून ओळखतात. ज्ञानेश्वरानंतर सर्व संतांनी त्यांचे अनुकरण केले ते सर्व जातीचे होते. दरवर्षी भक्त पंढरपूरला जथ्थ्याने जातात त्याला दिंडी म्हणतात. या दिंडीत पंढरपूरला जाईपर्यंत वैष्णवसंताच्या काव्याचे गायन केले जाते. या अभंगातून शेकडो वर्ष भक्तीपूर्ण आणि तात्त्विक विचार अशिक्षित समाजापर्यंत पोहचविले जात आहे. हे एकत्र चालणे, एकत्र गाणे, सर्व पालख्या पंढरपूरच्या बाहेर एकत्र होणे यामुळे संपुर्ण मराठी भाषिकात शेकडो वर्ष एकात्मतेची भावना दृढ झाली आहे. महाराष्ट्रातील मानसाच्या मनात एकात्मतेची भावना

जोपासण्यासाठी या इष्ट देवता म्हणून करण्यात येणाऱ्या विठ्ठल भक्तीने महत्वपूर्ण भूमिका बजावली आहे. छ. संभाजीच्या काळातही विठ्ठलाच्या भक्तीस वारकरी वर्गात विशेष महत्त्व होते.

### ६.११ छ. संभाजीकालीन अंधश्रध्दा आणि लोकभ्रम :

समाजजीवनातील चालीरीती रूढी, परंपरा आणि धार्मिक बाबी यातून श्रध्दा व अंधश्रध्देचा उदय झालेला होता. महाराष्ट्रातील सामाजिक आणि धार्मिक जीवनावर अंधश्रध्देचा फार मोठा प्रभाव होता. महाराष्ट्राची कृषीप्रधान संस्कृती असल्यामुळे आणि शेती हा व्यवसाय प्रामुख्याने पावसावर अवलंबून असल्यामुळे महाराष्ट्रातील सामान्य माणूस स्वभावतः दैववादी झालेला आढळतो.

छ. संभाजीकालीन महाराष्ट्रातील समाज वर्णाश्रम धर्म पाळणारा होता. त्यामुळे समाजाचा परंपरागत रूढी, कर्मकांड, देवदेवता, भूताखेतावरही विश्वास होता. मंत्रतंत्र मानणे, जादुटोणा, चेटूक इ. प्रकार प्रचलीत होते. संकट टाळण्यासाठी दाने देणे, अनुष्ठान करणे, व्रते करणे इ. धार्मिक प्रकार करण्याची चाल होती. त्यामुळे सर्वप्रथम अंधश्रध्दा म्हणजे काय हे पाहणे आवश्यक ठरते.

### ६.११.१ अंधश्रध्दा म्हणजे काय ? :

डॉ. नरेंद्र दाभोळकर म्हणतात, "घडणाऱ्या घटनेस ज्ञानाच्या अनुभवाच्या साहाय्याने प्रश्न विचारले असता जिचा खरेपणा टिकतो, तिचा कार्यकारणभाव समजतो तिला विश्वास म्हणतात. जिचा खरेपणा टिकत नाही. तिला अंधश्रध्दा म्हणतात."[४८] वैज्ञानिक दृष्टीने अंधश्रध्देचे आकलन केले पाहिजे देशमुख, विश्वासराव यांनी अंधश्रध्देची पुढीलप्रमाणे व्याख्या केली आहे. श्रध्दा, भाव, भावना, प्रेम व भक्ती हे सगळे एकाच अर्थाचे शब्द आहे. स्वतःचा जराही विचार बुध्दी व तर्क न चालविता दुसऱ्यांनी लिलिले अगर सांगितलेले जे ख़रे मानले जाते ते आंधळेच असते. म्हणूनच त्यांना अंधश्रध्दा म्हणतात.[४९]

### ६.११.२ अंधश्रध्देचे स्वरूप आणि प्रकार :

समाजात प्रचलीत असलेल्या अंधश्रध्देचे स्वरूप धार्मिक आणि सामाजिक असल्याचे आढळते. धर्म हे अंधश्रध्देचे मुळ समजले जाते. कारण धार्मिक विचार आणि कल्पनेतूनच श्रध्दा निर्माण होते आणि या श्रध्देतूनच अंधश्रध्देचा उदय झालेला आढळतो. स्वतःच्या इच्छाप्राप्तीसाठी मानवाने देवाची अर्थात दैवत्वाची कल्पना साकारली आणि याच देवाला प्रसन्न करण्यासाठी मानवाने अनेक मार्गाचा अवलंब केला. हे अवलंबविलेले मार्ग सत्य नाहीत याची कल्पना येऊनही मानवाने त्यावर विश्वास ठेवून त्याचा आंधळेपणाने स्वीकार केला हिच अंधश्रध्दा होय.

**१. मुहूर्त :**

कोणत्याही छोटयामोठया गोष्टीसाठी मुहूर्त पाहणे हे मध्ययुगीन महाराष्ट्राचे खास वैशिष्टये मानावे लागेल. त्यामुळे मुहूर्त पाहून देणे हा जोशी वर्गाचा प्रमुख उद्योग होता. जोशी हा शिक्षित ब्राम्हण असे. पंचांग सांगणे तसेच सर्व प्रकारचे धार्मिक विधी करण्याचे अधिकार जोशीला असे. पंचांग वाचून मंगल कार्यासाठी मुहूर्त काढून देणे जोशीचे मुख्य काम होते. "लग्न करण्यासाठी मुहूर्त, मुलाचे नाव ठेवणे, मुंज किंवा व्रतबंध, कुठे भेट देण्याचे असेल, कुणाबरोबर बोलणे असेल, कुणाला भेटावयाचे असेल, कोठे जायचे असेल, कुणावर मोहीम उघडावयाचे असेल इ. कारणांसाठी व इतर अनेक कारणांच्यासाठी मुहूर्त पाहिल्याशिवाय गत्यंतर नसे."[५०] आजही मुहूर्त पाहून सर्वकाही केले जाते. व एखादी गोष्ट मनासारखी घडली नाही म्हणजे दुसरा विचारतो "काय रे ! मुहूर्त पाहीला होतास का ?" शुभकार्यासाठी मुहूर्त पाहणे योग्य पण अगदी सामान्य गोष्टीसाठी मुहूर्त पाहणे वेडेपणाचे लक्षण होय.

**२. नवस मानणे व फेडणे :**

डॉ. बैसाने अनिल म्हणतात, "आपले इच्छित कार्य पुर्णत्वास जाण्याकरीता

देवदेवतांची प्रार्थना करणे व कार्य सिध्दी झाले असता. मानलेली वस्तू देवाला अर्पण करण्याची प्रतिज्ञा करणे म्हणजे नवस होय."[५१] दत्ता भगत म्हणतात, "विविध कारणांसाठी नवस करण्याची व ते फेडण्याची प्रथा समाजात प्रचलीत होती."[५२] इ.स. १६५८ मध्ये स्वराज्यावर अफजलखानाचे संकट आले होते. त्यावेळी छ. शिवाजी महाराजांनी तुळजापूरच्या तुळजाभवानीस संकटनिवारणार्थ केलेली प्रार्थना अर्थात देवीचा घेतलेला कौल प्रसिध्द आहे.[५३] यांत देवाकडून भक्ताने व्यक्त केलेली इच्छा पूर्ण झाल्यावर भक्ताने नवस फेडावयाचा अशी प्रथा आहे. यामध्ये देवाच्या देवत्वाला आव्हान दिले जाते. नवस हा व्यक्तीने धार्मिक श्रध्देतून देवदेवतांशी केलेला करार असतो. त्यांत मोबदला व देवघेव अशी स्वार्थी वृत्ती असल्याचे दिसते. छ. संभाजीकालीन महाराष्ट्रात आरोग्य लाभण्यासाठी, पुत्र प्राप्तीसाठी, राजपद मिळण्यासाठी इ. अनेक प्रकारच्या कार्यसिध्दीसाठी देवदेवतांना नवस केले जात. डॉ. कमल गोखले म्हणतात, "राजपद मिळण्यात अडचणी आल्यामुळे छ. संभाजी राजांनी नवस केला होता. व प्रत्यक्ष राजपद मिळाल्यानंतर त्यांनी तो नवस फेडला."[५४] प्रत्यक्ष छत्रपतींनी नवस फेडला तसेच सामान्य मानसावरही नवस सायास या कल्पनेचा प्रभाव होता.

### ३. ताईत भारवून देणे व घेणे :

वाकसकर वि. स. म्हणतात, "संभाजीकालीन समाजात अनेक जाती उपजाती होत्या. या जाती जमाती अंधश्रध्दा जोपासण्याचे काम करीत असत. शत्रुला ठार मारण्यासाठी ब्राह्मण ताईत भारवून देत असत."[५५] भारवून दिलेल्या ताईतास शत्रुचा स्पर्श झाल्यास तो आजारी पडून मरत असे. अशी समाजाची धारणा होती. ताईत भारवून देण्याचे काम ब्राम्हण करीत असत. एखादा मनुष्य आजारातून बरा होत नसेल तर त्याचा आजार कमी होण्यासाठी ताईत भारवून घेत आणि देत असत.

ब्राम्हणांशिवाय इतर जातीजमातीतील लोकही ताईत भारवून देत असत. ताईत म्हणजे गळयात बांधावयाची लहान आकाराची पदके अथवा पेटी होय. भारतात ताईत वापरण्याची प्रथा प्राचिन काळापासून प्रचलीत आहे. ताईत भारवून घेतल्यास आजार कमी होतो. अशी छ. संभाजीकालीन समाजाची समजूत होती. मानसिक दृष्टीने दूर्बल मनोवृत्तीचे लोक अशा कृत्यांचा वापर करत.

**४. भूते घालणे :**

डॉ. पानसे मु.ग. म्हणतात, "छ. संभाजीकालीन समाजाचा भूतपिशाच्च योनीवर विश्वास होता. अपघाती मृत्यू आलेला मनुष्य पिशाच्च बनतो अशी समजूत होती."[५६] या प्रकारचे गैरसमज त्याकाळातील समाजातील लोकभावना प्रकट करतात. एखादा मनुष्य आजारी पडला आणि त्याचा आजार कमी होत नसेल तर त्याला भूतबाधा झाल्याची लोकसमजूत असे. अशावेळी वैद्य आणि मांत्रिकाकडून भूत घालविण्याचा उपचार केला जात असे. समाजात भूते घालण्याचे काम ब्राह्मण, माळी, सोनार, महार, भोई करीत. भूताळया प्रमाणेच मांत्रिकावरही लोकांचा विश्वास होता. भूतबाधा झालेल्या मनुष्याचा आजार मांत्रिकामुळे कमी होतो. अशी समाजाची धारणा होती. या प्रकारच्या कल्पना त्या काळात रूढ होत्या कारण त्यांची मानसिकता मध्ययुगीन होती.

**५. अंगात येणे :**

शिवकाळात अनेक देवदेवता होत्या. या देवदेवता भक्तांच्या अंगात येत असे.[५७] छ. संभाजी काळातही देवदेवता अंगात येण्याची परंपरा चालू होती. "छ. शिवाजी महाराजांपासून ते पेशवाईपर्यंत समाजाचा देव अंगात येण्यावर विश्वास होता. देव भक्ताच्या अंगात येऊन उपाय सांगत असे."[५८] एखाद्या मनुष्याला भूत लागल्यानंतर ते भूत घालविण्यासाठी भगत व देवऋषी उपाय सांगत असत. या प्रकारची उदाहरणे छ. संभाजी काळात पत्रव्यवहारातही सापडतात.

### ६. शकुन अपशकुन :

शकुन अपशकुन म्हणजेच शुभअशुभ कल्पना अर्थात या गोष्टींवर लोकांचा विश्वास होता. छ. शिवाजी महाराजांचाही शकुन अपशकुन गोष्टींवर विश्वास होता. ६ जून १६७४ रोजी त्यांनी रायगडावर स्वतःचा राज्याभिषेक केला.[५९] राज्याभिषेक राजश्री गागाभट्टाच्या हस्ते पार पडला परंतु वैदिक पध्दतीने राज्याभिषेक करण्यास गागाभट्टाने अनेक चूका केल्याने बंगाली मंत्र तंत्र विद्येत पारंगत असलेल्या निश्चलपूरी गोसावी यांनी पुढे अनेक अशुभ घटना घडतील असे भाकीत केले. त्यानुसार पुढील अशुभ अपशकुन घटना घडून आल्या.[६०]

१. दत्ता भगत म्हणतात, "राजे सिंहासनारूढ होण्यापूर्वी राज्याभिषेक विधी चालू असतांना मंडपाचा एक खांब कोसळला. त्यात गागाभट्टाच्या नाकाला जखम झाली. तसेच त्याचा प्रमुख सहकारी बालभट्ट जखमी झाला.

२. शिवाजी महाराज सिंहासनावर बसतांना मंडपाच्या आग्नेयकडे असलेल्या समुदायातील एक व्यक्ती शिंकला या दिशेला अग्निदेवतेचे वास्तव्य असते. असे मानले जाई. त्यामुळे ही घटना अशुभ मानली गेली.

३. राजपुत्र संभाजीच्या गळयातील हिऱ्यांच्या माळेतून दोन हिरे गळून पडले ही घटनाही अशुभ मानली गेली.

४. शिवाजींच्या समोर तलवार ठेऊन त्याची पूजा चालू असतांना तलवारीचे म्यान खाली पडले.

५. धार्मिक विधीचा भाग म्हणून शिवरायांच्या धनुष्यातून सोडलेल्या बाणामुळे शिवाजींनी स्वीकारलेल्या मुद्रेला लागून ती खाली कोसळली.

६. त्यांचा एक मंत्री दंताजी त्र्यंबक (वाकियानवीस किंवा मंत्री) चालतांना अडखळून जमिनीवर पडला. हे देखील अशुभच मानले गेले.

७. शिवाजींची एक राणी, काशिबाईंचा १६ मार्च १६७४ रोजी मृत्यू घडून आला.

वरील सर्व घटना अपशकुन ठरल्या. यावर छ. शिवाजी महाराजांचा विश्वास बसणे साहजिकच होते. त्यामुळे त्यांनी २४ सप्टेंबर १६७४ रोजी निश्चलपुरी गोसावी यांच्या हस्ते तांत्रिक पध्दतीचा दुसरा राज्याभिषेक करवून घेतला. एखाद्या मनुष्याचा जन्म पायाकडून झाल्यास ही घटना अशुभ समजली जात असे. अशा मनुष्याला पायाळू म्हणत असत. छ. शिवाजी महाराजांना सोयराबाई नावाची एक पत्नी होती. ती शिर्के घराण्यातील होती. २४ फेब्रुवारी १६७० रोजी हिस राजाराम नावाचा पुत्र झाला. तो पायाकडून जन्माला आला. सभासदाने असा उल्लेख केलेला आढळतो की,

राजियास प्रथम स्त्री संभाजी राजियाची माता होती. ती निवर्तली. त्याजवरी राजियांनी सहा स्त्रिया केल्या. त्यामध्ये मोहित्यांची कन्या सोइराबाई गरोदर झाली. तीस पुत्र जाहला. तो पालथा उपजला. राजियासी वर्तमान सांगितले. राजे म्हणू लागले की, थोर राजा होईल. शिवाजी राजियाहून विशेष कीर्ति होईल. असे भविष्य केले. मग राजियानी राजाराम म्हणोन नाव ठेविले आणि बोलिले की, राजाराम कीर्ति बहुत होईल. आपले नाव रक्षील तर एवढाचा रक्षील असे बोलिले आणि दानधर्म बहुत केला.''[६१] सभासद बखरितील हे उदाहरण तत्कालीन मानसिकतेचे दर्शन घडवितात. संभाजीकाळातही या प्रकारची भावना रूढ होती.

छ. संभाजीच्या काळात या प्रकारच्या शकून अपशकून कल्पना रूढ होत्या.

**७. धार्मिक अनुष्ठान :**

मध्ययुगीन महाराष्ट्रातील समाजावर धार्मिक बंधनाचा पगडा मोठया प्रमाणावर असल्याचे दिसून येते. समाजातील लोक ईश्वरावर श्रध्दा ठेवून आपले कर्तव्य पार पाडीत असत. महाराष्ट्रातील मराठी माणसाच्या मनावर ईश्वराविषयीच्या मोक्ष

प्राप्तीच्या कल्पनांचा जबरदस्त पगडा होता. त्यामुळे उपास तापास, पूजाअर्चा तसेच धार्मिक अनुष्ठान याद्वारे परमेश्वराची भक्ती केली जात असे. पाप पुण्यावर मानवाचा पुढील जन्म अवलंबून असतो या विचाराने पुण्यसंचयन करण्यासाठी विविध मार्गाचा अवलंब करण्याचा प्रयत्न केला जात असे. छ. संभाजीकालीन महाराष्ट्रीयन लोक अतिशय धार्मिक होते. डॉ. अनिल बैसाने म्हणतात, "कोणत्याही गोष्टीचा संबंध धार्मिक संकटाशी जोडून त्याच्या निवारणार्थ अनुष्ठाने व उपोषणे केली जात. देवास अनुष्ठान केल्यास ईश्वराची आपणावर कृपा होते अशी भावना असल्यामुळे लोक अनुष्ठान करीत. नियमपूर्वक किंवा विधीपूर्वक एखादे धार्मिक कृत्य करणे म्हणजे अनुष्ठान होय."[६२] पुढील कार्यासाठी अनुष्ठाने केली जात असत. आरोग्य लाभणे, शत्रुचा पराभव करणे, कैदेतून मुक्त होणे, पुत्रप्राप्ती फलप्राप्तीचा दृष्टांत, पर्जन्यासाठी[६३] अशा कार्यासाठी अनुष्ठान करण्याची उदाहरणे कितीतरी सापडतात.

वेळी अवेळी पाऊस पडून अवर्षणाची स्थिती निर्माण होत असे. पाऊस पडला नाही म्हणजे शेतकरी गावातील मंदिरात पर्जन्यकुंड उघडीत होमवहन झाल्यावर कधीकधी पाऊस पडे. कोकणात मृगाचा पाऊस पडला नाही व आद्रानक्षत्रापासून पाऊस सुरू झाला तर लावणीचा हंगाम व पिकांचा हंगाम लांबत असे त्यामुळे दुष्काळाचे स्वरूप येई व लोक उपासमारीने मरत. तेंव्हा लावणीच्या वेळी जोरदार पर्जन्य व्हावा म्हणून देवळातून जप व प्रार्थना करीत असत. डॉ. सुभाष पाटील म्हणतात, "छ. संभाजीराजांच्या कारकीर्दीतही ब्राम्हणांना पर्जन्यसूक्ताच्या अनुष्ठान प्रित्यर्थ प्रोत्साहन दिल्याचे समजते. इ.स. १६८५ -१६८६ या वर्षी चाकणच्या मुलुखात पाऊस पडला नाही म्हणून ६४ खेडयातील ब्राम्हणांनी ११ दिवस अनुष्ठान केले. कचरेश्वर भट्ट, सिध्देश्वर भट्ट यांच्या अनुष्ठानामुळे पाऊस पडला असा उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रात सापडतो."[६४] अशा प्रकारच्या धार्मिक अनुष्ठानांचा प्रभाव तयार करून अंतिम साध्य, साध्य करून घेण्यावर भर दिला जात असे.

## ८. दैवी चमत्कार :

दैवी चमत्कारावर समाजाचा विश्वास होता. ३ एप्रिल १६८० रोजी छ. शिवाजी महाराजांचा मृत्यू झाला. त्यादिवशी दैवी चमत्कार घडून आल्याची नोंद कृष्णाजी अनंत सभासद यांनी करून ठेवली आहे. तो म्हणतो,

"राजियाचे देहावसान जाले ते दिवशी पृथ्वीकंप जाहाला. मगनी धूमकेतू, उदेला. उल्कापात आकाशाहून जाला. रात्री जोड इंद्रधनुष्ये निघाली. अष्टदिशा दिग्दाह होऊन गेल्या. श्री. शंभुमहादेवी तळयाचे उदक रक्तांबर जाले. पाण्यातील मच्छ बाहेर पडून अमासवाणी ? उदक जाहले एशी अरिष्टे जाहली. मग राजियाचे कलेवर चंदनकाष्ठे व बेलकाष्ठे आणून दग्ध केले. स्त्रिया, राज्यपत्न्या, कारकून व हुजरे सर्व लोकांनी सांगितले की धाकटा पुत्र राजाराम यांनी क्रिया करावी. सर्वांनी खेद केला. राजाराम यांनी अत्यंत शोक केला. त्या नंतर उत्तरकार्य कनिष्ठांनी करावे असे सिध्द केले. वडीलपुत्र संभाजी राजे वेळेत नाहीत. याचकरिता धाकटयांनी क्रिया केली." [६५] अशा प्रकारचे समज सर्वत्र रूढ होते. अशा प्रकारच्य दैवी चममत्काराची नोंद पाहता तत्कालीन लोकांच्या भावना स्पष्ट होतात.

## ९. दानधर्म करणे :

मध्ययुगीन महाराष्ट्रात दानधर्म केल्यामुळे पुण्य प्राप्त होते अशी लोकश्रध्दा होती. त्यामुळे लोकांचा कल दानधर्म करण्याकडे अधिक होता. डॉ अनिल बैसाने व डॉ. सुभाष पाटील यांच्या मते, "दान हे धर्माचे मुख्य लक्षण मानले जात होते. समाजामध्ये दान देणाऱ्यांची व दानांची मोठी स्तुती केली जाई. दान म्हणजे एखाद्या वस्तूवरील आपला स्वतःचा मालकी हक्क संपुष्टात आणून दुसऱ्याची मालकी किंवा स्वामित्व निर्माण करणे होय. तसेच योग्य व्यक्तीपर्यंत संपत्ती पोहचविण्याकरीता शास्त्रोक्त पध्दतीने केल्या जाणाऱ्या विधानाला दान म्हटले जाई. दान स्वीकारण्यास माता

पिता, गुरू, मित्र, चांगले आचरण करणारी व्यक्ती ज्यांनी दात्यावर उपकार केले आहे तो. अनाथ, दरिद्री अशा प्रकारची माणसे दान घेण्यास पात्र समजली जात असत. दान वस्तूमध्ये गाई, घोडे, उंट, हत्ती, म्हैस, अन्नपदार्थ, भूमी, गाव इ. समावेश होत असे. दान देण्याकरीता आरंभदिवस, ग्रहणाचे दिवस, अमावस्या, संक्रांत, रविवार अशा दिवशी दान देणे योग्य समजले जाई. पर्वत, नद्या, सागर अशा पवित्र स्थळी साधारण दान दिली जात. दान देतांना स्विकारणाऱ्याच्या हातावर उदक सोडले जाई. छ. संभाजीकालीन समाजात रोगांवरील औषधे गुणकारी नव्हती अशा परिस्थितीत रोग्यास बरे होण्याकरीता जास्त काळ लागत असे. काहीवेळा नंतर प्रभावी औषधामुळे गुणही येत नसे. यामुळे लोक देवधर्म, तंत्रमंत्र, दान असे उपाय करीत असत. औषध उपचाराप्रमाणेच दानाचाही उपयोग होतो. अशी तत्कालीन समाजाची समजूत होती. दानात धर्मादाय म्हणून ग्रहनाप्रसंगी, उत्तरकार्याप्रसंगी व आरोग्य लाभण्यासाठी ब्राम्हणांना दाने दिली जात असत."[६६] अशा प्रकारे दानधर्म करून पुण्य प्राप्त होते अशी त्या काळातील लोकांची समजूत होती. दानधर्म केल्याने पुण्यप्राप्ती होते या भावनेतून दानशूर लोक धार्मिक प्रसंगी उदार अंतकरणाने दान करत असत.

**१०. जादुटोणा, तंत्रमंत्र व चेटूक :**

डॉ. बैसाने अनिल म्हणतात, "जादुटोणा, तंत्रमंत्र, चेटूक यावर लोकांचा अंधविश्वास होता. चेटूक हा जादूगीरी करण्याचा एक प्रकार होता."[६७] चेटूक करून आपण सकारात्मक व नकारात्मक हेतू साध्य करू शकतो. अशी तत्कालीन भावना होती. जादूटोणा, जादूगीरी, करणी, मंत्रतंत्र करणाऱ्या व्यक्तीस चेटूक व जोदूटोणा, तंत्रमंत्र करणाऱ्या स्त्रीला चेटकीण म्हणत असत.[६८] डॉ. अनिल बैसाने यांच्या मते,

"जादू हा शब्द यातून या संस्कृत शब्दापासून बनला आहे. मानवाने आपल्या जिवनात सर्वांगीण प्रगती केली असली तरी संकटप्रसंगी तो आपल्या ऐहिक आकांक्षा सफल करण्याकरिता निसर्गातील गूढ शक्तींना वश करण्यासाठी वाईट किंवा चूकीच्या कार्यकारण भावावर अंधपणे विश्वास ठेऊन रहस्यात्मक विधिविधानांचा अवलंब करतो. त्यालाच यातू किंवा जादू असे म्हणतात. अथर्ववेदात जादूखोरांचा नाश करण्यासाठी जादूचाच वापर केलेला दिसतो. वेगवेगळया मंत्राद्वारे विशिष्ट उच्चाराद्वारे विशिष्ट शक्ती निर्माण करता येते. या शक्ती म्हणजेच देवता. जशा उपकारक म्हणून मदतीला येतात तसेच विशिष्ट मंत्राद्वारे त्यांच्यामार्फत त्रासही देता येतो. यावर समाजाचा विश्वास होता."[६९] त्यामुळे लोक अशा कल्पनांवर विश्वास ठेवत व त्याप्रमाणे वागत असत.

वैदिक काळातील श्रेष्ठ संस्कृतीच्या सामाजिक जीवनातही मानवी स्वभावातील गुणदोष दिसून येतात. मानवी स्वभावात वैरभाव, मत्सर, उपद्रव देण्याची वृत्ती पाहायला मिळते. त्यातूनच जादूविद्या उदयास आली.[७०] जादू करणाऱ्यांना जादूगार असे म्हटले जाते. हे जादूगार म्हणजेच भगत व मांत्रिक होय. जादू विद्येतील कार्यकारणभाव हा काल्पनिक आणि चुकीचा असतो. म्हणूनच जादू ही वांझ आहे. काही आदिवासी लोक मांत्रिक आणि चेटकीणी यांच्या जादू प्रयोगातून रोग निर्माण होतात असे मानतात. म्हणून आदिवासी समाजामध्ये मोठे महत्व होते. जादूने रोग झाला असल्यास ते उतारा करून घालवित. आजारातून बरे वाटावे म्हणून गंडेदोरे, ताईत, माळा इ. वस्तू मंत्रून गळयात किंवा दंडावर बांधल्या जात. हे जादूचेच सौम्य प्रकार मानले जात असत. मुठ मारून ठार करणे, मुठ मारून आजारी पाडणे, अंगारा व तीर्थ देवून ठार मारणे. इ. अनेकविध जादू करण्याचे प्रकार संभाजीकालीन महाराष्ट्रातील समाजात अस्तित्वात होते.[७१] काही जमातीत जादू धार्मिक विधी मानला जात असल्याने ही जादू करणाऱ्या भक्ताला महत्व होते. [७२] सामान्यपणे

जादूमुळे दुसऱ्याचे वाईट होते या समजुतीमुळे जादू करणाऱ्या मांत्रिकाची लोकांना भीती वाटत असे.

थोडक्यात जादूच्या विविध प्रकारावर लोकांचा फार विश्वास होता. छ. संभाजीला शत्रु उत्पन्न होऊन तो संकटांनी ग्रासून गेला असता. त्यांनी आपल्या पंडीतांची एक सभा भरवून त्यांस उपाय विचारला. पंडीतांनी संभाजीस सांगितले. शिवयोगी नावाचा मंत्रविद्या जाणनारा कोणी एक ब्राम्हण आहे. तो आपल्या संकटाचा परिहार करील.[७३] यावरून संभाजीने शिवयोगीला बोलावून आणले. त्याने राजास उपाय सांगितला की, तुम्ही कालीकादेवीची आराधना करा. ती तुम्हास सुपुत्र होईल तो पुत्र तुमच्या सर्व संकटांचे निरसण करून भाग्य संपादन करीन. त्यावरून छ. संभाजीने कालीकादेवीची आराधना केली. हा प्रकार अंधश्रध्देचाच एक भाग आहे. या सर्व अंधश्रद्धा मध्ययुगात प्रचलित होत्या. छ. संभाजीच्या काळातही या अंधश्रद्धा कायम होत्या. छ. संभाजी महाराजांनी भवानी देवीची शृंगारसाने अभिषेक केला. शाक्त पंथाच्या प्रथम संपर्कात आले. यावरून संभाजी महाराजांवरील शाक्त पंथाचा प्रभाव स्पष्ट होतो. त्यांनी भवानी देवीची उपासना केली.

### ६.११.३ धार्मिक समजूती व चालीरिती :

या पार्श्वभूमीवर तत्कालीन समाजातील धार्मिक समजूती व चालीरिती सुद्धा समजावून घेतल्या पाहिजे.

### १. सुर्यग्रहण, चंद्रग्रहण, पायगुण, जपमंत्र-तंत्र :

प्राचीन काळाप्रमाणे छ. संभाजीकाळात सुर्यग्रहण, चंद्रग्रहण अशुभ मानले जात असे. चंद्रग्रहणाच्या अगोदर व नंतर चार दिवस प्रवास करू नये. असा एक समज होता. या दोन्ही ग्रहण प्रसंगी दानधर्म केला जाई. डॉ. गाठाळ एस.एस. म्हणतात, "ग्रहणाच्या पूर्वकाळात तीर्थक्षेत्री स्नान हे पवित्र मानले जाई. श्रीमंत मंडळी ग्रहणाच्या

वेळी स्वतःची तुला करून ग्रहांचा कोप शांत करत."[७४] याची कितीतरी उदाहरणे त्याकाळात पत्रे व बखरीतून सापडतात.

एखाद्या व्यक्तीच्या पायगुणाने कार्य यशस्वी होते किंवा अयशस्वी होते असा एक समज होता. नववधूच्या नंतर त्या घरातील कोणाचे निधन झाले तर तिला पांढऱ्या पायाची समजत.[७५] या प्रकारच्या गैरसमजूतीतून लोक लग्नाकडे पाहत त्यांच्या या कल्पना भ्रामक समजूतीवर आधारलेल्या होत्या. इच्छापूर्तीसाठी जप, मंत्र-तंत्र करणे याचेही प्रस्थ समाजात होते. रोगमुक्तीसाठी जप,तप, मंत्र म्हटले जात.[७६] अशा प्रकारे रोगमुक्तीसाठी या मंत्रतंत्राचा उपयोग केला जात असे.

**२. नजर लागणे, ग्रहपीडा, होमहवन :**

डॉ. गाठाळ पुढे म्हणतात, "नजर लागणे किंवा दृष्ट लागणे हा प्रकार पूर्वपरंपरेचाच भाग म्हणून संभाजीकाळात प्रचलीत होता. सुंदर स्त्री पुरुषांना दृष्ट लागते व ते आजारी पडतात. म्हणून दृष्ट काढण्याचे काही उपायही होते. ग्रहपीडा दूर व्हावी म्हणून जप केले जात."[७७] ही मानसिकता मध्ययुगात अधिक प्रभावी होती.

**३. संस्कार :**

हिंदूंच्या चालीरितीचा बराचसा भाग हा धार्मिक विधींशी निगडीत असतो. त्याला 'संस्कार' म्हणतात. हे संस्कार ज्यात विशेषतः शुध्दीकरणाचे क्रियाविधी असतात. ते परंपरागत पध्दतीने ब्राम्हण पुरोहितांच्या अधिपत्याखाली केले जातात. सर्व जातीत सहा संस्कार केले जातात. डॉ. खोबरे वि.गो. म्हणतात, "त्यातील प्रमुख संस्कार पुढीलप्रमाणे होत. मौजीबंधन, विवाह, गर्भादान आणि अन्य संस्कार मोठया धामधुमीने केले जात असे. ब्राम्हण नित्यकर्म करीत. उदा. स्नानसंध्या इ. यज्ञांना प्रोत्साहन दिल्याने धार्मिक कर्तव्य पार पाडल्याचे समाधान लोकांना मिळत असे."[७८] आपली नित्य कर्तव्ये पार पाडून पावित्र्य राखण्यात ब्राह्मण वर्ग पुढे होता. त्यामुळे उच्च कुळातील लोक या संस्काराचे काटेकोर पालन करत असत.

हिंदू धर्मात जन्म ते मृत्यू पर्यंत १६ धार्मिक संस्कार प्रचलीत होते. विवाह हा त्यापैकी एक धार्मिक संस्कार असून तो महत्त्वाचा आणि पवित्र मानला गेला आहे.

शारदा देशमुख म्हणतात, "धर्माचरणासाठी स्त्री व पुरूष यांनी एकमेकांना पती व पत्नी या नात्याने केलेला अंगीकार म्हणजे विवाह होय."[७९] विवाह संस्था ही पवित्र संस्काराने बांधलेली असे. विवाहाचे एकूण आठ प्रकार धर्मशास्त्रात सांगितले आहे. त्यापैकी चार विवाहप्रकार संभाजीकाळात समाजमान्यता होती. ब्राह्य, प्राजापत्य, दैव, आर्ष इ.

लग्नसमारंभ जेंव्हा उच्च जातीत हिंदू कुटुंबात विवाह निश्चित केला जाई. तेंव्हा दोन्ही बाजूचे पुरोहित शुभदिवस आणि घटीका एकमेकांच्या विचाराने नक्की करीत. लग्नाचा दिवस नक्की केल्यावर गृहदेवतेपासून सुरवात करून निमंत्रणे धाडण्यात येत. नवरामुलगा व नवरीमुलगी यांचे नातेवाईक मिरवणूकीने गणपती व देवीच्या देवळात जाऊन हळदी कुंकु अर्पण करून एका शुभ दिवशी आमंत्रणे जाण्याची प्रथा होती.[८०]

"विवाहाच्या पूर्वीच्या संध्याकाळी सीमेची पूजा केली जात असे. मुलीचे आई वडील त्यांच्या नातेवाईकाच्या समवेत मुलाच्या घरी भेटी घेऊन जात तेथे त्यांना गणपती, वरूण, दीप आणि भूमी यांची पूजा करावी लागत. नंतर नवऱ्या मुलाचे पाय धुवून त्याला पोषाख दिला जात असे. नंतर मुलीची आई नवऱ्या मुलाचे पाय धुवीत असे."[८१] या परंपरा या पिढीने दुसऱ्या पिढीकडे सोपविल्या जात असत.

लग्नाच्या दिवशी वधूच्या अंगाला तिच्याकडील व वराकडील सुवासिनी हळद लावीत व उरलेली हळद वराच्या घरी नेऊन त्याचप्रकारे त्याच्याही अंगाला चोळीत.[८२] वराकडील मंडळी वधूला दागिने व तिच्या आई वडिलांना पैसे किंवा धान्य देत. तसेच त्याच वेळी लग्नमुहूर्त ठरविण्यात येई.[८३] संपूर्ण समारंभात गावकऱ्यांना सहभागी

करून घेतले जाई. विधी पाच दिवस चालत असे. वेदाची उभारणी, हळदी समारंभ, देवक पहिल्या दोन दिवसात केले जाई. मुख्य विवाह समारंभ तिसऱ्या दिवशी असे. वरात चौथ्या दिवशी आणि पाचव्या दिवशी हळकुंड सोडण्याचा समारंभ केला जाई.[८४] पाच दिवसाची लग्ने ही एक मध्ययुगीन कल्पना छ. संभाजीकाळातही रूढ होती. विवाह हा संस्कार होता. त्यातील विधीचे पालन लोक उत्साहाने करत.

**४. उत्तरक्रिया व श्राध्द :**

डॉ. पी. ए. गवळी म्हणतात, "उत्तरक्रिया हाही एक संस्काराचा भाग होता. मानव मृत्यू पावल्यावर त्याची तीन प्रकारांनी विल्हेवाट लावली जात असे. जाळणे, पुरणे किंवा विसर्जन प्रेत जाळण्याची प्रथा फक्त ब्राम्हणांमध्येच होती. इतर जातीत दफण केले जाई. तर प्रेताचे विसर्जन करण्याची प्रथा ही सर्रास नव्हती. कारण ती धर्मदृष्टया अत्यंत पवित्र समजली जात असे. त्यामुळे संन्यासी किंवा संत यांच्या प्रेताची विल्हेवाट अशा प्रकारे लावली जात असे."[८५] प्रत्येक वर्षी ज्यावर्षी ती व्यक्ती मृत्यू पावली त्या दिवशी श्राध्द घालण्याची पध्दती होती.[८६] आपल्या पितरांची आठवण ही अशा श्राध्द विधीतून ठेवली जात असे. या प्रसंगी ब्राह्मणास दानधर्म केला जाई. या प्रकारे पितृंची स्मृती ठेवून त्यांच्याविषयी आदरभाव व्यक्त केला जाई. प्रत्येक घरचा पुरोहित वर्षश्राध्द दिनाअगोदर त्या घरी जाऊन वर्षश्राध्द कोणत्या दिवशी आहे. याची आठवण करून देत असे.त्या ठराविक दिवशी पुरोहित परत येऊन सर्व धार्मिक विधींची तयारी करीत असे त्यासाठी सर्व नातेवाईक बोलाविण्यात येत. पानसुपारी व दक्षिणा वाटण्यात येत असे.

**५. सतीप्रथा :**

महाराष्ट्रात सतीची चाल फार मोठया प्रमाणात होती. ब्राम्हण, मराठा आणि तत्सम लढवय्या जातीत ही प्रथा प्रामुख्याने होती. पुरूष कितीही वर्षाचे असले तरी

त्यांना ८-९ वर्षाचीच पत्नी मिळत असे. अशा विषम विवाहामुळे कुटूंबात स्त्रीचे जीवन कष्टमय असे. विधवा स्त्रियांना सती जावे लागे. नसता कष्टमय जीवन जगावे लागे. त्यांचे केशवपन केले जाई.

डॉ. कृ.ना. चिटणीस म्हणतात, "सतीची कल्पना भारतीचा स्त्रीत्वाचा आदर्श हा जितका भारताच्या वैभवाचा मानबिंदू होता. तितकाच स्वतःला जिवंतपणे जाळून घेवून सती जाण्याची अमानुष चाल म्हणजे भारतीय समाजाला शाप व गालबोट होता. सतीची कल्पना म्हणजे उदात्त व पूर्णपणे पवित्र आणि कर्तव्यदक्ष अशा पत्नीची कल्पना प्राचीन भारतात प्रचलीत असली तरी जाळून घेवून सती जाण्याच्या सामाजिक परंपरेत त्या कल्पनेचा विकृत अविष्कृत व्यक्त होत नव्हता. परंतू मध्ययुगीन भारतात. सतीच्या चालीने प्रभूत्व मिळविले. या चालीप्रमाणे मृत पूरूषाच्या विधवा पत्नीने आपल्या पतीच्या चितेवर स्वतःला जाळून घेऊन सहगमन करावयाचे असे. या चालीतून अशी कल्पना व्यक्त होत असे की, एखाद्या पुरूषाची पत्नी याशिवाय स्त्रीला स्वतंत्र अस्तित्व किंवा दर्जा नाही या लोकांत किंवा परलोकांत आपल्या पतीचे जीवन सुखी करणे एवढेच तिचे पत्नी म्हणून एकमेव कर्तव्य आहे. आपल्या पतीची मानसिक अवस्था आनंदीत ठेवण्याकरीता कराव्या लागणाऱ्या प्रयत्नात पत्नीने कोणताही त्याग केला तरी तो फार मोठा नाही. ही कल्पना त्यात अंतर्भूत झालेली होती."[८७] मध्ययुगीन समाज हा पतीव्रता आणि पतीची निष्ठा यावर भर देत असे.

शहाजीराजे भोसले २३ जानेवारी १६६४ रोजी मृत्यू पावले तेंव्हा जिजाबाई सती चालल्या होत्या परंतु छ. शिवाजी महाराजांच्या आग्रहामुळे त्या सती गेल्या नाहीत. छ. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर पुतळाबाई सती गेल्या.[८८] छ. संभाजी महाराजांची कन्या भवानीबाईचा पती हरजी महाडीक यांचा पुत्र शंकराजी महाडीक

होता. त्याच्या मृत्यूनंतर भवानीबाई सती गेल्या.[८१] यावरून त्यावेळी सतीप्रथा प्रचलीत होती असे लक्षात येते.

यावरून असे दिसतो की रूढी, परंपरा, समजूती, भ्रम पाहता, मध्ययुगीन सनातनी व सरंजामशाही समाजाचे स्वरूप छ. संभाजीच्या काळातही दिसून येते.



## ब. सांस्कृतिक जीवन

### ६.१२ प्रस्तावना :

छ. संभाजीकालीन सांस्कृतिक जीवन हे शिवकालाप्रमाणेच समृद्ध व संपन्न होते. या काळात हिंदवी स्वराज्यात भारतीय संस्कृतीचे रक्षण व्हावे आणि ही संस्कृती तेजाने तळपत रहावी म्हणून प्रयत्न करण्यात आले. मंदिरे, देवालये, यात्रा यांचा मोगल काळात छळ होत होता. त्याऐवजी स्वराज्यात त्यांना योग्य ते अभय देण्यात आले. हे धोरण केवळ हिंदू धर्मासाठीच अनुकूल होते असे नव्हे तर लोककल्याणाची कामे करणाऱ्या सर्व धर्मियांना संभाजी महाराजांनी उदारतेने व सहिष्णूवृत्तीने वाढविले.

छ. संभाजीकालीन सांस्कृतिक जीवनाचे पैलू येथे उलगडावयाचे आहेत. डॉ. वा.सी. बेंद्रे म्हणतात, "काव्यालंकार, शास्त्रे, पुराणे, धनुर्विद्या यांचा संभाजी महाराजांनी सखोल अभ्यास केला होता. नीतीशास्त्रातील त्यांची पारंगतता तर सर्वतोमुखी झाली असल्याची दिसते." [१०] त्यावरून त्यांची प्रतिभाशक्ती लक्षात येते. या क्षेत्रात छ. संभाजी महाराज शिवाजीपेक्षाही एक पाऊल पुढे होते. शिवाजी महाराजांनी त्यांच्या शिक्षणाची योग्य काळजी घेतल्याने छ. संभाजी महाराज ज्ञानात भर टाकू शकले. श्री. अशोकराव शिंदे सरकार म्हणतात, "संभाजी महाराजांनी ज्या ग्रंथरचना केल्या त्यामध्ये राजनीती, शृंगार, अध्यात्म, वगैरे सर्व विषय प्रभावीपणे हाताळलेले आहेत."[११] यावरून त्यांच्या चौफेर प्रतिभाशक्तीची साक्ष पटते. डॉ. पी. जी. जोशी म्हणतात, "Chatrapati Sambhaji, his ministers and officers took interest in supporting the cultural and religious activity in the swarajya, They also honoured and encouraged learnig in the swarajya by granting lands, grains,

and money to the scholars."[१२] यावरून छ. संभाजीकालीन सांस्कृतिक जीवन किती समृद्ध होते याची प्रचिती येते.तसेच विद्वानांचा यथायोग्य सन्मान केल्याचे दिसून येते.

**६.१३ संस्कृती संकल्पना :**

संस्कृती ही संकल्पना खुप व्यापक व अनेक अर्थ असणारी आहे. संस्कृती या शब्दाच्या अर्थाला अनेक पदर असल्यामुळे त्या शब्दाचे आकलन होण्यात अडचणी येऊ शकतात. आपण जेव्हा पुरातत्वशास्त्राच्या संदर्भात 'संस्कृती' हा शब्द वापरतो तेव्हा त्याचे दोन अर्थ संभवतात. संस्कृती या शब्दाला पुरातत्वशास्त्रात Culture व Civilization असे दोन इंग्रजी शब्द आहेत. पुरातत्वशास्त्र केवळ काळाच्या उद्रात गडब झालेल्या संस्कृतींचाच अभ्यास करते. छ. संभाजीकालीन महाराष्ट्राच्या संस्कृतीचा अभ्यास करतांना हा व्यापक अर्थच अभिप्रेत धरावा लागणार आहे.

संस्कृती शब्दाची व्यापकता कळण्यासाठी आपणांस आधी त्या शब्दाची व्याख्या करावी लागेल. जेष्ठ समाजशास्त्रज्ञ डॉ. इरावती कर्वे यांनी पुढील शब्दांत संस्कृती या शब्दाची व्याख्या केली आहे. "संस्कृती म्हणजे एखाद्या मनुष्यसमाजाची दृष्य आणि भौतिक वस्तुरूप निर्मिती, तसेच मनुष्य समाजाचे असे चित्र की जे डोळयांना दिसू शकत नाही. परंतु त्याचे आकलन विचारांनी होऊ शकते."[१३] हे छ. संभाजीकालीन सांस्कृतिक जीवनाचे येथे यथार्थ आकलन करतांना विचार व कृती या दोहोवर भाष्य करावयाचे आहे.

पु.ग. सहस्त्रबुध्दे म्हणतात, "मानवाचे भौतिक व मनोमय सृष्टी म्हणजे संस्कृती, आध्यात्मिक व आधिभौतिक शक्तींना सामाजिक जीवनात उपयुक्त बनविण्याची कला म्हणजे संस्कृती." [१४] छ. संभाजीकालीन आध्यात्मिक जीवनाची वैशिष्टये येथे प्रकाशित करावयाची आहे. त्यामुळे धर्म, श्रध्दा व मूल्य यांचे आकलन करता

येईल. वसंत आबाजी डहाके यांनी "संस्कृती म्हणजे समाजाची समग्र जीवनरीती, व्यक्तीने आपल्या समुहाकडून घेतलेला सामाजिक वारसा, विचार, भावना, श्रध्दा यांची सरणी, बाहय पर्यावरण आणि इतर लोक यांच्याशी जुळवून घेण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या तंत्राचा समुच्चय म्हणजे संस्कृती." [१५] भारतीय संस्कृतीची श्रेष्ठ मुल्य मध्ययुगीन समाजही जपत असे.

उपरोक्त विवेचनावरून आपणांस संस्कृतीचे स्वरूप स्पष्ट होऊ शकते. संस्कृती ही एकाच वेळी दृष्यही असते व अदृष्यही असते. विचारांचा आविष्कार जेंव्हा भौतिक स्वरूपात होतो. तेंव्हा संस्कृतीस दृष्य स्वरूप प्राप्त होते. संस्कृती पूर्णपणे व्यक्तीनिरपेक्ष अशी संकल्पना असून प्रत्येक व्यक्तीवर ती ज्या पर्यावरणात राहते. तेथिल संस्कृतीचा प्रभाव अवश्य पडतो. परंतु एकटी व्यक्ती पूर्ण संस्कृती प्रभावित करू शकत नाही किंवा एखादी व्यक्ती प्रस्थापित निकषांपेक्षा कितीही वेगळी असली तरी ती एकमेव व्यक्ती हे संबंधीत संस्कृतीचे पृथगात्मक वैशिष्टये होऊ शकत नाही.

पाश्चिमात्य संस्कृतीचा प्रभाव आशियायी संस्कृतीवर पडला आहे. असे जेंव्हा म्हटले जाते. तेंव्हा एका पाश्चिमात्य व्यक्तीचा प्रभाव आशियायी संस्कृतीवर पडलेला नसतो तर पाश्चिमात्य मूल्ये आशियातील बहुसंख्य गटाने आत्मसात केल्याने तो पडलेला असतो. यातून संस्कृतीही विशिष्ट अर्थाने केलेल्या सामुहीक कृतीतून साकारत असते वा बदलत असते असे तिच्या व्यक्तीनिरपेक्षतेच्या संदर्भात आपणांस म्हणता येईल.

उपरोक्त विवेचनावरून असा प्रश्न उपस्थित होऊ शकतो की, संस्कृती ही परिस्थिती सापेक्ष असते का ? मागे म्हटल्याप्रमाणे विशिष्ट परिस्थितीकीय पर्यावरणाचा प्रभाव संस्कृतीवर जरूर पडत असतो. परंतु असे असेल तर समान नैसर्गिक पर्यावरणात समान वैशिष्टये असलेल्या संस्कृतिचा जन्म व विकास व्हावयास हवा पण असे झालेले

दिसत नाही. दक्षिण अमेरिकेतील ॲमेझॉनच्या अत्यंत सूपीक खोऱ्यात आजसुध्दा शेतीची अजिबात माहिती नसलेल्या रानटी जमाती आढळतात. शेतीची कला विशिष्ट भागातच वाढली याचे कारण तेथील लोकांनी शेतीची कला अवगत करून घेतली. थोडक्यात तेथील समुहाने विशिष्ट अर्थाने सामूहिक कृती केली जी आफ्रिकेतील लोकांना करणे जमले नाही. यावरून आपण असे म्हणू शकतो की संस्कृती ही परिस्थितीसापेक्ष असली तरी त्याचप्रमाणे परिस्थिती ही देखिल संस्कृती सापेक्ष असू शकते. याच कारणांमुळे समान परिस्थितीत निरनिराळ्या संस्कृतीची उत्पत्ती होते. परिस्थिती व संस्कृती यांचा थेट संबंध नसून संस्कृतीचे नियंत्रण केवळ परिस्थितीच्या माध्यमातून होत असते. संस्कृती व परिस्थिती हे दोन्ही घटक एकमेकांना प्रभावी करू पाहत असतात.

उपरोक्त विवेचनाचा महाराष्ट्राच्या संदर्भात विचार केल्यास अनेक प्रश्नांचा तसेच महाराष्ट्रीय संस्कृतीच्या पृथगात्मतेचा उलगडा होऊ शकतो. शुभंगना अत्रे म्हणतात, "सतराव्या शतकात महाराष्ट्रात राजकीय क्रांती झाली याला महाराष्ट्राची वैशिष्टयपूर्ण भौगोलिक रचना जशी कारणीभूत झाली तसेच भागवत पंथाने येथील भूमीत रूजविलेले समन्वयवादी भक्तीपरंपरेचे बीजदेखिल कारणीभूत झाले."[१६] महाराष्ट्रातील आध्यात्मिक व सांस्कृतिक वातावरणाचे आकलन केले असता. छ. संभाजीकालीन समाजाचे विश्लेषण करता येणे शक्य आहे.

## ६.१४ सांस्कृतिक जीवनाचे विविध पैलू :

### ३.१ अलंकार :

अलंकार हे प्रगत सांस्कृतिक जीवनाचे वैशिष्टये होय. छ. संभाजीकालीन महाराष्ट्रात स्त्रियां आणि पुरूष विविध प्रकारचे अलंकार अर्थात दागदागिने वापरत असत. त्यांना अलंकार वापरण्याची मोठी हौस होती. साने का.ना. म्हणतात, "पुरूष

पदक, कंठहार, टिळाहार या माळा वापरत भिकबाळी, चौकडा, कुडक्या ही कर्णभुषणे बाजुबंध व भुजाबंध हे दंडात घालण्याचे अलंकार, बोटात आंगठी व पवित्रक व छल्ला इ. अलंकारही पुरूष वापरत असत. शिरपेच, तुरा, जेगा लष्करी अधिकारी आणि सरदार शिरोभूषण म्हणून वापरत असत.''[९७] या प्रकारचे अलंकार वापरून पुरूष त्यावेळी समाजातील आपल्या प्रतिष्ठेचे दर्शन घडवित असत.

डॉ. दिपा सावळे म्हणतात, ''हिंदू स्त्रिया आपल्या वेणीच्या पेडात कुयरी , मच्छ, कुरमा, बोर, चिमण्या, सिताफळ, आवळा, मोर इ. अलंकार वापरीत. कानात बुगडया, काप, कर्णफुले, बाळया, मोकरे, कुडी, कुडक्या, कुंडले घालत.''[९८] त्या पुढे म्हणतात, नाकात नथ व मोरनी घालत. गळयात मंगळसुत्र वज्रटीका, एकदानी, ठुशी, चंद्रहार, मोहनमाळ, कंठा हे गळयातील दागिने होते. [९९] हातात पाटल्या, गोठ, तोडे, कंगणे, बांगडया, पोची, इ. अलंकार वापरीत.[१००] पायात तोडे, तोरडया, जोडवी, वाळे, पैंजन, घागऱ्या, मासोळया इ. अलंकार वापरीत.[१०१] मुसलमान स्त्रिया खालील दागिने वापरीत. चांद, तारा, मोर, टिका, कर्णफुल, झुमका, बिजली की बाली, नथ, कंठी, चंपाकळी, माळ, चंदनहार, बाजुबंद, कंगण,चुडी, आंगठी, तोडे, कटयार, जोडवा इ.[१०२] म्हणजे सतराव्या शतकात महाराष्ट्रातील स्त्रियां व पुरूष सामान्यपणे वरील अलंकार वापरीत असत. छ. संभाजी महाराजांच्या काळातील हे सर्व अलंकार गतकालीन सांस्कृतिक जीवनाची उंची प्रकट करतात.

### ३.२ सण, समारंभ व उत्सव :

सण व समारंभ हे कुठल्याही समाजाचा एक अविभाज्य घटक असतात. सण आपणांस एका विशिष्ट प्रदेशात असणाऱ्या धार्मिक कल्पनांचे ज्ञान करून देतात. सामाजिक व्यवहार व विशिष्ट भौगोलिक परिस्थिती यांचा अन्योन्य संबंध असतो. विशिष्ट प्रादेशिक वैशिष्टयांमधून एखादया दैवताचा उदय होतो. एखादया दैवताचा

उदय कशा परिस्थितीत झाला याचा अभ्यास करण्यासाठी या दैवतांच्या उपासना प्रकारांचा अभ्यास अत्यंत महत्त्वाची अशी माहिती अभ्यासकास देऊ शकतो.

एखादया कालखंडातील समाजाचा अभ्यास करण्याच्या हेतूने सण जसे महत्वाचे आहेत तेवढेच महत्वाचे समाजातील समारंभाना आहे. समाजातील समारंभ हे जरी केवळ समाजातील उच्चभ्रू वर्गापुरते मर्यादित असले तरी या वर्गाची समाजाच्या अर्थकारणावर पकड असते हे विसरता कामा नये. अशा समारंभामुळे समाजाची अभिरूचीची पातळी किती आहे याचे ज्ञान आपणांस होत असते. अभिरूचीच्या पातळीवरून एखादा समाज किती विकास पावला आहे. याविषयी अंदाज बांधता येतो. सतराव्या शतकातील महाराष्ट्रात जे सण साजरे केले जात होते. त्यामध्ये शाही पातळीवरून दसरा,गणेशउत्सव, वसंतपंचमी, रंगपंचमी, असे अनेक सण साजरे होत असत. सण समारंभ व उत्सव हे सांस्कृतिक जीवनाशी निगडीत आहे. सण साजरे करण्याची कारणे अर्थातच महाराष्ट्राच्या सामाजिक, आर्थिक परिस्थितीसंदर्भात आहे. छ. संभाजीकालीन महाराष्ट्रात खालील सण साजरे केले जात असत. त्यामुळे संभाजीकालीन समाज जीवनातही सण समारंभांना सांस्कृतिक महत्त्व होते. सण, समारंभ व उत्सव हे सांस्कृतिक जीवनाशी निगडीत आहे.

### १. गुढीपाडवा :

डॉ. सावंत बी.एस. म्हणतात, "गुढीपाडवा म्हणजे चैत्र शु. प्रतिपदा गुढीपाडव्याची प्रथा प्रामुख्याने दक्षिण भारतात प्रचलीत आहे. हिंदू वर्षाची सुरूवात गुढीपाडव्यापासून केली जाते. मराठी प्रदेशात गुढया उभारण्याची प्रथा होती. साडेतीन मुहुर्तांपैकी हा एक असल्याने या दिवशी अनेक मंगलकार्याचा आरंभ होत असे. मोहीमेवरील सरदार व सैन्य या दिवसाकरीता शक्य असल्यास घरी परतत असे. या दिवशी खेडयापाडयात पंचांग वर्तविण्याचा सामुहिक कार्यक्रम एखादया देवळात होत असे."[१०३] हा सन साडेतीन मुहुर्तांपैकी एक असल्याने लोक चांगल्या कामाचा या दिवशी शुभरंभ करत असत.

**२. पोळा :**

तत्कालीन भारताप्रमाणे महाराष्ट्र हा देखिल कृषीप्रधान होता. कृषीप्रधान महाराष्ट्रात पोळा सन महत्त्वाचे असणे उघड आहे. पोळयाच्या दिवशी बैलांना सजवून त्यांची पूजा केली जात असे. पोळयाच्या दिवशी गावातील बैल ग्रामदैवतांच्या दर्शनाला आणले जात असत अशा वेळी अग्रपूजेचा मान पाटलाच्या बैलजोडीस असे. गावातील सर्व रहिवासी पाटलांच्या बैलांना पुरणपोळीचा नैवद्य दाखवत असत. यावरून गावातील पाटलाची प्रतिष्ठा समजण्यासारखी आहे.[१०४] पोळा हा सण कृषीसंस्कृतीमध्ये महत्त्वाचा माणला जातो. या दिवशी शेतात राबणाऱ्या बैलाचा सन्मान केला जातो. कृषी जीवनातील हा सण महत्त्वाचा होय.

**३. होळी :**

हा लोकउत्सव भारतात सर्वत्र साजरा केला जात असे. परंतु महाराष्ट्रात होळीच्या दिवशी रंग खेळण्याची उत्तरेप्रमाणे प्रथा नव्हती. महाराष्ट्रात होळीला शिमगा असेही नाव होते. महाराष्ट्रात होळीला पुरणपोळयाचा नैवद्य दाखविण्याची प्रथा होती. होळीच्या दुसऱ्या दिवशी होळीवर तापलेल्या पाण्याने स्नान करण्याचीही प्रथा होती. शिमग्यासाठी खेडयातून बरीच सोंगे आणली जात असत. गावोगावी सार्वजनिक व वैयक्तिक होळी पेटविण्यात येत असे. होळी पेटविण्याचा मान पाटलाचा असे. राज्यकर्ते यामध्ये भाग घेत असत. होळीचा सण पाच दिवस साजरा केला जात असे.[१०५] त्याकाळात होळी खेळणे प्रतिष्ठेचे समजले जात असे. शहाजी भोसले व जिजाऊंचे प्रेम होळीत रंग खेळतांना जमले होते. होळीचा सण हा प्रेम आणि स्नेहाचे प्रतिक मानला जात असे. छ. संभाजीच्या काळातही होळीचा सण साजरा केला जात असे.

### ४. दसरा :

दसरा हा सण साजरा करण्याची प्रथा फार पुरातन होती. समाजातील सर्व स्तरातून हा सण कटाक्षाने साजरा केला जात असल्याने त्याला राष्ट्रीय सनाचा दर्जा प्राप्त झाला होता. कोणत्याही शुभकार्याचा या दिवशी आरंभ केला जात असे. यादिवशी पांडवांनी शस्त्रपूजा केली होती. म्हणून मराठे लोक आपली हत्यारे साफसुफ करून त्यांची समारंभपूर्वक पूजा करीत असत. त्याचदिवशी घोडा शृंगारून त्यावर सिमोलंघन करीत असत.[१०६] गावोगावी सिमोलंघन थाटामाटाने गाजत वाजत आणि उंचीवस्त्रे परिधान करून साजरे करीत असत. गावाच्या सिमेलगत असणाऱ्या शमी वृक्षाची केली जात असत. शमीची पाने सोने म्हणून लुटून आणून परस्परांना देत असत. अशा प्रकारची खेळातील मर्दुमकी गाजवून परतल्यानंतर घरी औक्षणाचा कार्यक्रम होत असे. त्यावेळी हे लुटून आणलेले सोनेच स्त्रियांना ओवाळणी दाखल टाकले जात असत. सोने लहानांनी मोठयांना देण्याची पध्दत होती.

### ५. दिवाळी :

दिवाळी हा सण अत्यंत महत्वाचा मानला जात असे. तथापी या सणाला दरबारी प्रतिष्ठा मिळाली नव्हती परंतु सामाजिक प्रतिष्ठा मात्र भरपूर होती. दिवाळी हा सन खेडयात घरोघरी साजरा केला जात असे. या सणाला देखिल धार्मिक परंपरा होती. बलीप्रतिपदा, लक्ष्मीपूजन व भाऊबीज मोठया उत्साहाने साजरी केली जात असे. [१०७] या प्रसंगी घरोघरी दिपोउत्सव व अतिषबाजी करून आनंद साजरा केला जात असे.

### ६. मकरसंक्रांत :

दिवाळीनंतरचा महत्त्वाचा सण म्हणजे संक्रांत होय. या प्रसंगी तिळगूळ दिले जात असे. तिळगूळ मोठयांनी लहानास देण्याची प्रथा होती. एकमेकांच्या घरी जाऊन

तिळगूळ दिला घेतला जात असे. एकमेकांतील स्नेह वृध्दिंगत व्हावा हा उद्देश तिळगुळ देण्याघेण्याचा असे. छ. आपल्या सरदारांना अगत्यपूर्वक तिळगुळ पाठवित असत.[१०८] तिळगुळातून समाजामध्ये स्नेहभाव व मैत्री जोडण्यावर भर दिला जात असे.

**७. वसंतपंचमी :**

माघशुध्द पंचमी म्हणजे वसंतपंचमी होय. ही वसंतऋतूच्या आगमनाची पूर्वसूचना होय. या दिवशी रंग खेळला जात असे. या दिवशी विद्वान ब्राम्हणांची सन्मानपूर्वक पूजा केली जात असे. [१०९] हा सण मने जोडणारा व ऐक्य भाव जोडणारा होता.छ. संभाजीकाळात वरील सर्व सण साजरे केले जात होते.

महाराष्ट्र संस्कृतिचे खरे मानचित्र प्रामुख्याने यादव काळात तयार झाले. महाराष्ट्राच्या प्रमुख कुलदैवतांचा उदय यादव काळात झालेला आढळून येतो. तरी या देवतांना खरे महत्त्व प्राप्त झाले ते शिवकाळापासून महाराष्ट्र हा मुळचा शिवोपासकांचा प्रदेश असल्यामुळे येथे अनेक शिवमंदिरे निर्माण झाली. दुर्गा, गणपती, खंडोबा, जोतिबा इ. दिवसांचे महत्त्व दिवसेंदिवस वाढत गेले. सतराव्या शतकापासून राजाश्रय मिळाल्यामुळे हिंदू देवदेवतांच्या मंदिरांची व उत्सवयात्रा यांची संख्या वाढत गेली. महाराष्ट्राच्या धर्मजीवनात ग्रामदेवता व कुलदेवता यांचे महत्त्व वाढत गेले. खंडोबा, ज्योतिबा, भवानी इ. कुलदेवता पुज्य म्हणून घरोघरी विराजमान झालेल्या दिसून येतात. त्यामुळेच तिर्थक्षेत्रांना महत्त्व प्राप्त झाले व प्रत्येक तिर्थक्षेत्राच्या ठिकाणी मोठमोठया यात्रा व उत्सव सुरू झाले.[११०] मध्ययुगातील यात्रा व उत्सव हे सामाजिक संगठण यासाठी पोषक ठरले होते. हिंदू समाजाची सण समारंभ व उत्सवप्रियता यावरून स्पष्ट होते. स्वराज्यात तर धर्मनिष्ठा महत्त्वाची होती. त्यामुळे या उत्सवास महत्त्व होते. रामनवमी, हनुमानजयंती, वटसावित्री, नागपंचमी, गणेशचतुर्थी, दत्त जयंती, महाशिवरात्र इ. उत्सवामुळे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनात नवचैतन्य निर्माण झाले होते.

### ३.३ मनोरंजनाची साधने :

आत्रे त्रि. ना. म्हणतात, “प्रत्येक गावात धार्मिक उत्सव, यात्रा भरत असत. व त्यानिमित्ताने अनेक करमणूकीचे कार्यक्रम होत असत. या यात्रांना विदुषक नर्तकी, सापवाले, गारूडी, जादूगार असे लोक येऊन आपली कला दाखवून करमणूक करीत असत. अशा यात्रा प्रसंगी गावोगावी बैलगाडयांच्या शर्यती, कुस्त्या आयोजित केल्या जात असत. दरवेशी मुसलमान लोक वाघ व अस्वलाचे खेळ करून खळी मागत. गारोडी मुसलमान असत व ते सापाचा नजरबंदीचा खेळ करीत. मुसलमान बंदरवाले, वानर, माकडे, बोकड यांचे खेळ करत. डोंबारी कसरतीचा खेळ करत. तसेच कलावंतीनीचा नाच हे मनोरंजनाचे मोठे साधन होते.”[१११] ही सर्व साधने लोकांचे मनोरंजन करणारी होती. तसेच कलावंतांचेही जीवन सुखी होत असे.कारण त्यांना कलेसाठी बिदागी दिली जात असे.

### ३.४ वेशभूषा :

स्त्री आणि पुरूष यांची वेशभूषा विभिन्न प्रकारची असे. वस्त्रे रेशमी आणि सुती असत तसेच सामान्य लोक व श्रीमंत लोक यांच्या वेशभूषेत फरक असे. श्रीमंत लोक रेशमी, सुती आणि विविध कलाकुसरी केलेली वस्त्रे वापरत असत. तर सामान्य लोक सुती वस्त्रांचा वापर करीत असत. पुरूष पायजमा, विजार, धोतर आणि अर्धा हाताच्या जाकीटाप्रमाणे कुडता घालत असत. धोतर सहा हात लांब व दोन हात रूंद असे. धोतर पांढरे स्वच्छ व त्याच्या समांतर किनारी सोनेरी व रेशमांत कलाकूसर केलेली असे. धार्मिक कार्यासाठी पितांबर नेसले जाई. डोक्यात पागोटे, फेटा, पगडी, मोठा रूमाल बांधत मुंडासे व पागोटी पांढरी व रंगीत असत. मुंडासे हे शिरोभूषन सर्व लोक वापरत असत. गरीब लोक डोक्याला पंचा बांधत शालचादर, ओढणी, पासोडी ही वस्त्रे वापरली जात असे. वस्त्रे सुती व रेशमी असत. साडी आणि चोळी हा स्त्रियांचा

पोषाख असे. मराठा स्त्रिया नऊवार साडी नेसत असत. शेतकरी व इतर जातीतील स्त्रिया साडी गुडग्यापर्यंत पोहचेल अशा पध्दतीने नेसत. वरच्या जातीतील स्त्रिया साडीचा पदर खांदयावर टाकत तर गरीब जातीतील स्त्रिया पदर डोक्यावरून घेत असत.[११२]

स्त्रिया साडी चोळी वापरत व मुली परकर चोळी वापरत चोळी ही विशिष्ट कपडयापासून बनवत त्याला खण म्हणत. श्रीमंत लोक रेशमी मलमल व जरीकाम केलेली वस्त्रे वापरत असत. वि.गो.खोबरेकर म्हणतात, "स्त्रिया पुरूष दोघेही बुट आणि चप्पल वापरत त्यांना जोडा आणि पायपोस म्हणत. जोडे चामडयाचे आणि रेशमी असत."[११३] आपापल्या ऐपतीनुसार त्याकाळातील लोक कपडे व पादत्राणे खरेदी करत.

### ३.५ केशभूषा :

स्त्री आणि पुरूष विविध प्रकारची केशभुषा करीत असत. स्त्रियांना नटण्या मुरडण्याची मोठी हौस होती. त्या विभिन्न प्रकारची केशभुषा करीत असत. या काळातील स्त्रिया साधारणपणे केसांचा आंबाडा बांधत असत. त्या केसांमध्ये विविध प्रकारचे दागदागिने वापरत असत. हे त्याकाळातील उपलब्ध चित्रांवरून लक्षात येते.

### ३.६ साहित्य :

वाड्मय किंवा साहित्य ही समाजातील इतर संस्थांपैकी एक आहे. साहित्य ही प्रगत समाजाची अभिरूची समजली जाते. प्राचीन काळामध्ये संस्कृतचे अध्ययन आवश्यक असे. मोठमोठया राजघराण्यातील व्यक्तींचा व संस्कृतचा नित्याचा संबंध येत असे. भोसले घराण्याने संस्कृत भाषेला उत्तेजन पूर्वीपासून दिलेले दिसते.

शहाजीराजांच्या बेंगलूर येथील दरबारात अनेक संस्कृत पंडीत व कवी होते. त्याचप्रमाणे संस्कृतचे अनेक जाणकारही होते. स्वतः शहाजीराजे या संस्कृतच्या

जाणकाराशी संस्कृतमध्ये काव्य, शास्त्र, विनोद, राजकारण या बाबींवर चर्चा करीत असत. शहाजीराजांचा दासीपुत्र कोयाजी हा संस्कृतचा जाणकार म्हणून दरबारात प्रसिध्द होता. त्याचप्रमाने व्यंकोजी राजांनाही संस्कृतचे चांगले ज्ञान होते. असे वर्णन जयराम पंडीत याच्या राधामाधवविलासचंपू या संस्कृत ग्रंथात आले आहे. व्यंकोजीराजानंतरच्या भोसले घराण्यातील अनेक राजांनी विविध विषयांवर स्वतः लेखन केले आहे. व इतर अनेक विद्वानांकडून लेखान करून घेऊन प्रचंड ग्रंथसंपदा निर्माण केली आहे.[११४] तंजावरचे भोसले घराणे हे तर साहित्य व नाटकावर भर देत असे. मराठीतील पहिले नाटक तेथेच बसविण्यात आले. स्वतः छ. संभाजीराजे हे संस्कृतपंडीत होते त्यांनी बुध्दभूषण हा ग्रंथ रचिला होता.

छ. शिवाजी महाराजांनाही चांगल्यापैकी संस्कृतचे ज्ञान होते. त्यांनी आपल्या कारकीर्दीमध्ये 'राज्यव्यवहारकोष' हा ग्रंथ तयार करून घेतला होता. त्याचप्रमाणे विविध विषयावरही मीमंसा, ज्योतिष, व्याकरण इ. ग्रंथसंपदेची निर्मिती करून घेतलेली होती. शिवकाळात वाङ्मयाची निर्मिती सर्वांगीण स्वरूपात झाली. वाङ्मय स्वरूपात महाराष्ट्राला भूषण म्हणून ठरणारे संत तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर, वामन पंडीत, कवी भूषण, कवी परमानंद यांच्या वाङ्मयाची निर्मिती झाली. जरी रयतेची बोलीभाषा म्हणून मराठी भाषेस राजभाषेचा दर्जा दिला असला तरी संस्कृत भाषेचेही त्यांनी महत्त्व ओळखले होते. म्हणून त्यांनी संभाजीराजांच्या संस्कृत शिक्षणाची चांगली व्यवस्था करून आपल्या घराण्याचा संस्कृत भाषेचा वारसा जपला होता. छ. संभाजी महाराजांना केशवभट्ट पुरोहित यांच्याकडे शिक्षणासाठी ठेवले होते. त्याच केशव भट्ट पुरोहित याचे 'राजारामचरितम् 'या नावाचे संस्कृत काव्य असून त्याने संभाजीची स्तूती केलेली असून तो म्हणतो की, 'सकलशास्त्र विचारशिल आणि धर्मज्ञशास्त्र कोविद' अशा शब्दांत त्याची स्तुती केलेली आहे.

संस्कृत भाषेचे ज्ञान व काव्याच्या आवडीमुळेच संभाजी राजांनी 'बुध्द भुषणम' या ग्रंथाची रचना केली. हा ग्रंथ संस्कृतमध्ये असून या ग्रंथाचे अवलोकन केले असता. असे दिसून येते की, संभाजीराजांना संस्कृत काव्याची रचना करण्याचे पूर्ण ज्ञान अवगत होते. 'बुद्धभुषण' ग्रंथाच्या पहिल्या खंडामध्ये १९४ सुभाषिते आहे. पहिल्या सत्रात सुभाषितांमध्ये संभाजीराजांनी आपल्या पूर्वजांच्या इतिहासांचे रेखाटन केले आहे. त्यामध्ये छ. शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापनेसाठी केलेल्या प्रयत्नांचे व ध्येयाचे अलौकीक वर्णन आहे. त्याच्या पुढील सुभाषिते श्री भवानी मातेच्या स्तुतीपर वर्णनांची आहे. त्याच्या पुढील सुभाषिते निरनिराळया देवतांचे स्तवन करणारी आहे. त्यानंतर आठ सुभाषीतांमध्ये प्राचिन संस्कृत ग्रंथातील आशीर्वाद युक्त वचने आहेत. नंतरच्या सुभाषितांमध्ये अन्योक्ती दिलेल्या असून शेवटची तीन सुभाषीते अंतलिपिकेची आहेत.

तसेच या ग्रंथाच्या द्वितीय खंडामध्ये एकुण ६३२ सुभाषिते असून त्यामध्ये मत्स्यपुराण, विष्णुधर्मोत्तर पुराण, कामदकीय नितीसार, यातील अनेक वचने दिलेली आहेत. तसेच राजा, प्रधान, मंत्री राजाचे सल्लागार यांची कर्तव्य व जबाबदाऱ्या दिलेल्या आहेत. तसेच राजपुत्राचे शैक्षणिक महत्त्व राजपुत्राची जबाबदारी, कर्तव्य, राज्याचे घटक व त्याचे कार्य व महत्त्व तसेच कोश, दुर्ग, हेर, राजसभा इ. व्यवस्थेविषयी चर्चा केलेली आहे. तसेच परमुलखावर स्वारी करतांना घ्यावयाची खबरदारी याचीही चर्चा केलेली आहे. या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडास मिश्रक निती प्रकरण असे नाव दिलेले असून यात संकीर्ण माहिती दिलेली आहे.

या ग्रंथामधील संस्कृतमधील काव्यरचना जशी महत्त्वाची आहे. तशीच राजकीय चर्चाही महत्त्वाची आहे. या ग्रंथामुळे संभाजीराजांना सर्व बाजूंचे चौफेर ज्ञान होते असे समजून येते. [११५] छ. संभाजीच्या राजकीय तत्त्वज्ञानाची व कर्तव्याची ओळख

या ग्रंथातून होते. हा ग्रंथ प्राचीन इतिहासावर, ज्योतिषशास्त्रावर आधारलेला आहे. त्यामध्ये भवानीमातेचे महत्त्व तसेच पूर्वकल्पनेचा मागोवाही प्रकट होतो.

'बुध्दभुषणम' या संस्कृत काव्याप्रमाणेच छ. संभाजी महाराजांनी 'नायिकाभेद', 'नखशिख', 'सातशतक' या हिंदी काव्यग्रंथांची रचना केली आहे. त्यांची संस्कृत व हिंदी भाषेतील प्रतिभाशक्ती अपुर्व होती. विद्वानांच्या सहवासातून ते ज्ञानसाधानेवर भर देत असत.

**१. नायिकाभेद :**

हा संपुर्ण ग्रंथ संभाजीराजांनी 'नायिकाभेद' या ग्रंथाची सुभाषित रचना केली आहे. परंतु हा संपुर्ण ग्रंथ संशोधकांना मिळून आलेला नाही. त्यातील बराचसा भाग उपलब्ध झाला असून काही सुभाषिते उपलब्ध होत नाही. या ग्रंथामध्ये नायिकाभेदाचे सोदाहरण विवेचन केलेले आहे. या संग्रहालयातील काव्याची उत्कटता खालील सुभाषितांमधुन स्पष्ट होते.

*"सासु कहयो दधिबेंचन को, सुदई सुखदाई कहाँ ते धो हाँकरी ।।*

*मोहि मिले नृपशंभु गुपाल तमाल तरे वह गैल नो सांकरी ।*

*मो तन ताकि बडी आँखियन ते, काँकरी लै फिरी मो तन धाकरी ।*

*काँकरी ओडी गई कर ते पै, करेजे कहाँ धौं गडि काँकरी ।।"*[११६]

हा ग्रंथ पुर्ण उपउब्ध झाला तर छ. संभाजीची सौंदर्यदृष्टी प्रकट होईल.

याचा अर्थ - सासूने दही विकायला जायला सांगितले, नशिब माझे, की कोठून तरी सुखद अशी हाक ऐकू आली. अरूंद गल्लीच्या एका टोकाला तमाल वृक्षाखाली मला गोपाळ भेटला. मोठे मोठे डोळे करून तो माझ्याकडे पहात राहिला. माझ्या अंगावर मग त्याने खडा मारला. मी तो हसत अडविला खरा पण तो कोण जाणे, हृदयात जावून बसला.

नायिकाभेद हा संपूर्ण ग्रंथ उपलब्ध न झाल्या कारणाने त्याचा लेखनकाल नक्की सांगता येत नाही. परंतु संभाजीराजांची त्या लेखनावर जी छाप पडली आहे. त्याचा विचार करता ही रचना इ.स. १६८१ ते १६८६ च्या दरम्यान केली असल्याची अनुमान निघते. या ग्रंथावरून संभाजीराजांची सौंदर्यदृष्टी स्पष्ट होते. त्यांची कल्पनाशक्ती किती उच्च दर्जाची होती, हे दिसून येते.

**२. नखशिख :**

१३६ छंदांनी युक्त काव्यसंग्रह असा हा काव्यग्रंथ असून यातील अनेक विविध सुभाषिते काव्य व अलंकार यांनी युक्त असून त्यांच्या भाषेत गोडवा आहे. या ग्रंथाचा रचनाकाळ इ.स. १६८१ ते १६८९ च्या दरम्यान असावा कारण यातील भाषा प्रौढ व परीपक्वतेची आहे. गणेशाचे वर्णन करतांना संभाजी राजे म्हणतात की,

*"श्री गजजू । लिखीते संभुक्रत नषशिष वर्नन ।*

*पदपदम पत्र सम चरन जंघजिमी कनक करमकर ।।*

*नाभी ललित गभीर उदर लंबित विसाल वर ।*

*उर दीरघ अति मंजू चारि कर देत चारि फल ।।*

*अेक दंत अरू सुंड लषत हरि जात सकल मल ।*

*अति नैंन चारू ढीली फलक श्रवन सीस छवि सौ मढत ।*

*ग्यान होत अग्यान के सो गुरूनायक के गुन पढत ।।"* [११७]

याचा अर्थ पुढीलप्रमाणे

श्री गणेशाचे नखशिख वर्णन शंभूकविने लिहीले आहे. गणेशाचे पाय कमलपत्रासारखे, मांडया सुवर्णमकराकार, लिहीले आहे. गणेशाचे पाय कमलपत्रासारखे, मांडया सुवर्णमकराकार, नाभी सुंदर, उदर विशाल, छाती ताठ,

चार सुरेख हात चार फलदेणारे (धर्म, अर्थ, काम, मोक्ष) एक दांत आणि सोंड असणारे श्री गणेशाचे दर्शन होताच सारी पापे नाहीशी होतात. सुरेख डोळे व कानाच्या पाळया यांनी त्याचा चेहरा आकर्षक बनला आहे. छ संभाजी महाराजांनी केलेले गणेशाचे वर्णन अद्‌भूत आहे. नवशिखा या ग्रंथामध्ये त्यांची कल्पनाशक्तीची पूर्ण भरारी असून या काव्यातून जसेच्या तसे चित्रण डोळयासमोर उभे करण्याची उत्कट प्रतिमा संभाजीराजांकडे होती.

**३. सात सतक :**

या ग्रंथात १०० सुभाषिते आहेत. त्यात गणपती, कमला, रामसिता, यांची स्तुती आणि आळवणी आढळते. सात सतक हा ग्रंथ ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे. या ग्रंथांचा बारकाईने अभ्यास केला असता. संभाजीमहाराजांच्या उत्तर कालीन जीवनावर प्रकाश पडतो. संभाजीमहाराजांच्या आयुष्यातील अखेरच्या कालखंडामध्ये त्यांना नैराश्याने ग्रासले असल्याचा भास होतो. तसेच औरंगजेबाच्या कैदेत पडल्यानंतर त्यांच्या जिवंतपणी त्यांच्या शरीरावर अमानुष, अमानवी अत्याचार होत असतांना देखिल त्यांनी "स्वधर्मे निधनं श्रेयः परमधर्मो भयावहः"या न्यायाने मृत्यूला सामोरे जाण्याचे धैर्य कसे दाखविले याचा उलगडा होतो.

अंतसमयी त्यांच्या शरीरावर क्रूर अत्याचार होत असतांनाही त्यांनी दयेचा किंवा यातनेचा एकही शब्द आपल्या मुखातून काढला नाही. याचे आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. इतक्या अडचणी व संकटातूनही संभाजीराजांचे रसिक मन साहित्यातील आनंद घेण्यास सिध्द असलेले दिसून येते. या साहित्यामुळे त्यांच्या संघर्षमय जीवनाला आनंदाचा व समाधानाचा विरंगुळा मिळत होता. साधारणपणे इ.स. १६८८ च्या सुमारास या ग्रंथाची रचना संभाजी महाराजांनी केली असल्याचे दिसून येते. आपल्या मृत्यूपुर्वी या ग्रंथाच्या रचनेस सुरूवात करून ती पूर्ण केली असल्याचे दिसून

येते. कारण त्यांनी आपल्या मृत्यूचे काही संकेत त्यामध्ये दिलेले दिसून येतात. 'सात सतक' या ग्रंथातील खालील काव्यरचना पाहता त्यांच्या अंतकरणाचा त्यामध्ये ठाव लागतो.

*"छत्र गज चमर तुरंग अगणित संग*

*एते पर मन ना गरूर गहिमुत है ।।*

*असन विहूँगे अंग वे वसन सूँने राषो ।*

*लोक निंदा भाषो सुष मानि सहिअुत है ।।*

*दुषन तुम्हैं जे देत मुगुध अचेत प्रभु ।*

*करिहौ उहैं पै जाको जैसो चहिअतु है ।।*

*सैंभ षोड महिपाल कहैं सुनिये गोपाल ।*

*हम हरी हाल तुम सौ निहाल रहिअतु हैं ।।"*[११८]

या सुभाषिताचा अर्थ असा आहे की, शंभुराजे परमेश्वराला विनवितात की, गोपाला ऐका, आम्ही आमची सर्व जबाबदारी तुमच्यावर सोपवून राहीलेलो आहोत. आमचेकडे हत्ती, छत्रचामरे, सिंहासन आणि अगणित घोडे वगैरे वैभव असतानाही आमचे मनामध्ये अहंकार निर्माण झाला नाही. खाणे, पिणे, उंची वस्त्रे याकडे आम्ही लक्ष न देता स्वराज्यावर लक्ष केंद्रीत केल्याने काही लोकांनी आमच्यावर टिका केली. त्यांत सुख मानून ती सहन केली, जे तुम्हांस दुषणे देत होते, ते अज्ञानी व असमंजस होते, त्यांना जे जसे करावयाचे आहे ते करू द्या. म्हणजेच वरील सुभाषितावरून असे दिसून येते की, संभाजी महाराजा छ. असल्याकारणाने त्यांचेकडे सर्व ऐश्वर्य होते. तसेच अगणित संपत्ती, मान, मतराब सर्व काही होते, असे असतांना सुध्दा त्यांना कोणत्याही प्रकारचा गर्व किंवा त्याबद्दल अहंकार नव्हता. त्यामुळे संभाजी राजांच्या

मत्सरामुळे काहींनी त्याच्यावर टिकाही केलेली होती. परंतु स्वभावतः ते निश्चयी असल्यामुळे त्यांनी त्या टिकेलाही सुख मानले व आपले मस्तक परमेश्वराच्या चरणावर ठेवून ते निश्चींत झालेले दिसतात.

स्वतः संभाजी महाराज साहित्यिक असल्यामुळे त्यांनी आपल्या दरबारात कवी व धर्मपंडीतांना राजाश्रय दिला. कवी मोहनदास संभाजी महाराजांच्या दरबारी कवी होता. संभाजी महाराजांच्या आश्रयाखाली राहिलेला दुर्गादास राठोड हा सुध्दा कवी होता. त्याची देशभक्तीपर गीते राजस्थानात प्रसिध्द आहेत.[११९] छ. संभाजीकालीन राजाश्रयातून लोकसाहित्याची निर्मिती झाली असे त्यावरून म्हणता येईल. संभाजीराजे त्याच्या या गुणावर लुब्ध असावेत संभाजी राजांची काव्यरसिकतेची वरील गोष्टींवरून साक्ष पटते. केशवपंडीत हे धर्मपंडीत होते. त्यांनी संभाजीराजांसाठी 'धर्मकल्पकता' हा ग्रंथ लिहला. यावरून त्यांना छ. संभाजीची प्रेरणा होती असे दिसते.

### ३.७ शिक्षण :

मध्ययुगीन काळात शिक्षणाची जबाबदारी सरकारवर नव्हती. आधुनिक काळातील शिक्षणविषयक दृष्टिकोण तेंव्हा अस्तित्वात नव्हता. शिक्षणाचे महत्त्वही वाटत नव्हते. लिहिता वाचता येणारा व हिशोब ठेवू शकणारा व्यक्ती श्रीमंत, वरिष्ठ कुटुंबातील असायचा. सामान्य व्यक्तींना आपापली कामे पार पाडणे हेच महत्त्वाचे होते. रितीउद्योग व त्यानंतरचा सैनिकी व्यवसाय हाच सर्वात प्रमुख व्यवसाय मानला जाई. त्यामुळे शिक्षण देणाऱ्या व्यक्ती व संस्था अतिशय मर्यादित होत्या. त्यांना सरकारी मदत नव्हती. क्वचित अनुदानरूपाने मिळणारे सहाय्य हेच शिक्षण देणाऱ्या व्यक्तीच्या उदरनिर्वाहासाठी म्हणून दिले जाई. शिवकाळापासून शिक्षण देणाऱ्या पंडीतांना मुल्ला, मौलविंना आर्थिक मदत देण्याचे धोरण स्वीकारले होते. तसेच अनेक

सुशिक्षित विद्वानांना दरबारी आश्रय दिला होता. प्रा. सावंत बी.एस. म्हणतात, "पारंपारिक भारतीय पध्दतीने शिक्षण दिले जात होते. या शिक्षणामध्ये उदारमतवादाचा त्याचप्रमाणे सामुहिक शिक्षण तत्त्वाचा प्रकर्षाने अभाव होता."[१२०] त्याकाळातील शिक्षण हे राजधर्मास अनुसरून होते.

ते पुढे म्हणतात, "प्राथमिक शिक्षणात लिहिणे,वाचणे, पाठांतर करणे, यापद्धतीवर भर दिला जात असे. तसेच व्याकरण, तर्कशास्त्र, खगोलशास्त्र, गणित, ज्योतिष्य विद्या, काव्य व अलंकार इ. विषय शिक्षणात समाविष्ट होते."[१२१] यासर्व विषयांना या काळात प्रतिष्ठा होती.त्यामुळे लोकांच्या ज्ञानात भर पडत असे.

"छपाईतंत्र उपलब्ध नसल्याने पाठांतर करणे हा या काळातील शिक्षणाचा कणा होता. वाचने, मनन करणे या पद्धतीने शिक्षणाचे कार्य चालत असे. शाळेची स्वतंत्र अशी इमारत नव्हती. झाडाखाली, झोपडीत, अथवा देवळात शिक्षणाचे कार्य चालत असे. शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यातील वरिष्ठ विद्यार्थी नविन कनिष्ठ विद्यार्थ्यास शिक्षण देत असत. या पध्दतीने चालणाऱ्या शाळा विद्यार्थ्यांना उपयुक्त ठरत असत. प्राथमिक शिक्षणानंतर बहुतेक विद्यार्थी आपापल्या व्यवसायाकडे वळत असत."[१२२] शिक्षण हे व्यवसाय करण्यास पोषक असावे. ही त्यावेळची रीत होती.

छ. संभाजीकालीन समाजाला महाराष्ट्रात शिक्षणात मल्लविद्या, लष्करी शिक्षण, व्यवहारीक शिक्षण, व्यावसायिक शिक्षण, धार्मिक शिक्षण इ. प्रकारचे शिक्षण दिले जात असे. [१२३] आपापल्या आवडीनुसार तरूण वर्ग शिक्षण घेत असे.

**१. मल्लविद्या :**

प्रा. टी. के. बिरादार म्हणतात, "मल्लविद्या मध्ययुगीन काळातील शिक्षणपध्दतीचा एक प्रमुख भाग होता. स्वसंरक्षण व स्वराष्ट्रशिक्षण ही या काळातील गरज होती. प्रत्येक जण आपल्या शरीर संवर्धनाकडे लक्ष देत असे. दंडबैठका काढणे.

कुस्ती, कवायत, वजन उचलणे इ. बाबी यात सामील होत्या. याच काळात समर्थ रामदासांनी चालविलेली बलोपासनाची चळवळ तरुणांणा आकृष्ट करणारी ठरली होती. बहुतेक गावातून व्यायामशाळा व आखाडे असत. कुस्तीगीर मल्लांचा आदर होत असे. छ. शिवाजी महाराजांना मल्लविद्येचे शिक्षण देण्याची सोय दादोजी कोंडदेव यांनी केली होती. असे वर्णन आढळते."[१२४] याचा अर्थ असा की, विशिष्ट क्षेत्रात तज्ञ व्यक्तींकडून शिक्षण दिले जात असे.

**२. लष्करी शिक्षण :**

अभ्यासक म्हणतात, "मल्लविद्येप्रमाणे शिवकाळात लष्करी शिक्षणासही अधिक महत्त्व दिले जाई. सैनिकी पेशा हा दुसरा प्रमुख व्यवसाय होता. कारण पोट भरण्याचे व उदयास येण्याचे लढाईतील पराक्रम हेच मुख्य साधन होते. शिक्षणात तलवार चालविणे दांडपट्टा चालविणे, भालाफेक, बाण, गोफन या शास्त्रांचे शिक्षण दिले जाई. प्रत्येक माणूस मिळेल ते शिक्षण खाजगी पद्धतीने मोठया प्रयासाने मिळविण्याचा प्रयत्न करीत असे."[१२५] गनिमीकाव्यासाठी लागणारे युद्धाचे शिक्षण त्याकाळात दिले जात असे.

**३. व्यावसायिक शिक्षण :**

संशोधक म्हणतात, "व्यावसायाभिमुख शिक्षण देण्यासाठी कोणत्याही संस्था त्या काळात महाराष्ट्रात नव्हती. बापाची विद्या मुलगा शिकत असे. व्यावसायावर आधारित जातीव्यवस्थेमुळे निरनिराळे व्यवसाय पिढयानपिढया चालत असत. संयुक्त कुटुंब पध्दतीने पारंपारीक व्यवसाय टिकण्यास मदत झाली. जातीच्या पूर्वापार धंद्याशिवाय इतर धंदा करण्यास परवानगी नसे. आपला व्यवसाय पुढच्या पिढीत कसा चालू राहिल याची फिकीर वडीलधाऱ्यांना असे. घरालाच शिक्षणसंस्थेचे महत्त्व प्राप्त होत असे."[१२६] एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे व्यावसाय शिक्षण दिले जात असे.

## ४. व्यावहारिक शिक्षण :

व्यावहारिक शिक्षणाचे दोन भाग होते. प्राथमिक शिक्षण व उच्च शिक्षण प्रा. बी. एस. सावंत म्हणतात, "प्राथमिक शिक्षणात जे शिक्षण दिले जात असे. ते व्यवहारातील प्राथमिक ज्ञान विद्यार्थ्यांना मिळावे या उद्देशाने दिले जात असे. लिहिणे, वाचणे, पाठांतर करणे इ. समावेश असे. मुळाक्षरे व बाराखडी यांची ओळख करून दिली जात असे. त्याचबरोबर १०० पर्यंत अंक मोजणे, लिहणे, पाढे, पावकी, निमकी, पाऊणकी, सवाईकी, आऊटकी यासारख्या कठीण संख्या पाठ करण्यावर भर दिला जात असे. याशिवाय बाजारात नित्य उपयोगासाठी लागणारी पैशाची, वजनाची कोष्ठके इ. माहिती दिली जात असे. कोष्ठकांच्या आधारावर विद्यार्थ्यांना अंकगणितांचे ज्ञान दिले जात असे. त्याचबरोबर वजाबाकी, गुणाकार, भागाकार शिकविला जात असे."[१२७] नित्य जीवन जगतांना या गणिताचा उपयोग होत असे.

उच्च शिक्षण दोन प्रकारे दिले जात होते. पाठशाळामधून व खाजगी रितीने पाठशाळा-या तिर्थक्षेत्राच्या उच्च ठिकाणी होत्या. उच्च शिक्षणात धर्मग्रंथ, तत्त्वज्ञान इतर धार्मिक वाड्.मय यांचा अभ्यास केला जात असे.[१२८] खुद्द संभाजी महाराजांनी बनारस येथे जाऊन अध्यात्मिक व धार्मिक शिक्षण घेतले होते.

## ५. धार्मिक शिक्षण :

प्रा. बी. एस. सावंत म्हणतात, "सर्वसामान्य लोकांना कथा, कीर्तनाद्वारे ज्ञान प्राप्त होण्याची संधी मिळत असे. कथा कीर्तन करणारे पुराणिक व हरदास गावोगावी जाऊन पौराणिक कथा सांगत असत. प्रत्येक गावात श्रावण महिन्यात एखाद्या धार्मिक ग्रंथाचे सामुहिक वाचन होत असे. याशिवाय चित्रकथिंचा एक वेगळा वर्ग समाजशिक्षणाचे कार्य करीत असल्याचे दिसते. चित्रकथी जवळ रामायण, महाभारत, पांडवकथा इ. ग्रंथामध्ये महत्त्वाच्या प्रसंगावरील चित्रे असत. या चित्रांच्या मदतीने

ते संबंधित ग्रंथाचा आशय स्पष्ट करीत असत." [१२९] या प्रकारची कितीतरी उदाहरणे संभाजीकालीन धर्मग्रंथात सापडतात. "एकंदर मराठयांच्या काळात मध्ययुगीन शिक्षणाचे स्वरूप प्रामुख्याने धार्मिक होते. वेद उपनिषद, धर्मग्रंथ अभ्यासले जात. संस्कृत,मोडी, देवनागरी, भाषा शिकविली जात असे. वास्तविक धार्मिक, सामाजिक क्षेत्रात जागृती घडवून आणण्याचे फार मोठे कार्य मध्ययुगीन महाराष्ट्रात साधु संतांनी केलेले दिसते. संत तुकाराम, संत रामदास या संतांनी आपल्या अमर अभंगवाणीतून व खेडयापाडयातून फिरून धार्मिक शिक्षण, सदाचारांची शिकवण दिली."[१३०] त्यांचे मनाचे श्लोक त्यावेळी महाराष्ट्रात घरोघरी म्हटले जात असत.

थोडक्यात पारंपारिक शिक्षण पध्दतीला प्रोत्साहन देण्याचे राज्यकर्त्यांचे धोरण होते. त्यामुळे मूल्यशिक्षण व धार्मिक संस्कार घडत असत. गुरू.ब्राह्मण यांना राजश्रेष्ठयांकडून सन्मानाची वागणूक मिळत असे. अगदी वैदिक काळ व महाकाव्यकाळापासून चालत आलेली ही परंपरा मध्ययुगातही चालत होती असे यावरून दिसते. नैतिक, आध्यात्मिक, शारीरिक इ. शिक्षणावर भर दिला जात असे. अध्यात्माचा विकास करणे. आणि सद् गुणांची जोपासना करणे हा त्या काळातील शिक्षणाचा हेतू होता. शिवाय परचक्राशी लढतांना बलोपात्रतेवर भर दिला जात होता. त्याबाबत समर्थ रामदासांनी अपूर्व लोकजागृती घडविली. संस्कृत आणि वेदाध्ययन हेच विद्येचे गमक मानले जात होते. शिक्षण हे खाजगी पाठशाळातून थोरामोठयांच्या आश्रयावर चालत असे. सरकारी यंत्रणेचे स्वरूप आलेले नव्हते. ग्रंथनिर्मितीची संधी आणि प्रसाराची साधने मर्यादित असल्यामुळे श्रवण-पाठांतर आणि हस्तलिखित ग्रंथामुळे शिक्षणाचा व साहित्याचा प्रसार झाला नव्हता. शिक्षण ही संस्कृती संवर्धनाची एक पध्दतशीर व्यवस्था असून शिक्षणाच्या प्रक्रियेतून समाज आणि सांस्कृतिक परंपरा एका पिढीकडून दूसऱ्या पिढीकडे संक्रमणे करीत असे.

## ३.८ भाषा :

वसंत आबाजी डहाके म्हणतात, "संस्कृतिच्या विकासात भाषा एक महत्त्वाचा घटक आहे. मानवी समाज, संस्कृती ही संज्ञापन व्यवस्थेवर अवलंबून असते. भाषा हे संज्ञापनाचे, संवादाचे साधन आहे. भाषा प्रतिकांनी बनलेली असते. अथवा ती एक चिन्हव्यवस्था आहे. असे म्हटले जाते. भाषा ही निसंशयपणे एक सामाजिक संस्था आहे."[१३१] छ. संभाजी महाराजांनी अशा शिक्षणाकडे लक्ष दिले होते.

ते पुढे म्हणतात, "संज्ञापण ही गोष्ट एकंदरीत मानवी आयुष्यात अत्यंत महत्त्वाची आहे. मात्र कोणतेही संज्ञापन पोकळीत होत नसते. बोलणारा व ऐकणारा या दोन गोष्टी जशा आवश्यक असतात. तशाच बोलणे समजून घेण्यासाठी आणखी एक गोष्टींची म्हणजे संकेतांची आवश्यकता असते. बोलणारा व ऐकणारा हे ज्या समाजाचे घटक असतात. त्या समाजाच्या वर्तन पध्दतीने, संस्कृतीने काही संदर्भ संकेत निर्माण केलेले असतात."[१३२] मराठी भाषेत बोलण्याचा शिवकाळात बोलण्याचा जसा आग्रह होता. तसा संभाजीकाळातही होता.

कालेलकर ना.गो. म्हणतात, "अनुभव व्यक्त करणे, जुने ज्ञान नव्या पिढीपर्यंत पोहचविणे, नवे ज्ञान शोधून काढून ते पुढे उपयोगी पडेल अशा रितीने त्यांचा संचय करणे या गोष्टी समाजजीवनाला आवश्यक आहे. ज्ञानगंगेचा प्रवाह अखंड चालू ठेवण्याची आणि समाजजीवन प्रगतशील बनण्याची ही कामगीरी भाषेला पत्करावी लागते."[१३३] त्यामुळे संभाजी महाराजांनी संस्कृत भाषा शिकून घेतली होती. व मराठीची सेवा करणाऱ्या संतांचा गौरव केला होता.

"व्यवहार सुकर व सुलभ होण्याचे साधन म्हणजे भाषा होय."[१३४] संभाजी महाराजांनी मराठी भाषेत व्यवहार करण्यावर भर दिला होता. ध्वनीयुक्त भाषेच्या निर्मितीपूर्वी मानवाने हावभावाची भाषा वापरली असावी असे मानले जाते. भाषेचा

मुख्य आधार जो आवाज तो निर्माण करण्याची शक्ती मानवाप्रमाणेच इतर प्राण्यांमध्येही निसर्गाने केली आहे. परंतु त्या ध्वनींना अर्थ चिटकवण्याचे काम मनुष्य करू शकतो. मानव अनुकरणाने भाषेचे ज्ञान प्राप्त करून घेतो. मराठी भाषेचा जेंव्हा आपण विचार करतो. तेंव्हा संस्कृत भाषेपासून मागधी, मागधीपासून पैशाची, पैशाची पासून, शौर्यसेनी व शौर्यसेनी पासून महाराष्ट्री अशी हिची प्रगती दिसून येते. म्हणून महाराष्ट्री नावाच्या प्राकृत भाषेपासून मराठीची उत्पत्ती झाली असे मानतात. प्राकृत भाषेपासून मराठीची उत्पत्ती झाली म्हणजेच मराठीची महाराष्ट्री प्राकृत ही आई व संस्कृत ही आजी आहे.[१३५] मराठी भाषेने हे दोनही ऋणानुबंध जपले आहेत.

यादव राजांनी मराठीला अतिशय उत्तेजन दिले. म्हणून या काळाला मराठी भाषेचा सुवर्णकाळ असे म्हणतात. ज्ञानेश्वरवादी महाराष्ट्र संत कवींचे वाड्मय व महानुभावी वाड्.मय असे तत्कालीन मराठीचे दोन प्रवाह आढळून येतात. सुरूवातीच्या काळी मराठी वाड्.मय पद्य स्वरूपात होते. उदा. बोलू, लेखकू, विठ्ठलू, रसु इ. उकारात व पावो, विषो, ज्ञानदेवो इ. ओंकारात अशी नामादिकांची रूपे आढळतात.[१३६] हे सर्व मध्ययुगीन भाषिक अभिव्यक्तीचे मौलीक पैलू होते. बहामनी काळात ज्ञानेश्वरकालीन मराठीचे शुध्द स्वरूप न राहता ती संस्कृतमय बनू लागली. शिवाजीने राजकीय घडामोडींच्या जोडीला भाषेंच्या दृष्टीने सुध्दा खूपच प्रगती केली. फार्सीला पायबंद घालून त्या ठिकाणी संस्कृतला प्राधान्य दिले. शिवकालीन मराठीचा नमुना पुढीलप्रमाणे सांगता येईल.

गायकवाड आर. डी. म्हणतात, "संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग, दुर्ग नसता मोकळा देश, परचक्र येताच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उद्वस होतो. देश उद्वस झाल्यावरी राज्य असे कोणास म्हणावे ? याकरीता पूर्वी जे जे राजे झाले त्यांनी आधी देशामध्ये दुर्ग बांधोन तो तो देश शाश्वत करून घेतला आणि आलेले परचक्र संकट दुर्गाश्रयी

परिहारे केले."[१३७] अशा रितीने यादव काळापासून सतराव्या शतकापर्यंत मराठी भाषेचा विकास होवून ती समृध्द झालेली दिसते. छ. संभाजीकाळामध्ये शिवकाळाप्रमाणेच स्वभाषा संवर्धन व स्वसंस्कृतीवर भर दिला जात होता. भाषेचा विकासाचा विचार करता कटाक्षाने फारसी शब्द टाळण्याचा प्रयत्न केला जात असे. संस्कृत व प्राकृत भाषेचा वापर करण्यावर अधिक भर दिला जात असे.

## ३.९ छ. संभाजीकालीन ललीतकला :

प्राचीन काळाप्रमाणेच मध्ययुगीन महाराष्ट्रात कला जीवन समृद्ध होते. छ. संभाजी महाराजांच्या काळातील सांस्कृतिक जीवनाची उंची समजून घेण्यासाठी त्याकाळातील कलावैभवाचे वेगळेपण समजावून घेतले पाहिजे.

### १. संगीत :

प्राचीन भारतामध्ये संगीत परंपरा अस्तित्वात होती. गायन, वाद्यवादन या दोन्ही कला संगीतशास्त्राच्या निर्मितीतून निर्माण झाल्या. यादवकाळात संगीतकला बहरलेली दिसते. संगीताचा प्रसार, लोकप्रियता समाजात सर्व थरात होती. गायनाचे कार्यक्रम नगरात होत असत. यादव काळात ग्रामीण भागात संगिताचा प्रसार लोकगीतांच्या माध्यमातून होत गेला. उदा. अभंग, आरत्या, ओव्या, भारूडे, कवने या काळात भक्तीपंथांना मोठी चालना मिळालेली होती.

शुभांगणा अत्रे म्हणतात, "याचकाळात अनेक संतांचे कार्य संगिताला पुरक ठरले. संतांच्या साहित्यानेच संगितविषयक अनेक संज्ञा आढळतात. उदा. नामदेवांच्या काही पदांना रागाचे स्वरूप चढविलेले दिसते. संत एकनाथांनी लोकशिक्षणासाठी भारूड रचना केली. भारूडरचना आजही महाराष्ट्रात लोकप्रिय आहे. सतराव्या शतकात संत रामदास यांनीसुध्दा आपल्या साहित्यात संगितविषयक परिभाषा वापरलेली

आढळते. छ. शिवाजी महाराजांनी स्वराज्यस्थापन केले. ते स्वराज्य सुस्थिर केले हा सर्व कालखंड अत्यंत धामधुमीचा होता. राजकीय, धार्मिक उलाढाली खुप चालू होत्या. इस्लामचे आक्रमण होतेच त्यामुळे कला, कलाआविष्कार यांकडे दुर्लक्ष समाजाचे होणे सहाजिकच होते. नंतर मात्र पेशवाईच्या काळात उत्तेजन मिळालेले दिसते."[१३८] तथापी राजा व सरदार वर्ग हा कला व संगितास जमेल तसे प्रोत्साहन देत असे. राजकीय अस्थिरता, युध्दे वा परिस्थितीमुळे विररसप्रधान काव्य आणि अशा काव्याची उचित गायन हे कलाप्रकार तसेच विरहशृंगार हा भाव असलेले काव्य आणि गायन उदयाला आले त्याच्या जोडीला नृत्यही आले. त्यामुळे काव्यरचना, गायन, नर्तन या तिनही कलांना एकत्रित करणारा हा प्रकार म्हणजे लावणी व विररसात्मक पोवाडा होय.

**२. पोवाडा :**

ऐतिहासिक पार्श्वभूमी असलेली कथानक आणि त्यातील शुरनायक, या काव्यगायन प्रकारातील केंद्रबिंदू होय. शूरनायकाचे कर्तृत्व त्यात वर्णन केलेले असे. ती खडया आवाजाची व उत्कृष्ट रसपोषक अशा चालीची त्यामुळे या पोवाडा प्रकाराचे कार्यक्रम हमखास रंगत असत. त्या गायकांना शाहीर असे संबोधले जात असे.[१३९] शिवकाळाप्रमाणे छ. संभाजी काळातही पराक्रमाचे पोवाडे गाणारे शाहीर समाजात विररसाचा प्रसार करत असत. तालवाद्य जास्त वापरली जात. शाहीरांच्या जोडीला इतर गायकही साथ देत असत.

**३. लावणीप्रकार :**

विरह, वेदना, शृंगार या भावनांचा परिपोष करणारी काव्यरचना यात केंद्रस्थानी असे. या काव्याचे गायन गायिका करत. महाराष्ट्रातील पोषाख घुंगरू व इतर वाद्य या समवेत कार्यक्रम सादर होत असे.[१४०] नृत्यही सादर केले जाई. अनेक लावणीकार, कवी या काळात उदयाला आले.

## ४. चित्रकला :

छ. शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केली. थोडे स्थिरस्थावर झाल्यावर मात्र दुर्ग उभारणी, राजधानी उभारणी, मंदिरांची जिर्णोध्दार इ. कामांना सुरवात झाली. अर्थात या काळातील चित्रकाम आता पहावयाला मिळत नाही. असे अनेक तज्ञांचे मत आहे. कारण या काळात ते मराठा राज्यकर्त्यांना चित्रकलेचा परिचय नव्हता. त्यांनी चित्रकलेला प्रोत्साहन दिले नाही. म्हणून मराठेशाहीत चित्रकाम दृष्टीस पडत नाही.[१४१] परंतु हे मत प्रा. सतिश देशमुख यांना मान्य नाही. त्यांनी औरंगाबाद विद्यापीठातील वस्तुसंग्रालयात मराठेकालीन चित्रांचा संग्रह केला आहे. व त्याचा अभ्यासही केला आहे. त्यांच्या मते मराठेकाळात स्वतंत्र चित्रशैली विकसित झाली होती. परंतु या काळातील साहित्यामध्ये चित्रकलेचे उल्लेख मिळतात. शिवभारत या ग्रंथात शहाजीराजांच्या बंगळूर येथिल वाडयातील चित्रकामाचा उल्लेख येतो. रामदासस्वामींच्या साहित्यात राजवाडा व चित्रशाळा यांचा समावेश आहे. रायगडावर छ. शिवाजी महाराजांनी राजधानीची स्थापना केली. तेंव्हा चित्रसभेची योजना केलेली होती असे वाटते.[१४२] ही सर्व उदाहरणे बोलकी आहेत.

महाराष्ट्रातील चित्रकामासाठी विविध माध्यमांचा उपयोग केला जाई. कापडीपट, भूर्जपत्र, काचचित्र, भिंतीचित्र, लाकडीपट. इ. शिवकाळाप्रमानेच संभाजीकाळातही ही माध्यमे वापरलेली आढळतात. मराठेशाहीतील सरदारांच्या वाडयातील भींतीवर, मंदिरांच्या भींतीवर चित्रकाम झाले. चित्रकारांना आश्रय देणे, त्यांच्याकडून चित्रे काढून घेणे ही त्याकाळातील समाजरित होती.

संभाजी काळातील खुद्द संभाजी महाराजांचे दुर्मिळ छायाचित्र मराठवाडा विद्यापीठाच्या इतिहास वस्तुसंग्रहालयात आहे. ते स. मा. गर्गे यांनी मराठी रियासतीचे पुनःसंपादन करताना प्रकाशित केले आहे. मराठेकालिन चित्रकलेबाबत डॉ. सतीश देशमुख यांनी मौलिक संशोधन करून डॉ. रानडे यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनपर लेखन केले आहे. त्याआधारे पुढील दोन बाबी स्पष्ट होतात.

एक अशी की, मराठा काळात स्वतंत्र चित्रशैलिचा विकास झालेला होता. ही चित्रे राजवाडे आणि दरबारात प्रामुख्याने रंगवण्यात येत असत.दुसरे असे की, बलाढ्य असे सरदार आपल्या वैभवाची रोमांचक कहाणी चित्ररुपाने रेखाटत असत. त्यांच्या प्रासादात चित्रकला, वस्तुकला आणि दुर्मिळ कलावस्तु यांचा स्वतंत्र संच असे. मध्ययुगाच्या प्रारंभी लेण्यांमधील चित्रकला लोप पाऊन ही कला एक पोथ्यांच्या माध्यमातून प्रकट होऊ लागली आणि त्यानंतर ती राजप्रसादातील दरबारात आणि सरदारांच्या वाड्यातून चित्रित करण्यात येऊ लागली.

लोकांचे रंजन करण्याचे काम ललीतकला करत संगित पोवाडा व लावणी इ. लोकगीतेही विरश्रुंगार रसाची जोपासना करीत असत. मराठेकाळातील स्वतंत्र चित्रशैलीचा विकास ही एक लक्षणिय बाब होय. छ. शिवाजीप्रमाणेच छ. संभाजीच्या काळातही वाडयांमध्ये चित्रे काढली जात.

### ६.१० समारोप :

या प्रकरणात धार्मिक व सांस्कृतिक पैलूंचा विचार केला आहे. औरंगजेबाचे धार्मिक धोरण, लोकांचा छळ, अन्याय त्यास छ.संभाजीने दिलेले उत्तर, धर्मांतर रोखण्यासाठी केलेले शुध्दीचे प्रयत्न तसेच धार्मिक इनाम,अंधश्रध्दा, ग्रामिण देवता, धार्मिक सण,समारंभ, तसेच सांस्कृतिक जिवनात कला, वाङ्मय संस्कृती, उत्सव, मनोरंजन, अलंकार, वेशभूषा, आहार, भाषा इ. प्रकाश टाकण्यात आला. धार्मिक व सांस्कृतिक पैलू हे परस्परांशी निगडीत असतात. मध्ययुगीन समाज हा चातुःवर्ण माणनारा व परंपरावादी होता. त्यामुळे समाजाला, प्रतिकूल परिस्थितीतून मार्ग काढण्यास अधिक संघर्ष करावयास लागला.

मोगलकालीन धार्मिक धोरणांची कट्टरता ही छ. संभाजीकालीन संघर्षाचे खरे कारण होते. औरंगजेबाने स्थानिक लोकांवर जो धार्मिक अत्याचार केला त्याविरोधात प्रखर प्रतिक्रिया दिसून आली. तत्कालीन समाजातील अंधश्रध्दा, रूढी, परंपरा तसेच सतीप्रथा, बहूपत्नीत्व, विवाहपध्दती, धर्मकल्पना, मूहूर्त, शकूण, ग्रहणे, नवस, अनुष्ठान करणे, होमहवन, गृहशांती इ. पैलू अभ्यासले आहेत. तर सांस्कृतिक जिवनात सण समारंभ, मनोरंजनाची साधने, अलंकार, पोषाख, केशभूषा, साहित्य, कला यांचा आढावा घेण्यात आला आहे. अशा प्रकारे हे प्रकरण छ. संभाजीकालीन धार्मिक व सांस्कृतिक जिवन स्पष्ट करणारे आहे.

छ. संभाजीच्या काळातील अंधारलेल्या वातावरणात महाराष्ट्र धर्माचे रक्षण करून भारतीय संस्कृतिची पताका उंच-उंच फडकत ठेवण्याचे काम छ. संभाजी महाराजांनी केले. या कामी साधूसंतांनी बजावलेले कार्य व त्यांस छत्रपतींनी केलेले सहाय्य पहाता लोकजीवनाचा मुक्त आणि स्वतंत्र विकास करण्यात छ. संभाजी महाराजांनी महत्त्वाचा वाटा उचलला असल्याचे दिसून येते.

## संदर्भसूची


१. डॉ. शिवदे सदाशिव, "ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा"; डायमंड पब्लीकेशन, पुणे, द्वितीय आवृत्ती २००८, पृष्ठ ३७८

२. डॉ. गोखले कमल, "शिवपुत्र संभाजी", प्रकाशन कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, चौथी आवृत्ती, २००१, पृष्ठ ४२१

३. डॉ. जोशी पी.एस., "छत्रपती संभाजी" पब्लीकेशन एस. चंद अँण्ड कंपनी, न्यु दिल्ली, फर्स्ट पब्लिश १९८० पेज २९२

४. दीक्षित ना.सी., "प्राचीन व मध्ययुगीन भारत", प्रकाशन, पिंपळापूरे अॅण्ड कंपनी, नागपूर, प्रथमआवृत्ती १९८७, पृष्ठ २४९

५. कित्ता पृष्ठ २४९

६. कित्ता पृष्ठ २४९

७. कित्ता पृष्ठ २४९

८. कित्ता पृष्ठ २४९

९. डॉ. आठल्ये वि.भा., "प्राचीन व मध्ययुगीन भारत", प्रकाशन अंशुल पब्लीकेशन, नागपूर, प्रथमआवृत्ती १९९९, पृष्ठ ३३९, ३४०

१०. कित्ता पृष्ठ ३४०

११. कित्ता पृष्ठ ३४०

१२. कित्ता पृष्ठ ३४०

१३. कित्ता पृष्ठ ३४०

१४. दीक्षित ना.सी., उपरोक्त पृष्ठ २५०

१५. कित्ता पृष्ठ २५२,२५३

१६. कित्ता पृष्ठ २५३

१७. डॉ. गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ४३४

१८. कित्ता पृष्ठ ४३४

१९. जोशी शं.ना. (संपा), "संभाजीकालीन पत्रसार संग्रह" पृष्ठ १४

२०. कुलकर्णी अ.रा., "शिवकालीन महाराष्ट्र", राजहंस पब्लीकेशन, पुणे, प्रथमआवृत्ती १९९३, पृष्ठ ४६

२१. डॉ. गोखले कमल, कित्ता पृष्ठ ४३६

२२. कित्ता पृष्ठ ४३६

२३. कित्ता पृष्ठ ४२४

२४. कित्ता पृष्ठ ४२४

२५. कित्ता पृष्ठ ४३७

२६. कित्ता पृष्ठ ४४४

२७. कित्ता पृष्ठ ४४५

२८. कित्ता पृष्ठ ४४५

२९. कित्ता पृष्ठ ४४५

३०. डॉ. जोशी पी.एस., उपरोक्त पृष्ठ २९२

३१. डॉ. शिवदे सदाशिव, उपरोक्त पृष्ठ ३८७

३२. डॉ. गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ३२८

३३. डॉ. जोशी पी.एस., उपरोक्त पृष्ठ २९२

३४. डॉ. अनिल बैसाणे व डॉ. सुभाष पाटील, "मराठेकालीन समाज आणि अंधश्रध्दा", कल्पना प्रकाशन, नांदेड, पहिली आवृत्ती २००५, पृष्ठ ७०

३५. कित्ता पृष्ठ ७०

३६. कित्ता पृष्ठ ७१

३७. कित्ता पृष्ठ ७२

३८. आत्रे त्रि.ना., "गावगाडा", वरदा बुक्स प्रकाशन, पुणे, पुनर्मुद्रण १ जानेवारी १९९५, पृष्ठ १४४

३९. डॉ. खोबरेकर वि.गो., "महाराष्ट्राचा इतिहास", मराठा कालखंड भाग १, प्रकाशन महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई प्रथम आवृत्ती २००६, पृष्ठ ६१४

४०. कित्ता पृष्ठ ६१५

४१. कित्ता पृष्ठ ६१५

४२. कित्ता पृष्ठ ६१५

४३. डॉ. कृ.ना. चिटणीस, "मध्ययुगीन भारतीय संस्था व संकल्पना", भाग २, तिसरी आवृत्ती २००८, पृष्ठ २०९

४४. कित्ता पृष्ठ २१०

४५. कित्ता पृष्ठ २११

४६. डॉ. खोबरेकर वि.गो., उपरोक्त पृष्ठ ६२२

४७. कित्ता पृष्ठ ६२३

४८. डॉ. दाभोळकर नरेंद्र, "अंधश्रध्दा प्रश्नचिन्ह आणि पुर्णविराम", राजहंस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती १९८८, पृष्ठ ८७

४९. देशमुख विश्वासराव, "अंधश्रध्दा व बुवाबाजी", सुधीर प्रकाशन, वर्धा, प्रथमआवृत्ती २००३, पृष्ठ ५

५०. डॉ. गवळी पी.ए., "पेशवेकालीन महाराष्ट्र", कैलास प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती २०००, पृष्ठ ११३

५१. डॉ. बैसाने अनिल व डॉ. पाटील सुभाष, उपरोक्त पृष्ठ ७९

५२. भगत दत्ता, संपा, कृष्णाजी अनंत सभासद कृत, "श्री. शिवछत्रपतींचे चरित्र", प्रतिमा प्रकाशन, प्रथम आवृत्ती २००१, पृष्ठ ७१

५३. वाकसकर वि.स. संपा, कृष्णाजी अनंत सभासद, "छ. शिवप्रभूंचे चरित्र", व्हिनस प्रकाशन, पुणे, प्रथमआवृत्ती, १९७३, पृष्ठ १२

५४. डॉ. गोखले कमल, उपरोक्त पृष्ठ ४२४

५५. डॉ. अनिल कठारे व डॉ. जयश्री घोडके, "शिवकालीन महाराष्ट्र", अल्फा प्रकाशन, नांदेड, प्रथमआवृत्ती, २००८, पृष्ठ १४७

५६. डॉ. पानसे मु.ग., "यादवकालीन महाराष्ट्र", प्रकाशन मराठी ग्रंथ संग्रालय, मुंबई, प्रथमआवृत्ती १९६३, पृष्ठ १२४

५७. डॉ. बैसाने अनिल व डॉ. पाटील सुभाष, उपरोक्त पृष्ठ ९३

५८. खोबरे वि. गो., उपरोक्त पृष्ठ ९९

५९. भगत दत्ता संपा, उपरोक्त पृष्ठ ८२

६०. बिरादार टी.के., उपरोक्त पृष्ठ १८१

६१. भगत दत्ता संपा, उपरोक्त पृष्ठ १३१,१३२

६२. डॉ. बैसाने अनिल, उपरोक्त पृष्ठ ८७

६३. कित्ता पृष्ठ ९२

६४. डॉ. पाटील सुभाष, "शिवकाळ व पेशवाईतील दुष्काळाचा इतिहास", पुनम प्रकाशन, कंधार, प्रथम आवृत्ती २०११, पृष्ठ २५२

६५. भगत दत्ता संपा, उपरोक्त पृष्ठ ६५

६६. डॉ. बैसाने अनिल, उपरोक्त पृष्ठ ९९

६७. कित्ता पृष्ठ १४४

६८. कित्ता पृष्ठ १४४

६९. कित्ता पृष्ठ १४४

७०. कित्ता पृष्ठ १३६

७१. कित्ता पृष्ठ १३६

७२. कित्ता पृष्ठ १३६

७३. सरदेसाई गो.स., ''मराठी रियासत खंड २'', पॉप्युलर प्रकाशन १९९८, पृष्ठ ३२०

७४. डॉ. गाठाळ एस.एस., ''मराठयाचा इतिहास'', कैलास पब्लीकेशन, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती २०१०, पृष्ठ ४१३

७५. कित्ता पृष्ठ ४१३

७६. कित्ता पृष्ठ ४१३

७७. कित्ता पृष्ठ ४१४

७८. डॉ. खोबरेकर. वि. गो., उपरोक्त पृष्ठ ६१६

७९. देशमुख शारदा, ''शिवकालीन व पेशवाईतील स्त्रीजीवन'', प्रकाशन टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे, प्रथमआवृत्ती १९७३, पृष्ठ ५६

८०. कित्ता पृष्ठ ६०

८१. खोबरे वि.गो., उपरोक्त पृष्ठ ६०३

८२. कित्ता पृष्ठ ६०४

८३. कित्ता पृष्ठ ६०५

८४. कित्ता पृष्ठ ६०५,६०६

८५. Russell R.V., "Tribes and cast of central provinces of India", Published Under the orders of the central provinces Administration in forur vol 1 Bombay, 1925, page 240

८६. डॉ. गवळी पी.ए., "पेशवेकालीन महाराष्ट्र", कैलास प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमआवृत्ती २०००, पृष्ठ १०४

८७. कृ.ना.चिटणीस, उपरोक्त पृष्ठ १३४,१३५

८८. वाकसकर वि.स.(संपा.), कृष्णाजी अनंत सभासदांची बखर कथित, "छ. शिवप्रभूंचे चरित्र", व्हिनस प्रकाशन, पुणे, चौथी आवृत्ती, १९७३ पृष्ठ ६९

८९. सरदेसाई गो.स., उपरोक्त पृष्ठ १२०,१२१

९०. बेंद्रे वा.सी., "श्री. छत्रपती संभाजी महाराजांचे विचिकित्सक चरित्र", प्रकाशक, पी.पी.एच बुक स्टॉल, मुंबई, द्वितीय आवृत्ती, १९७१, पृष्ठ ५३३

९१. शिंदे सरकार अशोकराव, छ. संभाजी महाराज वाङ्मय व साहित्य, सहयाद्री प्रकाशन, इस्लामपूर, पृष्ठ ७४

९२. Dr. Joshi P.S., Chatrapati Sambhaji, S.Chand & Company Published, New Delhi, First Published 1980, Page 285

९३. डॉ. अत्रे शुभांगना, "महाराष्ट्र संस्कृती", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती नोव्हे २००८, पृष्ठ १

९४. सहस्रबुध्दे पु. ग., "महाराष्ट्र संस्कृती", कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, तृतीय आवृत्ती २००३, पृष्ठ ४

९५. डहाके व. आ., "मराठी साहित्य इतिहास आणि संस्कृती", पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, प्रथम आवृत्ती, २००५, पृष्ठ २४६

९६. डॉ. अत्रे शुभांगना, उपरोक्त पृष्ठ ३

९७. साने का.ना. संपा, मल्हाररामराव चिटणीस विरचित, शककर्ते "श्री. छत्रपती संभाजी महाराजांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र", आर्यभूषण प्रकाशन, पुणे, प्रथम आवृत्ती १९२४, पृष्ठ २४५

९८. डॉ. सावळे दि.पा., "मराठेकालीन दागदागिने आणि अलंकार", कैलास प्रकाशन, औरंगाबाद, प्रथम आवृत्ती २००७, पृष्ठ ८१

९९. कित्ता पृष्ठ ८१

१००. कित्ता पृष्ठ ८१

१०१. कित्ता पृष्ठ ८१

१०२. कित्ता पृष्ठ ८१

१०३. प्रा. सावंत बी.एस., "मराठयांचा प्रशासकीय सामाजिक व आर्थिक इतिहास", विद्या प्रकाशन, नागपूर, प्रथम आवृत्ती १९९७, पृष्ठ १७८

१०४. आत्रे शुभांगना, उपरोक्त पृष्ठ १६८

१०५. कित्ता पृष्ठ १६९

१०६. प्रा. सावंत बी. एस., उपरोक्त पृष्ठ १७७

१०७. कित्ता पृष्ठ १७७

१०८. कित्ता पृष्ठ १७७

१०९. कित्ता पृष्ठ १७८

११०. कित्ता पृष्ठ १७४

१११. आत्रे त्रिंबक नारायन, "गावगाडा", वरदा प्रकाशन, पुणे, पुर्नमुद्रण,
१ जाने १९९५, पृष्ठ १२७

११२. डॉ. खोबरेकर वि.गो., "मराठेकालीन कोकणचे सामाजिक व आर्थिक जीवन", प्रकाशन इतिहास संशोधन मंडळ, मुंबई, प्रथम आवृत्ती १९९७, पृष्ठ ८९

११३. कित्ता पृष्ठ ९०

११४. शिंदे सरकार अशोकराव, "छ. संभाजी महाराज वाड्मय व साहित्य" सहयाद्री प्रकाशन, इस्लामपूर, पृष्ठ १९

११५. कित्ता पृष्ठ १९

११६. कित्ता पृष्ठ २१

११७. कित्ता पृष्ठ २२

११८. कित्ता पृष्ठ २५

११९. डॉ. शिवदे सदाशिव, "ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा", डायमंड प्रकाशन, पुणे, द्वितीय आवृत्ती २००८, पृष्ठ ३९८.

१२०. प्रा. सावंत बी.एस., उपरोक्त पृष्ठ १६८

१२१. कित्ता पृष्ठ १६८

१२२. प्रा. बिरादार टी. के., "मराठयांचा इतिहास", विद्याभारती प्रकाशन, लातूर, प्रथम आवृत्ती २०००, पृष्ठ ५३८.

१२३. प्रा. सावंत बी. एस., उपरोक्त पृष्ठ १६९

१२४. प्रा. बिरादार टी. के., उपरोक्त पृष्ठ ५३८

१२५. प्रा. सावंत बी. एस., उपरोक्त पृष्ठ १६९

१२६. प्रा. सरदेसाई बी. एन., "मराठयांचा सामाजिक आर्थिक व सांस्कृतिक इतिहास", फडके प्रकाशन कोल्हापूर, प्रथम आवृत्ती २००१, पृष्ठ ६२

१२७. प्रा. सावंत बी. एस., उपरोक्त पृष्ठ १७१

१२८. कित्ता पृष्ठ १७२

१२९. कित्ता पृष्ठ १७३

१३०. प्रा. बिरादार टी.के., उपरोक्त पृष्ठ ५४०

१३१. डहाके वसंत आबाजी, उपरोक्त पृष्ठ २५२

१३२. कित्ता पृष्ठ २५२

१३३. कित्ता पृष्ठ २५३

१३४. गायकवाड आर. डी., "मराठेकालीन संस्था व विचार", फडके प्रकाशन, कोल्हापूर, द्वितीय आवृत्ती १९८७, पृष्ठ ४५

१३५. कित्ता पृष्ठ ४६

१३६. कित्ता पृष्ठ ४६

१३७. कित्ता पृष्ठ ५०

१३८. शुभांगणी आत्रे, उपरोक्त पृष्ठ ९४.

१३९. कित्ता पृष्ठ ९४

१४०. कित्ता पृष्ठ ९४

१४१. कित्ता पृष्ठ ८९

१४२. कित्ता पृष्ठ ८९

# प्रकरण ७ वे : उपसंहार

७.१ प्रस्तावना

७.२ प्रकरण निहाय सारांश

७.३ ठळक निष्कर्ष

७.४ नवी सैध्दांतिक मांडणी

७.५ उपसंहार

७.६ अंतिम भाष्य

# प्रकरण ७ वे

# उपसंहार

## ७.१ प्रस्तावना :

मराठ्यांच्या इतिहासात १६३० ते १६९० या कालखंडाला 'शिवकाळ' असे संबोधले जाते. त्यापैकी पहिला टप्पा म्हणजे छ. शिवाजी महाराजांची कारकीर्द व दुसरा टप्पा म्हणजे छ. संभाजीची कारकीर्द होय. १६८०-८९ या दहा वर्षांच्या काळात संभाजी महाराजांनी बजावलेल्या कामगिरीचे आजवर अनेक इतिहासकारांनी मूल्यमापन केले असले तरी तत्कालीन लोकजीवनाचा सखोल आणि सर्वांगाने अभ्यास मात्र झालेला नाही. हे लक्षात घेऊन प्रस्तुत प्रबंधात छ. संभाजी महाराजांच्या कालखंडातील केवळ राजकीय नव्हे तर सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचे विविध पैलू उलगडण्यात आले आहेत. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर निर्माण झालेल्या अस्थिर व डोलायमान परिस्थितीतून महाराष्ट्राला खंबीरपणे बाहेर काढण्यात छ. संभाजी महाराजांनी बजावलेली कामगिरी वैशिष्ट्यपूर्ण ठरते. त्यांनी मोगल, पोर्तुगीज आणि इंग्रजांशी शर्थीने आणि चतुराईने झुंज दिली. तसेच त्याहीपेक्षा महत्त्वाची बाब म्हणजे स्वातंत्र्याच्या मूल्य रक्षणासाठी आवश्यक ती नैतिक व अध्यात्मिक प्रेरणा महाराष्ट्राच्या लोकमानसात जागृत ठेवली. समर्थ रामदासांनी सांगितलेल्या महाराष्ट्र धर्माची यथार्थता प्रस्थापित करून हा महाराष्ट्र धर्म पुढील स्वातंत्र्य लढ्याच्या काळात अधिक बलशाली बनवण्याचे ऐतिहासिक कार्य छ. संभाजी महाराजांनी केले. त्यांच्या कार्यकर्तृत्वाचे अनेक पैलू असले तरी त्यातील महत्त्वाचे आणि उपेक्षित असे तीन पैलू या प्रबंधात मांडले आहेत.

एक म्हणजे छ. संभाजी महाराजांनी मोगल व पोर्तुगीजांच्या आक्रमणाविरुद्ध युद्धप्रिय राजपुत्र या अभिवचनाप्रमाणे प्रत्यक्ष रणांगणावर शर्थीचा संघर्ष करून स्वातंत्र्याचे मूल्य जोपासले.

दुसरे म्हणजे छ. संभाजी महाराज हे संस्कृत ग्रंथांचे अभ्यासक होते. त्यांनी रचलेल्या विविध ग्रंथांचा आणि काव्यांचा आढावा घेतला असता त्यांच्या चतुरस्त्र प्रतिभेची प्रचीती येते. या प्रबंधात त्यांच्या या वैचारिक योगदानाची विस्ताराने दखल घेतली आहे.

तसेच तिसरे व सर्वात महत्त्वाचे सूत्र म्हणजे छ. संभाजी महाराजांच्या काळात लोकाभिमुख लोकप्रशासन हे तत्त्व त्यांनी कसोशीने कृतीत आणले. अवर्षण आणि दुष्काळाच्या काळात महाराष्ट्रात निर्माण झालेले पाण्याचे दुर्भिक्ष आणि त्यातून उद्भवलेल्या अनेकविध समस्यांना सामोरे जाण्यासाठी त्यांनी केलेल्या उपाय योजनांचे सुद्धा या संशोधनात जाणीवपूर्वक नवे आकलन केले आहे.

छ. शिवाजी महाराजांनी घालून दिलेले आदर्श आणि त्यांच्या मूल्यप्रेरणा यांची जोपासना करतांना छ. संभाजी महाराजांनी स्वराज्याच्या उत्कर्ष व्हावा, स्वराज्याची मधूर फळे सामान्य माणसापर्यंत पोहोचवीत आणि हिंदवी स्वराज्याचा वटवृक्ष व्हावा यादृष्टीने बजावलेले कार्य निश्चितच इतिहासाला कलाटणी देणारे ठरले आहे. या कार्यातून छ. संभाजी महाराजांच्या कर्तृत्वाचे ऐतिहासिक स्वरूप या प्रबंधातून पुढे आणण्याचा प्रयत्न केला आहे.

'राजा कालस्य कारणम' असे म्हणतात. राजा काळाला घडवितो की काळ राजाला घडवितो. 'कालो राजस्य कारणम' असे एक द्वंद प्रचलीत आहे. यापैकी राजा श्रेष्ठ की काळ याला महत्त्व नाही. खरेतर राजा हा काळाला आकार देत असतो. तसा काळही राजाच्या जीवनकार्यावर प्रभाव टाकत असतो. या दृष्टीने विचार करता

छत्रपती संभाजीकालीन महाराष्ट्राचे लोकजीवन अभ्यासले असता प्रस्तुत प्रबंधात नवा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. या अंतिम प्रकरणात ठळक निष्कर्ष मांडले आहेत व पूर्व प्रकरणांचा मागोवा घेऊन नवी सैध्दांतिक मांडणी स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.

या प्रबंधात नवी समाजशास्त्रीय दृष्टी योजिली आहे. या समाजशास्त्रीय दृष्टीने संभाजीकालीन परिस्थितीचे आकलन करताना लोकजीवन, संस्थात्मक संरचना तसेच अध्यात्मिक व सांस्कृतिक मूल्यप्रेरणा यादृष्टीने नवी मांडणी केली आहे. सभोवतीच्या परिस्थितीतून गांगरून न जाता निश्चयाने नवा मार्ग शोधण्यासाठी संभाजी महाराजांनी केलेले प्रयत्न अनेकविध स्वरूपाचे होते. प्रथमतः त्यांनी आपल्या राजदरबारातील मंत्र्यांची पुनर्रचना करताना त्यांच्या निखळ निष्ठांना प्राधान्य दिले. दुसरे म्हणजे आर्थिक परिस्थिती सुधारण्यासाठी दमदार पावले टाकली. तसेच शहजादा अकबराशी युती करून दिल्लीतील सत्ता उलथून टाकण्याचा महत्त्वपूर्ण प्रयोग केला. चौथे महत्त्वाचे म्हणजे संभाजी महाराजांनी पोर्तुगीजांना केवळ नमवलेलेच नाही तर त्यांना पराभूत करून वठणीवर आणले. छ. संभाजीकालीन लोकजीवनातील सर्वात महत्त्वाचे यश कोणते असेल तर स्वातंत्र्याची जोपासना करण्यासाठी सामान्य माणसांमध्ये त्यांनी जागविलेला निर्धार हा होय. प्राणाची बाजी लावून स्वराज्याचे रक्षण करतो तोच खरा स्वराज्याचा आधारस्तंभ आहे. हे सूत्र त्यांनी निश्चितपणे कृतीत आणले. मराठयांच्या इतिहासामध्ये संभाजी महाराजांचे कार्य इ.स. १६८० ते १६८९ हे वैशिष्टयपूर्ण ठरले आहे. छत्रपती संभाजी महाराजांनी प्राणपणाने हिंदवी स्वराज्याचे संरक्षण केले व स्वराज्याच्या प्रतिष्ठेसाठी बलिदान केले.

डॉ. कमल गोखले, वा.सी. बेंद्रे, गो.स. सरदेसाई, पी.जी. जोशी, डॉ. जयसिंगराव पवार, प्रा. विजय देशमुख, डॉ. पां.स.पिसुर्लेकर प्रभृतींनी आजवर छत्रपती संभाजी

महाराजांच्या कार्याविषयी ग्रंथरचना केली आहे. वा.सी.बेंद्रे म्हणतात, "संभाजी महाराजांची सांप्रतच्या इतिहासात जी फक्त दुराचारी व दुर्व्यसनी म्हणून नोंद केली गेली आहे ती संपूर्णतः काल्पनिक किंवा अवास्तव आहे. या समजाच्या अगदी उलट अशी तत्कालीन वस्तूस्थिती असल्याचे निदर्शनास येते. छत्रपती संभाजी महाराजांनी आपल्या कारकीर्दीचा, कदाचित आयुष्याचाही क्षण नि क्षण "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" या मनोवृत्तीनेच वेचला, आणि राजभोग तर राहोच पण सामान्य गृहसुखाच्याही लाभास विन्मुख राहून मोगली परचक्राला तोंड देण्यासाठी, कर्तव्यनिष्ठेने म्हणा किंवा स्वराज्यनिष्ठेने म्हणा, त्यांना सतत झगडत रहावे लागले. तसेच आपल्या भीषण मृत्यू समयीच्या काळात धारण केलेल्या स्थितप्रज्ञतेने संभाजी महाराजांनी "स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः" या गीतावचनाची अती तेजस्वी अशी जाणीव करुन देऊन महाराष्ट्राच्या प्रतिकारातील चैतन्य जागृत राखले." (बेंद्रे वा.सी."श्री. छ. संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र", पी.पी.एच, बुकस्टॉल मुंबई, द्वितीय आवृत्ती १९७१, पृष्ठ ३३५,३३६)

तथापी महाराष्ट्रातील लोकजीवनाचा यथार्थ अभ्यास झालेला नाही. डॉ. अ.रा.कुलकर्णी यांनी शिवकालीन महाराष्ट्रावर जसे परिपूर्ण अध्ययन केले आहे. तसे छत्रपती संभाजी कालीन लोकजीवनाचे समतोल व वस्तुनिष्ठ अध्ययन झालेले नाही. त्यासाठी या प्रबंधाची योजना केली होती. असा अभ्यास करतांना काही नवे पैलू विचारात घ्यावयाचे आहे. छत्रपती संभाजी महाराजांचा इतिहास अभ्यासतांना या प्रबंधात सामाजिक इतिहासाचा दृष्टीकोन समोर ठेवला आहे. प्रो. ब्लॉक यांनी सामाजिक इतिहासाची संकल्पना स्पष्ट करतांना म्हटले आहे, "सामाजिक इतिहास म्हणजे मानवांचा इतिहास हा इतिहास मानवांचा विचार त्यांचे कार्य, त्यांचे दैनंदिन जीवन, त्यांच्या श्रध्दा, सवयी यांच्याशी निगडीत असतो." (गायकवाड डॉ. सरदेसाई, हनमाने, "इतिहासलेखनशास्त्र", फडके प्रकाशन कोल्हापूर, तृतीय आवृत्ती १९९०,

पृष्ठ ३६) छ. संभाजी महाराजांचा अभ्यास करतांना तत्कालीन सामाजिक परिस्थितीला या प्रबंधात केंद्रबिंदू मानून अभ्यास केला आहे. त्यासाठी पत्रे, बखरी, विदेशी साधने, संत वाङमय यांच्या आधारे तत्कालीन महाराष्ट्रातील मानवांचे दैनंदिन जीवन कार्य त्यांच्या सवयी, श्रध्दा, आचार विचार इ.चा अभ्यास केला आहे.

असा अभ्यास करताना योजिलेली समाजशास्त्रीय दृष्टी तथ्यांचे नव्याने आकलन करण्यास वरदान ठरली आहे. उपलब्ध कागदपत्रे आणि पुरावे यांचे गुणात्मक आशय विश्लेषण करताना त्यातील महत्त्वाच्या तथ्यांची क्रमबद्ध आखणी करून त्यावर नवा प्रकाश टाकला आहे. गतकालीन घटना व घडामोडी तसेच कागदपत्रांतील महत्त्वाचे संदर्भ आणि उपलब्ध वाङ्मयीन संदर्भ यांची

जुळणी करून पडताळणी करून त्याआधारे नव्या दृष्टीने काही सत्य शोधण्याचा प्रयत्न केला आहे.

मध्ययुगीन भारताच्या इतिहासात सर्वात महत्त्वाचा प्रश्न कोणता असेल तर तथ्यांची विश्वसनीयता तपासून पाहणे हा आहे. यादृष्टीने अंतर्गत व बाह्य समीक्षा पद्धतींचा वापर करून ऐतिहासिक घटना व घडामोडींचे या संशोधनात नवसमाजशास्त्रीय दृष्टीने विश्लेषण केले आहे. भूत, वर्तमान आणि भविष्यकाळ यांच्यातील सुप्त असे समांतर धागे जेव्हा संशोधकाला उलगडावे लागतात त्याआधारे घटनाक्रमावर नवा प्रकाश टाकावा लागतो तेव्हा समाजशास्त्रीय दृष्टीने नवा इतिहास समोर येऊ शकतो. हे सूत्र घेऊन या प्रबंधात नवी मांडणी केली आणि त्यादृष्टीनें समोर आलेले निष्कर्ष आता क्रमाने मांडले आहेत.

## ७.२ प्रकरणनिहाय सारांश

### १. प्रस्तावना

पहिल्या प्रकरणात छ. संभाजीकालीन महाराष्ट्राचे लोकजीवन या प्रबंधाची पार्श्वभूमी स्पष्ट केली आहे. शोधकार्यातील संकल्पना स्पष्ट केल्या आहेत. त्यात उद्दिष्टे, महत्त्व, गृहीतके, स्पष्ट करण्यात आली आहेत. तसेच महाराष्ट्र, लोकजीवन, लोकजीवनाचे विविध पैलू या संकल्पनाही स्पष्ट केल्या आहेत. उदा. सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक हे सर्व पैलू परस्परांशी निगडीत असल्यामुळे त्यांचा परस्परपूरक संबंध स्पष्ट केला आहे. या अध्ययनाची बैठक ही ऐतिहासिक समाजशास्त्रीय असल्यामुळे हा प्रगत दृष्टीकोनही छत्रपती संभाजीकालीन लोकजीवनाची अनेक विविध रुपे अभ्यासतांना त्यामागील काही तात्विक व वैचारीक पैलू विचारात घेतले पाहिजेत हे लक्षात घेऊन या प्रकरणात काही सूत्रे मांडली आहेत. ही सर्व सूत्रे इतिहास शास्त्रातील लोकइतिहासाची व्यापक संकल्पना स्पष्ट करणारी आहेत.

छ. संभाजीकालीन लोकजीवनास एक तात्विक बैठक प्रदान करण्याचे कार्य या प्रकरणामध्ये शक्य झाले आहे.

या संशाोधनाचे पहिले प्रकरण अशाप्रकारे अभ्यासविषयाची ऐतिहासिक पार्श्वभूमी आणि संकल्पना स्पष्ट करणारे आहे. तसेच विषयाची आवश्यकता व महत्त्व प्रतिपादन करून पुढील संशोधनाचा मार्ग स्पष्ट केला आहे आणि शोध कार्याचा आराखडा देऊन भावी शोधकार्याची दिशाही स्पष्ट केली आहे.

### २. संबंधित साहित्याचा आढावा

या प्रकरणात प्रकाशित साहित्याचा आढावा घेण्यात आला आहे. प्रथम साहित्य समालोचनाचे महत्त्व स्पष्ट करण्यात आले. त्यानंतर प्रकाशित साहित्याचे वर्गीकरण

करण्यात आले आहे. असे वर्गीकरण करताना इंग्रजी ग्रंथ, चरित्रात्मक ग्रंथ व विशिष्ट पैलूं बाबतचे संशोधनपर ग्रंथ असे तीन प्रकार पाडून त्यांचा आढावा घेण्यात आला आहे. मागील संशोधनातील उणीवा स्पष्ट करण्यात आल्यामुळे पुढील शोधकार्यासाठी पोषक असे सूत्र विकसीत करणे शक्य झाले आहे. इंग्रजी ग्रंथामध्ये जी.एस. सरदेसाई, पी.एम. जोशी. यांच्या ग्रंथाचा आढावा घेण्यात आला.

जी.एस. सरदेसाई यांच्या 'न्यू हिस्ट्री ऑफ द मराठाज' मधील पहिल्या खंडामध्ये छ. संभाजींचे जीवनचरित्र व कार्य अभ्यासले आहे. त्याचा आढावा घेण्यात आला. तसेच पी.एम. जोशी यांच्या छ. संभाजी या इंग्रजी ग्रंथाचा आढावाही घेण्यात आला. या ग्रंथामध्ये एकूण ८ प्रकरणांचा समावेश असून यामध्ये पार्श्वभूमी, पूर्वायुष्य, संभाजी मोगल संघर्ष, संभाजीचे विजय, मोगलांशी युध्दे व प्रत्यक्ष संघर्षाचे दुसरे पर्व तसेच संघर्षाचे तिसरे पर्व हे पैलू स्पष्ट केले आहेत. संभाजीच्या प्रशासन कौशल्याची त्यांनी स्वतंत्र चर्चा केली आहे. परंतु त्यामध्ये तत्कालीन लोकजीवनाचा आढावा घेतलेला नाही. चरित्रात्मक ग्रंथामध्ये वा.सी. बेंद्रे, डॉ. कमल गोखले, डॉ. एस.ए. बाहेकर. डॉ. सदाशिव शिंदे, अशोकराव शिंदे सरकार यांनी लिहीलेल्या ग्रंथांचा आढावा घेण्यात आला. अशा सर्व चरित्रग्रंथाचा संक्षिप्त आढावा घेण्यात आला. विशिष्ट पैलू बाबतच्या ग्रंथामध्ये डॉ. जयसिंगराव पवार यांनी संपादीत केलेल्या ग्रंथाचा आढावा घेण्यात आला. प्रा. एस.ए.पाटील यांच्या 'मराठेकालीन दुष्काळ' या ग्रंथाचाही आढावा घेण्यात आला.

अशा प्रकारे तीन घटकामध्ये गतकालीन इतिहासाचे वर्गीकरण करुन त्यावर भाष्य करण्यात आले. असे वर्गीकरण करताना उपलब्ध ग्रंथ, संदर्भग्रंथ तसेच इंग्रजी, मराठी कोश, विविध शोधपत्रिकांतील संशोधनपर लेख तसेच इंटरनेटवर उपलब्ध झालेली सामग्री याचाही आढावा घेतला आहे. १९४९ साली 'संभाजीकालीन

पत्रसारसंग्रह' शं. ना. जोशी यांनी संपादन केला आहे. तसेच पांडूरंग पिसुर्लेकर यांनी पोर्तुगीज कागदपत्रांचे दोन खंड प्रकाशित करण्यात आले. दुसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत स. शं. देसाई म्हणतात, "खरे सांगावयाचे तर कुठल्याही राष्ट्राचा इतिहास हा त्या देशाच्या साधनसंपत्तीवर आधारीत असतो. त्या देशाच्या इतिहासाची इतर भाषेतील साधने ही दुय्यम म्हणून समजली पाहिजेत. परंतु एखादी आकृती जशी विविध रंग भरविल्याविना पूर्ण होत नाही तसेच एखाद्या देशाच्या इतिहासाचेही असते. त्या देशासंबंधीची इतर देशातील साधने उपयोगात आणल्याखेरीज तो इतिहास पूर्ण होत नाही." (पिसुर्लेकर पांडूरंग "मराठयांच्या इतिहासाची साधने पोर्तुगीज दपतर" खंड २ प्रकाशन महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळ मुंबई, पृष्ठ ३) हे सूत्र घेऊन या अभ्यासामध्ये पोर्तुगीज कागदपत्रांचे आकलन करण्यात आले आहे. तसेच साधनांची चिकित्सा करून पोर्तुगीज, इंग्रज, फ्रेंच या साधनांच्या आधारे छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे काही नवे रंग प्रकाशात आणले आहेत. त्यामुळे छ. संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास परिपूर्ण करण्याच्या दृष्टीने भर दिला आहे.

### ३. संशोधन पध्दती

या प्रकरणात छ. संभाजीकालीन लोकजीवनाचा अभ्यास करण्यासाठी योजलेल्या संशोधन पध्दतीवर चौफेर प्रकाश टाकला आहे. या प्रकरणात प्रथम इतिहास एक सामाजिकशास्त्र या नात्याने त्यातील संशोधनाच्या नवीन प्रवाहावर प्रकाश टाकला आहे. तसेच ऐतिहासिक संशोधन पध्दतीची रूपरेषा स्पष्ट केली आहे. या अभ्यासासाठी तथ्य संकलनाच्या प्राथमिक, दुय्यम साधनांवर विशेष प्रकाश टाकला आहे. तसेच या अभ्यासात वर्णनात्मक संशोधन आराखडा का व कसा वापरला ते नमूद केले आहे.

तसेच छ. संभाजीकालीन लोकजीवन स्पष्ट करण्यासाठी प्राथमिक व दुय्यम साधनांची ओळख करुन देऊन त्यांची सत्यता व विश्वसनियता पडताळण्यासाठी अंतरंग व बहिरंग परिक्षणाच्या पध्दती दिल्या आहेत. तसेच हे शोधकार्य उद्दिष्टांनुरुप कशा प्रकारे पूर्ण केले जाणार आहे तेही स्पष्ट केले आहे. त्यामुळे हा अभ्यास परीपूर्ण सर्वांगीण व सर्वंकष करण्यावर भर दिला आहे. शिवकालीन पत्रसार संग्रह खंड १,२,३ व छ. संभाजीकालीन पत्रसार संग्रह, शिवकालीन पत्रे, मराठयांच्या इतिहासाची साधने, वि.का. राजवाडे यांचे खंड डॉ. पिसूर्लेकर यांनी संपादित केलेली छ. संभाजी पोर्तुगीज संबंधांची कागदपत्रे खंड २ तसेच इतिहास संकिर्ण निबंध इ. आधार घेण्यात आला. छ. शिवाजी व छ. संभाजीकालीन सामाजिक व आर्थिक इतिहासाचा अभ्यास करत असतांना पूरक असे वाङमयीन साधने येथे अभ्यासली आहेत. छ. संभाजीकालीन लोकइतिहासाचे आकलन करतांना तत्कालीन लोकजीवनाचे विविध पैलू उलगडण्यासाठी पोषक अशा साधनांवर या प्रकरणात प्रकाश टाकण्यात आला आहे.

लोकइतिहासाची मांडणी करतांना उपलब्ध साधनांचे नव्याने आकलन व विश्लेषण करावे लागते तसेच ही सर्व साधने शास्त्रीय पध्दतीने पुन्हा पुन्हा पडताळून पहावी लागतात. पूर्व इतिहासाचे नवे स्वरुप हे साधन चिकित्सा व नव्या मांडणीवर अवलंबून असते. त्यादृष्टीने प्रस्तुत प्रकरणात उपरोक्त नोंद केली असता सर्व साधनांचे पुनश्च नवीन समाजशास्त्रीय दृष्टीने परिशीलन करण्यात आले. लोकहिताची नवीन बैठक लक्षात घेऊन त्याआधारे इतिहासाची नवी मांडणी करण्यावर भर देण्यात आला आहे.

लोकइतिहासाची जडणघडण करताना केवळ राजकीय घटनांची जंत्री देऊन चालत नाही तर तत्कालीन लोक आणि परिस्थिती, राजा आणि लोककल्याणाचे निर्णय तसेच सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक घडामोडी आणि त्याचे लोकजीवनावर पडलेले

पडसाद हे सर्व पैलू अभ्यासावे लागतात. असा अभ्यास केवळ एका साधनाने पूर्ण होत नाही. तो पूर्ण करताना परस्पर पूरक साधनांचा सम्यक दृष्टीने विचार करावा लागतो. असा विचार येथे संशोधकाने केला आहे. त्यामुळे संभाजीकालीन इतिहासाची मांडणी करताना केवळ राजा आणि राजपद याभोवती नव्हे तर लोक आणि त्यांच्या संस्था याभोवती इतिहासाची जडणघडण करण्यावर या संशोधनात भर देण्यात आला. तेच या लोकइतिहासाच्या अभ्यासाचे मुलभूत केंद्रस्थान आहे हे येथे लक्षात घेतले आहे.

### ४. नव्या साधनांच्या आधारे छ. संभाजी महाराजांचे जीवन व कार्य

या प्रकरणात छ. संभाजींच्या जीवनातील प्रमुख घटनांचा आढावा घेतला आहे. त्यामध्ये गृहकलह, मंचाकारोहन, कट व काटशह, संभाजी - अकबर युती, मोगल बादशहाचे दक्षिणेत आगमन, संभाजी सिध्दी, पोर्तुगीज इंग्रज संघर्ष, औरंगजेबाचे डावपेच, संभाजीस अटक व वध अशा प्रमुख घटनांचा आढावा घेतांना जुन्या साधनांची नव्याने पडताळणी केली आहे. व काही नवीन साधने वापरली आहे. त्यामुळे पूर्वीच्या अभ्यासकांनी संभाजीवर अन्याय करणारे जे विश्लेषण केले त्यापेक्षा काही नवे पैलू प्रकाशात आणले आहे. डॉ. कमल गोखले यांनी शिवपुत्र संभाजी या ग्रंथामध्ये छ. संभाजी महाराजांच्या चरित्राचे नवे पैलू अभ्यासले आहेत. अशोक शिंदे सरकार यांनी संभाजी राजांच्या प्रतिभाशक्तीवर नवा प्रकाश टाकला आहे.

डॉ. पी.एस. जोशी यांनी छ. संभाजी महाराजांच्या प्रशासकीय कौशल्यावर प्रकाश टाकला आहे. डॉ. रविंद्र रामदास यांनी पोर्तुगीज कागदपत्रांच्या आधारे युध्दप्रिय संभाजीच्या वृत्तीवर नवा प्रकाश टाकला आहे. पिसुर्लेकर संपादीत कागदपत्रांच्या आधारे पोर्तुगीज इतिहासावर प्रकाश टाकला आहे. वा.सी. बेंद्रे, डॉ. सदाशिव शिवदे, डॉ. एस. ए. बाहेकर, डॉ. जयसिंगराव पवार, यांच्या नव्या अभ्यासू लेखनाचा या प्रकरणात नवी मांडणी करण्यासाठी निश्चित उपयोग झाला आहे.

छ. संभाजी व मोगल यांच्या संघर्षाचे तीन पैलू आहेत. या तीनही पैलूंचा उलगडा करतांना येथे नवीन साधने वापरली आहेत. तसेच पोर्तुगीज, इंग्रज, सिध्दी यांच्याशी छ. संभाजीचे जे संबंध आहे त्याचाही आढावा घेतला आहे. छ. संभाजी व शहजादा अकबर यांच्या भेटीचे व सफल योजनेचे आकलन येथे केले आहे. ही योजना सफल झाली असती तर इतिहासाला नवी कलाटणी मिळाली असती. छ. संभाजी व मोगल यांच्या संघर्षातील अखेरचे पर्व हे अत्यंत धकाधकीचे होते. त्यावरही येथे प्रकाश टाकला आहे. या संघर्षाचे आकलन केले असता चरित्राचे अनेक नवे पैलू समोर आले आहेत हाच या प्रकरणाचा गाभा आहे.

छ. संभाजींचे चरित्र हे एका दशकापुरते मर्यादित असले तरी त्याचे मागील व पुढील संदर्भ अभ्यासता त्यांच्या चरित्राचा कालखंड हा केवळ दहा वर्षांचा उरत नाही तर तो तीस वर्षांचा होतो. त्यांनी केलेला पूर्व उत्तरकालीन संघर्ष दोन दृष्टीने महत्त्वाचा आहे. पूर्वकालीन संघर्षात त्यांनी स्वराज्याची घडी बसविली. प्रशासनाची चौकट भक्कम केली तर उत्तरकालीन प्रशासनात हिंदवी स्वराज्याच्या लक्षणाचा लोकलढा आपल्या अनुपस्थितीत चालू रहावा म्हणून त्यांनी घेतलेली काळजी व त्यांनी केलेली आखणी पाहता छ. संभाजींच्या वधानंतरही त्यांनी पेरलेली मूल्ये जिवंतपणे उभी राहिली आणि त्याआधारे मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धास आवश्यक अशी ऊर्जा त्यांच्या बलिदानातून प्राप्त झाली. त्यांनी तयार केलेल सरदार, त्यांचे सहकारी तसेच त्यांनी उभारलेल्या धर्मसंस्था आणि समाजसंस्था या त्यांच्या नंतरच्या काळातही तेवढ्याच तेजस्वी आणि लखलखीत राहिल्या. त्यामुळे त्यांच्या नंतरही स्वराज्याचा हा लढा १०० वर्षे चालत राहिला.

## ५. छत्रपती संभाजीकालीन लोकजीवनाचे सामाजिक व आर्थिक पैलू

या प्रकरणात छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे नवीन समाजशास्त्रीय दृष्टीने अध्ययन केले आहे. यात प्रामुख्याने सामाजिक व आर्थिक या दोन पैलूंचा विचार केला आहे. लोकजीवनात तत्कालिन समाजातील समुदाय, त्यांच्यातील परस्पर संबंध, रुढी, परंपरा, श्रध्दा, अंधश्रध्दा इ. बाबतचे नवे आकलन केले आहे. छ. शिवाजी व छ. संभाजीकालीन आर्थिक परिस्थितीची तुलना करुन तत्कालीन दुष्काळ व त्यावर छ. संभाजीने केलेली उपाययोजना यावर प्रकाश टाकण्यात आला आहे. मध्ययुगीन सामाजिक व आर्थिक जीवनाचे विवेचन करतांना एकतर साधनांचा अभाव दिसतो व दुसरे म्हणजे लोकइतिहासाचे आकलन करतांना नव्या दृष्टीचाही अभाव दिसतो. तत्कालीन संरजामशाही व्यवस्थेमध्ये सामाजिक व आर्थिक विषमता होती. या प्रकरणात प्रथम समाजशास्त्रीय दृष्टीकोन मांडला असून त्यानंतर समाजरचना स्पष्ट केली आहे. त्यानंतर ग्रामीण जीवन, गुलामगिरी, वेठबिगारी, स्त्रीजीवन, कुटुंबपध्दती इ. पैलू स्पष्ट करण्यात आले आहे.

आर्थिक जीवनात शेती हा मुख्य व्यवसाय होता. त्यामध्ये जमिनीचे स्वरुप व प्रकार, पीके, इनामप्रकार व स्वरुप, शेती व्यवसायाची परिस्थिती, कल्याणाचे प्रयत्न जमीन महसूल पध्दत, व्यापार उदयोग, तसेच चलन, ग्रामजीवन, दळणवळण वाहतूक हे घटकही स्पष्ट करण्यात आले आहेत.

सामाजिक व आर्थिक संस्थांची व्यवस्था लक्षात घेता शिवकाळाची व संभाजी काळाची तुलना करण्यात आली. ग्रामजीवन व अर्थरचनेचा विचार करता सततची युध्दे, दुष्काळ यामुळे संस्थात्मक जीवन उध्वस्त झाल्यामुळे संभाजीच्या प्रशासनावर अधिक ताण पडला.

तथापि हा ताण कमी करण्यासाठी संभाजी महाराजांनी केलेल्या उपाययोजना

पाहता खेड्यापासून ते अष्टप्रधान मंडळापर्यंत प्रत्येकाची सुरक्षा जपण्यासाठी त्यांनी टाकलेली पावले निर्णायक ठरली. स्वराज्याचा पाया शिवाजी महाराजांनी भक्कमपणे घातला होता. तो मजबूत करण्यासाठी आवश्यक ते सामाजिक वातावरण तयार करणे व तसेच आर्थिक सुधारणांना तेवढ्याच जिद्दीने गती देण्यावर त्यांचा भर होता. त्यांनी अर्थव्यवहारात आणलेली पारदर्शकता, चलनपद्धतीत केलेल्या सुधारणा तसेच आर्थिक व्यवहाराच्या नियंत्रणासाठी टाकलेली ठाम पावले पाहता जबाबदार सामाजिक व आर्थिक जीवन आणि प्रजेच्या कल्याणाची हमी ही दोन तत्त्वे त्यांच्या लोकप्रशासनात प्रामुख्याने दिसून येतात. त्यामुळे जबाबदार आणि उत्तरदायी प्रशासन व्यवस्था निर्माण करण्यावर त्यांनी भर दिला होता.

आर्थिक जीवनामध्ये संस्थात्मक व्यवस्था बळकट करणे आणि लोकांच्या आशा आकांक्षाला तडा जाणार नाही म्हणून योग्य ती पावले टाकणे यावर त्यांचा भर होता. त्यासाठी त्यांनी घेतलेले निर्णय आणि त्यांनी राबविलेली धोरणे पाहता त्यांची दूरदृष्टी लक्षात येते. सामान्य जनतेच्या मनात आस्था व विश्वासाची भावना निर्माण करून त्यांना स्वराज्यासाठी चालू असलेल्या संघर्षात सक्रीयपणे सहभागी करून घेण्यावर त्यांचा भर होता. याकामी त्यांनी स्वराज्य व प्रजा यांच्यामध्ये सुसंवादाचे वातावरण निर्माण करण्यावर भर दिला. स्वराज्याच्या आर्थिक धोरणाचा केंद्रबिंदू रयतेचे कल्याण हा होता हे कल्याण साध्य झाल्यामुळे प्रजेला पुढील काळात सुद्धा स्वराज्यासाठी संघर्ष करण्यात काही वेळा त्याग करावा लागला तरी तशी तयारी प्रजेने ठेवली. आर्थिक आघाडीवर छ. संभाजींनी केलेल्या सुधारणा शिवकाळापेक्षा काकणभर श्रेष्ठ होत्या. रयतेला काडीचाही आजार होता कामा नये हे शिवकालीन आर्थिक प्रशासनाचे सूत्र होते.

त्याच धर्तीवर संभाजी महाराजांनी सुद्धा आपली आर्थिक धोरणे राबिवली. शेती, शेतकरी, बलुतेदार तसेच कष्टकरी यांच्या कल्याणासाठी त्यांनी धोरणे राबविली. त्यामुळे आर्थिक आघाडीवर घेतलेले निर्णय हे प्रजेच्या कल्याणासाठी पोषक होते. जमिनीची मोजणी, प्रतवारी आणि सारानिश्चिती करताना सभोवतीच्या परिस्थितीचा व संकटांचा विचार करण्यात येत असे. जर दुष्काळाची तीव्रता अधिक असेल तर सारा कमी केला जात असे, प्रसंगी तो माफही केला जात असे आणि शेतकऱ्यांना झालेल्या नुकसानाची भरपाई करण्यावर सुद्धा योग्य ते आदेश दिले जात असत. यावरून कल्याणकारी अर्थकारणाची निश्चित कल्पना येते. सहभागी प्रशासन हे जनतेच्या कल्याणाचा विचार करते आणि निर्णय प्रक्रियेत जनतेला सामावून घेत असते.

तसेच सर्वांना सारखा न्याय देऊन लोकांमध्ये समानतेची भावना रुजविली जात असते. या सर्व दृष्टीने संभाजी महाराजांच्या आर्थिक धोरणांचे परिशिलन केले असता सर्वाभूती समदृष्टी हे त्यांच्या अर्थकारणाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य असल्याचे लक्षात येते. या अनुषंगाने तत्कालीन लोकइतिहासात त्यांच्या या प्रगत धोरणाची बीजे आढळतात.

### ६. छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे धार्मिक व सांस्कृतिक पैलू.

या प्रकरणात धार्मिक व सांस्कृतिक पैलूंचा विचार केला आहे. औरंगजेबाचे धार्मिक धोरण, लोकांचा छळ, अन्याय त्यास संभाजींनी दिलेले उत्तर धर्मांतर रोखण्यासाठी केलेले शुध्दीचे प्रयत्न, अंधश्रध्दा, ग्रामीण देवता, धार्मिक सण समारंभ, तसेच सांस्कृतीक जीवनात कला, वाङ्.मय, संस्कृती, उत्सव, मनोरंजन, अलंकार, वेशभुषा, आहार, शिक्षण, भाषा इत्यादींवर प्रकाश टाकण्यात आला. धार्मिक व सांस्कृतिक पैलू हे परस्परांशी निगडीत असतात. मध्ययुगीन समाज हा चातुर्वर्ण्य मानणारा व परंपरावादी होता. त्यामुळे या समाजाला प्रतिकूल परिस्थितीतून मार्ग काढण्यास

अधिक संघर्ष करावा लागला.मोगलकालीन धार्मिक धोरणांची कटूता ही छ. संभाजीकालीन संघर्षाचे खरे कारण होते.

औरंगजेबाने स्थानिक लोकांवर जो धार्मिक अत्त्याचार केला त्याविरोधात प्रखर प्रतिक्रिया दिसून आली. तत्कालीन समाजातील अंधश्रध्दा, रुढी, परंपरा तसेच सतीप्रथा बहुपत्नीत्व विवाहपध्दती, धर्मकल्पना, मुहूर्त, शकुन, पायगुण, ग्रहणे, नवस, अनुष्ठान करणे, होमहवन, गृहशांती इ. पैलू अभ्यासले आहेत. तर सांस्कृतिक जीवनात सण समारंभ, उत्सव, मनोरंजनाची साधने, अलंकार, पोशाख, केशभूषा, साहित्य, कला, परंपरा यांचा आढावा घेण्यात आला. संभाजीकालीन सांस्कृतिक जीवनाचे अनेक उपयोजीत पैलू व त्यांचे पदर येथे नव्याने उलगडतात. असे हे प्रकरण नवीन दृष्टीने सांस्कृतिक जीवन स्पष्ट करणारे आहे.

मोगल सम्राट औरंगजेबाच्या धार्मिक धोरणातील तफावत आणि विषमता लक्षात घेता छ. शिवाजी महाराजांप्रमाणेच छ. संभाजी महाराजांनी आपल्या प्रजेवर होणाऱ्या धार्मिक जुलूम व जबरदस्तीपासून प्रजेचे रक्षण केले. तसेच स्वतःच्या धार्मिक धोरणात मोगल बादशहाप्रमाणेच अपपरभाव असू नये म्हणून हिंदू व मुस्लिम यास समानतेने वागविले. तसेच अन्य धर्मियांचाही आदर केला. साधू व संत हे कोणत्याही धर्मपंथाचे अनुयायी असले तरी त्यांच्या कार्यातील प्रजेच्या कल्याणाचा दृष्टीकोन लक्षात घेऊन त्यांना उदार अंतःकरणाने आर्थिक मदत दिली जात असे. इनामी जमीन तसेच देवालयांच्या दिवाबत्तीसाठी केलेले साह्य यामध्ये कोणत्याही बाबतीत फरक केला जात नसे. सांस्कृतिक सण, समारंभ व उत्सव यांचे समाजातील महत्त्व लक्षात घेऊन त्यांना उचलून धरण्यासाठी पोषक अशी आर्थिक मदतीची पावले टाकल्याची अनेक उदाहरणे दाखविता येतात.

तसेच सक्तीचे धर्मांतर होऊ नये म्हणून राज्यव्यवस्था डोळ्यात तेल घालून जपत असे. अशी सक्तीची धर्मांतरे स्वराज्यात झाली असता त्यांना परत हिंदू धर्मात घेण्यासाठी शुद्धी चळवळ करून त्यास सन्मानाने वागविण्याचा प्रयत्न केला जात असे. या संदर्भात हर्सुल येथील रंगो बाबुजी कुलकर्णी यांचे उदाहरण लक्षणीय असून, छ. संभाजी महाराजांनी या बाबतीत लक्ष घालून स्वतः घेतलेले निर्णय हे पुढील काळातील राज्यकर्त्यांना वस्तुपाठ घालून देणारे ठरले. त्यांच्या सहिष्णू धार्मिक धोरणाचा विचार करता सर्व धर्म समभाव आणि सर्वांना सारखा न्याय हे त्यांच्या धार्मिक धोरणाचे मुख्य सूत्र असल्याचे लक्षात येते. लोकांच्या सांस्कृतिक अस्मितेचे रक्षण करण्यासाठी छ. शिवाजी महाराजांनी जशी पावले टाकली तशी व त्यापेक्षा अधिक प्रभावी अशी पावले टाकल्याचे संभाजी महाराजांच्या सांस्कृतिक धोरणावरून दिसून येते.

## ७.३ ठळक निष्कर्ष

**१. छ. संभाजी महाराजांनी प्रतिकूल परिस्थितीत स्वातंत्र्याचे संरक्षण केले आणि आपले अष्टपैलू कर्तृत्त्व सिध्द केले.**

१६८०-१६८९ या अल्प कालखंडामध्ये छ. संभाजी महाराजांनी आपले कर्तृत्त्व सिध्द केले त्यांच्या चौफेर कर्तृत्वाचे दर्शन त्यांच्या आक्रमक राजकीय कृतीतून स्पष्ट होते. त्यांनी केलेला त्याग व संघर्षामुळे स्वतंत्र या सूत्रावर श्रध्दा असलेला महाराष्ट्र समाज एकदिलाने मोगलांशी लढा देण्यासाठी उभा राहीला. या समाजाने केलेल्या संघर्षामुळे नवा इतिहास घडू शकला. मल्हार रामराव चिटणीस यांनी छ. संभाजी महाराजांच्या या बखरीतून रेखाटलेले संभाजीचे बदफैदी व व्यसनी चित्र चूकीचे असून त्यांनी केलेला पराक्रम हा त्या टीकेपेक्षा श्रेष्ठ असून तो त्यांच्या कर्तृत्त्वाची

तेजस्वी किनार स्पष्ट करणारा आहे. संभाजी महाराजांनी मोगल, पोर्तुगीज आणि इंग्रजांशी केलेला संघर्ष पाहता पोर्तुगीजांनी त्यांचे केलेले 'वॉर लाईक प्रिंस' म्हणजे 'युद्ध आवडणारा राजपुत्र' हे वर्णन सार्थ असल्याचे दिसून येते. संभाजी महाराज प्रत्यक्ष रणांगणावर सैन्याचे स्वतः नेतृत्व करत. त्याहीपेक्षा ते महसूल व्यवस्था, लष्करी प्रशासन, उदार धार्मिक धोरण आणि विशाल सांस्कृतिक संवर्धनाची दृष्टी पाहता छ. शिवाजी महाराजांप्रमाणेच कल्याणकारी राज्याचे पुरस्कर्ते असल्याचे स्पष्ट होते.

छ. संभाजी महाराजांनी साधूसंतांशी साधलेला संवाद आणि विद्या व कलांना त्यांनी दिलेले प्रोत्साहन पाहता त्यांच्या अष्टपैलू कर्तृत्त्वाची जाणीव होते. त्यांनी ज्योतिषशास्त्र, तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र इ. ज्ञानशाखांमध्ये महत्त्वाची भर टाकली आणि मौलिक ग्रंथरचनाही केल्या. संस्कृत पंडितांना त्यांनी दिलेला राजाश्रय आणि ज्ञान संवर्धनासाठी त्यांनी केलेले पोषक कार्य पाहता संभाजी महाराजांनी केवळ हिंदवी स्वराज्याची बैठक भक्कम केली एवढेच नव्हे तर हे हिंदवी स्वराज्य अधिक विशाल व व्यापक करून त्याच्या वटवृक्षाखाली सामान्य माणसाला सुखनैव जीवन जगण्यासाठी पोषक वातावरण तयार केले.

**२. छ. संभाजी कालीन लोकजीवन हे संघर्षामूळे ढवळून निघाले राजाप्रमाणे प्रजेसही संघर्षास सामोरे जावे लागले. राजाने हा संघर्ष सुसह्य होण्यासाठी विविध उपाय योजना केल्या.**

छ. संभाजी महाराजांनी आपल्या नऊ वर्षांच्या काळात मोगलांशी तीन वेळा संघर्ष केला अन्य शत्रूंपेक्षाही छ. संभाजीवर औरंगजेबाने केंद्रीकरण केले होते. त्यामुळे मोगल सत्तेचे अस्मानी संकट महाराष्ट्रावर चालून आले असता संभाजी महाराजांनी स्वतः निकराचा संघर्ष केला. शिवाय प्रजेलाही या संघर्षास सामोरे जावे लागले. त्यासाठी त्यांनी साधूसंत, बैरागी, कीर्तन, प्रवचन या माध्यमातून प्रजेला या

संघर्षासाठी प्रवृत्त केले. छ. संभाजी महाराजांच्या अष्टपैलू कर्तृत्त्वाची रुपे या संघर्षातून प्रकट होतात.

या संघर्षाच्या काळात लोकजीवन सुसह्य व्हावे म्हणून संभाजी महाराजांनी यथायोग्य पावले टाकली. आपल्या लष्करी मोहीमांचा सामान्य प्रजेच्या जीवनावर प्रतिकूल परिणाम होऊ नये म्हणून ते शिवाजी महाराजांप्रमाणेच योग्य ती काळजी घेत असत. तसेच या कालखंडात अवर्षणामुळे निर्माण झालेल्या दुष्काळी परिस्थितीस तोंड देण्यासाठी संभाजी महाराजांनी योग्य ती पावले टाकली. ठिकठिकाणी पाटबंधारे बांधून पाण्याची साठवण केली आणि दुष्काळात शेतकऱ्यांना मदतीचा हात दिला. त्यांचा सारा कमी केला. जनावरांसाठी चारा पाण्याची सोय करून त्यांची योग्य ती काळजी घेतली.

हे सर्व उपाय स्वराज्याचा लौकिक वाढविण्यासाठी आणि प्रजेमध्ये आत्मविश्वास निर्माण करण्यासाठी पोषक ठरले.

**३. छ. संभाजीकालीन सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक, धार्मिक जीवन हे अस्मिता जपणारे व स्वातंत्र्यास प्रेरक व पूरक होते.**

छ. संभाजीकालीन समाज हा स्वातंत्र्याच्या मूलभूत प्रेरणा जोपासणारा होता. छ. शिवाजी महाराजांनी ज्या उदात्त मानवी मूल्यावर आधारलेला महाराष्ट्र समाज उभारला होता. त्या मूल्यांच्या उभारणीसाठी छ. संभाजीकालीन महाराष्ट्र कटीबध्द होता. तत्कालीन समाजातील व्यवस्था ही परंपरावादी, सनातनी, वाटत असली तरी मोघलांशी लढतांना सर्वंकश मूल्यप्रेरणा जोपासण्याची काम करत होती. रणाविना स्वातंत्र्य कोणा मिळाले या मूल्यधारणेप्रमाणे राजाप्रमाणे प्रजासुध्दा संघर्षाला तयार होती. त्यामुळे संताजी व धनाजी यांच्यासारखे वीर याकाळात पुढे आले. व त्यांनी मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द चालू ठेवले.

प्रतिकूल अशा परिस्थितीत सामान्य माणसाच्या अंतःकरणात स्वराज्याविषयी असलेली निष्ठा तेजस्वीपणे तळपत ठेवणे हे महत्त्वाचे ध्येय होते. त्यासाठी साधूसंतांच्या विचार जागरणातून देशभक्ती व समाजसेवा ही मूल्ये जोपासली गेली. तसेच सामान्य शिपाई आणि सरदार यांच्या अंतःकरणात प्रखर देशभक्तीचा भाव जागृत झाल्यामुळे तळहातावर शर घेऊन जगण्यासाठी लागणारा निश्चय आणि समर्पणाची भावना जोपासणे शक्य झाले. शत्रूच्या मोठ्या सैन्याशी कमी संख्याबळाने लढणे आणि जिंकणे ही विजूगिषू मानसिकता शिवाजी महाराजांनी जोपासली होती. हीच मानसिकता संभाजी महाराजांनी जोपासल्यामुळे त्यांना पोर्तुगीजांविरुद्धच्या प्रत्येक लढाईत निश्चितपणे भरघोस यश मिळाले. युद्ध कोणतेही असो, नियोजन, निश्चय आणि निर्धाराने वाटचाल करण्याची क्षमता त्यांनी आपल्या सैन्यामध्ये निर्माण केली होती.

**४. दुष्काळासारख्या आपत्तीशी सामोरे जातांना छ. संभाजीचे प्रशासकीय कौशल्य सिध्द झाले .**

वारंवार पडणारा दुष्काळ हा सामान्य माणसाचे जीवन कठीण करत होता. अशावेळी छ. संभाजी महाराजांनी टाकलेली धाडसी पाऊले निर्णायक ठरली. त्यांनी तत्कालीन परिस्थितीला हाताळण्यासाठी शेतसारा माफ केला तसेच धरणे व बंधारे बांधली मोहळ. जि. सोलापूर येथे केलेले बांधकाम याचे उदाहरण होय. अस्मानी सुल्तानी मोगल आक्रमकाशी लढणारा स्थानिक शेतकरी हा दुष्काळांच्या तीव्र संकटात सापडला असता त्याला वाचविणे हे राजाचे कर्तव्य आहे. या भावनेने छ. संभाजी महाराजांनी घेतलेले निर्णय महत्त्वाचे ठरतात. त्यामुळे छ. संभाजी काळातील जनता दुष्काळाशी निर्भयपणे मुकाबला करु शकली.

छ. संभाजी महाराजांनी स्वराज्यात ठिकठिकाणी दुष्काळ निवारणासाठी केलेली उपाययोजना ही त्यांच्या योजकतेची साक्ष पटवते. सोलापूर जिल्ह्यात मोहोळ येथे दुष्काळ पडला असता नदीवर बंधारा बांधून जलसंचय करण्याची योजना त्यांनी कृतीत आणली. शिवकालीन पाणी साठवण्याचे विविध प्रकार व प्रयोग त्यांनी अधिक विश्वासाने पुढे चालविले. गडावरील पेयजलाचा साठा नागरी वस्तीमधील पिण्याच्या पाण्याचा संचय तसेच शेतीसाठी लागणारे पाणी या तिन्ही बाबतीत त्यांनी योग्य ती काळजी घेतल्यामुळे संभाजी काळात उद्‌भवलेल्या दुष्काळाप्रसंगी लोकक्षोभ निर्माण झाला नाही. उलट शत्रूशी लढताना प्रजेने संभाजी काळात राजा आणि सैन्यदलास भरपूर नैतिक साह्य केल्याचे दिसून येते. हीच संभाजीच्या दूरदर्शी आर्थिक धोरणाची फलश्रुती म्हटली पाहिजे.

**५. मोगलांशी व पोर्तुगीजांशी लढतांना छ. संभाजी महाराज सरस होते .**

छ. संभाजी महाराजांनी आपल्या काळात मोगलांशी तीन वेळा संघर्ष केला. प्रत्येक संघर्ष हा मागील संघर्षापेक्षा अधिक तीव्र व निर्णायक स्वरुपाचा होता. भावी कालखंडामध्ये करावयाचा संघर्ष हा निर्णायक आहे. हे संभाजीच्या सहकार्‍यांना इ ाात होते. पोर्तुगीजांशी लढतांना संभाजीचे कर्तृत्त्व अधिक सिध्द होते. प्रत्यक्ष समोरासमोरच्या लढाईत पोर्तुगीजांना नमवीत संभाजीस शिवाजी महाराजांपेक्षाही अधिक यश आले. हे पोर्तुगीज कागदपत्रांवरुन दिसून येते. त्यामुळे ते संभाजीचे 'युध्द आवडणारा राजपुत्र' असे वर्णन करतात. मोगल, पोर्तुगीज, इंग्रज, सिध्दी अशा एकाच वेळी चारही मात्तबर शत्रूंशी संभाजी महाराज लढत होते यावरुन त्यांचे आक्रमक नेतृत्त्व नजरेत भरते.

एक सरसेनापती आणि कुशल प्रशासक तसेच युद्धाच्या वेळी योजकतेने डावपेच आखणारा दूरदृष्टीचा संघटक अशा त्रिविध अंगांनी छ. संभाजींचे कर्तृत्त्व तेजस्वी

बनल्याचे दिसते. त्यांच्याशी राज्यव्यवहार करताना पोर्तुगीजांनी त्यांना दिलेली प्रतिष्ठा ही केवळ नावलौकिकापुरतीच साजेशी नव्हती तर संभाजी महाराजांच्या बलशाली कामगिरीमुळेच पोर्तुगीज त्यांना नमले होते. हे प्रकर्षाने लक्षात घेतले पाहिजे.शहजादा अकबराशी केलेली युती आणि त्यानंतरचे राजकारण याबाबत त्यांनी अधिक सावधपणे पावले टाकली असती तर औरंगजेबाचा पराभव करणे त्यांना शक्य झाले असते.

**६. संभाजी महाराजांनी स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी लोकलढा उभारला.**

तत्कालीन सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचे सार असे सांगता येईल की संभाजी महाराजांनी स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी एक आक्रमक लोकलढा उभारला या काळात त्यांच्याप्रमाणेच त्यांच्या प्रजेचेही हाल झाले पण त्यांनी आपल्या सैन्यांच्या व प्रजेच्या कल्याणासाठी योग्य ती पावले टाकली. दुष्काळात त्यांनी घेतलेली काळजी व सैन्याच्या कल्याणासाठी त्यांनी योजलेले उपाय हा विचार अधिक प्रभावीपणे स्पष्ट होतो. प्रजा हितदक्ष व लोककल्याणासाठी राजा असतो हे कौटिल्याचे सूत्र घेऊन संभाजींनी राज्य चालविले. संभाजीचे भारतीय राजनितीमधील योगदान यावरून स्पष्ट होते.

छ. संभाजी हे स्वतः संस्कृत भाषेचे अभ्यासक असल्यामुळे त्यांनी राजनितीवरील प्राचीन ग्रंथांचा अभ्यास करून आपल्या राज्याचा कारभार हाकण्यासाठी टाकलेली पावले ही तत्त्व आणि व्यवहार यामध्ये सुसंगती साधणारी होती. मोगलाविरुद्ध लढायचे तर एकटा राजा लढून उपयोगाचे नाही त्यासाठी समग्र प्रजेचे नैतिक बळ उंचावले पहिजे हा त्यांचा सिद्धांत होता. त्यामुळे मोगलाविरुद्ध लोकलढ्याचे संघटन करण्यास छ. संभाजींना यश आले, असे निश्चितपणे म्हणता येईल.

**७. संभाजीकालीन लोकजीवन हे संघर्ष व मूल्यनिष्ठा यावर आधारलेले होते .**

संभाजीकालीन महाराष्ट्रातील समाज हा संघर्ष व मूल्यनिष्ठेवर आधारलेला होता. धर्मासाठी संभाजी महाराजांनी वीरमरण पत्करले. ''व्यर्थ न हो बलीदान'' या काव्य वचनाप्रमाणे संभाजीराजांनी केलेले संघर्षाचे विराट रुप हे महाराष्ट्र समाजासमोर उभे राहिले. गतकालीन आदर्श जपावयाचे असतील तर मोगलांशी त्याच पातळीवर संघर्ष करावा लागेल. हे छ. संभाजी महाराजांनी ओळखले होते. त्यामुळे मोगलांशी कोणतीही तडजोड न करता त्यांनी आपल्या उभ्या आयुष्यात संघर्ष व मूल्यनिष्ठा यावर अधिक भर दिला व प्रजेनेही तो जोपासला असे म्हटले पाहिजे.

मोगल सम्राट औरंगजेबाशी अखेरच्या क्षणी संभाजी महाराजांनी केलेला संवाद हा त्यांच्या प्रखर अस्मितेची साक्ष पटवतो. स्वराज्य, स्वधर्म आणि सुसंस्कृती हेच जीवनाचे सर्वस्व आहे. प्राण गेला तरी बेहत्तर परंतु स्वराज्याची शान जाता कामा नये या भावनेने संभाजी महाराज मोगलांनी केलेल्या सर्व छळास सामोरे गेले. त्यांच्या या अतुलनीय धैर्य व संघर्षाची दंतकथा बनली. आणि ही दंतकथा महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात पोहोचली. ज्या पद्धतीने मराठ्यांच्या शूर राजपूत्रास अपमानित करण्याचा मोगलांनी प्रयत्न केला तो पाहता संभाजी महाराजांनी स्वराज्याचा स्वाभिमान अखेरपर्यंत जागृत ठेवला आणि या स्वाभिमानाच्या ज्योत सतत तेवत ठेवल्यामुळे महाराष्ट्रातील प्रजा त्यांच्या ध्येयवादाकडे आणि मूल्यसमर्पणाकडे नतमस्तक होऊन पाहू लागली. व्यर्थ न हो बलिदान या न्यायाने त्यांच्या बलिदानास प्रेरक सलामी देण्यासाठी म्हणून महाराष्ट्रात राजाविना मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध उभे राहिले या अपूर्व ज्वालांमध्ये शेवटी मोगलसम्राट औरंगजेबाचा दारूण पराभव झाला आणि १७०७ साली त्यास अहमदनगर येथे मृत्यू आला. हा सर्व मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाचा परिपाक होता.

## ७.४ नवी सैध्दांतिक मांडणी :

लोकजीवनाचा अभ्यास हा ऐतिहासिक व समाजशास्त्रीय दृष्टीने केला असता तो अधिक वस्तूनिष्ठपणे करता येतो. सामाजिक इतिहासाची संकल्पना स्पष्ट करतानां Brockhampton ने म्हटले आहे; Social history is a branch of history that documents the living and working conditions of people rather than affairs of state. only in the early 20th century did historians begin to study how people lived and worked in the past. राज्याच्या घडामोडींपेक्षा लोकांच्या जीवनशैली व कार्यपध्दती यांबाबत अध्ययन करणारी ज्ञानशाखा म्हणजे "सामाजिक इतिहास" होय. विसाव्या शातकाच्या प्रारंभी इतिहासकारांनी गतकालीन लोक कशाप्रकारचे जीवन जगत होते याच्या अभ्यासाला प्रारंभ केला. छत्रपती संभाजी महाराजांविषयी राजकीय दृष्टीने अभ्यास झाला असला तरी तत्कालीन लोकजीवनाबाबत शास्त्रीय अध्ययन झाले नाही म्हणून हा अभ्यास करण्यात आला.

सामाजिक इतिहासामध्येच आर्थिक इतिहासाचा समावेश होतो. व्हॅन डीलन याने आर्थिक इतिहासाला सामाजिक इतिहासाची शाखाच मानली आहे. त्याच्यामते या शाखा परस्पर पूरक आहेत. सामाजिक इतिहासामध्ये प्रामुख्याने मानवप्राणी, समाज, चालीरिती, कार्यपध्दती, संपत्ती, श्रध्दा, अन्नवस्त्र, करमणूकीची साधने, खाजगी जीवन, उत्सव, सामाजिक संस्था यासर्वांचा अभ्यास केला जातो. छ. संभाजी महाराजांचा अभ्यास करतांना या सर्व पैलूंवर प्रकाश टाकण्यात आला. सामाजिक इतिहास लिहीत असतांना अनेक गोष्टींचा विशेषतः धर्म, वाङ्मय, संगीत, तत्त्वज्ञान, कला यांचा प्रभाव कसकसा पडत गेला हे दाखवून दिले पाहिजे. छ. संभाजीकालीन महाराष्ट्राचा सामाजिक, धार्मिक, अर्थिक व सांस्कृतिक अशा

चारअंगांनी अभ्यास केला असता छ. संभाजी महाराजांच्या इतिहासाचे नवे आकलन होऊ शकते.

अशा प्रकारे छ. संभाजीकालीन लोकजीवनाची चौरस मांडणी या प्रबंधात करण्यात आली. संभाजीकालीन महाराष्ट्र समाजावर मोगल बादशहा औरंगजेबाने चौफेर राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक आक्रमण केले होते. अशावेळी स्वराज्याचे सत्त्व व स्वत्त्व राखून ठेवण्यासाठी छ. संभाजी महाराजांना निर्णायक लोकसंघर्ष करावा लागला. अत्यंत दूरदृष्टीने प्रशासन चालविताना छ. संभाजी महाराजांनी एकाहून एक धाडसी निर्णय घेतले. मोगल, पोर्तुगीज, सिध्दी यांची आक्रमणे पाठीवर घेऊन त्यांना प्रशासन करावे लागले. तथापि त्यांनी कधीही न डगमगता लोक कल्याणकारी निर्णय घेतले. छ. संभाजी महाराजांच्या कार्यकर्तृत्वाची अनेक पैलूंनी मीमांसा केली असता त्यांनी लोकजीवनाला कसा आकार दिला याची प्रचिती येते. संभाजीकालीन महाराष्ट्र जीवन हे मोगलांच्या आक्रमणामुळे सुलतानी संकटात सापडले होते. संभाजी महाराजांनी या आक्रमणाशी स्वतः सामना केला. शिवाय प्रजेलाही सर्वंकष सामना करण्याची प्रेरणा दिली.

स्वराज्याच्या रक्षणामध्ये सामान्य प्रजा ही महत्त्वाची भूमिका पार पाडते. प्रजेचे हित साध्य करण्यासाठी प्रजेवर पुत्रवत प्रेम करावे लागते व त्यातून त्यांचा विश्वास संपादन करावा लागतो. छ. संभाजी महाराजांनी प्रजेचा असा अलोट विश्वास संपादन केला होता. छ. शिवाजी प्रमाणे ते निश्चयाचे महामेरु होते. बहूत जणांस आधार देण्याचे वटवृक्षाचे सामर्थ्य त्यांच्या प्रशासनात होते. कुठल्याही प्रतिकूल परिस्थितीशी निर्धारपूर्वक मुकाबला ते करु शकत होते. तत्कालीन सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक जीवनाचा संघर्ष हा पदर होता. मूल्यनिष्ठा हा आत्मा होता. एका नव्या उमेदीने स्वराज्याचे रक्षण करण्यासाठी प्रेरक अशी मूल्यप्रेरणा छ. संभाजी

महाराजांनी निर्माण केली. आयुष्यभर मोगल, पोर्तुगीज, सिध्दी यांच्याशी त्यांनी निकराचा संघर्ष केला. शेवटी प्राणार्पण करुन व हौतात्म्य पत्करुन ते अमर झाले.

छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे अध्ययन केले असता समोर येणारे सूत्र हे स्पष्ट करते की, संभाजीकालीन लोकजीवन हे स्वराज्याच्या मूल्यावर आधारलेले होते. स्वातंत्र्य, समता आणि बंधूता ही मूल्ये जपण्यासाठी छ. संभाजी महाराजांनी आपल्या राजकीय जीवनातील प्रत्येक क्षण समर्पित भावनेने घालविला. तसेच त्यांनी आपल्या सामाजिक, आर्थिक, धार्मिक व सांस्कृतिक धोरणांना सुद्धा प्रजेच्या कल्याणाचे अधिष्ठान प्राप्त करून दिले. मोगल सम्राट औरंगजेब आणि पोर्तुगीजांनी केलेला धार्मिक छळ हा प्रजेसमोर होता. त्यापेक्षा आपले शासन हे लोक कल्याणकारी आहे, ते लोकांच्या धर्मभावनांचा आदर करते. लोकांच्या कल्याणाची बूज राखते आणि अधिकाधिक प्रमाणात लोकहित साध्य करण्यावर भर देते. असा विश्वास त्यांनी निर्माण केला. दहा वर्षांच्या कालावधीत प्रशासन आणि प्रजा, संस्था आणि लोक आणि धर्मसंस्कृतीचे रक्षण आणि स्वराज्याची जबाबदारी या तीनही बाबतीत विचार करता संभाजी महाराजांनी कधीही आपल्या तत्त्व व व्यवहारात अंतर पडू दिले नाही.

समर्थ रामदासांनी त्यांना केलेला उपदेश हा विलक्षण दिशादर्शक होता. त्यानुसार शिवरायांचे रूप, प्रताप आणि साक्षेप आठवून त्या पावलावर पाऊल ठेवून कार्य करावे असा त्यांचा आग्रह होता. त्यानुसार छ. संभाजी महाराजांनी दशकामध्ये आपला राज्यव्यवहार संपूर्णपणे लोकाभिमुख करण्याचा प्रयत्न केला. प्रजा आणि प्रजेचे हित हे त्यांच्या तत्कालीन प्रशासनाचे मुख्य सूत्र होते. त्यातूनच तत्कालीन लोकजीवन घडत गेले आणि या लोकजीवनात श्रद्धा, विश्वास आणि बळकटी निर्माण करण्यावर त्यांनी भर दिला. त्यामुळे त्यांच्या बलिदानानंतरही मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध अखंडपणे गतीमान राहिले. त्यातच त्यांच्या कार्याचे श्रेष्ठत्व जाणवते.

## ७.५ उपसंहार

अशा प्रकारे छ. संभाजीकालीन लोकजीवन हे प्रतिकूलतेवर आधारलेले होते. तत्कालीन साधनांच्या आधारावर असे दिसते की संभाजी महाराजांनी पुढील ५ बाबींवर भर दिला होता.

१. स्वराज्याची घडी विस्कटता कामा नये व त्यासाठी प्रयत्न चालू ठेवले तर लोक सुखी राहतात.

२. सामाजिक शांतता व आर्थिक समृध्दी या बाबी लोककल्याणाच्या पायावर उभ्या असतील तर त्यामुळे प्रजा स्वराज्यात सहभागी होते.

३. दुष्काळ व नैसर्गिक आपत्तीचा सामना करतांना प्रजेच्या हिताची योग्य उपक्रमाची योजना केली तर लोकजीवन संपूर्णपणे समृध्द होते. त्यांचे जीवन मूल्यांनी भरलेले होते. त्यांचा आधार त्याग, सेवा व समर्पण या मूल्यावर आधारलेला होता.

४. सामान्य माणसाचा विश्वास स्वपराक्रमाने संपादन केला तर संघर्ष अधिक फलदायी ठरतो. हे लक्षात घेऊन त्यांनी आपल्या प्रशासनात अनेक महत्त्वपूर्ण बदल केले आणि लोकांचा विश्वास संपादन केला. हे तत्कालीन पत्रव्यवहाराचा अभ्यास केला असता स्पष्ट होते.

५. प्राणापेक्षाही स्वराज्याचे रक्षण महत्त्वाचे असते. त्यासाठी प्रत्येक वीर हा गडाचा आधार बनतो. अशा प्रकारे छ. संभाजीकालीन लोकजीवन हे स्वातंत्र्यपूरक व प्रेरक होते.

अशा प्रकारे या प्रबंधामध्ये छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे नवे यथार्थ व साक्षेपी आकलन करण्यात आले. प्रतिकूल अशा परिस्थितीवर मात करून छ. संभाजी

महाराजांनी स्वराज्याचे रक्षण केले. देश, देव, धर्मरक्षण करतांना त्यांनी छ. शिवाजी महाराजांचा आदर्श समोर ठेवला. स्वराज्यात सामान्य माणसाला सहभागी करुन घेतले. त्यामुळे छ. संभाजी महाराजांच्या हत्त्येनंतरही मराठयांनी आपले स्वातंत्र्ययुध्द चालू ठेवले व संताजी- धनाजी या जोडीने प्रत्यक्ष बादशहाच्या तंबूचे कळस कापून आणले ही स्वराज्यरक्षणाची जिद्द जोपासण्याचे श्रेय छ. संभाजी महाराजांच्या तेजस्वी जीवनाकडे जाते हाच या अभ्यासाचा आत्मा होय.

## ७.६ अंतिम भाष्य

छ. संभाजीकालीन लोकजीवनाचे ऐतिहासिक समाजशास्त्रीयदृष्टीने आकलन केले असता, हे स्पष्ट होते की, त्या काळातील लोकजीवन हे

छ. संभाजी महाराजांनी तयार केलेल्या सांस्कृतिक अस्मितेवर आधारलेले होते. मोगलांच्या अस्मानी, सुलतानी आक्रमणाशी लढताना स्थानिक प्रजेच्या अंतःकरणात स्वराज्याचा मूल्यभाव जागृत ठेवण्यावर त्यांचा भर होता.

छ. संभाजीकालीन सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक जीवनाचा या प्रबंधात विस्ताराने उहापोह करण्यात आला आहे. हा उहापोह सबळ कागदपत्रांवर आधारलेला आहे. आजवर उपेक्षित असे अनेक पैलू या संशोधनामुळे समोर आले आहेत. तत्त्कालिन दुष्काळामध्ये राजा व प्रजा हतबल झाले नाहीत तर राजाने अनेक महत्त्वाचे प्रजाहितदक्ष निर्णय घेतले आणि लोकांच्या मध्ये मोगलांच्या अस्मानी, सुलतानी संकटाबरोबरच अशा दुष्काळाशी सुद्धा मुकाबला करण्याची क्षमता निर्माण केली.

संभाजीकालीन दूरगामी धोरणाचा परिपाक म्हणजे पोर्तुगीजांचा निप्पात करण्यात संभाजीला आलेले यश होय. तसेच संभाजी महाराजांनी घेतलेल्या धार्मिक व सांस्कृतिक धोरणामुळे लोकांच्या मनात स्वराज्याविषयी प्रितीभाव जागृत झाला

आणि स्वराज्याच्या रक्षणासाठी आपण ध्येयवादाने संघर्ष करावा ही भूमिका त्यांच्या मनात घर करून राहिली. छ. संभाजींच्या हत्येनंतर सबंध महाराष्ट्रात त्याची प्रतिक्रियात्मक स्वरूपात संतापाची लाट निर्माण झाली. त्यातून स्वातंत्र्य युद्धामध्ये स्वराज्याच्या रक्षणासाठी ज्या ज्वाला उभ्या राहिल्या त्यात शेवटी मोगल सम्राट औरंगजेबाचा पराभव झाला आणि दक्षिण भारतातच त्यास आपली कबर खणावी लागली मराठी सत्ता मात्र छ. संभाजीच्या हत्येनंतर ही निर्विवादपणे यशोशिखरावर पोहोचली आणि या सत्तेने भारतातील स्वातंत्र्याचे आणि अस्मितेचे रक्षण करण्याची ऐतिहासिक जबाबदारी १६३० ते १८१८ या काळात समर्थपणे पार पाडली. संभाजी महाराजांचा दहा वर्षांचा कालखंड हा प्रतिकूलतेत एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे प्रकाश देत राहिला. संभाजीकालीन लोकजीवनाचे हे अध्ययन असे स्पष्ट करते की, राजाने प्रजेच्या कल्याणाचा विचार केला असता प्रजा ही स्वराज्याच्या सुख-दुःखात तेवढ्याच जिद्दीने समरस होत असते. संभाजी काळात त्यामुळे मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले आणि ते यशस्वी करण्यात पुढील काळात अनेक घराण्यांनी महत्त्वाची भूमिका पार पाडली. या भूमिकेचा भक्कम पाया छ. संभाजी काळातील प्रगत ध्येयधोरणामुळे घातला गेला आणि त्यातून लोकजीवनाचे अनेक तेजस्वी पैलू उलगडत गेले. हाच या लोकइतिहासाचा खरा समतोल दृष्टीकोन होय.

## संदर्भ ग्रंथसूची

### मराठी ग्रंथ


१. अत्रे शुभांगना, "महाराष्ट्र संस्कृती", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, २००८

२. ओतूरकर रा.वि. (संपा), "पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार", इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३०

३. आवळकर शा.वि. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड ९, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९४४

४. आवळकर शा.वि. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड १०, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९५३

५. आपटे द.वि व ओतुरकर रा.वि. (संपा), "महाराष्ट्राचा (मराठयांचा) पत्ररूप इतिहास", पुणे विद्यार्थीगृह प्रकाशन पुणे

६. आत्रे त्रि.नां., "गावगाडा" वरदा प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, २००८

७. आचार्य. डॉ. धनराज, "छ. संभाजी आणि मराठयांचे स्वातंत्र्ययुद्ध", साईनाथ प्रकाशन नागपूर, पहिली आवृत्ती २००९

८. आठवले सदाशिव, "शिवाजी आणि शिवयुग", मेहता प्रकाशन पुणे, द्वितीय आवृत्ती, १९९२

९. आगलावे प्रदिप, "संशोधन पद्धती शास्त्र व तंत्रे", विद्या प्रकाशन नागपूर, प्रथम आवृत्ती, २०००

१०. आवळकर शा.वि, "रायगडची जीवनकथा", महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ मुंबई, प्रथम आवृत्ती, १९६२

११. इंग्लिश रेकॉर्डस ऑन शिवाजी (१६५९ ते १६८२) प्रकाशन शिवचरित्र कार्यालय, पुणे १९३१

१२. ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड १ ते १७, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३१ ते १९७८

१३. ऐतिहासिक संकीर्ण निबंध, खंड १ ते १९, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे

१४. कुलकर्णी, अ.रा.डॉ., (संपा), "मराठयांचा इतिहास साधन परिचय", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९०८

१५. काळे द.वि. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड ४, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३५

१६. कुलकर्णी, डॉ., अ.रा., "शिवकालीन महाराष्ट्र",राजहंस प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९९३

१७. कुलकर्णी, डॉ., अ.रा., "मध्ययुगीन महाराष्ट्र", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, २००७

१८. कोलारकर, डॉ., श.गो., "मराठयांचा इतिहास", मंगेश प्रकाशन नागपूर, पाचवी आवृत्ती, २००३

१९. कानडे, डॉ.,श्री. मु., "संतांची हे भेटी", स्नेहवर्धन प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९९१

२०. काचोळे , डॉ.,दा.धो., "सामाजिक संशोधन पद्धती", कैलास प्रकाशन औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, १९९३

२१. कठारे, डॉ., अनिल., "शिवकालीन महाराष्ट्र", अल्फा प्रकाशन नांदेड, प्रथम आवृत्ती, २००८

२२. कुलकर्णी, डॉ., अ.रा., "महाराष्ट्र समाज आणि संस्कृती", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, २००८

२३. कुलकर्णी, एम. जी., "भारतीय समाज व्यवस्था", परिमल प्रकाशन औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, १९७५.

२४. खरे ग.ह. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड १, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३०

२५. खरे ग.ह. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड ६, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३७

२६. खरे ग.ह. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड ११, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९५७

२७. खरे ग.ह. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड १२, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९६४

२८. खरे ग.ह. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड १४, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९८३

२९. खोबरेकर, डॉ., वी.गो., "महाराष्ट्राचा इतिहास", महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई, प्रथम आवृत्ती, २००६

३०. खरे गणेश हरी, "मध्ययुगीन कालखंड - भाग १", महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ मुंबई, प्रथम आवृत्ती, २००१

३१. गाठाळ, डॉ., एस.एस. "मराठयांचा इतिहास", कैलास प्रकाशन औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, २०१०.

३२. गोखले, डॉ., कमल, "शिवपुत्र संभाजी", कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, चौथी आवृत्ती, २००३

३३. गवळी, डॉ., पी.ए., "पेशवेकालीन महाराष्ट्र", कैलास प्रकाशन औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, २०००

३४. गायकवाड सरदेसाई, थोरात, "मराठेकालीन संस्था व विचार", फडके प्रकाशन कोल्हापूर, तृतीय आवृत्ती, १९९०

३५. घाटोळे रा.ना., "समाजशास्त्रीय संशोधन तत्त्वे व पद्धती", मंगेश प्रकाशन नागपूर

३६. जोशी शं.ना., "मराठेकालीन समाजदर्शन", अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९६०

३७. जोशी सू.द. व इतर "डायमंड इतिहास माहिती कोश", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, २००९

३८. जोशी शं.ना. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड ३, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३०

३९. जोशी शं.ना. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड ४, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३५

४०. जोशी शं.ना. (संपा), "आज्ञापत्र", प्रकाशन कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९६०

४१. जोशी शं.ना. (संपा), "शिवकालीन पत्रसार संग्रह", खंड १,२,३ प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३०,१९३७

४२. जोशी शं.ना. (संपा), "छ. संभाजीकालीन पत्रसार संग्रह", प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९४९

४३. दिवेकर सदाशिव (संपा), "श्री शिवभारत" प्रकाशन शब्दवेध प्रकाशन पुणे, दुसरी आवृत्ती, १९९८

४४. दिवेकर वा.द. (संपा), "शिवचरित्र साहित्य", खंड १४, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९८२

४५. देशपांडे प्र.न. (संपा), "छ. शिवाजी महाराजांची पत्रे", शुषमा प्रकाशन धुळे, प्रथम आवृत्ती, १९८३

४६. डहाके व. आ., ''मराठी साहित्य इतिहास आणि संस्कृती'',पॉप्युलर प्रकाशन मुंबई, पहिली आवृत्ती, २००५

४७. देशमुख विजय, ''राजा शंभू छत्रपती'', सन प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९९६

४८. देव प्रभाकर, ''इतिहास एक शास्त्र'',कल्पना प्रकाशन नांदेड, प्रथम आवृत्ती, २००२

४९. देशपांडे, डॉ., प्र.न., ''मराठ्यांचा इतिहास'',स्नेहवर्धन प्रकाशन पुणे, तृतीय आवृत्ती १९९९

५०. दाखरकर अनंत, ''अद्वितीय संभाजी महाराज'', खंड १ - २००७, खंड २ - २००९, खंड ३ - २०१० श्री. शंभू प्रेरणा प्रकाशन पुणे

५१. नाडगोंडे गुरूनाथ , ''सामाजिक संशोधन पद्धती'',फडके प्रकाशन कोल्हापूर, प्रथम आवृत्ती,१९८६

५२. पोतदार द.वा. (संपा), ''शिवचरित्र साहित्य'', खंड २, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे, १९३०

५३. पिसुर्लेकर पां.स., ''पोर्तुगीज मराठे संबंध'', पुणे विद्यापीठ मुद्रणालय पुणे, प्रथम आवृत्ती, १९६७

५४. पिसुर्लेकर पांडूरंग, ''मराठयांच्या इतिहासाची साधने'', खंड २, प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मुंबई, प्रथम आवृत्ती, १९७४

५५. पगडी सेतु माधवराव (संपा) , ''मोगाल दरबाराची बातमीपत्रे'', भाग १, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ मुंबई, प्रथम आवृत्ती, १९८८

५६. पगडी सेतु माधवराव, ''मराठयांचे स्वातंत्र्ययुध्द'',जोशी आणि लोखंडे प्रकाशन पुणे, १९६२

५७. पवार आप्पासाहेब (संपा) , ''ताराबाईकालीन कागदपत्रे'', खंड १, प्रकाशन शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर, १९६९

५८. पुरंदरे कृ. वा. (संपा) , "शिवचरित्र साहित्य", खंड ७, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे ,१९३८

५९. पाटील, डॉ., बी.एन., "प्राचिन महाराष्ट्र वाड्मय वैभव",प्रशांत प्रकाशन जळगांव, प्रथम आवृत्ती, २००९

६०. पठाण, डॉ., यू.म.(संपा), "सभासद बखर", श्री. शिवप्रभुंचे चरित्र, प्रकाशन स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे २०००

६१. पवार जयसिंग, "मराठी सत्तेचा उदय", निराली प्रकाशन पुण, प्रथम आवृत्ता, १९९६

६२. पाटील सुभाष, "शिवकाळ व पेशवाईतील दुष्काळाचा इतिहास", पुनम प्रकाशन कंधार, प्रथम आवृत्ता, २०११

६३. पवार जयसिंग, "छ. संभाजी एक चिकित्सा", सुमेरू प्रकाशन कोल्हापूर, प्रथम आवृत्ती, २००५

६४. पवार जयसिंग, "छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ ", मंजूश्री प्रकाशन कोल्हापूर, प्रथम आवृत्ती, १९९०

६५. प्रभूणे पद्माकर, "महाराष्ट्रातील चलनाचा इतिहास", डायमंड प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, २००७

६६. बेंद्रे वा.सी. (संपा) , "महाराष्ट्रे इतिहासाची साधने", विभाग ३, प्रकाशन महाराष्ट्र ग्रंथ संग्रालय मुंबई, १९३०

६७. बेंद्रे वा.सी., "१७ व्या शतकाच्या पुर्वार्धातील पोर्तुगीजांच्या महाराष्ट्रातील हालचाली", प्रकाशन मराठी ग्रंथ संग्रालय मुंबई

६८. बाहेकर, डॉ., एस.ए., "हुतात्मा छ. संभाजी राजे क्राल आणि कर्तृत्त्व",कसब प्रकाशन जळगाव, प्रथम आवृत्ती, १९९९

६९. बिरादार टि. के., ''मराठयांचा इतिहास'', विद्याभारती प्रकाशन लातूर, प्रथम आवृत्ती, २०००

७०. बेंद्रे वा.सी., ''श्री. छ. संभाजी महाराज यांचे विचिकित्सक चरित्र '', पीपीएच बुक स्टॉल प्रकाशन मुंबइ, द्वितीय आवृत्ती, १९७१

७१. बेहेरे, डॉ., सुमन, ''सामाजिक संशोधन पद्धती'', विद्या प्रकाशन नागपूर, प्रथम आवृत्ती, १९८८

७२. बैसार्न, डॉ., अनिल व पाटील, डॉ., सुभाष, ''मराठेकालीन समाज आणि अंधश्रद्धा'', कल्पना प्रकाशन नांदेड, पहिली आवृत्ती, २००५

७३. भगत दत्ता (संपा), ''कृष्णाजी अनंत सभासदकृत श्री. शिवछत्रपतींचे चरित्र'', प्रतिमा प्रकाशन पुणे, २००१

७४. भावे वा.कृ., ''महाराष्ट्राचा सामाजिक इतिहास'', वरदा प्रकाशन पुणे, दुसरी आवृत्ती, १९९८

७५. भावे वा.कृ., ''पेशवेकालीन महाराष्ट्र'', भारतीय इतिहास अनुसन्धान परिषद नवी दिल्ली, प्रथम आवृत्ती, १९७६

७६. मोरवंचीकर, डॉ., रा.श्री., ''सातवहानकालीन महाराष्ट्र'', प्रतिमा प्रकाशन पुणे, प्रथम आवृत्ती, १९९३

७७. राजवाडे वि.का. (संपा), "मराठयांच्या इतिहासाची साधने", खंड ८,१५,१६,१७,१८,२०,२१, प्रकाशन भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे

७८. शिवदे, डॉ., सदाशिव, ''ज्वलज्वलनतेजस संभाजीराज'', डायमंड प्रकाशन पुणे, २००८

७९. शिवदे, डॉ., सदाशिव, ''मराठयांच्या इतिहासाची संस्कृत साधने '', प्रकाशन टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, प्रथम आवृत्ती, २०१०

८०. शिंदे सरकार अशोकराव, ''छत्रपती संभाजी महाराज वांङःमय व साहित्य'', सहयाद्री प्रकाशन इस्लामपूर

८१. सावंत बी. एस., ''मराठ्यांचा प्रशासकीय, सामाजिक, आर्थिक इतिहास'',विद्या प्रकाशन नागपूर, प्रथम आवृत्ती, १९९७

८२. सरदेसाई, डॉ.,बी.एन., ''मराठ्यांचा सामाजिक, आर्थिक, प्रशासकीय इतिहास'',फडके प्रकाशन कोल्हापूर, प्रथम आवृत्ती, २००१

८३. सावळे, डॉ., दि.पा., ''मराठेकालीन दागदागिने आणि अलंकार'', कैलास प्रकाशन औरंगाबाद, प्रथम आवृत्ती, २००७

८४. सहस्त्रबुद्धे पु.ग., ''महाराष्ट्र संस्कृती'', कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, तृतीय आवृत्ती, २००३

**कोश :**

१. गर्गे स.मा.(संपा), ''भारतीय समाज विज्ञान कोश '', खंड पहिला, कल्पना मुद्रणालय पुणे, पहिली आवृत्ती, १९८६

२. गर्गे स.मा.(संपा), ''भारतीय समाज विज्ञान कोश '', खंड दुसरा, कल्पना मुद्रणालय पुणे, पहिली आवृत्ती, १९८७

३. गर्गे स.मा.(संपा), ''भारतीय समाज विज्ञान कोश '', खंड तिसरा, मेहता प्रकाशन पुणे, द्वितीय आवृत्ती, २००७

४. जोशी लक्ष्मणशास्त्री (संपा), ''मराठी विश्वकोश '', खंड १२, प्रकाशन महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ मुंबई, १९८५

**वाङ्मयीन साधने :**

१. जोग विष्णू बुवा (संपा), "सार्थ तुकारामाची गाथा",ज्योती धनंजय ढवळे प्रकाशन मुंबई, १४ वी आवृत्ती, २००१

२. पारगावकरे ल. रा. (संपा), "सार्थ दासबोध",स्मिता प्रिंटर्स पुणे, प्रथम आवृत्ती, १९९६

**इतिहास संशोधन त्रैमासिके :**

१. इतिहास संशोधन त्रैमासिक - कंधार, जि. नांदेड, "कंधारपूर", जानेवारी २०११, जुलै २०११, आक्टोबर २०११

२. इतिहास संशोधन मंडळ मुंबई त्रैमासिक, "भारतीय इतिहास आणि संस्कृती", जुलै २०११, आक्टोबर २०११

**इंग्रजी ग्रंथ**

1. Chitnis K.N., "Glimpeses of Maratha Socio-Eco- History", Atlantic Publishers Delhi 1994
2. Jadunath Sarkar, "A Short History of Aurangzib" Orient Publication, New Delhi, 2009
3. Joshi P.S."Chhatrapati Sambhaji S.Chand & Company Ltd., New Delhi, First published 1980
4. Kulkarni A.R. "Maharastra In the Age of Shivaji", Publishers, Prabha Prakashan, Pune 2nd Revised Edition 2000
5. Kincaid C.A. "A History of the Maratha People", Published, S.Chand & Co. New Delhi, First Edition 1968

6. Pawar A.G. , "Studies in Maratha History" Vol- I, Publishe, Shivaji University Publications, First Edition 1971.
7. Russell R.V., "Tribes and Castes of the Central Provinces of India" Vol - I, 1925
8. Rande M.G., "Rise of the Maratha Power" Publication, Punalekar & Company, Bombay, Third edition 1974
9. Sardesai G.S., "New History of the Maratha", Vol - I, Publication, Phonexix, Bombay
10. Sarkar Jadunath "House of Shivaji", Orient Longman Delhi, Third edition 1955
11. Surendranath Sen, "Administrative System of the Marathas", Publisher, K.P. Bagchi & Company, Third edition 1976
12. Sharma Sri Ram, "The Religious Policy of the Mughal Emperors", Publication, Munshiram Manoharlal Ltd., New Delhi. Third edition, 1978.
13. Travernier J.B., "Travels in India", Oxford University Press, London 1924
14. Walunjkar T.N. "Maharashtra Land and its people", Publisher, Government Photozinco press, Pune, English Edition - 2009

परिशिष्ट क्र.१

ऐतिहासिक साधने छत्रपती संभाजी महाराजांबद्दल खालील मते नोंदवितात.

अ) प्राथमिक साधने

| अ.नं. | साधनाचे नांव | साधनाची भाषा | संपादकाचे नांव | तपशील | मत |
|---|---|---|---|---|---|
| १ | छत्रपती संभाजीकालीन पत्रसार संग्रह | मराठी | शंकर नारायण जोशी | राज्यकारभार विषयक पत्रे १२० वतनाबाबत ८२, धार्मिक ७५, राजकीय २८,इतरसामान्य बाबी २५, पेठबाजार १२,जहागिर ९, असे वर्गीकरण केले आहे. | ही पत्रे छत्रपती संभाजीकालीन प्रशासकाने लिहली असून प्रशासन ,धर्म संरक्षण ,राजकीय हालचाली,बाजारपेठ,आर्थिक व्यवहार,संकीर्ण बाबी इ.बाबतचे वर्णन केले आहे.हि पत्रे छत्रपती संभाजीच्या चोख राज्यकारभाराची शास्त्रीय नोंद करतात.स्व:ता छत्रपती संभाजी महाराजांनी लिहलेल्या ४१ पत्रांचा त्यात समावेश आहे. |
| २ | मल्हार रामराव चिटणीस विरचित संभाजी महाराजांचे चरित्र | मराठी | का . ना.साने | ही बखर राजारामाच्या आज्ञेवरुन मल्हार रामराव चिटणीसाने लिहली. या बखरीत छत्रपती संभाजी विषयी ६ ,छत्रपती राजाराम संबधाने व समर्थ रामदास विषयक १ - १ आणि औरंगजेबाबद्दल २ असे एकूण १० शककाल देऊन प्रसंग सांगितले आहेत. | बखरीत आलेल्या १० कालनिर्दीष्ट प्रसंगापैकी चुकीचे ३, बरोबर ४, सामान्य बरोबर २ व १ नविन असे आहेत. |
| ३ | श्रीमंत महाराज भोसलें यांची बखर | मराठी | वि.ल.भावे | कब्जी बाबा याचे डोकीत लोखंडाचा सोटा घालून त्यास ठार मारले.संभाजी प्रधान समवेत घेऊन तूळापुरास नेले.-----औरंगजेबाने ----- संभाजीस बोलावून नेले ---- ते कुर्निसात न करीता ---- कचेरीत उजवे बाजूस बसवले. | या माहितीवरुन कवि कलशाच्या हत्तेची व छत्रपती संभाजीच्या अटकेची माहिती मिळते.मोगल छत्रपती संभाजीस कसे दुय्यम वागणूक देत होते हे लक्षात येते. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | सभासद बखर | मराठी | यू.म.पठाण | सभासद बखरीत संभाजीराजांचे शिवाजी राजांसह आगऱ्यास जाणे , सुखरुप परत येणे, संभाजीराजांचे मोगलास मिळणे व परत येणे. संभाजीराजाबद्दलचे शिवाजीमहारांच्या तोंडी घातलेले भविष्य निदान इ.गोष्ट समजण्यास या बखरीची मदत झाली. | कृष्णाजी आनंत सभासद हा छत्रपती शिवाजी महाराजांचा विश्वासू सहकारी असल्यामुळे त्याची मते ही खात्रीलायक म्हटली पाहिजेत. |
| ५ | मराठयांच्या इतिहासाची साधने खंड ४ | मराठी | वि.का.राजवाडे | छत्रपती शिवाजी महाराजांच्या निश्चलपुरीने केलेल्या तांत्रिक राज्याभिषेकाचा संदर्भ या खंडात आला आहे.लेखांक २४ त्याचे फळ इष्ट असल्यामुळे छत्रपती संभाजी महाराजांवर सुध्दा तांत्रिक प्रभाव पडला व त्यांनी कवी कलशाचे साहय घेतले. | छत्रपती संभाजी महाराजांचे चरित्र समजून घेण्यासाठी शिव चरित्रातील काही घटनांचा संदर्भ लक्षात घेतला पाहिजे. |
| ६ | मराठयांच्या इतिहासाची साधने खंड १५ | मराठी | वि.का.राजवाडे | वि.का.राजवाडे यांच्या १५ व्या खंडात छत्रपती संभाजी महाराजांनी निंब येथील सदानंद गोसावी यास लिहलेल्या पत्राचा उल्लेख आहे लेखांक १४२ . | या पत्रात सदानंद गोसावी यांचा निंब येथे इनाम चालू ठेवण्याबाबत शिफारस केली आहे.वरील पत्रावरुन एक गोष्ट लक्षात येते की साधू संताबद्दल संभाजी राजांच्या मनात आदर असल्याचे दिसून येते. |
| ७ | मराठयांच्या इतिहासाची साधने खंड १५ | मराठी | वि.का.राजवाडे | वि.का.राजवाडे यांच्या १५ व्या खंडात छत्रपती शिवाजी महाराजांची मुद्रा दिली आहे तिचा अर्थ दिला आहे लेखांक ४३७.<br>छत्रपती शिवाजी व छत्रपती संभाजी यांच्या मुद्रेची तूलना केली असता त्यांच्यातील चंद्र व सूर्याची प्रतिमा महत्वाची वाटते. | छत्रपती संभाजी महाराजांच्या राजमुद्रेचे महत्व तुलनेमुळे अधिक स्पष्ट होते. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ | मराठयांच्या इतिहासाची साधने खंड १५ | मराठी | वि.का.राजवाडे | हंबीराव मोहिते हा शिवाजी महाराजाच्या वेळेपासून सेनापती होता.छत्रपती संभाजीच्या काळात तो त्याच्या मृत्यू पर्यंत त्याच पदावर होता.एका साक्ष पत्रावर हंबीरावाचा शिक्का आहे.लेखांक १० | यावरुन हंबीराव मोहिते यांच्या स्वराज्य निष्ठेची खात्री पटते. |
| ९ | मराठयांच्या इतिहासाची साधने खंड १५ | मराठी | वि.का.राजवाडे | अवघे वतनदार एकमते राहोन गनिमास सजा द्यावी.लेखांक २७९. | यावरुन दोघा पिता - पुत्रानी स्वराज्याच्या वाढीसाठी वतनदारांचा उपयोग करुन धेतल्याचे एकसमान धोरणात्मक सुत्र त्यांच्या वतनविषयक धोरणात दिसते. |
| १० | मराठयांच्या इतिहासाची साधने खंड २० | मराठी | वि.का.राजवाडे | नैसर्गिक आपत्ती सारख्या वेळी संपूर्ण वतन संस्था धोक्यात येत असे.त्याचे संस्थेवर गंभीर परिणाम होत म्हणून छत्रपती संभाजी महाराजांनी आपल्या वतनदारांना वतने विकण्याचा किंवा इतरांना वतने देण्याची परवानगी दिली होती.अशी मुभा केवळ वतनदारांना मदत व्हावी म्हणून त्यांनी दिली होती.लेखांक २२ | यावरुन दुष्काळासारख्या परिस्थितीत वतनदारांना संरक्षण देण्यासाठी छत्रपती संभाजी महाराजांनी वेगवेगळ्या प्रकारच्या सवलती दिल्या होत्या हे वरील उदाहरणावरुन दिसून येते. |

| | चे नांव | साधनाची भाषा | लेखकाचे नांव | तपशील | मत |
|---|---|---|---|---|---|
| | रियासत खंड २ कृती संभाजी व बुध्दी राजाराम | मराठी | गो.स.सरदेसाई | हा ग्रंथ २९४ पानांचा असून हा ग्रंथ चिटणीस बखरीवर आधारलेला आहे या ग्रंथात छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्याचे मुल्यमापन करतांना गो.स.सरदेसाई म्हणतात,"छत्रपती संभाजीच्या अंगी विशेष विव्दत्ता नव्हती बापाने त्यांना शिकविण्यास पंडीत ठेवले होते पण धामधुमीच्या त्या काळात लेखन पठणास सवड मिळाली असेल असे वाटत नाही." पृष्ठ ११८ | हा ग्रंथ वाचल्यामुळे छत्रपती संभाजी महाराजांच्या ऐतिहासीक कार्यावर कसा अन्याय झाला हे स्पष्ट होते. |
| २ | शिवपुत्र संभाजी | मराठी | डॉ.कमल गोखले | हा ग्रंथ ५५६ पानांचा असून त्यात १४ प्रकरणे आहेत या ग्रंथात कमल गोखले यांनी पूर्वीच्या संशोधकांनी छत्रपती संभाजीवर जो अन्याय केला आहे त्याबाबत भाष्य केले आहे.तसेच छत्रपती संभाजीचे नव्याने मुल्यमापन करतांना म्हटले आहे. " संभाजीची कारकीर्द जेमतेम ९ वर्षाची त्यात त्यांनी पोर्तुगीजांशी लढा देऊन त्यांची आशियात कधीही झाली नव्हती एवढी फजिती केली तरुण वयात त्यांना अद्दल घडविली अनेक विजय संपादन केले.इंग्रजांचा सारखा पाठिंबा मिळत असून सुध्दा सिध्दीला त्यांनी चांगले तोंड दिले.इंग्रजांना सतत दमात ठेवले." पृष्ठ ४८२ | हा ग्रंथ छत्रपती संभाजी महाराजांच्या नविन आकलनास उपयोगी आहे. |

| ३ | ज्वलज्वलनतेजस संभाजी राजा | मराठी | डॉ.सदाशिव शिवदे | हा ग्रंथ ४३५ पानांचा असून यात एकूण '१३ प्रकरणे आहेत.या ग्रंथात संभाजीच्या कार्याचे मुल्यमापन करतांना डॉ. सदाशिव शिवदे यांनी म्हटले आहे "औरंगी आक्रमण अंगावर घेऊन एका बाजूने कुतुबशहा व दूसऱ्या बाजूने आदिलशहा यांना उठविणे व रामसिंह आणि अकबराच्या माध्यमातून दिल्लीला धडक देणे ही राजनीती उच्च दर्जाची खचित होती, पण त्याकरीता आदिलशहा ,कुतुबशहा,शहाजादा अकबर , रामसिंह ही माध्यमे त्या दर्जाची नव्हती. त्यांच्यात ती ताकद नव्हती, जिद्द नव्हती तरी सुध्दा संभाजी राजांची जिद्द जळजळीत होती.समशेर सळसळती होती.आणि धैर्य धगधगते होते. दैवाने त्यांना पोषक परिस्थिती प्राप्त झाली नाही."पृष्ठ ४५४ | या ग्रंथात छत्रपती संभाजीच्या कर्तुत्वाचे नव्यान विश्लेषण केले आहे व त्यांनी प्रतिकुल परिस्थितीत छत्रपती संभाजीच्या कार्यावर प्रकाश टाकल आहे.त्यांनी केलेले हे मुल्यमापन वस्तुनिष्ठ आणि तेवढे सत्य सांगणारे आहे. |
| ४ | हुतात्मा छत्रपती संभाजीराजे काल आणि कर्तुत्व | मराठी | डॉ.एस.ए.बाहेकर | हा ग्रंथ ३६६ पानांचा असून त्यामध्ये १६ प्रकरणांचा समावेश आहे.छत्रपती संभाजी महाराजांच्या कामगीरी बद्दल डॉ.एस.ए.बाहेकर म्हणतात "छत्रपती संभाजी महाराजांनी आपल्या कारकिर्दीत गनिमीकाव्याच्या युध्द नितीस प्राधान्य दिले होते.शत्रूचे खच्चीकरण केले तसेच बचावात्मक आणि आक्रमक युध्दनितीचाही अवलंब केला. " पृष्ठ ३५१ | या ग्रंथातून छत्रपती संभाजी महाराजांच्या आर्थिक व लष्करी डावपेचाचे त्यांनी विश्लेषण केले आहे तसेच त्यांनी छत्रपती संभाजीच्या वतन देण्याच्या पध्दतीवर परखड मत व्यक्त केले आहे. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ | महापराक्रमी व परमप्रतापी छत्रपती संभाजी महाराज | मराठी | अशोकराव शिंदे सरकार | हा ग्रंथ २३१ पानांचा आहे.यात एकूण २५ पकरणे आहे संभाजी महाराजांच्या संस्कृतिक कार्याबद्दल ते म्हणतात." संभाजी महाराजांनी ज्या ग्रंथ रचना केल्या त्यामध्ये राजनीती ,शृंगार, अध्यात्म इ.सर्व विषय प्रभावीपणे हाताळले आहे."पृष्ठ ७४ | या ग्रंथात प्रथम त्यांनी संस्कृत साधनांच्या आधारे छत्रपती संभाजीच्या कामगीरीचे मुल्यमापन केले आहे.त्यामुळे छत्रपती संभाजीच्या चौफेर प्रतिभा शक्तीची साक्ष पडते. |

परिशिष्ट क्र.२

नवीन साधने

अ) पोर्तुगीज साधने

| अ. नं. | साधनाचे नांव | संपादकाचे किंवा लेखकाचे नांव | तपशील | महत्व |
|---|---|---|---|---|
| १ | पोर्तुगीज मराठे सबंध अर्थात पोर्तुगीजांच्या दप्तरातील मराठयांचा इतिहास | डॉ.पां.स.पिसुर्लेकर पुणे विद्यापीठ प्रकाशन १९६७ | हा ग्रंथ डॉ.पां.स.पिसुर्लेकर यांनी पुणे विद्यापीठात दिलेल्या व्याख्यानावर आधारलेला आहे.या ग्रंथातील प्रस्तावनेबाबत दत्तो वामन पोतदार यांनी म्हटले आहे "पोर्तुगीज मराठे संबध या विषयावर असा भरघोस आणि साधार ग्रंथ आजवर कोणत्याही भाषेत प्रसिध्द झालेला नाही.तो मान मराठीला डॉ.पां.स.पिसुर्लेकर यांनी मिळऊन दिला"<br>या ग्रंथात एकूण ३५९ पाने असून ७ प्रकरणे आहेत.<br>डॉ.पां.स.पिसुर्लेकर म्हणतात ""पोर्तुगीज मराठे संबधाचा परिणाम शिवकालीन व पेशवेकालीन मराठी पत्र व्यवहारावर दिसून येतो. ' भारतमित्र ' या गोव्यातील मासिका 'गोवे दप्तर' शिर्षक लेखसंग्रहात गोवे दप्तरातील किल्ले मराठी तहनामे प्रसिध्द केले आहेत.त्यात पोर्तुगीज शब्द भरपूर आढळतात" पृष्ठ ३३४.<br>यावरुन पोर्तुगीज साधनांचे महत्व लक्षात येते. छत्रपती संभाजी पोर्तुगीज संबधाबाबत डॉ.पां.स.पिसुर्लेकर म्हणतात.<br>"१७ फेब्रु.१६८३ च्या पत्रात विरजईने आपणास मराठयांविरुध्द मदतीची मोगलांनकडून करण्यात आलेल्या विनंतीची माहिती रामचंद्र पंडित यांस दिली.व छत्रपती संभाजीने आता विलंब न लावता आपणाशी कायम सलोख्याचा तह करावा असे सुचविले."पृष्ठ ९१ | अशा प्रकारच्या अनेक बाबीं पोर्तुगीज कागद पत्रातून उजेडात येतात. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | मराठयांच्या इतिहासाची साधने पोर्तुगीज दप्तर खंड २ | डॉ.पां.स.पिसुर्लेकर महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळ मुंबई १९७४ | हा ग्रंथ मराठी भाषेत आहे या खंडातून छत्रपती संभाजी कालीन मराठे पोर्तुगीज संबधावर प्रकाश पडतो हा खंड २९४ पानांचा असून या ग्रंथातील २२८ ते २८५ या पानावर छत्रपती संभाजी पोर्तुगीज संबधाची पत्रे दिली आहे.ही पत्रे राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक इ.पैलूंवर प्रकाश टाकणारी आहे.यापैकी एका पत्रात असे म्हटले आहे की,"आपला डिचोलीचा सुभेदार हा चोर व जुलमी आहे त्याने आपल्या प्रजेचा छळवाद मांडला आहे."पृष्ठ २३१<br>अशा प्रकारची रोकठोक भाषा छत्रपती संभाजीने वापरली आहे.<br>" पोर्तुगीजांनी मोगल सैन्याला आपल्या प्रदेशातून मराठयांच्या प्रदेशात आक्रमण करण्यास परवानगी दिल्याचे छत्रपती संभाजीला कळताच तो भयंकर चिडून गेला.व त्याने पोर्तुगीजांचे अनेक मचवे आणि गलबते गिरफ्तार करुन पोर्तुगीजांच्या उत्तरेकडील प्रदेशातील खेडयांची जाळपोळ केली" पृष्ठ २३७ | क्रियेसप्रतिक्रिया ठोसास प्रतिठोसा असे छत्रपती संभाजीचे पोर्तुगीज धोरण होते त्यामुळे पोर्तुगीजांना नमविण्यात ते यशस्वी ठरले. |

## ब) संस्कृत साधने

| अ. नं. | साधनाचे नांव | संपादकाचे किंवा लेखकाचे नांव | तपशील | महत्व |
|---|---|---|---|---|
| १ | मराठयांच्या इतिहासाची संस्कृत साधने | डॉ.सदाशिव शिवदे प्रकाशक टिळक महाराष्ट्र विद्यापीठ पुणे २१० | हा ग्रंथ ५५२ पानांचा असून यात एकूण २० प्रकरणे आहेत.छत्रपती संभाजी बद्दल आपणास खालील माहिती मिळते.<br><br>१) प्रकरण ११ वे कवी देवदत्त व गोविंद कृत परमानंदकाव्यंम (अनुपुराण )हे असून यात एकूण ८ प्रकरणे आहेत. त्यात खालील प्रकरणात छत्रपती संभाजी विषयी माहिती मिळते.त्यात i) प्रकरण ५वे शहाजादा अकबर आगमन या प्रकरणात शहाजादा अकबर व | छत्रपती संभाजीच्या डावपेचाचे व मुसद्देगीरीचे वर्णन या काव्यात आले आहे. त्यामुळे छत्रपती संभाजी शहाजादा अकबर संबधावर प्रकाश पडतो. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | छत्रपती संभाजी भेटीचा तपशील आला आहे.तो पुढे आला आहे. मुळ संहितेतील विभाग १ मधील ७६ ते ७९ श्लोकात औरंगजेब पुत्रात शहाजादा अकबर हा संभाजी राजांच्या आश्रयास आल्याचे व राजांनी त्यांना आनंदाने आश्रय दिल्याचे कवी म्हणतो.<br>तद्योगादभयार्थमागतवत:स्थातुस्थलं याचित<br>दिल्लीशस्य सुतेन शुध्दमतिना श्रेष्ठै: सह क्षत्रियै: ।<br>सोत्साहं ह्भयक्करं त्वकबरस्यादाच्च शम्भु:प्रभु:<br>देवस्थानविनाशनोभ्दमनस्तापापनुत्यै स्थिरम् ॥<br>अर्थ :- त्या योगाने दिल्लीपतीच्या सुबुध्द मूलाने वरीष्ट क्षत्रीयांसह शरण आश्रयासाठी याचना केली आणि देवस्थानांचा नाश केल्याने झालेला मनस्ताप घालविण्यासाठी आश्रयाला आलेल्या अकबराला आनंदाने चांगले आश्रयस्थान दिले. | |
| | | | ii) प्रकरण ७ या प्रकरणात छत्रपती संभाजीच्या कार्याची स्तुती केली आहे. व त्यांच्या कार्याची प्रशंसा केली आहे.<br>शिवयोग्याचे माहात्म्य व दीक्षा :- या अध्यायातील २ ते ९ श्लोकात संभाजीच्या राजदरबाराचे वर्णन कवीने केले आहे.बलशाही वीरश्री असलेले शंभूरजे एका दरबारात येवून प्रजेचे मुजरे स्वीकारतात सिंहासनावर आनंदाने विराजमान होतात.<br>अर्थ प्रोदामवीरश्री शंभूराजो महाबली ।<br>सभामागत्य कस्मिश्चित्समये परमोज्ज्वल: ॥ १ ॥<br>प्रकृतींना नतीर्गृह्णन्महानन्दभरालस. ।<br>सिंहासने विशेषेण विरराज सुरेन्द्रवत् ॥ २ ॥<br>अशा या शंभू राजांच्या दरबारात अनेक प्रकारचे लोक उपस्थित असल्याचे वर्णन कवीने केले आहे.<br>पुढील १० ते ५३ या श्लोकातून आपण कोणा कोणास जिंकले आहे हे शंभू | यावरुन छत्रपती शिवाजी महाराज छत्रपती संभाजीस कुशल प्रशासनाचे धडे कसे देत होते याची प्रचीती येते. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | राजे सांगत असल्याचे कवी वर्णन करतो.त्यात राजपूरीकर सिध्दी याची खुमखुमी कशी जिरवीली . भागानगरकर आणि विजापूरकर यांनी माझा पराक्रम मान्य केला आहे इ. | |
| | | | iii) प्रकरण ८वे या प्रकरणात छत्रपती संभाजी कालीन समाज जीवनातील रुढी परंपरा आणि संस्कृती यावर प्रकाश पडतो.<br>मुळ संहितेतील विभाग ५ मधील १ल्या अध्यात पुत्रकामेष्टी यज्ञासाठी संभाजी राजांनी अनुमोदन दिले.व त्यासाठी लागणारे सर्व साहित्य पुरोहित सांगतील त्याप्रमाणे जमाकरण्याची आज्ञा दिली त्याप्रमाणे यज्ञभूमी तयार झाली. शिल्पकाराने सुंदर खांब उभे केले. प्रशस्त मंडप तयार झाला.वेदिकेच्या भोवती विविध आश्रम तयार झाले. ध्वज,तोरणे उभी राहिली. कारागीरांनी सांगितलेल्या बऱ्याच कृती ऐकल्यावर राजाने त्यांना बरेच धन दिले.. | छत्रपती संभाजी काळात पुत्रप्राप्तीसाठी लोक यज्ञ करत होते. स्व:ता राजाने असा यज्ञ केल्याची माहिती या साधनावरुन मिळते |
| | | | २) प्रकरण १२वे श्रीमच्छभूनृपविरचितं बुधभूषण या नावाचे असून त्यामध्ये संभाजी महाराजांच्या संस्कृत ग्रंथावर प्रकाश टाकला आहे.ग्रंथाची विभागणी तीन भागात केली असून १ ल्या भागात १९४ श्लोक आहेत तर दुसऱ्या भागात ६३२ श्लोक आहेत त्यात राजकारणाचा विषय हाताळला आहेत. तर तिसऱ्या भागात ५७ श्लोक आहेत.यात सर्वसामान्य सुभाषितांचा संग्रह आहे.यात राजाच्या कर्तव्यासबंधीचे श्लोक आहेत. | हा ग्रंथ ज्योतिष शास्त्राच्या दृष्टीने महत्वाचा असून त्यामध्ये छत्रपती संभाजीच्या प्रतिभाशक्तीची ओळख पटते. |
| | | | ३) प्रकरण १८ वे मराठे शाहीतील मुद्रा व शिक्के या नावाने आहेत.या प्रकरणात छत्रपती संभाजी महाराज यांची चित्रे व मुद्रा यावर प्रकाश टाकण्यात आला आहे.तसेच या प्रकरणात छत्रपती संभाजी महाराजांचे मुद्रांकीत पत्र दिले आहे. | अशा पत्रावरुन छत्रपती संभाजी महाराजांच्या प्रशासनातील कुशलतेची कल्पना येते. |

क) मराठी साधने

| अ. नं. | साधनाचे नांव | संपादकाचे किंवा लेखकाचे नांव | तपशील | महत्व |
|---|---|---|---|---|
| १ | छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ | प्रा. डॉ.जयसिंगराव पवार मंजूश्री प्रकाशन कोल्हापूर १९९० | या ग्रंथाला डॉ.जयसिंगराव पवार यांनी १० पानाची प्रस्तावना दिली आहे या ग्रंथामध्ये एकूण ५२ लेखांचा समावेश आहे या ग्रंथाच्या प्रस्तावनेत प्रा. डॉ.जयसिंगराव पवार म्हणतात. "प्रत्यक्ष बादशहाच दक्षिणेत मराठयांचे राज्य बुडविण्याच्या इरादयाने उतरल्यानंतर त्याला परत फिरविण्याचे फर्माण कोणी धाडायचे बादशहा यशस्वी झाल्याशिवाय मराठी राज्ये बुडल्याशिवाय परत जाऊ शकत नव्हता. तसे परतने म्हणजे त्याच्या साम्राज्य सत्तेच्या प्रतिष्ठेवर त्याने आपणहून निखारा ठेवण्यासारखे होणार होते.मोगल मराठा युध्द संभाजी राजांच्या मृत्यूनंतरही मोगलांच्या बाजूने का समाप्त होऊ शकले नाही.याचे रहस्य या बादशहाच्या प्रतिष्ठेच्या सरंक्षणाच्या हेतूत होते." पृष्ठ ९१ | या विधानातून छत्रपती संभाजी महाराजांची थोरवी स्पष्ट होते. |
| २ | छत्रपती संभाजी महाराज वाङ:मय व साहित्य | शिंदे सरकार अशोकराव, सहयाद्री प्रकाशन, इस्लामपूर २०११ | हा ग्रंथ ७३ पानांचा असून यात एकूण ६ प्रकरणे आहेत.या ग्रंथाच्या प्रस्तावनेत श्री.अशोकराव शिंदे सरकार म्हणतात."छत्रपती संभाजी राजे हे केवळ पराक्रमी , शुर , साहसी, मुसद्दी, राजनीती तज्ञ व कुशल प्रशासक होते.असे नव्हे तर ते उत्तम साहित्यिक व कवी होते.अजूनपर्यंत त्यांचे सर्व साहित्य प्रकाशात आलेले नाही.त्यांनी निर्माण केलेल्या साहित्यापैकी फक्त ४ ग्रंथ प्रकाशात आलेले आहे. त्यापैकी बुध्दभूषण हा ग्रंथ संस्कृतमध्ये असून नायिकाभेद , नखशिख आणि सात- सतक हे तीन ग्रंथ हिंदी मध्ये आहे.बुध्दभूषण हा ग्रंथ राजनीतीवर असून त्या संबधाची त्यात सखोल चर्चा केलेली आहे. नायिकाभेद व नखशिख हे दोन्ही ग्रंथ हिंदी भाषेत केलेले काव्य असून ते शृंगार रसप्रधान आहेत. सात सतक हा ग्रंथ हिंदी भाषेत असून यामध्ये परमेश्वराचे स्वरुप याबाबत चर्चा केली आहे."पृष्ठ १० | छत्रपती संभाजी महाराजांच्या संस्कृत व हिंदी ग्रंथावर नवा प्रकाश पडला आहे. |

| ३ | छत्रपती संभाजीकालीन पत्रसार संग्रह | शंकर नारायण जोशी | राज्यकारभार विषयक पत्रे १२०<br>वतनाबाबत ८२, धार्मिक ७५, राजकीय २८,इतरसामान्य बाबी २५, पेठबाजार १२,जहागिर ९, असे वर्गीकरण केले आहे. श.ना.जोशी यांच्या मते "राजकीय दृष्टीची या संग्रहात जी पत्रे आली आहेत त्यात शिवाजीराजांच्या राजकीय धोरणांचा परिपाक कोणता ते स्पष्ट करणारे आहेत." पृष्ठ १२ | ही पत्रे छत्रपती संभाजीकालीन प्रशासकाने लिहली असून प्रशासन ,धर्म संरक्षण ,राजकीय हालचाली,बाजारपेठ, आर्थिक व्यवहार,संकीर्ण बाबी इ.बाबतचे वर्णन केले आहे.हि पत्रे छत्रपती संभाजीच्या चोख राज्यकारभाराची शास्त्रीय नोंद करतात.स्व:ता छत्रपती संभाजी महाराजांनी लिहलेल्या ४१ पत्रांचा त्यात समावेश आहे. |
|---|---|---|---|---|

परिशिष्ट क्र.३

स्वातंत्र्य, देशभक्ती, धर्मनिष्ठा व संस्कृती रक्षण इ. मूल्य रक्षणासाठी छत्रपती संभाजी महाराजांनी दिलेले योगदान तक्त्याव्दारे स्पष्टीकरण

| अ.नं. | मूल्य | कार्ये | स्पष्टीकरण |
|---|---|---|---|
| १ | स्वातंत्र्य | छत्रपती संभाजी महाराजांना मोगलाशी लढून स्वातंत्र्य टिकवावयाचे होते.तर मोगलांना छत्रपती संभाजी महाराजांच्या काटा काढून मराठा राज्य बुडवावयाचे होते पण संभाजी महाराजांच्या स्वराज्य निष्ठेमुळे संभाजी महाराजांना आपल्या स्वातंत्र्याचे रक्षण करता आले. | छत्रपती संभाजी महाराजांना पकडण्यात आल्यानंतर त्यांचा छळ करण्यात आला परंतू शरण न जाता धर्मांतर न करता छत्रपती संभाजी महाराजांनी स्वातंत्र्यासाठी प्राणांपण केले डॉ.बाहेकर एस.ए.म्हणतात, " ११ मार्च १६८९ रोजी छत्रपती संभाजी राजांची अत्यंत क्रूरपणे आणि अमानुषपणे वडू येथे हत्या करण्यात आली. छत्रपती संभाजी राजांच्या मृत्यूनंतर अठरा वर्षापर्यंत मराठयांनी मोगलांशी झुंज दिली.औरंगजेबाची स्वप्ने धूळीस मिळविली.अत्यंत धाडसी, शूर, स्वाभिमानी कधीच कच न खाणारा आणि शेवटच्या क्षणापर्यंत मान ताठ ठेवणारा बाणेदार हा मराठयांचा लाडका राजा छत्रपती संभाजी हा राष्ट्राचा दैवत बनला यात काहीच आश्चर्य नाही." (डॉ.बाहेकर एस.ए."हुतात्मा छत्रपती संभाजी राजे काल आणि कर्तुत्व "पृष्ठ ३२३,३२४) या विवेचनावरुन त्यांनी आपल्या १० वर्षाच्या अल्पावधीत स्वांतत्र्य हे मूल्य जोपासले.त्यांच्या या मुल्य प्रेरणेमूळे मराठयांची सत्ता १८१८ पर्यंत कायम राहिली. |
| २ | देशभक्ती | छत्रपती संभाजी महारांची देशभक्ती प्रखर होती. त्यांनी स्वार्थापेक्षा देश श्रेष्ठ मानला | पोर्तुगीजांसारख्या परकीय शत्रूंशी लढतांना कधीही तडजोड केली नाही.सावध पाऊले टाकून करार करतांना सदैव देशांचे व प्रजेचे हित जपले.डॉ.बाहेकर एस.ए.म्हणतात "वसई आणि दमण प्रदेशातील चौथाई कर छत्रपती संभाजी राजास देण्याचे पोर्तुगीजांनी मान्य केले आणि आपल्या प्रदेशातून मोगलांच्या सैन्यास धान्य,दारुगोळा पोहचू देणार नाही.काही प्रमाणात का होईना त्यांच्या तहाचा उद्देश सफल झ-ाला.मोगलांच्या आश्रयामुळे संभाजी राजांना कारण नसतांना त्रास देण्याचे चाळे काही काळ तरी पोर्तुगीजांचे बंद झाले इतकेच नव्हे तर |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | पोर्तुगीजांना लागलेली ठेच पाहून इंग्रजही शहाणे झाले.या पुढे संभाजी राजांचा रोष ओढवून घेवून सिध्दी आणि मोगलांचे आरमार यांना मुंबईच्या बंदरात आसरा देण्याचे धाडस त्यांना झाले नाही." (डॉ.बाहेकर एस.ए."हुतात्मा छत्रपती संभाजी राजे काल आणि कर्तुत्व "पृष्ठ १४१) या विवेचनावरुन त्यांनी आपल्या कारकीर्दीत देशभक्ती हे मुल्य जोपासले . त्यांनी परकीय शत्रूशी तह करतांना स्वार्थापेक्षा देशभक्ती श्रेष्ठ मानली. |
| ३ | धर्मनिष्ठा | छत्रपती संभाजी महाराजांनी हिंदू धर्म आणि भारतीय संस्कृतीचे मूल्य जपले.त्यांनी स्वधर्म, स्वभाषेचे रक्षण करण्यावर भर दिला. | छत्रपती संभाजीच्या ठिकाणी स्वधर्मा बद्दल अत्यंत आदर होता. हे दाखविण्यास त्यांच्या अनेक सनदांपैकी खालील एकच उतारा पुरेसा आहे. याबद्दल गो.स.सरदेसाई म्हणतात " लखबा लिंगप्पा मामले तोरगळ यांनी विनंती केली की गतवर्षी सुलतान तारा मोगल लष्कर समवेत येवून कसबे मजकूरची घरे ,वाडे जाळून तलफ केली. गावात जागृत देवस्थान होते ते छिन्न-भिन्न केले.दुसरी थोर देवालय होती ती मोडली त्या योगे गावात मरग सुटला.माणसे मरु लागली.रयत लोग राहेनासे झाले.पांढरी बसली पूरातन मुर्ती दुरात्म्यांनी विच्छीन्न केल्या महाराज छत्रपती महाराष्ट्र राजा आहे त्यांची देवस्थाने छिन्न-भिन्न असों नयेत. ती बांधू ऊर्जा चालवावी तूर्त नवलगुदांस देवळेच नाहीसे झाली आहेत. वेदमूर्ती काशीनाथभट्ट वाराणसीकर बहुतयोग्य भले ब्राम्हण आहेत.विचार मते पाहता हिंदूकीची गोष्ट खरीच उदंड खर्चवेंच महाराष्ट्राच्या दरबारात घेवून जातो.त्यापरीस श्रीचे ऊर्जेसेवेच जाहला तरी त्याचें पूण्य व श्रेय छत्रपती महाराजास येईल तरी यास इनाम सर्व मान्य करुन दिल्हे असे." (गो.स.सरदेसाई "मराठी रियासत ", खंड २ पृष्ठ ११९,१२० ) या उदाहरणावरुन स्वधर्म आणि स्वसंस्कृतीचे रक्षण करण्यावर छत्रपती संभाजी राजांचा भर होता.त्यांनी राज्यातील प्रजेचे हाल होऊ नये म्हणून यथायोगे काळजी घेतल्याचे वरील इनामावरुन दिसून येते. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | संस्कृती रक्षण | मोगलांचे धोरण दक्षिण भारतात आपल्या सत्तेव्दारे इस्लामी संस्कृती रुजविणे हे होते.औरंगजेबाने त्यासाठी हिंदूवर जिझिया कर लादला.हिंदू मंदिरे उध्दवस्त केली याउलट छत्रपती संभाजी महाराज यांनी देवालय ,यात्रा, साधू, संत यांना प्रोत्साहन दिले . मंदीराच्या दिवा बत्तीस यात्रा उत्सावास आर्थिक मदत केली. अग्रहार व इनामी दिली. | संभाजी महाराजांनी स्वसंस्कृतीचे रक्षण करण्यासाठी प्रयत्न केले त्याचे उत्तम उदाहरण डॉ.कमल गोखले यांनी दिले आहे. " चाफळ येथील श्रीरामाचा उत्सव करणे हे राज्य व्यवस्थेचे अंग होते.श्री समर्थांची आज्ञा मान्य करुन श्रीच्या कार्याचा अंगीकार करणे.,श्रीचा उत्सव चालविणे हा एक राजकारणाचा भाग आहे. असे शिव प्रभू अखेरपर्यंत सांगत असत. शंभू छत्रपती नी तेच धोरण अंगीकारले. त्यांनी कराड, सातारा, सज्जनगड, चाफळ इ. ठिकाणच्या अधिकाऱ्यांना आज्ञा करुन उत्सवाच्या व्यवस्थेसंबधी पत्रे पाठविली छत्रपती संभाजी महाराजांनी वर्षासने पूर्ववत चालू ठेवली होती. त्याचप्रमाणे त्यांनी चाफळ येथील श्री रामदास स्वामीच्या श्री रघुनाथ देवाच्या पुजा व नैवैद्यासाठी आणि देवाच्या सेवकाना जी मोईन शिवाजी राजांनी १६७५ सालातील वर्ष प्रतिपदेस करुन दिली होती . ती संभाजी महाराजांनी दि.१८/१०/१६८० रोजी तशीच चालविण्याची आज्ञा देशाधिकारी काशी रंगनाथ प्रांत जावळी यास दिली."( डॉ.गोखले कमल, "शिवपुत्र संभाजी " , पृष्ठ ४३७)<br>अशाप्रकारे छत्रपती संभाजी महाराजांच्या ठाम पावलामुळे श्रीराम जन्म उत्सवास उचित सन्मान मिळाला या वरुन संस्कृती रक्षणासाठी त्यांनी प्रयत्न केल्याचे दिसते. |


भोसले घराण्याची वंशावळ
मालोजी
शहाजी
(१५९५ ते १६६४)
संभाजी
शिवाजी
(१६३० ते १६८०)
एकोजी किंवा व्यंकोजी
संभाजी
(१६५७-१६८९)
राजाराम
(१६७०-१७००)
शाहू
(१६८२-१७४९)
शिवाजी
(१६९६-१७२८)
संभाजी
(१६९८-१७६०)

परिशिष्ट क्र.५

पत्र क्रमांक : १ — १९ ऑगस्ट १६८०

**"माहादोबा गोसावीस वर्शासनाची मोईन"**

*तुकाराम महाराजांचे पुत्र महादोबा गोसावी यांसी संभाजी महाराजांनी वर्षासनाची नेमणूक करून दिल्याचे पुणे प्रांताच्या सुभेदारास आज्ञापत्र —*

**श्री**

प्रति स्वस्तिश्री राज्यांभिशेक शके ७ रौद्र संवछर भाद्रपद शुध पंचमी गुरुवार क्षत्रियेकुलावतंस श्रीराजा शंभु छत्रपति याणी राजश्री विनायेक उमाजी देशाधिकारी प्रांत पुणे यांसी आज्ञा केली यैसीजे- माहादोबा गोसावी तुकाबा गोसावी यांचे पुत्र वस्ती मौजे देहू ता। हवेली सुभे मजकूर यासी वर्शासनाची मोईन होन पा। लुगडियाबदल गला जोरी बारुले माहाल मापे खंडी येकूण होन पा। येक व गला खंडी येक मोईन आहे, ते सा। मा।रापासून सुभे मजकुरावरी देविली असे. दर हारसाल आदा करीत जाणे. प्रतिवरसी नवे सनदेचा उजूर न करणे. तुम्ही तालीक लेहून घेऊन असल गोसावीयासी परतोन देणे.

(पेशवे दप्तर, खं. ३१, ले. ४२)

पत्र क्रमांक : २ — १३ सप्टेंबर १६८०

**"गोसावी कुशल असतील तो ठेवीत जाणे."**

*पाटगाव प्रांत कुडाळ येथे शिवकालात मौनीबुवा नावाचे थोर सत्पुरुष होऊन गेले. शिवप्रभूंनी त्यांचा आशीर्वाद घेऊन त्यास गुरुस्थानी मानले होते. त्यांच्या पालखीस भोई-वाजंत्र्यांची कायमची व्यवस्था लावून देणारे संभाजी महाराजांचे कुडाळच्या सुभेदारास आज्ञा पत्र.*

**श्री**

श्री
लक्ष्मीनृसिंहभक्तश्री
निर्णयाब्धि सन्मणे: ।।
प्रल्हादवर्धिनी मुद्रा प्र
ल्हादस्य विजृंभते

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ७ रौद्र नाम संवत्सरे अश्विन शु।। प्रतीपदा इंदुवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपति याणी राजश्री गणोराम देशाधिकारी व देशलेखक प्रांत कुडाळ यांसी आज्ञा केली असी जे - तुह्मी हुजूर येऊन स्वामीस विनंति केली की राजश्री मौनी गोसावी पाटगावी रहातात. बहुत थोर ईस्वर पुरुष आहे. त्यास पालखी आहे. परंतु नेहमी भोई नाहीत. तरी नेहमी भोई व वाजंत्री नेहमी करून देविले पाहिजे. यावरून वरशास भोयास व वाजंत्रियास मोईन होन निशाणी १२५ सवासे करून दिले आहेती. यात भोई व वाजंत्री ठेवून देणे. ते सेवा करितील. तुह्मी सदहू पैके तुरुतगिरी शिष्य गोसावियांचा आहे त्याजवळ पावीत जाणे. ते भोयास व

वाजंत्रियास हक पावितील. सदहू मोईन ई।। सालमजकुरापासोन केली असे. यासी वाजंत्री तुह्मी ठेविले आहे. भोई ठेऊन देणे आहे. यैसीयासि वाजंत्री ज्या दिवसापासून सालमा। ठेविले असाल ते दिवसापासून वाजंत्रियास वरशास पंचवीस होनप्रमाणे पाववणे. उरले शंभर होन. यासी भोई ज्या दिवसापासून ठेवाल ते दिवसापासून सालमा।चे हक पाववणे. पुढे सदहू शंभर होन भोयास व पंचवीस वाजंत्रियास याप्रमाणे साल दर साल पावीत जाणे. आणि धर्मार्थ ह्मणून गोसावीयांचे नावे खर्च लिहीत जाणे. ताजा सनदेचा उजूर करीत नच जाणे. गोसावी कुशल असतील तो ठेवीत जाणे. असल गोसावीयाच्या शिष्यापासी देऊन तालीक सुभा विले लावणे. सदरहू सवाशे होन निवल देविले आहे, तियासी वजावाटाव माफ असे. लेखनालंकार.

मर्यादेयं
विराजते

रुजु सुरुनिवीस
रा। छ १६ माहे रमजान
छ. २९ शाबान माहे शाबान
सुरू सूद बार बार
श्रीशंकर पौ। छ २९ रमजान

(मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. २० ले. २८१)

**पत्र क्रमांक : ३** **१८ ऑक्टोबर १६८०**

**''श्रीची यात्रा सुखरूप भरे ते करवणे''**

*समर्थ रामदासांनी चाफळ येथे राममंदिराची स्थापना करून दर साल यात्रा सुरू केली होती. या यात्रेस येणाऱ्या भाविकांना लष्करातील लोकांचा अथवा मुसलमानांचा उपद्रव न होता श्रीचा महोत्सव यथासांग पार पाडावा म्हणून संभाजी महाराजांचे वासुदेव बाळकृष्ण या आपल्या अधिकाऱ्यास आज्ञापत्र —*

[अस्सल-मोडी]

**श्री**

श्रीरघुनाथस्वामी श्रीरामदास गोसावी

स्वस्तीश्री राज्याभिषेक शक ७ रौद्रनाम संवत्सर कार्तिक शुध सप्तमी इंदुवासर

एषा-श्री शिवराजेंद्रमुख्यामात्यस्य सत्यधृक्।। मुद्रा मोरेश्वरस्यास्तां भद्रा सद्रागदायिनी

क्षत्रिये कुळावतंश श्रीराजा शंभु छत्रपति यांणी राजश्री वासुदेव बाळकृष्ण यासी आज्ञा केली यैशी जे कसबे चाफल तेथे श्री गोसावी येही श्री चे देवाळये केळे आहे. यात्रा भरत्ये व सर्वदाही मोहत्साये चालतो. यैशीयास तेथे कटकीचे सीपाई व वरकड कीतेक लोक राहाताती ते श्री ची मर्यादा चालवीत नाहीत व यात्रेस लोक येताती त्यास तसवीस देताती. यात्रकरू लोकांसी दिवाणबळे कलागती करीताती

ह्मणौन कळो आळे. तरी तुह्मी ळोकांस ताकीद करून तेथ यात्रेमध्ये हो अगर सर्वदाही कोणाचा उपद्रव होऊं ने देणे. सालाबाद यात्रा राखताती तैसे यात्रेचे दिवसात नाणेघोल तर्फेचे (व ते प्रांतीचे कारकून यैसे) कारकून संगीजातीने जाउनु यात्रा सुखरूप भरे ते करवणे. मुसलमान व हरकोणाचा उपद्रव न लगे यैसे करून श्री गोसावी यांचे स्थल आहे हरयेकविशी परामृश करीत जाणे. देवाकरिता व गोसावीयाकरिता ब्राह्मण येउनु तेथे नवी घरे करून राहाताती त्याचाही परामृश करीत जाणे. येणेच प्रमाणे सन सलास सबैनामधे तीर्थस्वरूप राजश्री कैलासवाशी स्वामीने राजश्री (दताजी) त्रीमल वाकेनिवीस यांस पत्र लेहून आज्ञा केली होती त्याप्रमाणे गतवर्षपावेतो श्री चा मोहत्साये होत आळा. तेणेचप्रमाणे साल मजकुरापासून प्रतिवर्षी मोहत्साये करवीत जाणे व श्रीची शीहासने स्छळोस्छळी आहेती ती प्रतिवर्षी यात्रेस येउनु मोहत्साये होत आहे. त्यांचा परामृश घेउनु त्यांस पत्रे पाठउनु आणवीत जाणे. आणी श्रीचा मोहत्साये करून यात्रेचे संरक्षण बरे करवीत जाणे. हे पत्र वाचून लिहीळेप्रमाणे मोहत्साये करवीत जाणे. आण पत्र वेदमूर्ति दिवाकर गोसावी यांसी परतून देणे. लेखनालंकार

मर्या
देयंविज
यते

रुजु सुरु
नीवीस

रा। छ २४ जिलकाद
तेरीख ५
सौवाल सन इहिदे समानैन
बार सुद

माहे जिलकाद सौवाल माहे
सुरु सुद्र
बार

(श्री संप्रदयाची कागदपत्रे, ले. ३७)

**पत्र क्रमांक : ४** **६ नोव्हेंबर १६८०**

**"मोरेस्वर गोसावीस सुखे राहो देणे"**

*चिंचवड देवस्थानचे स्वामी मोरेश्वर गोसावी यांच्या मुलमाणसांस, शेतापोतास अथवा गुराढोरांस काडीचीही तसवीस देऊ नये म्हणून संभाजी महाराजांचे आपल्या लष्करी अधिकाऱ्यांना आज्ञापत्र -*

## श्री मोरेस्वर

स्वस्तिश्री राज्याभिषक शक ७ रौद्र संवत्सरे कार्तिक बहुल येकादसी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शंभू छत्रपति यानी राजश्री सुभेदारांनी व जुमलेदारांनी व कारकुनानी लष्कर

यासि आज्ञा केली ऐसीजे-राजश्री मोरेस्वर गोसावी वास्तव्य श्री ता कऱ्हेपठार येथे कुटुंबेसी राहाताती तरी तुम्ही येता जाता त्यांच्या माणसांस व सेतापोतास गुरांढोरांस काडीची तसवीस देत नव जाणे. निरोपद्रव सुखरूप राहेती ते करणे. जेथे त्याला अनुकूल पडेल तेथे जाऊन राहिले तरी सुखे राहो देणे. त्यांचे वाटेस नव जाणे . ताकीद असे. जाणिजे. .लेखनालंकार.

लक्ष्मी नृसिंह भक्त
श्री नीररायब्धि सन्मण:
प्रल्हाद वर्धिनी मुद्रा
प्रल्हादस्य नषञ्जभत

(शिवचरित्रसाहित्य, खं. ३, ले. ५५९)

**पत्र क्रमांक : ५** **३१ मार्च १६८१**

**''गाईची वणी तो एकंदर माफ केली आहे.''**

*किल्ले प्रचंडगडावर व पायथ्याशी गडरक्षणासाठी असलेल्या लोकांच्या गाईम्हैशींच्या चराईबद्दल (वणी) संभाजी महाराजांचे आज्ञापत्र. गाईंची चराई शिवाजी महाराजांनीच माफ केली होती. तेच धोरण संभाजी महाराजांनी चालू ठेवले.*

**श्री**

स्वस्तिश्री राज्याभिषेकशक ७ दुर्मति नाम संवत्सरे चैत्र बहुल सप्तमी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री रघोजी अहीरराऊ मुद्राधारी प्रचंडगड यांसि आज्ञा केली ऐसी जे-गडमजकूरचे कोळी मेटकरी गडाचे घेरियाखाले राहतात. त्यांपैकीं कितेक लोक गडमजकुरी चाकर आहेती व कितेक सोनजी इतबारराऊ याचे दिमतीस आहेती. त्यांकडे गुरे म्हैसी व गाई आहेती. त्या पैकी दर एकास हवालदार नाईकवाडी रजपूत यांस दोनी गुरांची वणीसोड करून वरकड बदल मु॥ बार करावी ऐसी तीर्थस्वरूप कैलासवासी स्वामीची सनद आहे. त्याप्रमाणे हाली सनद देविली पाहिजे ह्मणून या लोकी अर्ज केला. ऐशास गाईची वणी तो एकंदर माफ केली आहे. म्हैसीची वणी घ्यावयाचा तह आहे. त्या पैकी या लोकास दर एकास म्हैसीची वणी सोड देविली असे. तरी हवालदारास म्हैसी २ व नाईकवाडियास म्हैसी २ व रजपूतास म्हैसी २ याप्रमाणे सोड देऊन बाकी म्हैसी ज्याच्या ज्या उरतील त्यांची वणी जे होईल त्यास गडमजकुरी चाकर असतील त्यांची वणी त्यांच्या नावे लिहिणे. बाकी वजा करणे. सोनजी इतबाररायाचे दिमतीस लोक आहेती. त्यांकडे जे वणी होईल ते त्यांच्या नावे तपसीलवार खर्च लिहिणे आणि नावनिसी जाबिता हुजूर पाठवणे. त्यावरून त्यांच्या आवर्जा बार होईल. घरटकाहि ज्याकडे जो होईल तो त्याचे नावे बार करणे. हुजूर लेहून पाठवणे. हे वणीची व घरटकियाची जमाई माहालाकडे असेल तरी हेच सनद माहालचे कारकुनी मसमू जाणून एवं हे प्रमाणे चालवावे. गडी जमाई असेल तरी तुह्मी चालवावे. साल दर साल ताजे सनदेचा उजूर न करणे. तालीक लेहून घेऊन असल हे पत्र कोळियांपासी देणे. निदेश समक्ष.

श्री ॥शंभुनर
पतिहर्षनिदानमोरे
श्वरसुतनीळकंठ
मुख्यप्रधान

मर्या
देयं विरा
जते

रुजू सु
रुनिवीस
सुरु सूद बार

(मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. २०, ले. २७३)

पत्र क्रमांक : ६ — ६ नोव्हेंबर १६८१

**"अबासाहेबांचे संकल्पित आहे ते चालवावे....."**

*छत्रपती शिवाजी महाराजांनी गोपालभट अग्निहोत्री माभळेश्वरकर याजपासून मंत्रोपदेश घेऊन राज्याच्या अभ्युदयासाठी सूर्य अनुष्ठान सांगितले होते; आणि त्या प्रीत्यर्थ वर्षासन नेमून दानपत्रही दिले होते. संभाजी महाराज राज्यावर आल्यावर त्यांनीही 'राजश्री अबासाहेबांचे संकल्पित आहे ते चालवावे हे अम्हास अगत्य जाणोन' त्याचे पुत्र रामभटास हे वर्षासन चालू ठेविले.*

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ८ दुर्मतिनाम संवछरे कार्तिक सुध शस्टी रविवासरे क्षेत्रीय कुलावतंश सिंहासनाधीस्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यानी राजश्री कासी रंगनाथ देशाधिकारी व लेखक प्रांत जाउली यासी आज्ञा केली ऐसीजे वेदमूर्ती रामभट बिन गोपालभट अग्नहोत्री मांभलेस्वरकर यानी हुजूर येऊन विदित केले की अपले पिते गोपालभट बिन श्रीधरभट याजपासून महाराज कैलासवासी (शिवाजी महाराज) यानी मंत्रउपदेश घेऊन आपल्या अभ्योदयाकार्णे सूर्येप्रीत्यर्थ अनुस्ठान सांगितले त्यास वर्षासन दानपत्र मोईन करून आमचे पिते यासि दिल्ही. तेणेप्रमाणे चालत अले अहे. सांप्रत महाराजे चालविले पाहिजे, म्हणऊन विदित केले. तेणेप्रमाणे दानपत्र दाखविले व सुभाचे पत्र दाखविले. त्यास असल पत्रामध्ये लिहिले की, स्वामी भले थोर अनुस्ठाते सूर्ये उपासनी पद्महस्ती ऐसे जाणोन अम्ही स्वामीपासून मंत्रउपदेश संपादिला. त्यावरून आपल्या अभ्योदयार्थ सूर्येप्रीत्यर्थ अनुस्ठान सांगितले त्यास वर्षासन प्रतिवरुसी द्यावयाची मोईन केली असे. बी।। ता।

(शिक्का: श्री।। शंभु भजनोत्कठ मोरेश्वरसुत निळकंठ)

वर्षासन

| होन पातशाही शंभर | गला नवसेर बारुले |
|---|---|
| वजन टां।। | मापे खंडी |
| .।४ तूप | ४ तांदूळ |
| .।४ तेल | ४ नागली |
| .।।।३ | ८ |

सूर्येप्रीत्यर्थ अनुस्ठान प्रतिवरुसी यास सामोग्री व पूजा.

अरक वश्रे (वस्त्रे) — वजन टां।।

अनुस्थान समई
नेसावयास व असन
१ पितांबर
१ शाल
१ असन
३

चंदन
८८५ शुभ्र चंदन
८८५ अरक्त चंदन
--
८।.

ये।।। होन प।। येकसे व गला नवसेर बारुले मापे खंडी अठ व वजन सवा अठरा मण व अरक्त वश्रे दोनी व पितांबर येक व शाल येक व असन येक येणे प्रमाणे दानपत्र करोन दिल्हे, स्वामीनी अमचे अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थं अनुस्तान प्रतिवरुसी करावे व मंत्रउपदेशही स्वामीचे वौषपरंपरेने अमचे वौषपरंपरेस करावा. अपण संकल्पपूर्वक वर्षासन दानपत्र प्रतिवरुसी करून दिल्हे असे. अपले वौषपरंपरेने स्वामीचे वौषपरंपरेस उत्तरोत्तर चालवावे, यासि अन्नथा करून तर श्री माहादेव साक्ष. स्वामीनी निरंतर देवापासी आमचे कल्याण इछावे. ऐसे दानपत्र महाराज अबासाहेब कैलासवासी स्वामीनी भट गोसावी यास करून दिल्हे ते मनास आणून, व सुभाचे पत्र मनास आणून, त्यावरून राजश्री अबासाहेबांचे संकल्पित आहे ते चालवावे हे अम्हास अगत्य जाणोन, हाली वेदमूर्ती रामभट बिन गोपालभट यास वर्षासन सदरहू प्र।। सनद करून दिल्ही असे. पूर्वी नख्त होन प।। १०० येकसे हुजूर पोतापैकी. पावत होते व वरकड जिनस सुभा पावत होता. त्यास हुजूर ऐवज न पावे म्हणवून नख्त व जिनस सदरहूप्रमाणे सुभे मजकुरावरी देविले असे. तेणेप्रमाणे भटगोसावी यास साल दरसाल पावीत जाणे. ताज्या पत्राचा उजूर न कर्णे. तालीक लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास परतोन भट गोसावी यापासी देणे.

मर्यादेयं
विजयते

(भा. इ. सं. मं., वार्षिक इतिवृत्त, शके १८३४, पृ. ३२८-३३०)

**पत्र क्रमांक : ७** **२६ नोव्हेंबर १६८१**

**"तुम्ही आपले समाधान असू देणे."**

*पुण्याचे देशकुलकर्ण वतन राजर्षी घराण्याकडे होते. शिवकालात या घराण्याचा मुख्य कृष्णाजी काशी हा वतनदार कर्नाटकचा सरसुभेदार हरजीराजे महाडीक याच्याकडे कामगिरीवर होता. आपल्या गैरहजरीत आपले वतन कोणीतरी गैरवाका सांगून बळकावील अशी त्यास भीती वाटत होती आणि म्हणून आपले वतन जे अमानत आहे, ते तसेच ठेवावे; ते कोणा भाऊबंदास मोकळे करू नये अशी विनंती तो संभाजी महाराजांना करतो. दूरदेशी राजकीय कामगिरीवर असलेल्या या वतनदाराची विनंती छत्रपती मान्य करून त्याची काळजी या पत्राद्वारे दूर करतात.*

श्री

(स्व) स्तिश्री राज्याभिषेक शक ८ दुर्मती सवत्सरे कार्तिक बहुल द्वादसी मंद्‌वासरे क्षत्रियकुलावतंस सिहा (सना) धीश्वर श्री राजा शंभू छत्रपती स्वामी याणी राजश्री कृष्णाजि कासी यासि आज्ञा केली ऐसी जे- विनंतिपत्र अश्विन वद्य सप्तमीचे पाठविले ते कालीच पावले. ते प्रांतीचे वर्तमान राजश्री (हर) जी राजे माहाडीक यांचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करितो म्हणून कितेक ता।। लिहिले ते तुमच्या लिहिल्याप्रमाणे कलो आले. पुढेहि वर्तमान लिहित जाणे आणि राजश्री हरजी राजे यांचे आज्ञेत वर्तत जाणे व तुमची वृत्त पुणेची आहे ते अमानत केली आहे. त्यास आपले गोत्रजन हुंजूर येऊन गैरवाका सांगोन वृत मोकली करवितील तरी अमानतच असो द्यावी म्हणून लिहिले. तरी तुमची वृत अमानत आहे तैसी आहे. पुढे तुमचा कोणी दाईज हुजूर आला तऱ्ही त्याचे बोले मोकली करायाची आज्ञा होणार नाही. अमानतच आहे. येविसी तुम्ही आपले समाधान असो देणे. जाणिजे.

श्री ।। शंभु भजनोत्कठ मो रेश्वरसुत नी ळकंठ

मर्या

देयं विज

यते

(ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खं. ६, ले.१)

**पत्र क्रमांक : ८** **१३ मार्च १६८२**

**''यात्रा संवरक्षण करणे...''**

*रामदास स्वामींच्या अवतार समाप्तीनंतर सज्जनगड आणि चाफळ येथील देवस्थानांचा धर्मादाय ऐवज पूर्वीच्याच सनदांप्रमाणे पाववून तेथील यात्रांचा उत्सव यथासांग पार पाडावा आणि चाफळ येथील यात्रेच्या प्रसंगी खासा आपण जाऊन यात्रेचे संरक्षण करावे, म्हणून संभाजी महाराजांची कोनेर रंगनाथ या प्रांत सातान्याच्या सुभेदारास आज्ञा-*

[अस्सल मोडी]

श्री

रघुनाथ रामदास

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शक ८ दुंदुभीनाम संवत्सरे अधिक चैत्र शुध पौर्णिमा सोमवासरे क्षत्रियकुलावतंस सिंव्हासनाधीश्वर श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री कोनेर रंगनाथ देशाधिकारी प्रांत सातारा यांसि आज्ञा केली ऐसी जे- श्री स्वामी (नी) सज्जनगडी पूर्णावतार केला तेथे नूतन देवालये करविले आहे (ऐ) सी यासी श्री स्वामीकडील तुमच्या सुबा पहिलेपासून सनद सादर होऊन पावत आले असेली तेणे प्रमाणे पुढे ही साल दरसाल पावबीत जाणे व कसबे चाफल कर्याती नाणेघोल येथे श्री चे देवालये आहे त्यासी मोईन धर्मादाउ व इनाम व (बदल खर्च नित्य पूजा व रथोत्सव

श्री ।।शंभुनर पतिहर्षनिदान मोरे श्वरसुत नीळकंठ मुख्य प्रधान

यात्रा समारंभ यासी पेशजी) सनद सादर आहे त्या प्रमाणें चालत असे तैसे च पुढे ही (साल दर) साल चालवीत जाणे श्री स्वामीने वेदमूर्ति दिवाकर (गो) सावी यांचे स्वाधीन देवस्थानचे पारपत्य केले असे ते चालवितातो तैसे च चालवितील त्यांचे विद्यमाने सदरहु सनदेप्रमाणे पावणे ते पाववीत जाणे व स्थलोस्थलीची सिव्हासनें प्रतिवर्षी लोक आणितातो. दिंडीस खर्च लागतो. तो बहुत हस्ते माहालीहून करून यात्रेचा समारंभ करितातो. तेणे प्रमाणे अगोधर पत्रे पाठवीत जाउनु सिव्हासने आणऊन यात्रेचा उत्सव करीत जाणे व प्रतिवर्षी खासा तुह्मीच यात्रेस जाऊन यात्रा संवरक्षण करून समारंभ संपादीत असता तैसा च आता व पुढे ही संपादीत जाणे.

मर्या
देयं विज
यते

रुजु
सुरु सुद

(श्रीसंप्रदयाची कागदपत्रे, ले. ४५)

**पत्र क्रमांक : ९** **१३ मार्च १६८२ (सु.)**

**''देवाचा महोत्सवविध येथासांग करीत जाणे''**

*रामदास स्वामींच्या मागे सज्जनगड व चाफळ येथील देवांचे उत्सव यथासांग पार पाडीत जावे म्हणून संभाजी महाराजांचे स्वामींचा शिष्योत्तम दिवाकर गोसावी यास पत्र-*

**श्री**

[अस्सल मोडी]

श्री रघुनाथं हनुमंताचे

वेदमूर्ति राजश्री दिवाकर गोसावी प्रति राजश्री संभाजी राजे दंडवत् उपरी श्री स्वामी सजनगडी होते त्यांणी पूर्णावतार केला ते स्थली श्री देवालये करविले आहे. ऐसीयासी श्री स्वामी असता जो समुदाये तेथे होता तो देवालई सेवेसी असो देणे आणि धर्मादाये इनाम सुबांसुबांहून देविला आहे तो बरहुकूम सनद पेशजी प्रमाणे आणऊन देवास व समुदायास पाववीत जाणे आणि येथाविध उत्छवसमारंभ करीत जाणे तैसे च श्री चे देवालये कसबे चाफल कर्याती नाणेघोल येथे आहे तेथील ही धर्मादाये मोईन व इनाम व बदल खर्च नित्य पूजा व रथोत्सवसमारंभ यासी पेसजी सनद सादर आहे तेणे प्रमाणे चालत आहे तेणे प्रमाणे आणऊन देवाचा मोहत्सव विध येथासांग करीत जाणे कोण्हेविसी अंतर पडो नेदणे.

मर्या
देयं विज
यते
सुरु सुद

(श्री संप्रदयाची कागदपत्रे, ले. ४७)

पत्र क्रमांक : १० २ जून १६८२

**''तुम्ही ये घालयेलीत पडावया प्रयोजन नाही.''**

*रामदास स्वामींनी आपल्या मागे चाफळ व सज्जनगड येथील देवस्थानाची व्यवस्था कशी असावी याविषयी मृत्यूपूर्व आज्ञा करून ठेवली होती. तरी सुद्धा त्यांच्या शिष्यांमध्ये अंतस्थ कलह सुरू झाला. उद्धव गोसावी या शिष्याने द्रव्यलोभाने सज्जनगडावर कटकटी निर्माण केल्या. त्याची बाजू जिजोजी काटकर या गडाच्या किल्लेदाराने घेतली. संभाजी महाराजांच्या कानावर या गोष्टी गेल्यावर त्यांनी स्वामींच्या आज्ञेप्रमाणेच सर्व व्यवस्था ठेवली जाईल; राजगृही जाणे येणे दिवाकर गोसावी करतील; तेव्हा या घालमेलीत तुम्हास पडावयास प्रयोजन नाही, अशी सक्त ताकीद या आज्ञापत्राने किल्लेदारास दिली आहे.*

[अस्सल मोडी]

## श्रीरघुनाथ

श्रीरामदास

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८ दुंदुभीनाम संवत्सरे जेष्ट शुध सप्तमी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस सिंव्हासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजश्री जिजोजी काटकर मुद्राधारी सजनगड यांसी आज्ञा केली ऐसी जे श्री स्वामी याणी अवतार पूर्ण केला. त्या अगोधरच आज्ञा केली होती की श्री देव मु।। चांफल याकडील कार्यभाग व राजगृहास जाणे येणे हे वेदमूर्ति दिवाकर गोसावी याणी करावे. श्री स्वामीकडील वीत- विषय असेली त्याचा व्यय देवालया चाफलास करावा. सजनगडी चितास्थानी श्रीहनुमताचे देवालय बांधावे. गडमजकुरी भानजी व रामाजी गोसावी आहेती व स्वामीकडील समुदाये ही आहे तैसा असो द्यावा म्हणून श्री स्वामीची आज्ञा आहे. ऐसे असता उधव गोसावी उगीच द्रव्यलोभास्तव भानजी व रामाजी गोसावी यांसी कटकट करितात. तुह्मीही उधव गोसावी यांसी द्रव्य व पात्रे व वश्त्रे भानजी व रामाजी गोसावी याकडून श्री स्वामीची देवविली ह्मणून कलो आले. तरी तुह्मास ऐसे करावया प्रयोजन काये व उधव गोसावी यासी कटकट (करावया) गरज काये. या उपरी जे जे वस्ताभाव व द्रव्य उधव गोसावी याचे आधीन तुम्ही करविले असेली ते मागते भानजी व रामाजी गोसावी यांचे आधीन करणे. उधव गोसावी यांसी कटकट करून न देणे. श्री स्वामीने पहिलीच आज्ञा करणे ते केली आहे. मुख्य मोहत्सव तो चाफलीच होंत जाईल भानजी व रामाजी गोसावी गडमजकुरी आहेत तैसे असतील. श्रीस्वामीकडील द्रव्य व वस्ताभाव यांचा विचार होणे तो वेदमूर्ति दिवाकर गोसावी यांचे विद्यमाने आह्मास श्रुत होऊन होणे तो होईल. वरकड राजगृही येणे जाणे ते दिवाकर गोसावी च करितील. पहिलेपासूनही हेच करीत आहेत. जाणिजे. तुह्मी याउपरी ये घालमेलीत पडावया प्रयोजन नाही. श्री स्वामीच्या समुदायासी काडीइतके अंतर पडो न देणे व श्री स्वामीचा शिष्यसमुदाये आहे त्याणे उधव गोसावी आदिकरून जेथे जेथे पूर्वी होते तेथे असावे. जाणिजे. तुह्मी या पत्राप्रमाणे राहाटी करवणे. तालीक लिहून घेऊन असल दिवाकर गोसावी यांजवली परतो देणे. जाणिजे.

श्री ।।शंभुनर<br>पतिहर्षनिदान मोरे<br>श्वरसुत नीळकंठ<br>मुख्य प्रधान

मर्या
देयं विज
यते

रुजु
सुरु सुद
पौ।। छ २२ माहे रबिलाखर सु।। आर्बा
समानीन अलफ रत्काक्षी सवस्छरे चैत्र वदी नवमी शनिवार
(श्रीसंप्रदायाची कागदपत्रे. ले.४८)

**पत्र क्रमांक : ११** **३ जानेवारी १६८४**

**"गनिमाचा काय गुमान लागला, बुडविलाच जातो..."**

*स. १६८३ साली औरंगजेबाने मराठ्यांच्या स्वराज्याची इतिश्री करण्यासाठी जंगी मोहीम सुरू केली होती. तिचाच एक भाग म्हणून कोकणपट्टीचा प्रदेश जिंकण्यासाठी त्याने शहाजादा मुअज्जम व शहाबुद्दीनखान या दोन सेनानींना मोठ्या फौजफाट्यासह पाठविले. या संकटाशी मुकाबला करण्यासाठी स्वराज्याचे सैन्यबल वाढविणे आवश्यक होते. असे सैन्यबल वाढविण्यासाठी संभाजी महाराज कसा जिद्दीने प्रयत्न करीत होते, याचा प्रत्यय हे पत्र आणून देते.*

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १० रुधिरोद्गारी संवत्सरे पौष बहुल द्वादस गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस सिव्हासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी देशमुखानी प्रांत वाई यांसी आज्ञा केली अैसी जे सुलतान माजन व शाबदीखान गनीम दोही कडून कोकणात उतरला याप्रसंगे हशमांचे बहुतच प्रयोजन आहे. याकरिता राजश्री संताजी येमाजी सरमिरा + + याला नौ संचणी हशमाचा जमाव करावयाबदल वरघाट प्रांते (पाठ) विले असे. हे तुम्हांला हशमाचे जमावाविशी सांगतील तेण्हेप्रमाणे (ह) शम नौ संचणी करून पाठऊन देणे. हे काम म्हणजे बहुत नाजु (क आहे). या प्रसंगे जरी हशमाचा पोख्त जमाव जाला तरी गनिमाचा काय (गु) मान लागला बुडविलाच जातो. येवढे काम जाल्याने तुमचा बहुतच मजुरा होतो. आजीवरी स्वामीने तुमचे चालदिले ते सार्थक या दिवसात करून आपला मजुरा करून घेणे. हशमाविशई संताजी येमाजी तुम्हाला कितेक सांगतील. तेण्हेप्रमाणे तुम्ही तलाष तरतूद करून हशम पाठऊन देणे. म्हणजे स्वामी तुम्हावरी संतोशी होतील. आपले समाधान असो देणे लि।। प्रा। वर्तणूक करणे. लेखनालंकार.

श्री ।।शंभुनर
पति हर्ष निदान मोरे
श्वर सुत नीळकंठ
मुख्य प्रधान

मर्या।
देयंविज।
यते।

(शिवचरित्रसाहित्य, खं. २, ले. २७१)

पत्र क्रमांक : १२ ३ जानेवारी १६८४

**''उगेच माणूस दिलगीर करावे....हे कोण कारकुनी''**

*कोकणात मोगलांचे जोरदार आक्रमण चालू असता त्याचा प्रतिकार करण्यासाठी सैन्य बळ वाढविण्याचे संभाजी महाराजांचे अविरत प्रयत्न चालू होते. या कामी राज्यातील देशमुखवादी वतनदारांचे मोलाचे सहकार्य अपेक्षित होते. अशा स्थितीत या देशमुखांना नाराज होऊ देण्यात स्वामिकार्याचा नाश आहे, फायदा तर काडीचाही नाही, ही बाब जावळी प्रांताचा सुभेदार विठ्ठल शंकर यांच्या ध्यानात संभाजी महाराज आणून देत आहेत.*

**श्री**

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १० रुधिरोद्गारी (नाम) संवत्सरे, पौष्य बहुल १२ द्वादशी, गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी राजेश्री विठ्ठल शंकर देशाधिकारी प्रांत जावली यांसी आज्ञा केली ऐसीजे- दत्ताजी केशवजी पिसाळ देशमुख तर्फ जोरखोरे यांसी. कैलासवासी स्वामींनी हक्क वतन करून दिल्हे आहे. त्याप्रमाणे हे वर्षास मोईनप्रमाणे चालत आले. हल्ली कुसूर होतो म्हणून कळो आले. तरी हे दिवसात गनीम कोकणात पेशक. या प्रसंगे हशमाचा जमाव करावया देशमुख मशारनिल्हेस आज्ञा केली असे व पुढे कितेक काम यांचे हातून घेणे असता उगेच माणूस दिलगीर करावे आणि स्वामीकार्याचा नाश करावा हे कोण कारकुनी. हे गोष्टीने स्वामीचा तरी फायदा तरी ते कौडीइतकी गोष्ट नाही. ऐसे असता असे करावयास गरज काय. या उपरी तरी देशमुख एकंदर रंजीस न करणे. त्यांचा हक्क जो सालाबादप्रमाणे चालला आहे, तेणेप्रमाणे तुम्हीही चालवणे. कसूर काडीइतकी न करणे. पुढे बोभाट आल्यास स्वामी तुमची भीड धरणार नाहीत. हे नेमस्त समजणे. लेखनालंकार.

(सनदापत्रातील माहिती, पृ. १६१)

पत्र क्रमांक : १३ २३ जून १६८५

**''कृष्णाजी कंकाच्या पुत्रास हशमाचा सुभा''**

*संभाजी महाराजांच्या गोव्यावरील स्वारीच्या प्रसंगाशी संबंधित असे हे महत्त्वाचे पत्र आहे. या स्वारीतील खाडीवरील लढाईत शिवकालातील सुप्रसिद्ध सेनानी येसाजी कंकाचा पुत्र कृष्णाजी कंक जखमी होऊन पुढे मृत्यू पावला. त्याच्या कामगिरीचे चीज म्हणून संभाजी महाराजांनी त्याच्या पुत्रास हशमाचा सुभा दिला.*

**श्री**

श्री। शंभो: शिव। जातस्य मुद्राद्यौ। रिव राजते।। यदं। क स्रेविनो लेखा। वर्तते कस्यनो। परि।

पत्रवतन कृष्णाजी कंक पदाती नायेक सेवक राज्यमंडल शके १२ क्रोधन नाम संवत्सरे आषाढ षुध द्वितीया भोमवासर मानिलेचा बाप कृष्णाजी बिन येसजी कंक यास हशमाची

श्री ।।शंभुनर
पतिहर्ष निदान मोरे
श्वर सुतनीलकंठ
मुख्य प्रधान

हजारी होती. त्यावरी फोंडियाच्या कोटास फिरंगियांनी लगट केला तेव्हा राजश्री स्वामि राजापुरीहून स्वार होऊन फोंडियासि (गे)ले. ते वख्तीं खाडीवरी गनिमासीं गाठी घालून जुंझ बहुतच केले. ते वख्ती जखमा लागोन जरतुर जाला म्हणोन घरास जावया आज्ञा दिल्ही. घरास आलियावरी जखमा फुटोन मयत जाला.त्याचा लेक मानिले त्याचे नाव कृष्णाजीच ठेविले आहे. तीन वरसाचा मूल आहे. त्याच्या नावे सुभा चालवावा आणि लोकाच्या जमावास चाहुजी कंक आहे त्यास कारभारी करून ठेवावा म्हणोन येसजी कंक याणि विनंती केली. त्यावरून स्वामि कृपालु होऊन कृष्णाजी कंक स्वामिकार्यावरी पडला याकरिता याच्या लेकास सुभा दिल्हा आणि लोकांचा जमाव करावा हमेशा चाकरीवरी आसिले पाहिजे म्हणोन चाहुजी कंक शंभर मावलियांत होता तो माकुल पाहोन कारभार चालवावयासि दिल्हा. वेतन दोघास मिलोन करार केले सालिना होन पादशाही निवल —— बेरीज ६००८

येकूण सारे होन प।। रास

कृष्णाजी कंक याच्या पुत्राचे नाव कृष्णाजीच ठेविले आहे त्याची सुभाची आसामी चालवावी चाकरील्याख होये तोवरी घरबैठे देणे सालिना होन पादशाही बेरीज २०० यासि चाकराचा सिरिस्ता नाही. घरबैठी तैनाती द्यावी. पोतदारी मात्र धरावी नान परवेशी सुभा चाहुजी कंक सुभाचा कारभार चालवया हुजरून दिल्हा. त्यास वेतन केले सालिना देखील पालखी होन पादशाही ४००८ बि।।

| | | |
|---|---|---|
| खासा जा | | चाकर १४ यो। |
| तीस होन | १५० | भोई १० यो। |
| २००८ | ३० | दिवटिये २ यो। |
| | २० | अफ्तागिऱ्या व नेजदार |
| | | ना।। २ यो। |
| | २०० | |

येणेप्रमाणे तैनाती केली असे. यासि वजावाट व दंडकप्रमाणे वजा करून उरले वतन घेत जाणे. चाहुजी कंकास चाकराची मोईन केली आहे. त्याची हजरी पाहोन जमा सु।।तील होन मुजरा देणे. कृष्णाजी कंकास दोनीसे होन सालिना केली असेत. त्यास चाकराची रवेस नाही. खासा जातीस घरबैसले द्यावें. पोतदारी रवेसी प्रमाणे धरीत जावी. लेखनालंकार. मर्या। देयंविज। यतें।

तेरीख ३० रजब सु।। सीत समान
बार सुरुसुद बार

(शिवचरित्र साहित्य, खं. २, ले. ३९७)

**पत्र क्रमांक : १४** **५ ऑक्टोबर १६८५**

**''गनिमादेखील तुम्हास कापून काढवीतच आहे''**

*मावळ प्रांतातील सर्जेराव जेधे हा वतनदार मोगलास मिळाला होता. पण त्याला आपल्या कृत्याबद्दल पश्चाताप होत होता. त्याला स्वराज्याच्या सेवेत यायचे होते; तथापि छत्रपती समोर जाण्याचे धाडस त्यास होत नव्हते. तेव्हा त्याने आपली विनंती विचित्रगडच्या*

*किल्लेदाराच्या मार्फत संभाजी महाराजांकडे धाडली. त्या विनंतीस संभाजी महाराजांनी पाठविलेले हे खरमरीत उत्तर त्यांच्या प्रशासकीय व्यक्तिमत्वावर प्रकाश टाकते.*

**श्री**

स्वस्ति श्री राज्याभिषेकशक १२ क्रोधन नाम संवत्सरे आश्विन बहुल त्रितीया इंदुवासरे क्षत्रियकुलावतंश सिंव्हासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी सर्जाराऊ जेधे यांसि आज्ञा केली ऐसी जे. तुह्मी संताजी निंबालकर मुद्राधारी विचित्रगड यासि पत्र लेहून आपला मुद्दा सांगोन पाठविला की आपला भाऊ शिवजी जेधा याणे हरामखोरी करून सिरवळास गेला. त्याणे आपली गुरे ढोरे वळुनु नेली. पुढे आपणासं बरे पाहाणार नाही. या बदल आपण हि उठोन सिरवळास आलो आहे. ऐसियासि आपण राजश्री स्वामीच्या पायाजवळी एकनिष्ठच आहे. स्वामी कृपाळु होउनु आपले वतन देसमुखी आपले स्वाधीन करतील आणि अभयपत्र सादर होईल तरी आपण शेवेस एउनु एकनिष्ठ होउनु शेवा करीन ह्मणून. तरी तुमचा मुद्दा मा।इले हवालदार एही स्वामीचे शेवेसी हुजूर लिहिला. त्यावरून कळो आला. यावरून हे आज्ञापत्र तुह्मास लिहिले आहे. तरी आधी तुह्मीच संरासरी हरामखोरी केली की वतनदार होउनु इमाने इतबारे वर्तावे ते गोष्ट न करिता स्वामींचे अन्न बहुत दिवस भक्षिले त्याचे सार्थक केलेत की स्वामीच्या पायासी दुर्बुद्धि धरून दोन दिवसांचे मोगल त्यांकडे जाउनु राहिलेस. तुमचा भाऊ शिवजी गनीमाकडे गेला. तो तुह्मास बरे पाहे ना ऐसे होते तरी तुह्मी स्वामिसन्निध हुजूर यावे होते. ह्मणिजे तुमचे इतबारपण कळोन एकनिष्ठता कळो एती. ते केले नाही. तरी बरीच गोष्ट जाली. या उपेरीहि गनीमाकडे राहाणेच असेली तरी सुखेच राहाणे. तुमचा हिसाब तो काय आहे. ए क्षणी स्वामी आज्ञा करितात तरी गनीमा देखिल तुह्मास कापून काढवीच आहेत हे बरे समजणे. दुसरी गोस्ट की तेथे राहाणेच नाही. एकनिष्ठेने स्वामीच्या पायाजवळी वर्तावे ऐसे असेली तरी तुह्मी परभारे मुद्दे सांगोन गडकिलीयाकडे राबिते काय ह्मणून करिता. हे गोस्ट स्वामीसं मानत नाही. जो राबिता करणे तो स्वामीकडेच करून हुजूर वर्तमान लेहून पाठवावे. स्वामी तुमचा मुद्दा मनास आणून आज्ञा करायाची ते करितील. तरी ऐसी गोस्ट करावया प्रयोजन नाही. हुजराती खेरीज दुसरियाकडे एकंदर राबिता न करणे.जे वर्तमान लिहिणे ते स्वामीस लिहीत जाणे. तुमचे ठाइं एकनिष्ठताच आहे ऐसे स्वामीस कळलियावरी जे आज्ञा करणे ते करून आज्ञापत्र सादर होईल. तेणे प्रमाणे वर्तणूक करणे. लेखनालंकार.

श्री ॥ शंभु
भजनोत्कठ मो
रेश्वरसुत नी
ळकंठ .

रुजू
रवाना छ ३ जिल्हेज
सुरू सूद

(मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. १५, ले. ३४२)

**पत्र क्रमांक : १५** — २ नोव्हेंबर १६८५

**''तुम्हीही साहे करून श्री चा मोहोत्छाव होये ते करणे''**

*का।। चाफळ येथील देवस्थानचा प्रतिवार्षिक महोत्सव समर्थशिष्य दिवाकर गोसावी*

*सनदेप्रमाणे चालवतील; त्यांना आवश्यक ते साहाय्य करावे म्हणून संभाजी महाराजांचे कविकलशास आज्ञापत्र ———*

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १२ क्रोधननाम संवत्सरे कार्तिक बहुल द्वितीया इंदुवासर क्षत्रियकुलावतंस सिंव्हासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी यांणी समस्त राजकार्येधुरंधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री कवी कलश छेदोगामात्ये यांसि आज्ञा केली ऐसी जे- कसबे चाफल ता। कराड येथे श्री  यांचे निर्मितस्थानला देवालय आहे. त्यासि द्यावयाची मोईन पेसजीच करून सनदा दिल्या आहेत. त्याप्रमाणे प्रतिवर्षी पाउनु श्री  चा मोहत्छाव चालवावा त्याप्रमाणे राजश्री दिवाकर गोसावी चालवीत आहेत. ऐसे असता मधे उधव गोसावी येऊन कितेक घालमेली केली. ऐसीयास त्याकडील पूर्वील वृत्तांत अवघा तुह्मास ठावकाच आहे. ह्मणून उधव गोसावी यासि माघें नसते कथले करावयास संमध नाही. याकरिता त्यासि येऊन निरोप दिल्हा आणि प्रतिवार्षिक उत्छाव जो करणे व चालवणे तेविसई राजश्री दिवाकर गोसावी पूर्वी चालवीत असतात तैसेच पुढेही चालवावयाची अज्ञा केली असे. त्याप्रमाणे ते चालवितील. त्यास द्यावयाची मोईन आहे त्येही पावेल. यास तुह्मीही साहे करून श्री  चा मोहोत्छाव होये ते करणे. बहुत लिहिणे तरी तुह्मी शुज्ञ असा.

मर्या<br>
देयं विज<br>
यते

(श्रीसंप्रदयाची कागदपत्रे, ले. ६१)

पत्र क्रमांक : १६ — २ नोव्हेंबर १६८५

**"फितवा करील त्यासि वरजोर ताकीद करणे."**

*उंबरज तर्फेतील शहापूर या गावी असलेल्या श्री हनुमान मंदिराच्या व्यवस्थेसंबंधी संभाजी महाराजांनी साताऱ्याच्या सुभेदारास लिहिलेले हे आज्ञापत्र राजांच्या कारभारातील बारकाव्यावर प्रकाश टाकते.*

[अस्सल मोडी]

श्री

रामदास हनमंता

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १२ क्रोधननाम संवत्सरे कार्तिक बहुल द्वितीया इंदुवासर क्षत्रियकुलावतंस सिंव्हासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी (राजश्री) आंबाजी मोरदेऊ

श्री ॥ शंभु
भजनोत्कठ मो
रेश्वरसुत नी
ळकंठ

देशाधिकारी प्रांत सातारा यांसि आज्ञा केली ऐसी जे- शाहापुर ता। उंबरज येथे श्री यांचे मठासंनिध श्री चे देवालय आहे. तेथे पुजारी असतो, त्याणी देवाची सेवा करावी आणी शाहापुरी गोसावीयाचे (रामदास स्वामींचे) इनाम आहे त्यापैकी जे द्यावयाचे ते रा। दिवाकर गोसावि यांही द्यावे. ऐसे असता शाहापुरचे देवालयचा पुजारी मौजे वाहगाउ येथे जाउनु कृष्णाजी पाटेल मौजी वागांव याचे पाठीस रिघोन शाहापुर खोती केले आहे आणि मौजे मजकुरी गोसावीयाचे इनाम आहे ते उत्पन सारे कृष्णाजी पाटेल व तो पुजारी यैसे भक्षून बैसले. पुजारी देवाची सेवाही करीत नाही ह्मणून कलो आले. तरी पुजारीयाला कृष्णाजी पाटलाची पाठी रिघावयासि गरज काये. याउपरी तुह्मी हे मनास आणून मौजे शाहापुरपैकी गोसावीयाचे जे इनाम असेल ते सारे उत्पन वेदमूर्ति दिवाकर गोसावी यांचे स्वाधीन करणे. श्री चे देवालय पुजारी येउनु सेवा करील त्याची चाकरी मनास आणून जे मोईन द्यावयाची आहे तेणे प्रमाणे रा। दिवाकर गोसावी त्यासि देतील. परंतु मधे कोण्ही कुसूर करून हरकत फितवा करील त्यासि वरजोर ताकीद करणे. कृष्णाजी पाटेलाने जितके वरुसे इनाम खादले असेल त्याची बेरीज करून त्यापासुनु घेऊन गोसावीयांसि देणे. श्री चे कार्यास कोण्ही नसते कथले करील त्यासि बरी ताकीद करीत जाणे. जाणिजे. व कसबे परेली येथे श्री कडील काही त्रुण व कास्टाची मोईन आहे त्याप्रमाणे तुह्मी ही पावीत जाणे तुह्मी यात्रेस येउनु प्रतिवर्षी प्रमाणे मोहत्छाव करीत जाणे. अंतर पडो नेदणे. जाणिजे. लेखनालंकार.

रुजु
सुरु सुद

मर्या
देयंविज
यते

(श्रीसंप्रदयाची कागदपत्रे, ले. ६२)

**पत्र क्रमांक : १७** **२ नोव्हेंबर १६८५**

**''श्रीचे कार्यास हैगै कराया तुम्हाला गरज काय?''**

*का॥ चाफळ येथील देवस्थानाच्या व्यवस्थेसंबंधी प्रती वर्षी ठरावीक ऐवजाची नेमणूक छत्रपतींकडून सनदेनेच झालेली होती. पण कऱ्हाड प्रांतीचा सुभेदार रंगो विश्वनाथ हा देवस्थानास ऐवज पावता करण्याच्या कामात खळखळ करून अडचणी निर्माण करीत होता. तेव्हा त्यासंबंधीची तक्रार संभाजी महाराजांकडे येताच त्यांनी सुभेदारास खडसावून पाठविलेले हे ताकीद पत्र.*

[अस्सल मोडी]

श्री

रघुनाथ

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १२ क्रोधननाम संवत्सरं कार्तिक बहुल द्वितीया इंदुवासर

क्षत्रियकुलावतंस सिंव्हासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी यांणी राजश्री रंगो विस्वनाथ

श्री ।। शंभु
भजनोत्कठ मो-
रेश्वरसुत नी-
ळकंठ

देशाधिकारी प्रांत कराड यांसी आज्ञा केली ऐसी जे - श्री दे(व) मु।। कसबे चाफल यांकडील यात्रेचे व नंदादीप व लिहिणार व अफराद यांचे वेतनाची मोईन करून येकंदर सनद पेसजी सादर आहे. त्याप्रमाणे ऐवज वर्षास स्वामीने देविला आहे. तो ऐवज तुह्मी पावीत नाही. श्री चे कार्यास खलखल करिता. गाऊगाव वराता करून देता. येथून ऐवज पावत नाही ह्मणून कलो आले. तरी श्री चे कार्यास हैगै करा(या तु) म्हांला गरज काय. जो ऐवज देविला तो बिलाकुसुर पावता करावा ते(गोष्टी) तुह्मी करीत नाही. याकरिता हा रोखा सादर केला असे. तरी पेसजी सनदप्रमाणे जे द्यावयाची मोईन करून दिल्ही आहे त्या ऐवजाचा रोखा येकच गावावरी सरस ऐवज पाहून नेमून देणे. ह्मणजे तेथून बिला कुसुर ऐवज पावेल. श्री चा मोहोछाव यात्रासमारंभ येथासांग घडोन येईल,(तरी) हें जाणून कसबे चाफल मौजे सिगणवाडी येथे सारे ऐवजाची वरात करून (सर्व गावां)चा ऐवज तेथे पावेल. उरला ऐवज दिवाणात उसुल घेणे याचे ऐव(जात) नून होईल तरी अणीखे जागा ऐवज देउनु झाडियानसी पावता करणे. यात्रे(म)धे कोण्ही दिवाण लोक येताती. ते वाणीयाजवलुनु उचापती करितात. ते धा(स्ती)ने यात्रा मोडो पाहते तरी ऐसी गोष्टी न करणे. उचापती यात्रेमधे येकदर ने (कर)णे. पहिले ज्याकडे उचापती असेल त्या कडून रोख पैके पावते करणे. श्री चा मोहोछाव तुह्मी जाउनु करवीत जाणे. जाणिजे. या पत्राची तालीक लिहून घेऊंन असल पत्र वेदमूर्ति दिवाकर गोसावी याजवल परतोन देणे. जाणिजे. लेखनालंकार

मर्या
देयं विज
यते

रुजु
सुरु सुद बार
(श्रीसंप्रदयाची कागद-पत्रे, ले. ६०)

**पत्र क्रमांक : १८**

**४ ऑगस्ट १६८७**

**"जो धामधूम करील त्याला स्वामि जिवेच मारितील."**

*चिंचवडच्या देवस्थानास आपल्या अधिकाऱ्यांकडून आणि लष्कराकडून उपद्रव होतो, अशी तक्रार आल्यावर संभाजी महाराजांनी त्यांना या हुकुमाद्वारे जाहीर समज दिली आहे. देवस्थानाच्या बाबतीत कोणी गैर्वर्णूक केल्यास त्याचा मुलाहिजा होणार नाही, स्वामी त्यास जिवानिशी मारतील, अशा कडक शब्दात ही समज आहे.*

**श्री**

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १४ प्रभवनाम संवत्सरे श्रावण शुद्ध षष्ठी गुरुवासरे क्षत्रिय

कुलावतंस सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी याणी सुभेदारांनी व जुमलेदारांनी व कारकुनानी व हवालदारांनी व बारगिरानी व अफरादानी व बाजेलष्कर व हुजरात व सुभेहाय व हशम यासी आज्ञा केली ऐसीजे- मौजे चिंचवड प्रांत पुणे हा गाव श्री देव याकडे चालतो. तेथे आपल्याला काही उपद्रव देऊ नये अशी पहिल्यापासून स्वामींची आज्ञा. असे असता तुह्मी रहदारीस नाहक दरफ्ती करिता. मौजे मजकुरी उपद्रव देऊन धामधूमही करिता. रयतीकडून गैरसनदी मनास येईल ते मागत होता. ह्मणोन कळो आले. तरी या गावी तुह्माला धामधूम कराया काय गरज. हे ढंग स्वामीस कैसे मानो पाहतात. याउपरी ही बदराहा वर्तणूक केलीया तुमचा एकंदर मुलाहिजा होणार नाही.जो धामधूम करील त्याला स्वामी जिवेच मारितील. हे जाणून मौजे मजकुरास तसदी न देणे. बोभाट येऊ न देणे. ताकीद असे. जाणिजे. लेखनालंकार.

श्री॥ शंभु
भजनोत्कंठ मोरे.
श्वरसुत नीळकंठ.

मर्यादेयं
विजयते.

(सनदापत्रांतील माहिती, पृ. १६६)

**पत्र क्रमांक : १९** **२२ ऑगस्ट १६८७**

**''धर्मकार्यास खलेल न करणे.''**

*क॥ निंब प्रांत वाई येथील सदानंद गोसावींच्या मठास शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीपासून दरसाल ठरावीक ऐवजाची नेमणूक होती. तथापि सरकारी अधिकाऱ्यांकडून मठास ही नेमणूक पावती करण्यात हयगय होत असते अशी तक्रार येताच संभाजी महाराजांनी वाई प्रांताच्या सुभेदारास पाठविलेले आज्ञापत्र —*

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक १४ प्रभवनाम संवत्सरे श्रावण बहुल दशमी सोमवासरे क्षत्रिय कुलावतंस सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी राजश्री येसाजी मलार देशाधिकारी व देशलेखक प्रांत वाई यासि आज्ञा केली ऐसीजे- मठ श्री सदानंद गोसावी मो। कसबे निंब प्रां। वाई यासि मठमजकुरी अनछत्राबदल ऐवज पेशजी कैलासवासी स्वामीच्या वेळेपासून चालिला आहे. स्वामीनेही तेण्हेप्रो। ऐवज द्यावयाची आज्ञा केली होती. परंतु सांप्रत कारकून पाववावयास हैगै करितात ह्मणून राजश्री आनंदगिरी गोसावी मो। मठमजकूर याणी लिहिले त्यावरून कळो आले. तरी पहिलेपासून अनछत्र चालिले असता मधे ऐवजाबाबे कुसूर करावया काय गरज. याउपरी तऱ्ही ऐवज पाववावया बाबे सुस्ती न करणे. पहिलेपासून द्यावयाचा मोईन असेल तेण्हेप्रो। पाववीत जाऊन अनछत्र चालो देणे. धर्मकार्यास खलेल न करणे. जाणिजे. अनछत्राचा मामला पूर्वीपासून ता॥ सालगुदस्ता

श्री॥ शंभु
भजनोत्कंठ मो
रेश्वरसुत नी
ळकंठ

चालिला असेल ते मनास आणून त्याप्रमाणे चालवणे. उजूर न करणे. लेखनालंकार.

मर्या
देयं विज
यते

सुरु सुद बार

(मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. १५, ले. १४९)

**पत्र क्रमांक : २०** **ऑगस्ट-सप्टें. १६८७ (सु.)**

**"धर्माच्या कार्यास अंतर पडणार नाही."**

*आपल्या मठाच्या अन्नछत्रासाठी सरकारातून जो ऐवज पावता होणे तो प्रतिवर्षी वाईच्या सुभेदाराकडून पावता केला जाईल; धर्मकार्यास अंतर पडणार नाही, म्हणून संभाजी महाराजांचे का।। निंबच्या आनंदगिरी गोसावी यांना पत्र —*

**श्री**

तपोनिधी राजमान्य राजश्री आनंदगिरी गोसावी मो। मठ का।। निंब प्रांत वाई प्रती राजश्री संभाजी राजे उपरी तुह्मी पत्र पाठविले पावोन अभिप्राय कळो आला. अनछत्रास ऐवज पहिलेपासून हा कालपर्यंत पावत आला. परंतु सांप्रत देशाधिकारी ऐवज पाववावयास हैगै करितात तरी ऐवज पावेसा केला पाहिजे ह्मणून लिहिले. त्यावरून देशाधिकारी प्रांत वाई यास आज्ञापत्र सादर केले असे. ते पाववणे. याउपरी ते तुह्मास पहिलेपासून पावत आले असेली तेण्हेप्रो। पावते करितील. धर्माच्या कार्यास अंतर पडणार नाही. तुह्मी भवनगिरी गोसावी याजवळी श्रीचा प्रसाद देऊन पाठविला तो स्वामीस पावोन वंदिला. निरंतर आपणाकडील कुशल वर्तमान लिहीत जाणे. बहुत काय लिहिणे.

मर्या
देयं विज
यते

(मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं.. १५ ले. १५०)

**पत्र क्र.: २१** **२२ मार्च १६८८**
(शिलालेख)

**"आता हे हिंदुराज्य जाहाले..."**

*संभाजी महाराजांच्या कारकीर्दीतील गोमंतक परिसरातील हडकोण (फोंडा) या ठिकाणी*

*असणारा हा एक दुर्मिळ शिलालेख. यात व्यापारी मंडळीकडून घेतला जाणारा ''अंगभाडे'' हा कर माफ केल्याचे नमूद केले आहे. शिलालेखात मराठी अंमलास ''हिंदुराज्य'' असे संबोधिले आहे, ही गोष्ट लक्षणीय म्हटली पाहिजे.*

[येथे माथ्यावर सूर्य, अष्टदलकमल व चंद्र यांच्या आकृती कोरल्या आहेत.]

**श्री गणेशाय नमः।** श्री रामाय

श्री लक्ष्मी प्रसन्न।। स्वस्ति श्री नृप शालीवाहन शके १६१० वर्ष वर्तमान विभवनाम संवत्सर चैत्र शुध प्रतपदा गुरुवासर गोमंतक प्रांत अनंतउर्ज देश (अंत्रुज) क्षत्रियकुलावतंस राजा शंभु छत्रपति यांचे आज्ञानुवर्ती राजश्री धर्माजी नागनाथ मुख्य देशाधिकारी प्रांत मामले फोंडा या प्रति तिम नायकाचे पुत्र साम नायक याहि विनंति केली जे पुर्वि मुसलमानाच्या राज्यामध्ये तरि अनंतउर्जेसि लोकास आंगभाडे घेत नव्हते. तेणेकरून व्यावहारिक लोके सुखे येत. तेणेकरून राजगृहि हासिल होय. आता हे हिंदु राज्य जाहालेपासोन आंगभाडे घेऊ लागले. तेणेकरूनि राजगृहि हासिलासि धका बैसला. त्यासि ते कृपाळू होऊन आंगभाडे दडुवा अर्धकोसी चौदा दुडु घेत आहेति मना करावे पण काहि राजगृहि आदाय होईल ऐसि विज्ञापना केली ते प्रमाण जाणुन भाणस्तरि व पारवगवि व मांदुस कुंडैचि येथील आंगभाडे सोडिले. पुढे याप्रमाणे सकळहि चालवावे. सहसा धर्मकृत्यास नाश करू नये. कर्तिल त्यासि महापातक आहे. (संस्कृत श्लोक) या धर्मकार्यास समस्ति मान देवावे.

[भा.इ.सं.मं., वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, पृ.२१२]



परिशिष्ट क्र.६



छत्रपती संभाजीमहाराज

**हिंदवी स्वराज्याचे दुसरे छत्रपती**

(डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांच्या सौजन्याने)

छत्रपती संभाजीमहाराजांची राजमुद्रा



छत्रपती संभाजीमहाराजांची मर्यादा



छत्रपती संभाजीमहाराजांची नाणी





छत्रपती संभाजीमहाराजांचे हस्ताक्षर

॥ मतं मे श्रीशिवराजपुत्रस्य श्रीशंभुराज ॥
॥ छत्रपतेः यदत्रोपरिलेखितं ॥ श्री ॥ श्री ॥

( छत्रपती संभाजीमहाराजांच्या नाण्यांची छायाचित्रे श्री. संजय गोडबोले यांच्या सौजन्याने )